# नाटिकानवरत्नहार

( १ ) प्रेमदेवता, ( २ ) पूर्ण स्वातंत्र्य, ( ३ ) घटस्फोट, ( ४ ) कुमारी १९३१, ( ५ ) आई, ( ६ ) तरुण पिढी, ( ७ ) प्रीतिविवाह, ( ८ ) मुलींचं कॉलेज, ( ९ ) पुणेरी जोडा

## या नऊ नाटिकांचा संग्रह


— लेखक —

अनंत हरि गद्रे

( सं. स्वराज्य-सुंदरी, वीरकुमारी, माझा देश, भवानी तलवार, कर्दनकाळ, मूर्तिमंत सैतान, आर्य महिला इ. नाटकांचे नि नऊ नाटिकांचे कर्ते )



आवृत्ति पहिली

१ जानेवारी १९४२

मूल्य २॥रु.

# 'अच्युता'च्या चरणीं !



स्वदेश, स्वभाषा नि स्वधर्म यांची सेवा, स्वतःच्या मनोवृत्तीशीं अप्रामाणिकपणानें न वागतां, निर्भयपणें, झीज सोसून नि निर्भीडपणें कशी करावी हें शिकविणाऱ्या माझ्या सद्गुरूच्या चरणीं—कै. देशभक्त, साहित्यसूर्य अच्युत बळवंत कोल्हटकरांच्या चरणीं–मी लिहिलेल्या नऊ नाटिकांचा हा संग्रह भक्तिभावानें सादर करीत आहें.

१९३० सालीं मी माझी पहिली नाटिका 'प्रेमदेवता' बालमोहन नाटक मंडळीसाठीं लिहिली आणि या नाटिकेच्या द्वारें नाटिकासंप्रदायाला प्रारंभ केला. हा प्रारंभसमारंभ कै. अच्युतरावांच्याच हस्तें दि. १ ऑगस्ट १९३० रोजीं सायं. ६॥ वा. मुंबई येथील बॉम्बे थिएटरांत झाला. १ ऑगस्ट हा दिवस राजकीय क्षेत्रांत क्रांतिकारक गणला जातो. याच मुहूर्तावर अच्युतरावांच्या वरद हस्तानें या क्रांतिकारक संप्रदायाची मुहूर्तमेढ रोवली गेली हा अपूर्व योगायोग होय. १ ऑगस्ट १९३० पासून १ ऑगस्ट १९३१ पर्यंत एका वर्षांत एकंदर सात नाटिका मी लिहिल्या आणि त्या रंगभूमीवर येऊन चढत्या लोकप्रियतेनें गाजल्या. यांपैकीं पहिल्या सहा नाटिकांचे प्रयोग अच्युतराव जिवंत असतांनाच झाले. पण माझ्या नि देशाच्या दुर्दैवानें १५ जून १९३१ रोजीं त्यांचें देहावसान झालें. पण या नाटिकांना जें सुयश लाभलें तें अच्युतरावांच्या आशीर्वादानेंच लाभलें अशी माझी श्रद्धा आहे आणि म्हणूनच हा ग्रंथ प्रकाशित करतांना मला त्यांचें पुण्यस्मरण होत आहे.

१ ऑगस्ट १९३० या दिवशीं पहिली नाटिका 'प्रेमदेवता' बालमोहनच्या रंगभूमीवर आली नि लगेच त्याच महिन्यांत दि. २३ रोजीं दुसरी 'पूर्ण स्वातंत्र्य' हीहि नाटिका त्याच रंगभूमीवर अवतीर्ण झाली. दोन्ही नाटिका इतक्या यशस्वी झाल्या की, दुसऱ्या महिन्याच्या प्रारंभीं म्हणजे ५ सप्टेंबर या दिनांकीं मुंबईस जें महाराष्ट्र नाट्यसंमेलनाचें २५ वें सुवर्णाधिवेशन झालें, त्याचें अध्यक्षपद मला देण्यांत आलें. मला लाभलेला हा थोर मान नाटिका–संप्रदायाच्या यशाचें एक स्पष्ट गमक असल्यामुळेंच त्याचा मी येथें उल्लेख करीत आहें.

मीं पहिली नाटिका लिहिली तत्पूर्वी नाट्याचार्य वरेरकरादींनीं छोटीं नाटके लिहिलेली होती व तसा स्पष्ट उल्लेख माझ्या पहिल्या नाटिकेच्या प्रस्तावनेतच मीं केला आहे. पण त्या नाटकाचा उल्लेख त्रुटित नाटक असा आढळतो. शिवाय, अशा छोट्या नाटकाच्या द्वारे एकादा नवा सप्रदाय निर्माण करण्याचाहि त्याचा उद्देश नव्हता. मीच माझ्या छोट्या नाटकाना 'नाटिका' हे नाव दिले आणि त्या सप्रदायाच्या वाढीसाठीं १५ नोव्हेंबर १९३१ रोजी मुबई नाटिका सगीत मडळी, नटवर्य नानाराव चापेकर, श्री. श्रीपतराव उपरे, श्री. दामुअण्णा जोशी, श्री. भाई सामत नि शिंदे मास्तर ( कवि मिलिदमाधव ) याच्या सहकारितेने, स्थापन केली नि अखिल महाराष्ट्रात गाजविली. हे सर्व येथें सागण्यातील हेतु हा की, मी एक विशिष्ट ध्येय डोळ्या-पुढे ठेवून हेतुपूर्वक 'नाटिका' हें नाव प्रचलित केले आणि केवळ एवढ्याच कारणाने मी स्वत:ला नाटिकासप्रदायप्रवर्तक म्हणवून घेत असतो. यात छोटीं नाटकें लिहिणाऱ्या इतर लहानथोर नाट्यलेखकास कमीपणा चिकटविण्याची हीन बुद्धि मुळीच नाही. मी इतकेच म्हणतो कीं, मी एका विशिष्ट हेतूने नाटिकासप्रदायप्रवर्तनाचें जे कार्य केले ते नाट्यदेवतेच्या दप्तरात रूजू असावे ! असो.

जे त्या वेळच्या नाटकाचे तत्र होते तेच मी माझ्या नाटिकातहि पूर्णत्वाने अवलबिलेलें आहे. फरक इतकाच की, त्या वेळच्या नाटकप्रयोगाना कमींत कमी ४।५ तास लागत ते कमी करून नाटिकाचे प्रयोग २।२॥ तासावर आणले. नाटिका लिहिताना मी सर्व रसाचा शक्य तितका परिपोष करण्याची खबरदारी मात्र घेत असे. २।२॥ तासात सुद्धा माझ्या नाटिकामुळे प्रेक्षकाची भरपूर करमणूक होत असे. नाटिकाच्या प्रयोगात सगीतालाहि भरपूर वाव देण्यात येई. सुखान्त, दु:खान्त, हास्यरसपरिपोषक अशा सर्व तऱ्हा माझ्या नाटिकात आढळतात. थोडक्यात सागावयाचे म्हणजे बोलपटाच्या चढाओढींत यशस्वी रीतीने टिकाव धरतील अशाच माझ्या नाटिका होत्या. पूर्ण मनोरजन, सर्वांगीण रसपरिपोष पण थोड्या वेळात प्रयोगीकरण या सर्व गोष्टी माझ्या नाटिकानी साधून दाखविलेल्या आहेत.

म्हणूनच, आठवड्यातून ओळीने १०।१० नि १२।१२ प्रयोग होत असताहि माझ्या नाटिकाना नाट्यरसिकाचा अभाव भासला नाहीं. सर्व नाटि काना प्रेक्षकाचा भरपूर आश्रय मिळे. बोलपटाची माहिनी ज्याच्यावर पडली

होती ते सिनेमारसिकहि माझ्या नाटिकांच्या प्रयोगांना उत्साहानें नि उल्हासानें गर्दी करून सोडीत असत.

या सर्वच नाटिकांचे प्रयोग अखिल महाराष्ट्रांत शेंकड्यांनीं झालेले आहेत. मुंबईत एकेका नाटिकेचे ओळीनें नि अखंडपणें निदान पन्नासांवर प्रयोग होत असत. 'कुमारी १९३१' या नाटिकेचे तर मुंबईस अखंडपणें १०१ प्रयोग झाले. सिनेमाच्या भाषेंत सांगावयाचें तर ही नाटिका अखंडपणें, एकाच वेळीं, एकाच नाटकगृहांत १० आठवडे चालली. इतर नाटिकांचेहि कमीअधिक प्रमाणांत असेच प्रयोग झाले. उमरावती येथेंसुद्धां ७ दिवसांत 'आई' नाटिकेचे ओळीनें १४ प्रयोग झाल्याचें वृत्त अनेकांच्या स्मरणांत असेल !

सणावारीं बोलपटांचे ४।४ नि ५।५ प्रयोग होत असतात. तोहि प्रयोग मी करून पाहिला होता. एकदां आषाढी एकादशीच्या दिवशीं मुंबई नाटिका सं. मंडळीचे सकाळपासून मध्यरात्रीपर्यंत ओळीनें ५ प्रयोग झाले तरीहि त्यांना प्रेक्षकांची वाण पडली नव्हती.

पहिल्या एका वर्षांत मी सात नाटिका लिहिल्या नि त्यांचे प्रयोग मुंबईला केले. त्यानंतर नाटिका मंडळी महाराष्ट्रांत फिरतीवर गेली. ही मंडळी १९३२ सालीं अन्य कारणांमुळें नागपुरास बंद करणें भाग पडलें. ८ व ९ या नाटिका १९३३ व १९३४ सालीं माझे सहकारी श्री. नानाराव अभ्यंकर यांनीं आपल्या मित्र–मण्डळीच्या सहकारितेनें स्थापिलेल्या नूतन नाटिका सं. मंडळीच्या रंगभूमीवर आल्या. पण त्यांतहि गंमत ही की, ९ व्या नाटिकेचा प्रसिद्धिदिन १ ऑगस्ट १९३४ हाच आढळतो. म्हणजे १ ऑगस्टला पहिली नाटिका प्रसिद्ध झाली आणि ४ वर्षांनीं त्याच दिनांकीं ९ वी नाटिकाहि प्रसिद्धि पावली.

या नाटिका मीच लिहिल्या आणि त्यांचा संप्रदाय लोकप्रिय व्हावा म्हणून मीच अनेक संकटें सोसून त्या रंगभूमीवर गाजविल्या. या कामीं मला काय काय संकटें सोसावीं लागलीं तें मात्र मी येथें सांगत नाहीं. अथवा, तें सांगण्यांत लाभ तरी कोणता ? शिवाय, स्वतःच्या सोशिकपणाच्या कहाण्या रंगवून लोकांमध्यें कींव निर्माण करण्याचीहि संवय मला नाहीं.

विशिष्ट ध्येयानें लिहिलेल्या नाटिकांचे प्रयोग शेंकड्यांनीं होऊं लागतांच इतर महाराष्ट्रीय नाटक मंडळ्यांनींहि नाटिकांचे प्रयोग सुरू केले. गुजराथी

नाटिका करण्यासाठी १९३१ साली एक गुजराथी नाटक मण्डळीहि निर्माण झालेली मला स्मरते.

माझ्या नाटिकाना महाराष्ट्रीयाप्रमाणेच गुजराथी प्रेक्षक समाजहि मोठ्या प्रमाणात लोटत असे. 'कुमारी'पासून नाटिकेच्या पुस्तकाला गुजराथी 'टुक सारा'ची व इग्रजी 'सिनॉप्सिस'ची जोड द्यावी लागत असे हें, ज्याच्यापाशीं त्यावेळची पुस्तके असतील त्याना प्रत्यक्षच पहाता येईल. शिवाय, काहीं नाटिकाचीं गुजराथीत भाषातरेंहि झालेली आहेत.

या नऊ नाटिकापैकी काही नाटिकाच्या अनेक आवृत्त्या प्रसिद्ध कराव्या लागलेल्या आहेत. बऱ्याच नाटिकाचीं पुस्तके आज मिळत सुद्धा नाहीत. या सग्रहासाठी मलाहि काहीं नाटिकाची पुस्तके महत्प्रयासाने पैदा करावी लागलीं.

नटवर्य नानाराव चापेकर हे तर या नाटिकासप्रदायाचे आधारस्तभच होत. पडितराव नगरकरास नगर येथे 'सगीतकोहिनूर' ही पदवी मिळाली ती नाटिकातून कामे करू लागल्यावरच ! कु. राम आपटे हा ४॥ वर्षे वयाचा असतानाच 'प्रेमदेवता' नाटिकेत चमकला आणि लौकरच 'जॅकी कूगन' या पदवीने विभूषित झाला. 'प्रीतिविवाह' नाटिकेमुळे श्री. पालव याना 'बस्टर कीटन' ही पदवी लाभली श्री. नानाराव अभ्यकर, आग्रे, वैद्य, वाळके, निमकर, अतरकर, सगीतरत्न पाटणकर इ. होशी नटानीहि नाटिकातून उत्तम कामे करून उत्कृष्ट कीर्ति मिळविली. अशा एक ना दोन, पाच पन्नास गोष्टी सागून नाटिकासप्रदायाने मिळविलेले यश वर्णिता येईल. पण तो विस्तार मी करीत नाही. मी इतकेच सागतो की, या नाटिकासप्रदायाच्या द्वारे ८।१० वर्षापूर्वी मी स्वदेश, स्वभाषा नि स्वधर्म याची सेवा कष्टपूर्वक केलेली आहे.

या सप्रदायाचे महत्त्व आजच्या पिढीलाहि ज्ञात व्हावे म्हणून हा नऊ नाटिकाचा सग्रह मी प्रसिद्ध करीत आहे. कागदाची व छपाईची इतकी महर्गता झाली असताहि हा ३५० पेक्षा अधिक पृष्ठाचा ग्रथ मी अत्यल्प मूल्यात म्हणजे केवळ २ रुपयात वाचकाना देत आहे. या प्रकाशनाने मला पैशाच्या दृष्टीने बरीच चाट बसेल हे मी जाणतो. पण आज येथें भरत असलेल्या नाट्यसमेलनाच्या प्रसगीच हा ग्रथ प्रसिद्ध करण्यात स्वारस्य आहे ह लक्षात घेऊन हेहि साहस मी करीत आहे. ज्याचा सारा जन्म साहसाची

छोटीं मोठीं कामें करण्यांत गेला त्या मी याच वेळीं या लहानशा साहसाला कां भ्यावें बरें ?

आज माझे गुरु अच्युतराव जिवंत असते तर या ग्रंथाचा प्रकाशनसमारंभ मी त्यांच्या चरणांशीं बसून मोठ्या थाटामाटानें केला असता ! पण असा शोक करण्यांत अर्थ काय ? तरीहि माझा विश्वास आहे की, त्यांच्या आशीर्वादा-मुळेंच हे कार्य आज माझ्या हातून पार पडत आहे.

आजच्या संमेलनांत महाराष्ट्रीय रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाची चर्चा केली जात आहे. या चर्चेला या नाटिकासंग्रहाचा थोडाफार उपयोग होईल अशीहि मला आशा वाटते.

या नऊ नाटिकांपैकीं कांहीं नाटिकांचीं पुस्तकें उपलब्ध नसल्यामुळें सदर नाटिकांचे प्रयोग करूं इच्छिणाऱ्या नाटकमंडळ्या, हौशी नाट्यसंस्था, शाळा–कॉलेजांतील संमेलनें नि उत्सवमण्डळें यांची अत्यंत गैरसोय होते व त्यांची मागणी मला पूर्ण करतां येत नाहीं. अर्थात् या संग्रहाच्या प्रसिद्धीमुळें वरील सर्व संस्थांची, नाटिकांचे प्रयोग करण्याच्या कामीं, सोय होईल हें निराळें सांगणें नकोच.

या ग्रंथप्रकाशनाच्या बाबतींत मला श्री. सोराब मोदी, श्री. रामराव विजयकर, श्री. बाबूराव सापळे, श्री. नानाराव अभ्यंकर इ. मित्रांचें निरनिराळ्या प्रकारांनीं साहाय्य मिळालेलें आहे, अर्थातच मी त्यांचा अत्यंत आभारी आहें.

शेवटीं, प्रार्थना इतकीच कीं, नाट्यदेवता या ग्रंथसमर्पणानें प्रसन्न राहो !

मुंबई. }<br>
दि. ३१–१२–४१ }

नाटिकासंप्रदायाचा अभिमानी<br>
**अनंत हरि गद्रे.**

---

## नाटिकासंप्रदायाचे सहाय्यक

[ नाटिकांच्या प्रस्तावनांतून ज्यांचे ज्यांचे आभार मानलेले आढळतात त्या सर्वांचीं नांवें याखाली मुद्दाम देत आहोंत. या नांवनिशीवरून नाटिका–संप्रदायाला त्या त्या वेळीं थोरथोर मण्डळींचें कसें प्रत्यक्ष साहाय्य लाभलें होतें तें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. ]

श्री. अच्युतराव कोल्हटकर, मामा वरेरकर, वीर वामनराव जोशी, नाट्यतपस्वी अप्पाराव टिपणीस, दे. भ. ब्रामणगांवकर, नटवर्य पेंढारकर, सारोळकर, दामूअण्णा

जोशी, नानाराव चापेकर, नानाराव अभ्यंकर, शिंदेमास्तर, वसंतराव कुळकर्णी, श्रीपतराव उपरे, राजाध्यक्ष फोटोग्राफर, बागळे ब्लॉकमेकर, विविधवाङ्मयसेवक मगनलालजी जव्हेरी, वाङ्मयप्रभु त्रिलोकेकर, प्रभुप्रभातकार रामराव विजयकर, डॉ. सुरतकर, बाल-गणपतराव (जॅकी कूगन) राम आपटे, बाबाराव जोगळेकर, एस्. के. गोडबोले, गंगारामबुवा, बापूराव माने, चौधरी, संत, हातकणंगलेकर, डोंगरे, घरत, शंकर आपटे, जोशी, गोपाळराव मेस्त्री, दादाराव नायक, डॉ. चिटणीस, दे. भ. पु. रा लेले, डॉ. वेलकर, हरिभाऊ आपटे, पालव, वैद्य, कुमठेकर, परब, आग्रे, वाळके, अंतरकर, डोंगरे, सॅम्सन, फडणीस, कुळकर्णी, विनायकराव सामंत, चौधरी, बाबुराव मुळे, पराडकर, जोशी, वर्दे, हबर्डे, बाबुराव तुळजापूरकर, गोखले, बर्वे वकील, प्रो. पंडित, बेंडे, सरपोतदार, असरकर, खाडिलकर, न. र. जोशी, गोविंदराव लिमये, दीक्षित, शंकरराव अभ्यंकर, बी. पी. सामंत, बाबुराव सापळे, बागवे शेट, गोडबोले, दादासाहेब ओगले, वामनराव बर्वे, मिस् गोहर कर्नाटकी, लेडी जहांगीर.

## नाटिकांच्या प्रसिद्धीचे दिनांकः—

| | |
|---|---|
| (१) प्रेमदेवता— | दि. १-८-३० |
| (२) पूर्ण स्वातंत्र्य— | दि. २३-८-३० |
| (३) घटस्फोट— | दि. १३-१२-३० |
| (४) कुमारी १९३१— | दि. १७-१-३१ |
| (५) आई— | दि. ११-४-३१ |
| (६) तरुण पिढी— | दि. ६-६-३१ |
| (७) प्रीतिविवाह— | दि. १-८-३१ |
| (८) मुलीचें कॉलेज— | दि. ४-३-३३ |
| (९) पुणेरी जोडा— | दि. १-८-३४ |

मधुसंगीत

# प्रेमदेवता

## अंक पहिला

### प्रवेश १ ला

( स्थळ—दिवाणखाना. सुलोचना अभंग गात बसली आहे. )

**सुलोचनाः—**

**कां रे नाठविसी कृपाळू देवासी। पोसितो जगासि एकलाचि ॥ १ ॥**
**बाळा दूध कोण करितें उत्पत्ती। वाढवी श्रीपती सवें दोन्ही ॥ २ ॥**
**फुटती तरुवर उष्णकाळमासीं। जीवन तयांसी कोण घाली ॥ ३ ॥**
**तेणें तुझी काय नाहीं केली चिंता। राहें त्या अनंता आठवूनी ॥ ४ ॥**
**तुका म्हणे ज्याचें नांव विश्वंभर। त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ ५ ॥**

माझी कांहीं देवावर तितकीशी निष्ठा नाहीं पण काय असेल तें देव जाणे, सकाळच्या शांत वेळीं देवाचं एखादं गाणं गाइलं म्हणजे तितकंच आपलं मनाला बरं वाटतं! मला वाटतं कीं, हा संवईचाच परिणाम असावा. माझ्या आईनं हीं असलीं देवाचीं गाणीं गायची मला लहानपणापासून संवय लावून ठेविली आहे. लहानपणीं अज्ञानाच्या ऐन रंगांत मला जी देवभोळेपणाची संवय लागली ती, मी एवढी सज्ञान झाल्यें, चांगली शिकल्यें संवरल्यें, तरीहि जात नाहीं. मला वाटतं कीं, देवभोळेपणाचं हें व्यसनच मला जडलं आहे! व्यसन तें व्यसनच—मग तें वाईट असो किंवा चांगलें असो! लोकांना वाईटसाईट व्यसनें लागतात, मला आपलं हें—वाईटच कांहीं नव्हे पण—भोळेपणाचं, देवभोळेपणाचं, व्यसनच लागलं आहे. प्रातःकालचं गीत गाऊन बराच वेळ झाला पण कृष्णाईनं अजून कां बरं चहा आणून दिला नाहीं? (मोठ्यानें) कृष्णाई, अग कृष्णाई, अजून नाहीं का झाला चहा? अग, माझं गीत आटोपलं सुद्धां.

**कृष्णाईः—**( चहा घेऊन येते ) मग इतकं काय झालं घाबरायला? एक गीत आटोपलं तर दुसरं म्हणावं! बोलूनचालून देवाचं गाणं तें, एखाददुसरं

जास्त म्हटलंस तर काहीं बिघडायच नाहीं! देवाच गाण मूळचंच गोड खर पण तेंच तुझ्या गोड गळ्यातून निघाल म्हणजे फारच गोड लागत बाई! तू आज इतक काही गोड गाण गाइलीस कीं, ते गाण ऐकत असताना माझी सुद्धा तद्री लागली आणि पाण्याला आधण आल तरीहि त्यात चहाची पूड घालायला मी अजिबात विसरल्ये!

**सुलो०**—पहा, देवभोळेपणापासून कसे तोटे होतात ते! देवभोळेपणाच्या नादात तू हातातल काम सुद्धा विसरून गेलीस! मी म्हणते कीं, कामधाम सुद्धां विसरायला लावणारा हा देवभोळेपणाचा नाद चागला का? देवभोळी माणस कशीं शेवटी निकामी होतात ते आता माझ्या ध्यानात आल! देवा, या देवभोळेपणाच्या व्यसनापासून तूच मला सोडीव बाबा!

**कृष्णा०**—पहा किती खुळी आहेस तू ती! देवभोळेपणापासून सोडीव म्हणून तू देवालाच प्रार्थना करत्ये आहेस! बर, चहा पी पाहू आधी—देव तुझ कल्याणच करील.

**सुलो०**—हें पहा, माझं कल्याण मीच करून घेईन, मला नको कुठल्या देवाची मदत! देवाची मदत घ्यायला मी काही अडाणी आणि दुबळी नाहीं. मी चागली शिकली—सवरलेली मुलगी आहें, मनाची पक्की खबीर आहें. मला नाहीं कधी देवाची करुणा भाकावी लागणार!

**पद**

**दीन कुजन देवाची करिति याचना। कंपित करि त्यां मनिंची दैन्यभावना॥ ध्रु०॥ चंद्रकला तेजास्तव रविसि याचिते। तारकाहि तिमिरपटलिं लपुन चमकते॥ अढळपदी परि ध्रुव तो नित्य बैसतो। अरुण साक्षी ठेवी, दावी निज प्रकाशना॥ १॥**

**कृष्णा०**—बाळ, असला गर्व वाहण बर नाहीं! सर्व काही बरवाईट देवाच्या इच्छेनच होत असत बर! आपण काहीं करू शकत नाही, सार काहं देवच घडवून आणीत असतो.

**सुलो०**—हो, तू तरी काय? माझ्या देवभोळ्या आईच्याच तालमींत वाढलेली कीं नाहीं? जशी आई देवभोळी होती, तशीच तू! जा तू आपल्य कामाला, मला नको ब्रह्मज्ञान शिकवू! मी या जगात डोळे उघडे ठेवूनच

वावरत्यें आहें, मग मला देवाच्या दयेवर विसंबून बसण्याचं कारण पडणं शक्य नाहीं!

**कृष्णा०**—( कपबशी घेऊन जातां जातां ) हो! तूं मोठी शिकलेली, शहाणी, डोळस, तूं का मला बोलूं देणार आहेस? तूं आपली कितीहि गर्व व्हा, माझ्या आशिर्वादानं देव तुझं कल्याणच करील! ( जाते. )

**सुलो०**—किती दुधखुळी आपण आहों तरी! देवावर भरंवसा ठेवायचा, डोळे मिटून बसायचं, आणि देखत्या डोळ्यांत कुणी धूळ फेंकली म्हणजे देवाला दोष द्यायचा! शर्थ झाली बाई, आम्हां देवभोळ्या हिंदूंच्या दुधखुळ्या वेदान्तापुढं! ( मनाशीं हंसत सुटते तों बाहेरून 'बाईसाहेब, मला वांचवा' असा आवाज ऐकूं येतो. आवाज ऐकून सुलोचना चपापते. ) कोण? कोण संकटांत आहे?

( इतक्यांत काळा बुरखा घेतलेला एक तरुण पुरुष धांवत येतो व सुलोचनेचे पाय धरतो. )

**तरुण पुरुषः**—( धांपा टाकीत ) बाईसाहेब, मला वांचवा! मी संकटांत सांपडलों आहें. मी निरपराधी असून सुद्धां माझ्यामागं सरकारी शिपायांचा ससेमिरा लागला आहे. कृपा करून मला थोडा वेळ आपल्या घरांत लपायला जागा द्या. बाईसाहेब, मला वांचवा. मी तुमचे उपकार कधींहि विसरणार नाहीं.

**सुलो०**—( आश्चर्यानें ) अहो—पण तुम्हीं कोण, कुठले, ही काय भानगड आहे, तुमचं नांव काय, तुमच्या मागं सरकारी शिपाई कां, कांहीं सांगाल कीं नाहीं?

**तरुण पु०**—बाईसाहेब, तें मी मागाहून सांगेन. मी खरोखरीच भयंकर संकटांत आहें, मला आधीं तुमच्या घरांत लपून बसायला परवानगी द्या. बाईसाहेब, तुम्ही मला प्रत्यक्ष देवताच भेटलांत! माझ्यावर दया करा. ( बाहेर 'पकडा, पकडा त्या हरामखोराला' असा आवाज ऐकूं येतो. ) ते पहा, माझ्यामागं लागलेले शिपाई दारापर्यंत येऊन पोंचले. आतां मी लपतोंच तुमच्या घरांत, मग तुम्ही मला तारा किंवा मारा! ( घरांत लपावयास तसाच निघून जातो. )

**सुलो०**—हा तर माझ्या परवानगीची वाटहि न पाहतां घरांत लपायला गेला सुद्धां! आतां कसं करावं बरं?

**फांशीराम०**—( दोघा शिपायांना घेऊन येतो ) बाईसाहेब, त्या हराम-खोराला मुकाट्यान आमच्या स्वाधीन करा. तो गुन्हेगार आहे, चोर आहे, दरोडेखोर आहे. त्याला तुम्ही तुमच्या घरात थारा देऊ नका. भयकर माणूस आहे तो ! भयकर, अतिभयकर, महाभयकर !

**सुलो०**—( विचारपूर्वक स्वगत ) या वेळी समयसूचकता ठेवूनच आला प्रसग निभावून नेला पाहिजे ! ( उघड ) हे पहा फौजदारसाहेब, आधीं स्वस्थ-पणे या आसनावर बसा आणि मला नीट काय ते समजावून द्या. तुम्ही कोण चोर म्हणता तो इथ आलेलाच नाही, मग मी त्याला कुठ लपवून ठेवणार बर ? काहीं तरी तुमचीच नजरचूक झालेली दिसते आहे ! बसा आधीं.

**फांशी०**—ही बसायची वेळ नाहीं. त्या चोराला, तुमच्या घरात शिरतांना, मी या-या डोळ्यानीं पाहिल, मग माझ्या नजरेकडून कशी चूक होईल बर ? चूक झाली आहे ती तुमच्या हातून ! त्या चोराला मुकाट्यान आमच्या स्वाधीन करा. हें पहा, तुम्ही असल्या बोलण्यात वेळ घालवू पहाल तर जबर-दस्तीनच आम्हाला त्याचा तपास करावा लागेल.

**सुलो०**—फौजदारसाहेब, जबरदस्ती ती कशाला पाहिजे ? माझ्या घरातल्या माणसांना मीच बाहेर बोलावत्ये आणि तुमच्यापुढ हजर करत्ये, मग तर झाल ना ? ( मोठ्यानें ) कृष्णाई, अग ए कृष्णाई ! बाहेर ये पाहू !!

**कृष्णा०**—( बाहेर येऊन व सरकारी शिपायांना पाहताच तोंडावरून पदर घेऊन ) का बाळ ? मला का हाक मारलीस ?

**सुलो०**—हे बघ कृष्णाई, हे फौजदारसाहेब तुला पहायला आले आहेत, नीट उभी रहा त्याच्यासमोर !

**कृष्णा०**—काय ? हे मला पहायला आले आहेत ? ( रागानें ) मेल्यांनो, मला म्हातारीला रे काय पहाता ? फौजदारसाहेब, माझी म्हातारीची थट्टा करायला तुम्हांला शरम नाही वाटत ? घ्या, घ्या, तुमचे डोळे फुटेपर्यंत मला नीट पाहून घ्या ! ( फांशीरामापुढं धीटाईनें उभी राहते. )

**फांशी०**—( गुर्मीतच ) वाः ग तू ! एवढी तणतणतेस कशाला ? थेरडी झालीस म्हणून काय झाल ? मी फाशीराम फौजदार आहें. मी तुलासुद्धां पाहून घेईन, समजलीस ?

**कृष्णा०**—अरे वाः ! तू मला पाहून घेणार का ? मी तुझा कोणता गुन्हा केला रे ? अ ? काय गुन्हा केला तुझा ?

**फांशी०**—थेरडे, गप्प बैस ! असल्या बेफाम भाषेनें तूं सरकारी कायद्याचा अपमान करते आहेस ! संभाळून रहा !!

**कृष्णा०**—( अधिक चिडून ) तूं मला कायदा दाखवितोस नाहीं का ? चल माझ्याबरोबर तुझ्या विनस्पेटर साहेबाकडे ! त्यांच्यासमोर तुझा कान धरून तुला जाब विचारला नाहीं तर नांवच बदलीन ! चल, चल. ( त्याला ओढीत ) माझी म्हातारीची थट्टा करतोस नाहीं का ?

**सुलो०**—फौजदारसाहेब, किती झालं तरी ती जुन्या काळची म्हातारी बाई आहे. तिच्यापुढं तुमची घमेंड कांहीं चालणार नाहीं, तिच्याशीं जरा समजुतीनंच बोला !

( मध्यंतरीं कृष्णाई व फौजदार यांचा झगडा चालू असतांच तो तरुण पुरुष गवळणीचा वेष घेऊन व डोक्यावर दुधाची चरवी घेऊन बाहेर येतो, सुलोचनेच्या हातांत एक चिठ्ठी देतो, नंतर संधि साधून धीटाईनें बाहेर जाऊं लागतो. )

**फांशी०**—हो, तुमचं म्हणणं खरं आहे. ( कृष्णाईस ) अहो बाई, तुम्ही रागावूं नका. आम्ही तुमची थट्टा कशाला करूं बरं ? ( समोरून गवळण जात असलेली पाहून ) अहो, पण तें आतां कोण गेलं बाहेर ?

**सुलो०**—ती आमची गवळण आहे, रतीबाचं दूध घालून गेली आपल्या वाटेनं ! बोलावूं का तिला परत ? बोलावूं का तिला ?

**फांशी०**—छेः, छेः, छेः, छेः, तिला कशाला परत बोलावतां ? आम्हाला तुमची ही म्हातारी नको आणि ती गवळणहि नको, आम्हांला आमचा गुन्हेगार पाहिजे आहे. शोधूं का आम्ही त्याला तुमच्या घरांत ?

**सुलो०**—हो, तुमच्या मनांत अजूनहि शंका असेल तर खुशाल शोधा. मी तुमच्या सरकारी कामाच्या आड कशाला येऊं उगीच ? कृष्णाई, या शिपायांना सगळ्या घरांत फिरवून आण पाहूं !

**कृष्णा०**—चला मेल्यांनो, पहा तुमचं डौंबल शोधून ! चला, या माझ्या मागून असे !

**फांशी०**—बरं तर चलारे ! आपणांला डोळ्यांत तेल घालून या घराचा कोंपरान् कोंपरा शोधलाच पाहिजे. आमच्या पकडींतून तो गुन्हेगार कसा

निसटून जातो तेच पाहतो. म्हटल मी फाशीराम फौजदार आहे. ( भिंशीवर पीळ देत कृष्णाईमागून शिपायासह घरात जातो. )

**सुलो०**—( हसून ) अहारे मेले वेधळे ! तो चोर तर केव्हाच गेला याच्या डोळ्यात धूळ फेकून ! ( तरुण पुरुषाने दिलेली चिठी वाचते. ) काय म्हणतो हा या चिठीत ? 'मी तुम्हाला पुनः भेटेन !' काय ? तो चोर पुनः माझी गाठ घेणार आहे ? हे गौडबगाल काय आहे देव जाणे ! देवा, माझी आणि त्या चोराची लौकरच भेट करव. मी त्याची हकीकत ऐकून घ्यायला कशी अगदीं अधीर झाल्ये आहे !

**फांशी०**—( शिपायासह बाहेर येऊन ) नाहीं, कुठंहि चोराचा पत्ता लागत नाही. बाईसाहेब, जातो आम्ही ! तसदीची माफी असावी ! काय हा चोर तरी भयकर माणूस आहे ? भयकर, अतिभयकर, महाभयकर ! ( शिपायाना घेऊन जातो. )

**सुलो०**—मेले वेधळे कुठले ! म्हणे तसदीची माफी असावी ! अहो पण तुम्हाला एवढी तसदी घ्यायला सांगितली होती कुणी, आणि आता माफी तरी मागता कशाला ? हो, पण आता मला त्या चोराची भेट केव्हा एकदा होते अस झाल आहे ! देवा, त्या चोराच रक्षण कर अस म्हणण्याची पाळी माझ्या-वर आली खरी !

### पद

**भिववी मना दुरित घोर । नाही दुजा आधार ॥ ध्रु० ॥**
**स्मरति ईश आर्तकाली । वदति सुजन होई खरें ॥ १ ॥**

**कृष्णा०**—( घाबऱ्या घाबऱ्या धावत येऊन ) अग दुधखुळे, फसलीस गऽऽबाई पुरती ! त्या चोरान कपाट फोडून तुझ्या दागिन्याचा डबा लाबविला ना ?

**सुलो०**—काय म्हणतेस ? मी ज्या चोराला घरात आसरा दिला त्यानच मला लुबाडल ? जा, आण पाहू तो डबा इकडे, पाहू दे मला नीट ! ( कृष्णाई गेल्यावर ) काय तरी बाई, मेला साराच चमत्कार ! कुणी एक गृहस्थ काळा वेष घेऊन आला काय, माझ्याच घरात लपला काय, शिपायाना फसवून आणि त्याच्याच हातावर तुरी देऊन गेला काय, आणि शेवटी मलाच लुबाडून पळाला काय, साराच चमत्कार ! आणि इतके करूनसवरून त्यान

माझ्या हातीं चिठी दिली व पुनः भेटण्याचं आश्वासन दिलं. या त्याच्या कृत्यांचा सरळ अर्थ कसा लावावा तेंच मला समजत नाहीं !

**कृष्णा०**—( बाहेर येऊन व रिकामी पेटी तिच्यापुढं आपटून ) पहा, आहे का या पेटींत एखादा तरी फुटका मणी शिल्लक? मेला सर्वस्व लुबाडून गेला. मेल्याचं कध्धीं कध्धीं बरं व्हायचं नाहीं. माझा म्हातारीचा शाप......

**सुलो०**—( तिच्या तोंडावर हात ठेवून ) हां कृष्णाई, त्या चोराला इतक्यांत तरी शाप देऊं नको ! त्यानं मला लुबाडलं असलं तरी सुद्धां माझ्या मनांत त्याच्याविषयीं कौतुकच उत्पन्न झालं आहे. कोण, कुठला बिचारा कोणत्या संकटांत असेल देव जाणे ! त्याची ती मुद्रा, त्याचें तें वर्तन, त्याची ती चतुराई, सगळं कसं कौतुक करण्यासारखंच घडून आलें आहे.

**कृष्णा०**—अग, तुझे दागिने गेले म्हणून रडायचं सोडून त्या चोराचं कौतुक कसलं करीत बसली आहेस? रड नाहीं तर हंस, तुझी तूं मालकीण आहेस, मी आपली जात्येंच कशी ! ( जातां जातां स्वगत ) ही स्वतः दागिन्यांच्या चोरीची वर्दी फौजदारांकडे जाऊन देईल असं कांहीं वाटत नाहीं. आपण हळूच मागच्या दारानं फौजदारांकडे जाऊन चोरीची वर्दी द्यावी. (जाते.)

**सुलो०**—त्या चोराची चतुराई पाहून हंसावं कीं दागिने चोरीस गेले म्हणून रडावं तेंच मला कळत नाहीं. देवा, तुझ्या मदतीवर अवलंबून न राहण्याचा मीं कितीहि जरी निर्धार केला तरी शेवटीं ‘ त्या चोराची भेट मला करव ’ अशी तुझी प्रार्थना करण्याशिवाय मला गत्यंतर उरलेलं नाहीं. देवा, तूं तरी किती विचित्र जग निर्माण केलं आहेस हें ?

## पद.

**विस्मयता भरत जनमनांत । दाविसि देवा अशी कृती,**
**मती पडत झणि भ्रमांत ।। ध्रु० ।। पंकिं उदय कमलाचा ।**
**संभ्रम करि जनिं साचा ।। गंध मृगाच्या नाभीं ।। १ ।।**

**पहिला अंक समाप्त**

---

# अंक दुसरा



## प्रवेश १ ला

( **स्थळ.**—बाजूचा एक रस्ता. फाशीराम प्रवेश करतो. )

**फांशी०**—भयकर माणूस ! अतिभयकर माणूस !! महाभयकर माणूस !!! त्या गुणनिधानाला पकडण्यासाठीं मी जगजग पछाडतों आहे पण हाती लागेल तर शपथ ! अहो, मी शपथेवर सागतो कीं, गुणनिधान हा भयकर माणूस आहे, अतिभयकर माणूस आहे, महाभयकर माणूस आहे. माणूस तरी कसला तो ? सैतान आहे सैतान ! मी फाशीराम फौजदार आहे, काळाचाहि काळ आहे आणि सैतानाचाहि सैतान आहे. पण गुणनिधानान मला चारी मुंडे चीत केल ! चोर तर वस्ताद, दरोडेखोर तर अट्टल आणि सोंगाड्या तर विलक्षणच ! या घटकेला फाकडा फक्कडराव असला तर पुढच्या घटकेला भणग भिकारी बनेल आणि केव्हा एखाद्या बाईचा वेष घेईल त्याचा पत्ताहि लागायचा नाहीं. भयकर माणूस ! ( आत पाहून ) ऑ ! ही कोण बाई इकडे तोंडावरून पदर घेऊन लपतछपत येते आहे ? हा तो सोंगाड्या चोर गुणनिधान तर नसेल ? असायचा, असायचा, तोंहि नसेल तिथ असायचा आणि असेल तिथ नसायचा ! भयकर माणूस ! अतिभयकर माणूस ! महाभयंकर माणूस !!! आता शिताफी करून या बाईला पकडाव ! (बाजूला उभा रहातो तो कृष्णाई लपतछपत त्याच्या समोरून जाऊ लागते. तो तिच्या दडाला धरून पकडतो.) कसा सापडलास ? म्हटल कसा सापडलास ? माझ्या डोळ्यात धूळ टाकून पळून जातोस नाहीं का ? काढ तोंडावरचा पदर !

**कृष्णा०**—(त्याच्या हाताला हिसडा देऊन) तूं रे कोण मला अडवणार ? तुला माझ तोंड पाह्यच आहे नव्हे का ? पहा मेल्या, नीट माझ तोंड पहा ! मेल्या, माझ तोंड पहाताच आपल तोंड का फिरवलस ?

**फांशी०**—अरे ही तर ती सुलोचनेची दासी ! हिन तर माझ्या तोंडांतच दिलीन् म्हणायची ! बाई, रागावू नका, माझ्या हातून चूक झाली !!

**कृष्णा०**—(त्याला नीट निरखून स्वगत) अगबाई, हे तर फौजदारसाहेब ! ( उघड ) फौजदारसाहेब, चूक माझ्या हातून झाली, मला क्षमा करा.

**फांशी०**—नाहीं, नाहीं, चूक माझ्या हातून झाली, मलाच तुम्ही क्षमा करा !

**कृष्णा०**—छेः छेः, चूक माझ्याच हातून झाली !

**फांशी०**—छेः छेः छेः, चूक माझ्याच हातून झाली !

**कृष्णा०**—बरं तर, चूक दोघांच्याहि हातून झाली !

**फांशी०**—तसं कां म्हणाना, चूक दोघांच्याहि हातून झाली ! हो पण, तुम्ही अशा लपतछपत कुठं चाललां होतां ?

**कृष्णा०**—तुमच्याकडे ! एका चोरीची वर्दी द्यायला !

**फांशी०**—अस्सं ? पण चोरीची वर्दी द्यायला तुम्ही कां चोरासारख्या चोरपावलांनीं चाललांत ?

**कृष्णा०**—अहो, चोरीची वर्दी द्यायलाहि मला चोरीच झाली आहे ! तो कोणसा चोरटा तुमच्या देखत गवळणीचं सोंग घेऊन गेला ना ?

**फांशी०**—काय ? ती गवळण नसून तो गुणनिधान चोरच होता ? भयंकर माणूस ! अतिभयंकर माणूस ! ! महाभयंकर माणूस ! ! !

**कृष्णा०**—त्यानें सुलोचनेच्या दागदागिन्यांवर डल्ला मारला आणि गवळणीचें सोंग घेऊन तुमच्या समोरून तो निघून गेला !

**फांशी०**—काय, त्यानें सुलोचनाबाईंचे दागिने चोरले ? खरोखर भयंकर माणूस ! अतिभयंकर माणूस ! ! महाभयंकर माणूस ! ! !

**कृष्णा०**—त्याला तुम्ही पकडा आणि चांगली शिक्षा ठोठावा ! अहो, तुम्ही त्या चोराला मोकळा सोडलात तर तो आणखी काय अनर्थ करील कांहींच सांगतां येत नाहीं. त्यानं सुलोचनेच्या मनांत आपल्या चतुराईनें कौतुकाची भावना उत्पन्न केली आहे ! अत्तां त्यानें कौतुकच उत्पन्न केलं, उद्यां तो सुलोचनेचं मनच चोरून घेऊन जाईल !

**फांशी०**—जाईल, जाईल, तो चोर सुलोचनाबाईचं मनहि चोरून घेऊन जाईल ! तो चोर ना ? भयंकर माणूस ! अतिभयंकर माणूस ! ! महाभयंकर माणूस ! ! ! अहो पण बाई, तुमच्या सुलोचनादेवींनीं एका अट्टल चोराचं कौतुक करावं हें जरा चमत्कारिक नाहीं का ?

**कृष्णा०**—अहो, कसलं चमत्कारिक घेऊन बसलां आहांत ? सुलोचनाच मुळीं चमत्कारिक मुलगी आहे ! तिचे आईबाप श्रीमंत होते-तिला त्यांनीं श्रीमंतीच्या

लाडिक थाटात वाढविली. त्यांनीं तिला हल्लीचे भपकेदार शिक्षणहि दिल. आधींच पोर लाडावलेली आणि त्यात शिक्षणान नादावली मग तिला चमत्कारिक बनायला कितीसा वेळ लागणार ? इतक्यात काय झाल, तिचे आईबापहि एकाएकीं तापाच्या भयकर साथीत सापडून देवलोकाला निघून गेले ! मग काय विचारता ! तिच्या स्वतत्र विचाराचे साम्राज्यच माजल घरात ! तिची आई जरा देवभोळी होती म्हणा, निन पोरीला देवाची गाणी काय गोड शिकवली आहेत म्हणता ! पण आता तिला तीं देवाची गोड गाणींहि कडू वाटू लागलीं आहेत ! देवभोळे-पणाचा तर तिला तिटकाराच आहे. म्हणते कशी ? मी स्वतत्र विचाराची शिकलेली मुलगी आहे ! मग बोला, अशी ती शिकलीसवरलेली, लाडावलेली आणि नादावलेली पोर बहकली तर त्यात कसल आश्चर्य ? चोरान चोरी केली तेव्हां त्याच्यावर रागवायच सोडून ती त्याच्या चतुराईच कौतुकच करूं लागली आहे ! ती स्वतः तुम्हाला चोरीची वर्दी देणार नाहीं असे मला वाटूं लागल्यामुळ मीच चोरपावलानी तुम्हाला वर्दी द्यायला निघाल्ये तों, मलाच चोर समजून तुम्ही मलाच पकडलत !

**फांशी०**—ती माझी चूक झाली म्हटल ना ? धरू का तुमचे पाय ? लावू का तुमच्या दाढी.. . ? च्, च्, च् !

**कृष्णा०**—बर जाऊ आता ? हे पहा, तो एक चोर असला तर तुम्ही सवाईचोर बनून त्याला पकडा आणि ते कुठस निर्जन बेट आहे ना ? त्यावर हवा खायला पाठवून द्या. नीट सभाळूनच त्याला पकडा बर का ? नाहींतर तो तुम्हालाच तोडघशी पाडायचा ! नियम नाहीं त्याचा ! ( जाते. )

**फांशी०**—नाही, नियम नाही त्याचा, कारण तो तसाच बिलदर आहे ! भयकर माणूस, अतिभयकर माणूस, महाभयकर माणूस ! पण काहीं झाल तरी आज त्याला मी खास पकडणार ! त्याच्या ठावठिकाणाचा पत्ता लावतों आणि त्याला गिरफदार करतो. तो चोर गुणनिधान म्हणे, गुणीला नावाच्या सुदर नायकिणीच्या नादी लागला आहे. पाळत ठेवतों आणि त्याला त्या गुणीलेच्या रंगमहालातच पकडतो ! बाकी तो आहे बिलदर ! भयकर माणूस ! अतिभयकर माणूस !! महाभयकर माणूस !!! ( जातो. )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ—बगीचा, एक कोंपरा. गुणनिधान चोरपावलांनीं चालत येतो.** )

**गुण०**—अहो, या इकडे, अगदीं बाजूला या. माझ्याविषयीं कोणताहि संशय मनांत धरूं नका. या इकडे !

**सुलो०**—( येऊन ) तुम्ही मला असं एका बाजूला कां बोलावून आणलंत ?

**गुण०**—कारण मला तुम्हांला माझी हकीकत अगदी गुप्तपणं सांगायची आहे. सुलोचनादेवी–तुमचं नांव सुलोचनादेवी, होय ना ?

**सुलो०**—होय तेंच माझं नांव ! पण तुमचं नांव काय ?

**गुण०**—माझं नांव गुणनिधान ! मी तुमच्या आणि जगाच्या दृष्टीनें चोरच आहें. मीं चोरी केली आणि फांशीरामाला फसविण्याकरितां तुमच्या घरांत शिरलों. तुम्ही कृपाळु होऊन मला आश्रय दिलांत पण मी तुम्हांलाहि लुबाडलं ! देवि, मी तुम्हांला फसविलं याबद्दल मला अत्यंत वाईट वाटतं. तुम्ही मला दुष्ट, चोर, चांडाळ समजत असाल यांत संशयच नाहीं. पण खरी हकीकत कळल्यावर तुम्ही मला तितकासा दोष देणार नाहीं. ( इकडे तिकडे पाहून ) हें पहा देवि, मीं पवित्र उद्देशानंच चोरी केली. चोरीच्या पैशांनीं मीं एका प्रेमदेवतेला संकटमुक्त केलं आहे. मी समाजसुधारक आहें. समाजसुधारणेच्या कार्यात गुंतलों असतां गुणीला या नांवाच्या सुंदर व तरुण वेश्येची करुण कहाणी माझ्या कानावर आली. त्या मुलीला अब्रूनंच आयुष्य कंठायचं होतं, पण तिचा बाप पैशाच्या राक्षसी लोभानं तिला तसं करूं देईना ! मीं त्या मुलीची गांठ घेतली व तिच्या तोंडून सर्व हकीकत समजावूनहि घेतली. गुणीलेचा राक्षसी बाप तिला एका बदमाष तरुणास दहा हजार रुपयांना विकायला तयार झाला होता. त्या मुलीवर माझं प्रेम बसल्यामुळें पैशांची भरपाई करून तिला सोडविण्याचं मीं ठरविलं. मीं पैशाची भरपाई करण्यासाठीं एक वर्षाची मुदत मागून घेतली. माझ्यापाशीं जें कांहीं होतं तें गुणीलेच्या बापाला देऊन टाकलें; पण दहा हजारांची कांहीं भरपाई झाली नाहीं. आज वर्ष पुरं होऊन मुदत संपत असल्या-मुळं दहा हजारांची भरती करण्यासाठीं मीं चोऱ्या केल्या. आतां मी सर्व रक्कम गुणीलेच्या बापाला देऊनहि टाकली आहे. आज संध्याकाळीं गुणीला पूर्णपणें माझी होणार ! गुणीलेच्या व माझ्या आयुष्यांतील सोन्याचा दिवस आज उगवणार ! सुलोचनादेवि, तुमच्या पायांत मीं माझ्या कातड्याचे जोडे करून घातले तरीहि

तुमचे उपकार फिटणार नाहीत. देवि, लौकरच मी तुमच्या दागदागिन्याचीहि भरपाई करून देईन हें पक्कें लक्षात ठेवा. मी चोर असलों तरी सदुद्देशानच चोऱ्या करणारा चोर आहे. ( शीळ ऐकू येते. ) देवि, फाशीराम फौजदार इथच कुठतरी घिरट्या घालतो आहे. मला आता इथ थाबता येत नाहीं. मी जातों. देवि, मी पुनः केव्हातरी तुम्हाला भेटेन—( जातो. )

**सुलो०**—त्या बदमाषाच्या हातून गुणीलेसारख्या तरुणीची सुटका झाली तर मला सुद्धा आनदच होणार आहे. माझे दागदागिने सत्कारणींच लागले यात शका नाही. गुणनिधान हे जरी जगाच्या कलुषित दृष्टीनें चोर असले तरी त्याच्या मनाचे औदार्य स्वर्गीय आहे. पण गुणनिधानानी सागितलेली हकीकत खरी असेल ना ? की हीहि त्याची एखादी भुलथापच आहे ? काही असो, तूर्त तरी माझे मन त्या तरुण पुरुषाविषयीच्या कौतुकानच भरून गेलें आहे ! देवा, गुणनिधानाच्या हातून अशीच सत्कार्ये घडोत हीच तुझ्या चरणी माझी प्रार्थना आहे !

### पद

**दे सुमति तया देवा । दे सुगति प्रेमभावा ॥ ध्रु० ॥ दो,**
**करित मनुज जे कां । तें विफलहि विलोका ॥ जरि त्या**
**नाहि भाव साचा । तो यत्न हो फुकाचा ॥ १ ॥**

[ जाते. ]

---

## प्रवेश ३ रा

( स्थळः—गुणीलेचा महाल, गुणीला कोचावर बसली असून मोहनिधान तिच्या शेजारी उभा राहून बोलत आहे असा देखावा. महालाच्या बाहेरच्या बाजूला गुणनिधान येतो. )

**गुण०**—अहाहा ! आज मी धन्य होणार ! त्या बदमाष मोहनिधानाच्या दहा हजार रुपयाची भरपाई मुदतींत झाल्यामुळ आज गुणीला त्याच्या ऋणातून मुक्त होणार आणि तिचा बाप तिला राजरोसपण माझ्या स्वाधीन करणार ! झाल, माझ्या श्रमाच सार्थक झाल, माझ्या समाजसेवाबुद्धीच सार्थक झाल,

माझ्या चौर्यकर्माचं सार्थक झालं ! आज गुणीला माझी होणार आणि मी धन्य होणार ! यावेळीं माझी लाडकी गुणीला खात्रीनें माझी प्रेमळ वाट पहात असेल ! [ आंत पहातो व चपापतो. ] अरेरे ! घात झाला, मी हें काय पहातो आहें ? माझी गुणीला त्या बदमाष मोहनिधानाशीं कसल्या गुलगुल गोष्टी करते आहे ? ही गुणीला इमानी आहे का बेमान आहे ? तो बदमाष मोहनिधान शेवटीं माझी मान कापणार कीं काय ? मला आत्तांच्या आत्तां सर्व गोष्टींचा उलगडा करून घेतलाच पाहिजे. [ आंतील बाजूला जावयास निघतो. तो गेल्यावर महालाचा अंतर्भाग दृष्टीस पडतो. ]

**मोह०**—हें पहा गुणीले, याच क्षणीं मला तुझ्याकडून काय तें अखेरचें उत्तर मिळालें पाहिजे. बोल, तूं माझ्यावर प्रेम करणार कीं नाहीं ? आजच्या आज तूं आमच्याबरोबर हें विलासपूर सोडायला तयार आहेस कीं नाहीं ? चल, आपण दुसऱ्या शहरांत जाऊन सुखांत राहूं ! आपण इथं येऊन राहिलों आणि सर्व कांहीं कारस्थान यथास्थितपणंच पार पडलं. आतां मुळींच वेळ उरलेला नाहीं, काय तें याच क्षणीं उत्तर दे.

**गुणीला०**—मोहनिधान, तुमचं काम झालं असेल तर तुम्ही बाबांना घेऊन वाटेल तिकडे जा. मी इथंच राहणार आणि गुणनिधानांची सेवाचाकरी करून माझ्या जन्माचं सार्थक करून घेणार ! ज्यांनीं उदार बुद्धीनं मला तुमच्या हातून सोडविलं, त्यांच्याशीं मी बेमान होईन हें शक्यच नाहीं. तुमची पैशाची राक्षसी हांव पुरी झाली ना ? आतां माझा छळ कां करतां ?

**पद**

**दुखवितां वृथा कां ही वनिता । तुष्ट केलि ना दुष्ट लालसा । तुम्हीं स्वतां ॥ कां सती छळितां अतां ॥ ध्रु० ॥ पापविकारा झणीं आंवरा । न स्वैरता देत चित्ता शांतता ॥ १ ॥**

**मोह०**—मी तुझा छळ कां करतों तें तूं आपल्या तरुण सौंदर्यालाच विचार ! माझी पैशाची हांव पूर्ण झाली, पण प्रेमाची तृष्णा कुठं शांत झाली आहे ?

**गुणी०**—ही तुझी राक्षसी लालसा पूर्ण होणें शक्य नाहीं. मी इथंच रहाणार आणि गुणनिधानांची प्रेमानं सेवाचाकरी करणार ! यापुढं माझ्याशीं एकहि शब्द बोलूं नका. चालते व्हा, माझे गुणानिधान इतक्यांत इथं येतील... [ पडद्यांत आवाज—' हां, गुणनिधान ! आल्या पावलीं निघून जा ! ' ]

**मोह०**—हा पहा गुणनिधान आला ! याच क्षणीं मला तुझा निकाल लावलाच पाहिजे. तू कुठली बऱ्या बोलान कबूल व्हायला म्हणा ? जातिवंत वेश्या असून प्रेमाचे ढग करतेस काय ?

**गुणी०**—वेश्या होते पण आज गुणनिधानाच्या कृपेन कुलवती स्त्री होणार आहे. नीचा, एकहि शब्द न बोलता इथून मुकाट्यान आपल तोंड घेऊन चालता हो, नाहींतर गुणनिधान आल्यावर तुझ तोंड फुटल्याशिवाय राहणार नाहीं !

[ पुनः पडद्यात आवाजः—' शकानिधान, बाजूला व्हा, मी हा आत जाणारच !' ]

**मोह०**—आता तोंड बद करत्येस कीं ते मी जबरदस्तीने बद करू ? तू तशी कुठली ऐकायला म्हणा ? [ गळ्याचा मफलर काढून तिची मुसकी बाधतो. ती धडपडते. तो तिला उचलून आत घेऊन जातो. गुणनिधान शका-निधानाला रेटीत आणतो. ]

**गुण०**—( शकानिधानाची मानगुटी पकडून ) शकानिधान, हे तुम्हीं काय माडल आहे ? बोलता की नरडी दाबू ?

**शंका०**—धावा, धावा, गुणनिधान माझी नरडी दाबतो आहे, धावा !

**मोह०**—( धावत येऊन ) गुणनिधान, सोड त्याना आणि इथून बऱ्या बोलान चालता हो. ( शकानिधानाला सोडवितो. )

**गुण०**—मी इथून का जाऊ ? आजपर्यंत मी इथ चोरट्या पावलानी येत होतो. पण आज मी इथ राजरोसपण व हक्कानच आलों आहे. तुम्हीच इथून चालते व्हा ! तुमची रक्कम तुम्हाला ठरलेल्या मुदतीत पावती झाली ना ? आता गुणीला सर्वस्वीं माझी झाली आहे—मी तिच्याशीं लग्न करून तिला माझी पत्नी करणार !

**मोह०**—काय मूर्ख आहेस रे ? तू एका वेश्येला आपली पत्नी करणार ? तुझा समाज तुला तस करू देईल का ? तुझे आप्तेष्ट तुला असली अनीतीची गोष्ट करू देतील का ?

**गुण०**—तुला काय करायच्या या नसत्या उठाठेवी ? मी समाजाची आणि आप्तेष्टाची वाटेल तशी समजूत घालीन ! आता तुम्ही इथून नीट समजुतीन निघून जातां की चागली समज देऊ ?

**शंका०**—हें पहा गुणनिधान, हें माझं घर आहे आणि गुणीला माझी मुलगी आहे. तुला वेश्येच्या घरांत शिरून लग्नाच्या भानगडी करायला सांगितलं कुणी ?

**गुण०**—तें मला माझ्या सदसद्विवेकबुद्धीनंच सांगितलं ! वेश्यांच्या अनीतिकारक धंद्याला आळा घालून समाजसेवा करण्याचें पुण्यव्रत मीं अंगिकारलं आहे. स्त्रिया म्हणजे प्रेमळ देवता, त्यांना वेश्याव्यवसायाच्या नरकांत ढकलणं हें सैतानी पाप आहे. ज्या दिवशीं आमची पवित्र स्त्रीजात वेश्याव्यवसायाच्या नरकांतून उद्धरली जाईल त्याच दिवशीं आमच्या हिंदु समाजाला चांगले दिवस दिसतील ! मीं तुमचं ऋण देऊन टाकून गुणीलेला पापपंकांतून वर काढली आहे. आतां तुमच्यासारख्या घाणेरड्या कीटकांना इथं लुडबुडण्याचं कारण नाहीं ! गुणीला माझी आहे, सर्वस्वीं माझी आहे–तुम्ही इथून चालते व्हा !

**मोह०**—वेड्या, तूं एवढा शिकलेला, समाजसुधारणा करायला निघालेला, चतुर, धूर्त असून तुला एका वेश्येचें चरित्र कळूं नये ना ? मला तुझी कींव येते, खरोखरच मला तुझी कींव येते ! बिचारा साफ फसला ! साफ तोंडघशीं पडला ! ! ( हंसून खिजवितो. )

**गुण०**—काय म्हणतां मी फसलों ? आणि तो कसा ?

**मोह०**—अरे मूर्खा, तुला लुबाडण्यासाठीं आम्हीं हें कारस्थान रचिलं होतं. तुझ्यासारख्या मूर्ख आणि उतावळ्या बुद्धीच्या समाजसुधारकांना फसवि-णारी जी सोनेरी टोळी आज या विलासपुरांत धुडगूस घालते आहे, तिचे आम्ही म्होरक्ये आहों.

**गुण०**—आणि तुमच्या कपटकारस्थानाला गुणीलेची संमति आहे ?

**मोह०**—अरे, तिची संमति आहे आणि म्हणूनच तर आम्हीं तुला सबंध वर्षभर भुलथापांवर झुलविलं ! गुणीला ही तर आमच्या कपटनाटकाची नायिका आहे. तिनं तुला इतक्या चतुराइनं फसविलं कीं, तिची जितकी तारीफ करावी तितकी थोडीच होणार आहे. आमची रक्कम आम्हांला मिळाली, गुणीलेचा हेतु साध्य झाला. आतां, अहो राजेश्री, तुमचं काळवंडलेलं तोंड झांकून घेऊन इथून चालते व्हा ! वाहवा, गुणीलेची तरी काय तारीफ आहे ?

**गुण०**—वाः, तिचं तर माझ्यावर प्रेम आहे !

**मोह०**—तुझा भाबडा मूर्खपणा म्हणतों तो हाच ! अरे, तिच तुझ्यावर मतलबी प्रेम होत, आता मतलब साधला आणि तें प्रेमहि सपले ! तुला खरं सागू ? वाईट वाटून घेऊ नकोस ह, जे खर आहे तेच स्पष्ट सागतों, तिच खर प्रेम माझ्यावर आहे ! काय शकानिधान, तुम्हीच काय ते सागा आणि याची शका दूर करा.

**शंका०**—गुणनिधान, मोहनिधान सागतात तें निःसशय खर आहे ! माझ्या गुणीलेच प्रेम मोहनिधानावरच आहे.

**गुण०**—पाजी थेरड्या, काय बोलतोस हे ? अरे, तू तिचा बाप आहेस कीं कैसान गळा कापणारा उलट्या काळजाचा कसाब आहेस ?

**शंका०**—वेड्या ! जस गुणीलेचं प्रेम खोट, तसच माझ पितृपणहि खोटच आहे. मी गुणीलेचा खोटा बाप आहे. खर सागू ? एका चागल्या कुळातल्या हिंदु विधवेन टाकून दिलेली ती पोरकी पोर आहे. मीं तिचा लहानपणापासून सभाळ केला. तिच्या लालनपोषणाच्या कामी जो पैसा मी इतकी वर्षे खर्च केला त्याची सव्याज भरपाई करून घेण्यासाठी मी धडपडतो आहे. अजून त्या सुदर पोरटीच्या जीवावर मला तुझ्यासारख्या अनेक उल्लू तरुणाना लुबाडता येणार आहे.

**मोह०**—आणि त्या कामात मी मदत करणार आहें—समजलास ना काय तें नीट ?

**गुण०**—समजलों, नीट समजलों कीं तुम्ही बदमाष आहात, पाजी आहात, सैतान आहांत, कसाब आहात...

**मोह०**—आता या शिव्याचा काय उपयोग होणार बर ? आता तू इथून निघून जावस तेंच बर !

**गुण०**—जाईन, पण एकदां गुणीलेला भेटल्यावर ! तिची आणि माझी समक्षासमक्ष भेट करवा, मग मी जाईन !

**शंका०**—आता तुला तिची भेट होण शक्य नाही.

**मोह०**—आणि ती तुझी भेट घेणारहि नाहीं. तुझी चाहूल लागताच ती आपण होऊन इथून आत निघून गेली. तिनें तुला धक्के मारून बाहेर घाल-वायला मला सागितल आहे. तू जर मुकाट्यान इथून जाणार नाहींस तर मला माझ्या लाडक्या गुणीलेचा हुकूम अमलात आणावा लागेल ! ( अस्तन्या वर सारतो. )

**गुण०**—बदमाष ! मला धमकी देतोस ? मला आंत जाऊं दे. मी तिची भेट घेणार आणि तूं अशी बेमान कशी निघालीस तें समक्ष विचारणार ! वाटेंतून दूर हो नाहीं तर......

**मोह०**—नाहीं तर काय करशील ?

**गुण०**—तुला धूळ चारून आणि लाथाडून आंत जाईन !

**मोह०**—तें शक्य नाहीं, हा पहा मीं तुला अडवून धरला आहे !

**गुण०**—अस्सं काय ? ( त्या दोघांची झटापट होते. गुणनिधान मोह-निधानाला खालीं पाडून त्याच्या छातीवर बसतो. )

**शंका०**—धांवा, धांवा, खून ! खून ! !

**फांशी०**—( प्रवेशून ) कोण कुणाचा खून करतो आहे ? हा चोर गुण-निधान इतका बिलंदर खुनीहि आहे तर ! भयंकर माणूस ! अतिभयंकर माणूस ! ! महाभयंकर माणूस ! ! ! ( शिपायांस ) अरे पाहतां काय ? पकडा त्या भयंकर माणसाला आणि ठोका बेड्या ! ( शिपाई तसं करतात. ) गुणनिधान, काय भयंकर माणूस आहेस रे तूं ?

**गुण०**—फौजदारसाहेब, मी भयंकर माणूस नाहीं, खरीं भयंकर माणसं हींच आहेत !

**फांशी०**—बरोबर आहे. ज्याअर्थी यांनीं तुझ्यासारख्या बिलंदराला आपल्या कोंवळ्या माना चरचरां कापूं दिल्या नाहींत त्याअर्थी हेच भयंकर ! राजेश्री, तुमचीं पापें भरलीं, तुमच्या सर्व चोऱ्यांचा मला पत्ता लागला, शेवटीं सुलोचना-देवीसारख्या सुशील मुलीऱ्या दागिन्यांवर डल्ला मारून तुम्हीं गवळणीच्या वेषांत आमच्या डोळ्यांत धूळ फेंकून फरारी झालांत तेंहि आम्हांला साक्षीपुराव्यानिशीं समजलें. सुलोचनादेवींच्या घरून आम्हांला सर्व बित्तंबातमी लागली. मी सुलोचना-देवींचा फार आभारी आहें. कृष्णाई—सुलोचनादेवींची दाई हीहि लाख म्हातारी आहे ! आतां आमच्या हातून तुम्ही निसटणं शक्य नाहीं. चला, मेहेरबानी करून अंधारकोठडीकडे चला !

**गुण०**—( स्वगत ) अरेरे, काय ही बेमान दुनिया ! त्या सुलोचनेसारख्या कुलवधूनंहि माझ्याशीं बेमानीचं वर्तन करावं ना ? ती गुणीला बोलूनचालून वेश्या ! ती बेमान निघाली यांत मला फारसं आश्चर्य वाटलं नाहीं; पण मीं जिला विश्वासांत घेतली त्या सुलोचनेनंहि बेमानी करावी ना ? कृष्णाई तर काय,

बोलूनचालून दासीच ! ती बेमान झाली तर कसलं आश्चर्य ? आश्चर्य हे की, मीं भाबडेपणानं स्त्रीजातीवर विश्वास ठेवला ! बेमान, स्त्रीजात सारी बेमान हेंच खरं ! चला, फौजदारसाहेब ! मला वाटेल तिकडे घेऊन चला. वाटलं तर मला अंधारकोठडींत टाका, वाटलं तर मला फाशीं द्या ! मीं बेमान स्त्रीजातीवर विश्वास टाकला, मी वाटेल ती कठोर शिक्षा भोगायला योग्यच आहे—चला !

**फांशी०**—चल तर ! तू म्हणशील तर मी तुला फासावरहि चढवीन ! कारण मी बोलूनचालून फाशीराम आहे. पण तो योग काही या वेळीच साधेलसें वाटत नाही. कारण तू कुणाचा ग्वून केल्याचं माझ्या रोजनिशींत नमूद नाही. तू दरोडेखोर आहेस म्हणून तुला सक्तमजुरीची शिक्षाच भोगावी लागेल. पण तो वाद कशाला ? न्यायदेवता न्याय द्यायला बसलेलीच आहे. चला राजेश्री ! [ शिपायास ] अरे, तुम्ही याला नीट जेरबंद केला आहे ना पण ? नाहीं तर हा तुम्हाला वाटेतच धूळ चारायला कमी करणार नाही ! खरोखर भयंकर माणूस, अतिभयंकर माणूस, महाभयंकर माणूस ! ! ! ( गुणनिधानाला घेऊन जातो. )

**मोह०**—बाबासाहेब, आपल्या मार्गातला हा कांटा आयताच परस्पर फाशीरामाच्या पादत्राणाखाली चिरडून मोडून गेला ! मी आता गुणीलेला बाहेर आणतो. तिला घेऊन आपल्याला या क्षणींच विलासपुरातून पोबारा केला पाहिजे. [ गुणीलेला आणावयास जातो. ]

**शंका०**—हा मोहनिधान मदतीला आहे म्हणून बरं. नाहीतर त्या गुणनिधानानं माझी गठडीच वळली असती ! या मोहनिधानाचा तर मी आभारी आहेच, पण ज्या कुणी विधवेनं आपल्या सुंदर मुलीला गटारात फेकून दिलें त्या विधवा माउलीचेंहि मला आभार मानलेच पाहिजेत ! त्या विधवेच्या निर्दय कृतीमुळें तर ही गुणीला माझ्या हातीं लागली ! विधवांना निर्दय बनविणाऱ्या सदय हिंदुसमाजा, तू धन्य आहेस ! [ मोहनिधान मुसकी बांधलेल्या गुणीलेला बाहेर आणतो व तिची मुसकी सोडतो. ]

**मोह०**—गुणीले, इथं काय काय प्रकार घडले ते तुझ्या कानावर गेले असतीलच ! तुझा प्यारा गुणनिधान अंधारकोठडीची काळीकुट्ट हवा खायला गेला. आता तरी तू आमच्याबरोबर येतेस की नाही ? चल बोल, आटप लौकर !

**शंका०**—हो, आटप लौकर. कारण इथं रेंगाळत राहिलो तर आमच्यावरच आटपण्याची पाळी येईल.

**गुणी०**—नीचांनों, तुम्ही लौकर आटोपाल तर माझ्यासारख्या दीन गाईवर तुमचे उपकार होतील.

**शंका०**—बाळे, येणार ना मग तूं आमच्याबरोबर?

**गुणी०**—कुठं येऊं नरकांत? नाहीं, मी नरकांत येणार नाही. नरकाचे धनी तुम्हीच व्हा! मी पतिव्रता आर्यस्त्रीचं पुण्यव्रत आचरून स्वर्गालाच जाणार! मी प्रेमळ गुणनिधानांची अविवाहित पत्नी आहें. मला माझें पुण्यपावन पत्नीव्रत सोडतां येत नाहीं. तुमचा मार्ग तुम्हांला मोकळा आहे, मी इथंच राहणार!

**मोह०**—तुला इथं विलासपुरांत राहतां येणार नाहीं. तूं जर इथं राहि-लीस तर आमच्या पातकांना केव्हां तोंड फुटेल आणि त्याबरोबरच आमचंहि तोंड केव्हां फुटेल ह्याचा नियम सांगतां येणार नाहीं. शिवाय लाडके गुणीले, माझं तुझ्यावर प्रेम आहे. लाडके...(तिच्याजवळ जातो, ती त्याच्या श्रीमुखांत भडकावते.)

**गुणी०**—पाजी माणसा, हें घे तुझ्या प्रेमाचं बक्षीस!

**मोह०**—(गाल चोळीत) गुणीले, अशी बेफाम होऊं नकोस, मी हा अपमान मुकाट्यानं सहन करणं शक्य नाहीं.

**शंका०**—बाळे, हें काय बरं भलतंच? असला बेफामपणा कोमल मनाच्या स्त्रीजातीला शोभत नाहीं. बाळ, असं करूं नये!

**गुणी०**—नीचा, तूं मला बाळे म्हणून पितृवात्सल्याची विटंबना करूं नको. तूं माझा जन्मदाता पिता नाहींस ही गोष्ट मी मघांशीच ऐकली! पित्याचं ढोंग करणाऱ्या कसाबा! इथून निघून जा. तूं माझं लालनपालन केलंस आणि त्या उपकारांची फेड गुणनिधानांनी दिलेल्या रकमेनं केव्हांच झाली! नीचा, लपव, हें पापकृत्यांनीं काळवंडलेलं तोंड लपव आणि माझ्या आत्म्याला होत असलेल्या वेदना थांबव! मोहनिधान, तूं या कसाबाला घेऊन जातोस कीं आपली आणखी फजिती करून घेतोस?· मी पूर्वी वेश्या होत्यें पण गुणनिधा-नांच्या स्वर्गीय प्रेमामुळें पवित्राचरणाची पतिव्रता स्त्री म्हणून आतां या जगांत

मिरवणार आहे. पतिव्रता आर्यस्त्री कोपली तर काय अनर्थ ओढवतो ते तुला माहीत आहे ना ?

**मोह०**—वेडे पोरी, मला वाटत की तुझ डोक पातिव्रत्याच्या भडक कल्पनानीं भडकल आहे. हे वडे विचार सोडून दे आणि आमच्याबरोबर चल !

**गुणी०**—ते शक्य नाहीं, माझ्या जिवात जीव असेपर्यंत ते शक्य नाही.

**मोह०**—आणि तुला इथ जिवत ठेवून आमचा जीव वाचणाहि अशक्य आहे. लक्षात ठेव की, तू माझ्या हातीं जिवतपणी लागली नाहीस तर तुझा जीव घेऊनच आम्हाला इथून पळाव लागेल ! ( सुरा काढून ) हा पाहिलास सुरा ? एक तुला आमच्याबरोबर येऊन स्वतःचा जीव जगवावा लागेल किंवा या सुऱ्याला स्वतःच्या प्राणाच बलिदान कराव लागेल ! ( तिच्या छातीवर सुरा रोखतो. )

**गुणी०**—( त्याचा हात धरून ) इतकच ना ? पातिव्रत्याच्या सरक्षणासाठी मी स्वतःच्या प्राणाच बलिदान करावयास तयार आहे. हा सुरा माझ्या छातीत घुसून सर्व जगाला हेंच कठरवान सागेल की, पुरुषाच्या पापी कारस्थानामुळच कुलवती आर्यस्त्रिया वेश्या होतात पण त्यांना सत्यधर्माचा प्रकाश मिळताच त्या जागृत होऊन आर्यस्त्रियाची पवित्र परपरा चालविण्यासाठीं स्वतःच्या प्राणाची आहुति देण्यासहि तयार होतात ! नीचानो, पहा, पहा, नीट डोळे फाडून या पतिव्रतेचे बलिदान पहा ! ( स्वतःच्या उरात खजीर मारून घेते व निश्चेष्ट पडते. )

**मोह०**—अरे हे काय झाल भलतच ? शकानिधान, चला पळा इथून ! नाहींतर हिचा खून आमच्या मानगुटीला बसून आमच्या मानेला फास लावील !

**शंका०**—हो, तेंहि खरच ! चला, मोहनिधान ! जीव घेऊन चला ! !

**मोह०**—चला, आहे नाही तें गुडाळून घेऊन मागच्या दारान पळ काढा !

( जातात. )

**गुणी०**—( शुद्धीवर येत ) चाडाळानो, अजून तुम्ही पोबारा केला नसलात तर लौकर तस करा. ( सुरा हातात घेऊन ) हे प्राणघातक देवते, माझ्या हृदयात शिरून गुणनिधानावरील माझ्या पवित्र प्रेमाचा ठाव तू घेतलाच आहेस. सर्व जगाला माझ्या हृदयातील पवित्र प्रेमाची कहाणी साग आणि धन्य हो !

( वंदन करते. तिच्या कपाळाला रक्त लागतें. इतक्यांत कृष्णाई सुलोचनेला घेऊन येते. )

**कृष्णा०**—बाळे, हाच गुणीलेचा महाल. इथंच फांशीराम फौजदार गुणनिधानाला पकडणार होते !

**सुलो०**—( गुणीलेकडे पाहून ) बाई, बाई, हें काय तुम्ही करतां ? तुम्ही स्वतःचा खून करून घेतलांत कीं काय ? ( पाणी आणवून तिला पाजते. )

**गुणी०**—तुम्ही कोण ? इथं या नरकांत कां आलांत ?

**सुलो०**—मी इथं गुणनिधानांचं दर्शन घेण्यासाठीं आल्यें आहें.

**गुणी०**—तें पवित्र दर्शन तुम्हांला कांहीं वर्षं तरी होणार नाहीं. त्यांना फांशीरामांनीं पकडून नेलं—त्यांना आतां शिक्षा होणार ! कुण्या सुलोचनाबाईंचे दागिने चोरल्याचा त्यांच्यावर आरोप आहे.

**सुलो०**—हायरे दुर्दैवा ! शेवटीं त्यांच्या दुःखाला मीच कारणीभूत झाल्यें म्हणावयाची ! कृष्णाई, तूं भाबड्या भोळेपणानं गुणनिधानांवर केवढा भयंकर प्रसंग आणलास हा !

**कृष्णा०**—मला काय माहीत बरं की, ते इतके चांगले गृहस्थ असतील म्हणून ? कोण दुष्ट चांडाळीण मी ! ( कपाळावर हात मारून घेते. )

**गुणी०**—बायांनों, तुमचा कांहीच अपराध नाही. मीच खरी पापिणी आहें. मला वेश्येच्या नरकांतून मुक्त करण्याकरितां गुणनिधानांनीं तें साहस केलें. सुलोचनाबाई, तुम्ही भेटलांत हें फार चांगलं झालं. बाई, गुणनिधानांवर तुम्ही प्रेम करतां ना ? सांगायला लाजूं नका. त्यांच्यावर कुणाहि सुंदर तरुणीनं प्रेम करावं असेच ते प्रेमळ वीरपुरुष आहेत. त्यांच्यावर अवश्य प्रेम करा आणि ते कारागृहांतून परत आले म्हणजे त्यांना स्वर्गसौख्याचा लाभ करून द्या. मींच तें करणार होतें पण त्यांचा प्रेमळ सहवास माझ्या नशिबीं नाहीं. बाई, आंतल्या खोलींत जा आणि माझ्या तान्हुल्याला इकडे घेऊन या.

**सुलो०**—जा, जा, कृष्णाई ! आंत जाऊन बाळाला घेऊन ये पाहूं ! [ कृष्णाई जाते. ] गुणीलाताई, त्या पुण्यपुरुषाचं प्रेम तुम्हीं आकर्षण करून घेतलंत, तेव्हां तुमची थोरवी काय सांगावी ? [ तिचं डोकं आपल्या मांडीवर घेते. ]

**गुणी०**—( कृष्णाईन मूल आणलेल पाहून ) आणा, बाळाला इकडे आणा. ( मुलाला हृदयाशीं कवटाळून ) बाळ, तू मोठा भाग्यशाली आहेस. तुला गुणनिधानासारख्या थोर आणि उदार अंतःकरणाच्या प्रेमळ पित्याच्या पोटीं जन्म लाधला आणि आता सुलोचनादेवीसारखी देवता तुझी आई होऊन तुझें लालनपालन करणार! बाळ, या पापिणीची, या तुझ्या कर्मचांडाळ मातेची कधी आठवणहि काढू नकोस आणि आपल्या थोर पित्याच्या उज्वल चरित्राचे अनुकरण करून धन्य हो. बाळ, मी तुला आता या देवतेच्या ओटींत टाकून स्वर्गांत जात्ये. ( त्याचा मुका घेऊन, सुलोचनेस ) सुलोचनाताई, मी आता थोड्या क्षणांचीच सोबतीण आहे. हे तान्हुल आम्हा दोघाच्या प्रेमाच पुण्यफळ आहे. माझ्या बाळाची आई होऊन तुम्ही त्याचा पोटच्या गोळ्याप्रमाण सभाळ करा, याला मी तुमच्या ओटींत घातला आहे. सुलोचनाताई, माझे पतिदेव तुम्हाला भेटले म्हणजे माझ्या बाळाला त्याच्या स्वाधीन करा आणि त्याना माझा अखेरचा निरोप सागा की, मी अखेरपर्यंत त्याच्याशी इमानानच वागल्यें आणि भरल्या कपाळी कुकू लुटीत स्वर्गाला निघून गेल्ये. ( अडखळत ) ताई, माझा हा निरोप माझ्या पतिदेवाला सागाल ना?

**सुलो०**—हो, सागेन बर!

**गुणी०**—हे पहा, मी माझ्या हृदयातून वाहणाऱ्या पवित्र रक्ताची शपथ घेऊन माझ्या पवित्र प्रेमाची ग्वाही तुम्हाला देत्ये आहे. ( हाताला लागलेले रक्त दाखविते. ) ताई, तुम्हाला माझ्या पवित्र प्रेमाची ग्वाही पटली ना?

**सुलो०**—ताई, तुम्ही प्रत्यक्ष प्रमदेवताच आहात, तुमच्याविषयी कोण सशय घेईल बर?

**गुणी०**—बर तर मी तुमचा निरोप घेत्ये! गुणनिधान–गु–ण–नि–धा–न! ( मरते. सुलोचना मुलाला हृदयाशी कवटाळते. पडदा. )

**दुसरा अंक समाप्त.**

---

# अंक तिसरा

—•••—

## प्रवेश पहिला

( **स्थळः**—बगीच्याच्या बाहेरची बाजू. )

**फांशी०**—( प्रवेशून ) भयंकर माणूस ! अतिभयंकर माणूस ! ! महा-भयंकर माणूस ! ! ! अहो काय सांगू ? तो भयंकर माणूस निर्जन बेटावरील सक्त मजुरीची भयंकर शिक्षा भोगून जिवंत परत आला. त्या निर्जन बेटावर तुरुंगाची हवा खावयाला गेलेला माणूस बहुधा जिवंत परत येत नाही. पण याहि नियमाला तो बिलंदर गुणनिधान अपवाद ठरला. खरोखरच भयंकर माणूस ! विलासपूरला परत आल्यानंतर तो कुठं असतो नि काय करतो कांहींच पत्ता लागत नाहीं. एकदां नुस्ताच चोऱ्या करून निर्जन बेटावर गेला पण आतां तो कुणाचा खून पाडायलाहि सोडायचा नाही. भयंकर माणूस ! अति-भयंकर माणूस ! ! महाभयंकर माणूस ! ! ! बाकी मीहि कांहीं कमी नाहीं म्हणा. तो एक बिलंदर असला तर मी सवाईबिलंदर आहें ! हां, मी आधीच सांगून ठेवतों कीं, मी सवाईबिलंदर आहें. तो जर एखादा खून करील तर मी त्याला फांशीं देईन—आधीं आपलें सांगून ठेवितों कीं, मी फांशीराम फौजदार आहें. त्याला फांशी सुद्धां देईन ! ( मिशीवर पीळ देतो. इतक्यांत कृष्णाई लहानग्या प्रेमनिधानाला घेऊन येते. )

**कृष्णा०**—कांहो फांशीराम, कुणाला फांशीं देण्याची तयारी चालविली आहे ? कुणाचं भाग्य उदयाला आलं ? तुमच्या हातून कोण स्वर्गाला जाणार ?

**फांशी०**—तो चोर, तो बिलंदर, तो भयंकर माणूस ! तो निर्जन बेटाची कडक हवा खाऊन जिवंत परत आला आहे ना ?

**कृष्णा०**—काय, गुणनिधान शिक्षेची मुदत संपवून परत आले ? बरं झालं बाई !

**फांशी०**—बरं झालं बाई ! काय बरं झालं तुमचं कपाळ ? मी आपलं आधींच सांगून ठेवतों कीं, तो बिलंदर परत आल्यानं कुणाचंहि बरं व्हायचं नाहीं ! भयंकर माणूस आहे तो ! तो सुटून आल्यापासून कसल्या तरी भयंकर कारस्थानांत गुंतलेला आहे ! कसलं तरी सोंग घेऊन शहरांत वेड्यासारखा हिंडत

असतो म्हणे ! तुम्ही आधी सुलोचनादेवींना वर्दी देऊन ठेवा, कारण त्यांच्या वरच त्याचा डोळा असला पाहिजे असा मला संशय येतो. तो त्याच्यामुळच तुरुंगात गेला ना ? आपली सावध असा. बाकी मी त्याच्या पाळतीवर आहेच म्हणा ! हें पहा, बोका जसा उदरावर पाळत ठेवतो कीं नाहीं, तसा मी त्याच्यावर पाळत ठेवणार आहे. तो उदीर असला तर मी बोका आहें बरं का ? हसतां काय ? अहो, मी खरोखरच त्या उदराचा बोका आहें !

**प्रेम०**—काय ग आजी ? हा माणूस नाहीं का ? हा बोका का आहे ?

**फांशी०**—हो, हो, मी बोकाच आहे. त्या उदरावर झडप घालीन आणि त्याला या बोकोबाचा पराक्रम दाखवीन !

**प्रेम०**—काहो बोकोबा, तुम्ही आजपर्यंत असे कोणते पराक्रम गाजविले आहेत सागा तर खरे ! कोणते पराक्रम गाजविले आहेत ?

**फांशी०**—अहो कृष्णाई, मला आत्मस्तुति करण्याचा कटाळा आहे. स्वतःच्या पराक्रमाच वर्णन करायला मला लाज वाटते बघा ! तुम्ही मला मर्द समजत असाल पण आत्मस्तुतीचा प्रश्न निघाला की मी बायकासारखा लाजतो ! जसा मी पराक्रमी आहे तसाच मी लाजाळू आहे. तुम्हीच या मुलाला माझ्या पराक्रमाची कथा सागा !

**प्रेम०**—अहारे बोकोबा ! म्हणे मी बायकासारखा लाजतो ! अहो, मग तुम्ही परकर नेसून माझ्याबरोबर भातुकलीचा खेळ खेळायला का येत नाहीं ? हें पहा, मी होईन भातुकलींतला राजा आणि तुम्हाला पळवून नेऊन माझी राणी करीन !

**फांशी०**—वाः, तू मला पळवून नेणार आणि राणी करणार काय ?

**कृष्णा०**—महाराज, रागावू नका, लहान मूल आहे !

**फांशी०**—म्हणजे मी या मुलावर रागावेन अस तुम्हाला वाटल कीं काय ? मला मुलाच्या बाळबोलाच मोठ कौतुक वाटत ! अहो, मलासुद्धा याच्या एवढाच एक मुलगा आहे. मी झोंपी गेलों म्हणजे तो माझी शेंडी जात्याच्या खुट्याला बाधतो आणि छातीवर बसून माझ्या मिशाच उपटतो ! त्यान जोरजोरान मिशा उपटल्या म्हणजे मी ओरडत उठतों म्हणा, पण म्हणून मी त्याच्यावर रागावतों म्हणता कीं काय ? बाळ, तुझ्या बोलण्याचा मला नाहीं

राग येत! पण कायरे, तूं मला कसं पळवून नेशील सांग पाहूं? मी कसा रेड्यासारखा मोठा आहें तर तूं अगदीं पाड्यासारखा लहान आहेस! सांग, मी तुझ्या खेळांतली राणी झालों तर तूं मला कसं पळवशील?

**कृष्णा०**—काय हें? तुम्ही एवढे मोठे झालांत तरी थट्टेखोरपणा सुटला नाहीं ना? अहो, त्या मुलाची थट्टामस्करी काय मनावर घेतां?

**फांशी०**—बाई, तुम्ही गप्प बसा. तुम्हांला नाहीं समजायची मुलांच्या मंजुळ बोलांतली मौज! मी असा थट्टेखोर आहें आणि म्हणूनच भयंकर कामें करूनहि गुटगुटीत राहिलों आहें! माझ्यासारखीं दुष्ट माणसं अशींच थट्टेखोर असतात बरं का? तुम्ही गप्प बसा. बरं बाळ, या बाईच्या बरळण्यांत आपला भातुकलीचा विषय तसाच राहून गेला! सांग पाहूं, तूं मला कसं पळवशील?

**प्रेम०**—अहो, तुम्ही परकर नेसलांत म्हणजे लहान मुलगी व्हाल आणि मग मी तुम्हांला खांद्यावर घेऊन पळवून नेईन! हो, पण जर का तुम्ही गडबड करूं लागलांत तर या तुमच्या मिशाच उपटीन! सोडणार नाहीं!!

(त्याच्या मिशा उपटतो.)

**फांशी०**—ओय्, ओय्, ओय्, बाई, या तुमच्या मुलाला ओढा, हा आज माझ्या मुखड्यावर मिशा कांहीं उरूं देत नाहीं! ओय्, ओय्, ओय्!

**कृष्णा०**—बाळ, सोड त्यांच्या मिशा! मिशा गेल्या तर त्यांच्यावर फार भयंकर प्रसंग येईल!

**प्रेम०**—अग पण आजी, मी यांची थट्टा करतों आहे ना?

**कृष्णा०**—चल, ये इकडे, मोठ्या माणसाची थट्टा करणं बरं नव्हे! (त्याला दूर करते.)

**फांशी०**—ओय्, ओय्, ओय्,! बाई, तुमचा मुलगा मोठा भयंकर माणूस आहे बघा! तुम्ही त्याला ओढून घेतलंत म्हणून बरं झालं, नाहींतर हा तुमचा छकुला आज कांहीं माझ्या मर्दानी मुखावर मिशांचे आंकडे शिल्लक ठेवीत नव्हता! भयंकर माणूस होणार हा!

**कृष्णा०**—अहो, तुम्हांला अजून ठाऊक नाहीं! हा गुणनिधानांचा मुलगा आहे, बापसे बेटा सवाई होणार बघा!

**फांशी०**—( ताडकन् उठून ) काय म्हणता, हा त्या भयकर माणसाचा मुलगा आहे ? म्हणूनच हा इतका भयकर आहे ! भयकर, अतिभयकर, महा-भयकर ! बापापेक्षाहि भयकर !! मुला, तू त्या भयकर बापाचा सवाई भयकर मुलगा असलास तरी तुला सागून ठेवतो कीं, मी एकदा चिडलो कीं, माझ्यापुढं कुणाची मात्रा चालू द्यायचा नाहीं ! तुझ्या त्या भयकर बापाला निर्जन बेटा वरच हवा खायला धाडला, पण तुला मी वरच्या नदनवनाची हवा खायला स्वर्गात पाठवून देईन ! म्हटल मी फाशीराम फौजदार आहें !

**प्रेम०**—( चिडून ) काय, माझ्या बाबाना तुरुगात पाठविणारे फाशीराम ते तुम्हीच काय ? थाबा, मीच तुम्हाला स्वर्गात पाठवतो ! ( दड थोपटतो. ) माझ्याशी दोन हात करायची आहे का तुमची तयारी ? ( माड्या थोपटतो. )

**फांशी०**—बाई, या तुमच्या बिलदर मुलाला मागें ओढा. तुम्ही त्याला घट्ट धरून ठेवलत की, मी इथून ऐटीत निघून जाईन !

**कृष्णा०**— बर, तुम्ही खुशाल जा ! मी त्याला आवरत्ये. ( त्याला धरते. )

**फांशी०**—(ऐटीनें जाता जाता) भयकर बापाचा महाभयकर बेटा आहे खरा !

**प्रेम०**—( कृष्णाईच्या हातातून निसटून फाशीरामाच्या अगावर धावून जातो व त्याचे पाय पकडून त्याला पाडतो. ) अरे लेका, माझ्या बाबाना तूं तुरुगात पाठविलस नाही का ? आता कसा माझ्या हातून निसटतोस तेच पहातों ! ( त्याला गुद्दे मारतो. )

**कृष्णा०**—( त्याला मागे ओढून ) काय बर हे बाळ ? किती खोडकर आहेस तू ! अस करू नये ! जाऊ दे त्याना. फौजदारसाहेब, तुम्ही जा कसे !

**फांशी०**—( जाता जाता ) भयकर बापाचा भयकर मुलगा ! भयकर, अतिभयकर, महाभयकर ! ( मुलाकडे पहात पहात उलटा चालत जातो. )

**प्रेम०**—आजी, तू आज माझा घात केलास बघ ! माझ्या बापाला तुरुगात पाठविणाऱ्या त्या फाशीरामाचा मी खरपूस समाचारच घेणार होतों !

**कृष्णा०**—खुळा कुठला ! चल घरी, आई घरी वाट पहात असेल ! चल !

**प्रेम०**—( जमिनीवर बसून पाय आपटीत ) मी नाहीं येत जा ! तू माझा आज घात केलास ! आलो नाही तर तू काय करशील ?

**कृष्णा०**—मी काय करणार बाबा तुझ्या हूडपणापुढं ? जो तूं मोठमोठ्यांना ऐकत नाहींस तो मला का धूप घालणार आहेस ? मी आपली जातेंच कशी ! पण हें पहा, आणखी हूडपणा करूं नको, लौकर घरी ये. ( जाते. )

**प्रेम०**—( हातपाय आपटीत ) ऊं, ऊं, ऊं ! माझ्या हातून तो फांशीराम निसटला. आतां माझे बाबा मला भेटले तर ते काय म्हणतील बरं ?

**गुणनिधान०**—( बैराग्याच्या वेषांत आडून सारं ऐकत असलेला असा पुढें येऊन ) बाळ, तुझे बाबा तुला शूराचा बच्चा आहेस असंच म्हणतील व तुला शाबासकी देऊन जवळ घेतील आणि प्रेमानं कुरवाळून असा तुझा गोड पापा घेतील ! ( त्याला जवळ घेतो व कुरवाळून त्याचा पापा घेतो. प्रेमभरानें त्याचे डोळे पाण्यानें भरून येतात. )

**प्रेम०**—पण कांहो, तुम्ही कोण ? आणि तुम्ही असे रडतां कां ? बोला ना ? ( त्याला मिठी मारतो. )

**गुण०**—बाळ, तुझे गुण पाहून मला प्रेमाचं रडूं कोसळतें आहे. बाळ, किती गुणी आहेस तूं ? किती प्रेमळ आहेस तूं ?

**प्रेम०**—मी गुणनिधान बाबांचा मुलगा आहें म्हणून गुणी आहें आणि माझं नांव प्रेमनिधान आहे म्हणून मी प्रेमळ आहें ! पण तुम्ही कोण ?

**गुण०**—बाळ, मी एक भणंग भिकारी आहें. मीहि तुझ्यासारखाच गुणी आणि प्रेमळ होतों पण प्रेमाच्या नादी लागून गुण उधळले आणि असा बैरागी झालों. बाळ, तुला माझी भीति वाटत नाहीं का ? तुला माझ्या या भिकारी वेषाचा तिटकारा येत नाही का ?

**प्रेम०**—नाही, मला तुमची भीतिहि वाटत नाही आणि तुमचा तिटकाराहि येत नाही. मला तुम्ही कुरवाळलंत ना, तेव्हां मला फार आनंद झाला ! मला तुम्ही असेंच कुरवाळा ! मला तुमचा तिटकारा मुळीच येत नाहीं पण त्या म्हाताऱ्या आजिटलीचा मात्र तिटकारा येतो. ती माझ्यावर एवढाले डोळे वटारते आणि मला म्हणते कशी ? तुझा बाप एक खोडकर होता तर तूं सवाई खोडकर आहेस ! माझे बाबा खोडकर होते का हो ? मी सवाई खोडकर आहें का ? तुम्हीच सांगा !

**गुण०**—बाळ, तुझा बाप खोडकर नव्हता आणि तूंहि खोडकर नाहींस. ज्यांना जातिवंत शौर्याची पारख होत नाहीं तीं माणसें शूरांना खोडकर म्हण-

तात ! बाळ, तुझी आजी तुला वाईट बुद्धीनें नाही खोडकर म्हणत ! ती तुला तस कौतुकानच म्हणते. तुझी आजी मोठी प्रेमळ आहे बर का ?

**प्रेम०**—हो, खोट कशाला बोलू ? आजी किनई एरवीं फार प्रेमळ आहे. मला गोड गोड खायला देते आणि माझें किती कौतुक करते ! आणि माझी आई आहे की नाही, तिचा प्रेमळपणा तर विचारूच नका. मी थोडकासाच वेळ जरी दूर गेलों तरी ती कासावीस होते आणि मी तिला कडकडून मिठी मारली म्हणजे ती रडूच लागते ! बैरागीबुवा, माणसें प्रेमाने सुद्धा रडतात ती हो का ?

**गुण०**—बाळ, ते मी तुला कस सागूं ? तुला प्रेमाचा विषय कसा समजावून देऊ ? बाळ, प्रेमानं आतड्याला पीळ पडतो आणि जिवाचे पाणी होते—मग तेच जिवाच पाणी डोळ्यातून वाहू लागते आणि प्रेमाला पूर येतो ! बर पण बाळ, तुझ्या आईच नाव काय ? गुणीला का ?

**प्रेम०**—छे, माझ्या आईच नाव गुणीला नाही आणि फिणीला नाहीं. माझ्या आईच नाव मोठ्ठ गोड आहे—तिला मी आई म्हणतो आणि लोक तिला सुलोचनादेवी म्हणतात.

**गुण०**—हो, बाळ ! ती खरोखरीच देवता आहे, तिची योग्यता फार मोठी आहे ! बाळ, तुझ तिच्यावर खरच प्रेम आहे म्हणतोस ?

**प्रेम०**—( रागावून ) हे हो काय अस विचारता मला ? माझी तुम्ही थट्टा करता होय ? आईवरच्या माझ्या प्रेमाची कुणी थट्टा केली तर मला खपायची नाहीं बर का ? बजावून ठेवतों ! ( डोळे वटारतो. )

**गुण०**—बाळ, मी तुझ्या प्रेमाची थट्टा करण शक्य तरी आहे का ? बाळ, तुला सुलोचनादेवीसारखी देवतातुल्य आई मिळाली तेव्हा तू धन्य आहेस ! बर बाळ, जातो मी ! तू आता असाच दुडदुडत आईकडे जा बर का ? तुझ्या विरहामुळ त्या देवतेचा जीव कासावीस झाला असेल ! ( त्याचा मुका घेतो. )

**प्रेम०**—बैरागीबुवा, तुम्ही येता का माझ्या आईला पहायला ? चला माझ्याबरोबर ! तिची देवपूजा झाली म्हणजे ती मला प्रसादाची केळीं देईल आणि मग तीं मी तुम्हाला देईन बर का ? बैरागीबुवा, चला ना आईकडे ! ( त्याला ओढू लागतो. )

**गुण०**—बाळ, मला अत्तां काम आहे. मी जातों पण लौकरच येईन बरं का तुझ्या आईला भेटायला!

**प्रेम०**—(जातां जातां) या हं, खरोखरच या! याच बरं का? (जातो.)

**गुण०**—अहाहा! देवा, तुझी लीला तरी किती चमत्कारिक आहे ही? देवा, माझ्या बाळाचं दर्शन मला घडविलंस आणि तुझ्या कृपेनं मी धन्य झालों. चला, आतां चांगलीशी संधि पाहून सुलोचनादेवीचंहि दिव्य दर्शन घ्यावं आणि धन्य व्हावं!! (जातो.)

---

## प्रवेश २ रा

(**स्थळ**—घरापुढील अंगण. सुलोचनादेवी तुळशीची पूजा करीत असून संतांचा मेळा 'वैष्णवजन तो तेने कहिये' हें पद गात बाजूनें निघून जातो. पूजा आटोपल्यावर सुलोचना देवाचें गीत गाऊं लागते.)

**सुलोचनाः**—

### पद

**जे कां रंजले गांजले। त्यांसी म्हणे जो आपुले॥ तोचि साधू ओळखावा। देव तेथेंचि जाणावा॥१॥ तुका म्हणे सांगों किती। तोचि भगवंताची मूर्ती॥२॥**

(सुलोचनेचें गाणें चालू असतां कृष्णाई चहा घेऊन येते.)

**कृष्णा०**—बाळ, लौकर चहा घे हं! नाहींतर गाण्याच्या नादांत चहा निवून जाईल.

**सुलोचनाः**—काय ग हें कृष्णाई! किती लौकर चहा घेऊन आलीस? किती गोड गाणें मी गात होत्यें आणि त्यांत तूं व्यत्यय आणावास ना? आणखी दोन देवाचीं गाणीं मी म्हटलीं असतीं तर कांहीं बिघडलें का असतें? (चहा पिऊं लागते.)

**कृष्णा०**—हो, बिघडलंच असतें! तुला काय करायच्या या देवभोळे-पणाच्या उठाठेवी? देवभोळेपणामुळंच आपला हिंदुसमाज रसातळाला पोंचला असं तुझं मत होतं ना? तुझ्या देवभोळ्या आईनं तुला लहानपणीं देवाचीं गाणीं शिकविलीं म्हणून तिलासुद्धां नांवं ठेवायला तूं कमी केलं नाहींस पण आतां

पहाते तो तूच तिच्यावर कडी केली आहेस ! पहाटे उठून स्नान करतेस काय, तुळशीची पूजा करतेस काय, देवाची गाणी गात बसतेस काय, साराच चमत्कार ! शिकून शहाणी झालेली सुलोचना कधी असले देवभोळेपणाचे थेर करील अस मला स्वप्नात सुद्धा वाटत नव्हते !

**सुलो०**—कृष्णाई, माझ्या मनात जे परिवर्तन झाले ते आश्चर्य करण्यासारखेंच आहे खरे ! मी इतकी कशी बदलल्यें त्याचे माझे मलाच आश्चर्य वाटते आहे ! पण कृष्णाई, हल्लीं सर्वच गोष्टी आश्चर्य करण्यासारख्या घडून येत नाहीत का ? देवाची लीलाच आश्चर्यकारक नाही का ? देवा, तुझ्या अतर्क्य लीलेचे वर्णन कोण करील बर ?

## पद

**श्रमते गिरा तुज वानितां। लीलाधरा ॥ ध्रु०॥ करित लीला मति बावरी ! विश्वंभरा ॥ १ ॥ करिसि धवली रंग नाना मायावरा ॥ २ ॥**

**कृष्णा०**—होय बाई ! ते गुणनिधान तुला चोराच्या रूपाने भेटले काय आणि त्यानी तुला वेड केल काय, सारच आश्चर्य ! खरच, तुला ती गोष्ट सागायची अगदीच विसरल्ये ! काल मला काशीराम फौजदार भेटले होते आणि त्यानी मला सागितले की, गुणनिधानाची सुटका झाली आणि ते निर्जन बेटाहून इथ विलासपूरला परत आले सुद्धा !

**सुलो०**—काय म्हणतेस ? गुणनिधान परत आले ? मग ते अजून कसे मला भेटले नाहीत ? ते माझ्यावर रागावले तर नसतील ना ? अथवा, त्यानी माझ्यावर का राग धरू नये ? एका अर्थी मीच त्याच्या शिक्षेला कारणीभूत झाले नाही का ? बर, काशीरामानी त्याच्याविषयी आणखी काही सागितल नाहीं का ?

**कृष्णा०**—काशीराम म्हणाले, परत आल्यापासून ते वेषातर करून शहरात वेड्यासारखे फिरत असतात !

**सुलो०**—परत आल्यावर गुणनिधानाना गुणीलेसबधीची दुष्ट वार्ता कळली असावी आणि त्यामुळे त्याची स्थिति वेड्यासारखी झाली असण सहाजिकच आहे. अग पण कृष्णाई, बाळ प्रेमनिधान कुठ गेला ? आज तो देवाचा प्रसाद घ्यायला कसा आला नाही ? जा, त्याला इकडे लौकर पाठवून दे पाहू !

**कृष्णा०**—बरं तर देतें पाठवून त्याला ! ( जाते. )

**सुलो०**—गुणनिधान इथं परत आले नि मला कसे भेटले नाहींत ? कीं ते माझ्यावर रागावले ? खास ते माझ्यावर रागावलेच असले पाहिजेत. गुणनिधान, गुणनिधान, या तुमच्या दीन दासीवर रागावूं नका. तुमच्या सद्गुणांची ओळख मला झाली आहे. गुणनिधान ! तुम्हांला मी माझे हृदयेश्वरच समजल्यें.

### पद

**ईश मानीं प्रेमा । ध्यात मनीं रामा सुनामा ॥ ध्रु० ॥**
**रूप सुमंगल प्रेमा क्षणीं धरी । उपजवि मनिं झणिं**
**सुकामा ॥ १ ॥**

( इतक्यांत प्रेमनिधान येतो. )

**प्रेम०**—आई, आई, कां ग मला बोलावलंस ? ( सुलोचनेला मिठी मारतो. )

**सुलो०**—बाळ, कुठं भटकत फिरतोस ? आज देवपूजेचा प्रसाद घ्यायला कसा आला नाहींस ? बाळ, असं कुठं रिकामटेकडं हिंडूं नये. ( केळी आणून ) हीं घे प्रसादाचीं केळीं ! हं, खाऊन टाक पाहूं !

**प्रेम०**—आई, हीं केळीं अशींच ठेवून दे. ते बैरागीबुवा भेटले म्हणजे मी तीं त्यांना देणार आहें.

**सुलो०**—बैरागीबुवा ? कोण बैरागीबुवा ? कुठं आहेत ते ?

**प्रेम०**—आई, काल किनई मला एक मोठे थोरले बैरागीबुवा भेटले ! किती छानदार होते ते ? मला ते फार आवडले बघ ! त्यांनीं केवढी दाढी वाढविली आहे पण ? त्यांची दाढी म्हणजे जशा कांहीं वडाच्या पारंब्या ! पण आई, हें बघ, मला त्यांच्या दाढीची मुळींच भीति वाटली नाही. त्यांना तूं पाहिलं नाहींस म्हणून, नाहींतर ते तुला सुद्धां फार आवडतील बघ ! तूं मला बटबटीत डोळयांचा मुलगा म्हणतेस ना, पण त्या बैरागीबुवांचे डोळे अगदीं माझ्यासारखेच बटबटीत आहेत ! मी त्या बैरागीबुवांना तुला भेटायला बोलावलं आहे. आई, तूं भेटशील ना त्यांना ? भेटशील ना ? भेटशील ना ? कीं तूं त्यांची दाढी पाहून दूर पळशील ?

**सुलो०**—नाहीं बरं मी दूर पळायची, मी त्यांना भेटेन हं ! ( स्वगत ) काय बरं मी हें बोलून गेल्यें ? बाळानं सहज विचारलं आणि मी त्यांना भेटायचं कबूल केलं ! देवा, ते गुणनिधानच असतील ना पण ?

**प्रेम०**—बर पण आई, तुला त्या बैरागीबुवाना भेटायच आहे ना? होय ना? अत्ता मी त्याना पकडून आणतो—पकडून आणतों बरं का? अत्तां पकडून आणतो, जातात कुठ पळून तेच पहातो. ( इतक्यात एका झुडुपामागें लपून बसलेल्या गुणनिधानाला पकडून फाशीराम त्याला पुढे आणतो. )

**फांशी०**—अरे चोरा, आता कुठ पळशील? कसा पण तुला पकडला? सुलोचनादेवी, हा पहा मी एक चोर पकडून आणला! कायरे, झुडपामाग लपून सुलोचनादेवीकडे चोरून पहात होतास नाही का?

**प्रेम०**—( पाहून व ओळखून ) हा फाशीराम, सोडा त्या बैरागीबुवाान! हे बैरागीबुवा आहेत, चोर नाहीत! सोडा त्याना, ते माझे मित्र आहेत!

**फांशी०**—बरोबर आहे! चोराचा मुलगा तू, तेव्हा तुझे मित्र असलेच चोर असायचे! बाईसाहेब, मी या बैराग्यावर चोरीचा आरोप ठेवून त्याला गिरफदार केला आहे. पण माझ्या या कृतीला तुमची समति आहे ना?

**सुलो०**—फाशीराम, सोडा त्याना. हे चोर दिसत नाहींत—मला त्याचा सशय मुळीच येत नाही, बाळ म्हणतो तेंच खरें दिसते! सोडा त्याना, ते चोर नाहींत बर!

**फांशी०**—अहो, हा चोरच आहे. हा भस्मासुर तुमच्याकडे चोरून पहात होता. मी याची चोरटी नजर प्रत्यक्ष या डोळ्यानीं पाहिली! माझे डोळे धड आहेत, फुटलेले नाहींत!

**प्रेम०**—फुटलेलेच आहेत तुमचे डोळे! पहा नीट, हे बैरागीबुवा माझे मित्र आहेत, सोडता त्याना कीं आता तुम्हांला दाखवू गंमत? ( त्याच्या अगावर धावतो. )

**फांशी०**—हा, अगलट करू नकोस! दूर उभा रहा! दूर उभा रहा! हा पहा मी याला सोडून दिला!

**प्रेम०**—फांशीराम, तुम्ही मुकाट्यान दूर उभे रहा! बैरागीबुवा, या तुम्ही इकडे. आईन तुम्हाला भेटण्याच माझ्याजवळ कबूल केल आहे. या इकडे आईला भेटायला! ( त्याला ओढतो. )

**गुण०**—बाळ, तू भोळा आहेस. तुझी आई या चोराच तोंडसुद्धा पहाणार नाहीं—मी तसाच काळतोंड्या आहें.

**प्रेम०**—असें काय हो बोलतां बैरागीबुवा ? वर पहा ना ! कुठं आहे तुमचं तोंड काळं ? कसं गोरंपान आहे ! तुम्हांला ही एवढी दाढी नसती तर तुम्ही किती सुरेख दिसलां असतां ? उपटूं का तुमची ही दाढी ? ओढूं का ? ओढूं का ? (दाढी ओढतो.)

**फांशी०**—अरे, हा तर चोर गुणनिधान! अरे चोरा...( कृष्णाई येते. )

**सुलो०**—हां, त्यांना चोर म्हणूं नका, ते चोर नाहींत ते सच्चे माणूस आहेत. त्यांच्या सच्चेपणाबद्दलची खात्री कृष्णाईसुद्धां देईल !

**फांशी०**—कांहो कृष्णाई, तुम्ही देतां का या चोराच्या सच्चेपणा-बद्दलची खात्री ?

**कृष्णा०**—हो, मी देत्यें खात्री ! फांशीराम, तुम्हांला खरी हकीगत कळली नाहीं म्हणून तुम्ही असं बोलतां ! चला तिकडे घरांत म्हणजे मी तुम्हांला सर्व हकीगत सांगत्यें.

**फांशी०**—काय, या चोराला मोकळा सोडून घरांत येऊं म्हणतां ? अहो भयंकर माणूस आहे हा ! भयंकर, अतिभंयकर, महाभयंकर !

**कृष्णा०**—फांशीराम, तुम्ही निर्धास्त असा. गुणनिधान आतां सुलोचनेच्या हातांतून निसटून जाणं शक्य नाहीं. माझी बाळी यांना खात्रीनं मुठींत ठेवील ! तुम्ही चला घरांत, मी तुम्हांला सर्व कांही सांगत्यें, चला !

**फांशी०**—बरं चला तर ! यजमानच चोराला सामील झाला तर माझं तरी काय चालणार ? सुलोचनादेवी, सर्व हकीकत ऐकून परत येईपर्यंत तुम्ही यांना इथंच अडकवून ठेवा हं ! कृष्णाई, चला ! (स्वगत) काय भयंकर माणूस असला पाहिजे हा ? चोर म्हणून घरांत शिरला पण यजमानीणबाईचं मन चोरून फरारी झाला अशातलं कांहीं त्रांगडं झालेलं दिसतंय ! खरोखरच भयंकर माणूस ! ( जातो. )

**गुण०**—सुलोचनादेवी, मी सर्वस्वीं तुमचा अपराधी आहें. मला क्षमा करा ! ( तिचे पाय धरावयास खालीं वांकतो. )

**सुलो०**—हें काय बरं असं ? महाराज, मीच सर्वस्वीं गुन्हेगार आहें, तुम्हीच उदार मनानं मला क्षमा केली पाहिजे.

**प्रेम०**—हो बाबा, तुम्हीच आईला क्षमा करा. तुम्ही गुणनिधान तेव्हां

तुम्हीच माझे बाबा ! हो, तुम्हीच माझे बाबा ! बाबा, आईनच अपराध केला आहे–तिला क्षमा करा.

**गुण०**—बाळ, यानी काय बर अपराध केला ?

**प्रेम०**—अपराध केला नाही तर काय ? ही मला म्हणते की, 'मी तुझी आई नाहीं, तुझी आई गुणीला आहे.' कोण हो ही गुणीला ?

**गुण०**—बाळ, तुझी खरी आई गुणीलाच आहे. तू त्याच मायावी मातेच्या पोटी जन्म घेतला आहेस ! ती तुझी माता व्हावयाला मुळींच योग्य नव्हती– ती मायावी होती, दुष्ट होती, बेमान होती.

**सुलो०**—महाराज, तुम्ही त्या देवतेला उद्देशून असले अपशब्द उच्चारू नका. गुणीला प्रत्यक्ष प्रेमदेवता होती. त्या मोहनिधानाने तुमच्या डोळ्यात धूळ फेंकली आणि तुमचे मन कलुषित केले. महाराज, ती देवता होती, त्या देवतेन पवित्र पतिप्रेमाच्या अग्निकुडात आपल्या प्राणाची आहुति दिली. त्या देवतेनें प्राणत्याग केला आणि स्वतःच्या शीलाचे रक्षण केल. त्या देवतेला दोष देऊ नका. ती आपल्या पुण्यनामाचा जयघोष करीत स्वर्गाला निघून गेली, तिला दोष देऊ नका.

**गुण०**—अस असेल तर मीच पापी चाडाळ ठरलो, मी त्या देवतेला दूषण दिल

**सुलो०**—पण ते आपण गैरसमजुतीन केल, खरे नीच ते शकानिधान आणि मोहनिधान आहेत !

**फांशी०**—( कृष्णाईसह येऊन ) हो बुवा, खरे नीच तेच आहेत. कृष्णाईनीं सर्व हकीकत सागून माझीहि तशी खात्री करून दिली. गुणनिधान, मी तुम्हाला नकळत चोर म्हटल–तुम्ही मला क्षमा करा ! तसा मी कधी चुकायचा नाहीं पण या वेळी घसरलो खरा !

**प्रेम०**—घसरलात ना ? चुकलात ना ? अहो तुम्ही चुकायचेच ! मी तुम्हाला तस सागत नव्हतो ? फाशीराम, हे पहा माझे बाबा आणि ही पहा माझी आई ! ( दोघाचे हात धरून जवळ ओढतो. ) आई, तू माझ्या बाबाना भेटण्याचें कबूल केल आहेस, आता का लाजतेस ?

**सुलो०**—बाळ, लज्जा वाटण्यासारखीच कृति माझ्या हातून झालेली आहे. माझ्या मूर्खपणामुळच तुझे बाबा चोर ठरले !

**कृष्णा०**—नाहीं, तो मूर्खपणा माझ्याच हातून झाला! महाराज, सुलो-चनेचा त्यांत कांहींच अपराध नाहीं. तुम्ही उदार मनानें तिच्या प्रेमाचा स्वीकार करा. ही तुमच्यासाठीं सारखी झुरते आहे. गेल्या पांच वर्षांत हिच्या डोळ्याचं पाणी खळलेलं नाहीं. महाराज, माझ्या बाळीला पदरांत घ्या.

**गुण०**—कृष्णाई, सुलोचनादेवी म्हणजे प्रत्यक्ष प्रेमदेवताच आहे. मी त्यांच्या प्रेमाचा स्वीकार करावा इतकी माझी योग्यताच नाही. शिवाय कृष्णाई, मी तुम्हांला खरं तें सांगितलं तर तुम्हांला राग येणार नाहीं ना? एकंदर स्त्रीजातीविषयीच माझें मन विटलं आहे!

**कृष्णा०**—म्हणजे तुम्हांला माझ्या बाळीबद्दल तिटकारा वाटतो तर? ती तुमच्यासाठीं रात्रंदिवस झुरते आणि तुम्ही मात्र तिचा तिटकारा करतां—वाः!

**गुण०**—नाहीं, सुलोचनादेवींबद्दल मला मुळींच तिटकारा वाटत नाहीं, त्यांच्याबद्दल माझ्या मनांत पूर्ण आदरबुद्धीच वसत आहे!

**सुलो०**—महाराज, तिरस्काराची भावना नष्ट होऊन त्या ठिकाणीं आदर-बुद्धि उत्पन्न झाली म्हणजे प्रेमभावनेचा उदय होण्यास मुळींच वेळ लागत नाहीं. महाराज, माझंहि तसंच झालं बरं का? आपल्याविषयीं माझ्या मनांत प्रथम तिरस्कार उत्पन्न झाला, लौकरच त्या तिरस्काराचं रूपांतर कौतुकांत झालं, नंतर कौतुकाची जागा आदरभावानं घेतली आणि आतां त्याच आदरानें प्रेमाचं मंगल स्वरूप धारण केलं आहे. महाराज, तुमच्या मनांत माझ्याविषयीं आदर-भाव उत्पन्न झाला आहे ना? होय ना? हा आदरभाव म्हणजे पुढें वाढणाऱ्या प्रेमवृक्षाचा उमलता अंकुर आहे बरं! महाराज, या उमलत्या प्रेमांकुराला करपवून टाकूं नका आणि माझा स्वीकार करा. तुम्ही अंगिकारलेल्या सेवाधर्म-व्रताची पवित्र दीक्षा घेऊन तुमची सहधर्मचारिणी हें पुण्यनाम मी सार्थ करून दाखविणार आहें. महाराज, मनोभूमीवर उचंबळून येणाऱ्या प्रेमभावनेचा उगाच कोंडमारा कां करतां बरं? हो, तुमच्या मनांत खात्रीनं प्रेमाचीच भावना उत्पन्न झाली आहे. हो, हो, प्रेमाचीच भावना उत्पन्न झाली आहे! हो ना? खरं ना? महाराज, मीच ती तुमची लाडकी गुणीला आहे असें समजा!

**गुण०**—छेः, छेः! कुठं ती एका पापिणी विधवेनं टाकून दिलेली गुणीला आणि कुठं तुम्ही कुलशीलवान मातापित्यांच्या पोटीं जन्मलेल्या देवी?

**सुलो०**—महाराज, तुम्ही जाणूनबुजून त्या मायलेकींबद्दल अन्यायाची

भाषा वापरीत आहां ! मी थोडं स्पष्ट बोलल्ये तर मात्र राग मानू नका. महाराज, आम्हा आर्यस्त्रियाना पापिणी हें विशेषण लावणेंच पाप आहे. आर्यस्त्रिया जन्मतःच पवित्र असतात पण त्याना पापमार्गाला लावण्याचं पापकर्म कसाबकरणीचे पुरुषच करीत असतात हे विसरू नका. आम्ही स्त्रिया जितक्या पवित्र असतो तितकेच तुम्ही पुरुष पापी असता ! ज्या चांडाळ पुरुषानं गुणीलेच्या विधवा माउलीला पापमार्गाकडे नेलं, त्याला तुम्ही पुरुषानी कोणतं शासन दिलं ? तो चांडाळ खुशाल नामानिराळा राहिला आणि ती बिचारी विधवामाउली मात्र पापिणी ठरली. त्या चांडाळ पुरुषाच्या पापाचं प्रायश्चित्त एका अबलेला भोगावं लागलं ! गुणीलेचीहि तीच गती ! तिला पापमार्गाकडे खेचून नेणारे कोण ? ते शकानिधान आणि मोहनिधान ! पण ते पापमुक्त राहिले आणि तुम्ही गुणीलेसारख्या साध्वीलाच फासावर चढवावयास सिद्ध झाला ! महाराज, तुम्हा निर्दय पुरुषाची ही करणी न्यायाची आहे का ? तुमची स्वतःची गोष्ट वेगळी आहे, तुम्हांला मी दोष देऊं इच्छित नाहीं पण तुमची गोष्ट सोडलीत तर तुम्हा पुरुषाची एकदर जातच पापी आणि नीच नाही का ? महाराज, मी थोडं कठोर बोलत्ये आहे हे मला समजतं पण त्याला मी तरी काय करूं ? माझं हृदय आतून पेटलं आहे. पुरुषजातीनं स्त्रीजातीवर चालविलेला अन्याय मला सहन होत नाही ! महाराज, तुमची थोर योग्यता मी ओळखली असल्यामुळे मी तुम्हाला माझं प्रेमसर्वस्व अर्पण करत्ये आहे. महाराज, पापी पुरुषजातीच्या अन्यायापासून पवित्र स्त्रीजातीला सोडविण्याकरिता तरी माझ्या प्रेमाचा स्वीकार करा. तुम्ही अंगिकारलेल्या सेवाधर्मव्रताची भागीदारीण व्हावे हीच माझी आकांक्षा आहे. महाराज, कराल ना माझ्या प्रेमाचा स्वीकार ?

## पद

**मम सेवा स्वीकरा । नच द्यावे अंतरा ॥ ध्रु० ॥ धर्माचरणा साह्य करिन मी । द्या चरणीं आसरा ॥ १ ॥**

**गुण०**—सुलोचनादेवी, तुम्ही पुरुषजातीविषयीं कितीहि कठोर बोललात तरी मला राग येणार नाहीं. आम्हा पुरुषाची जातच तशी दुष्ट आहे. आम्ही आजपर्यंत हजारोंच नव्हे तर लाखों आणि कोट्यवधि आर्यस्त्रियाना पापमार्गाला लावून त्याची समाजातूनच केवळ नव्हे तर अत्युच्च दर्जाच्या आर्यधर्मातूनहि, कायमची हकालपट्टी केली आहे. देवि, तुम्ही माझ्या सेवाधर्माची भागीदारीण

झालांत तर त्यांत मला धन्यताच वाटणार आहे. तुमच्या पवित्र साहचर्यानें मला माझ्या परमसुंदर आणि परमपवित्र आर्यधर्माची सेवा करण्याला हुरूपच वाटेल पण...( विचार करतो. )

**फांशी०**—अरे बापरे ! हे बुवाजी असे भयंकर आहेत तर ? आणि या सुलोचनादेवी कांहीं कमी भयंकर नाहींत ! चोरावर प्रेम करणारी स्त्री भयंकरच म्हणायची ! गुणनिधान, मी जाणतों कीं तुम्ही गूढ विचारांत पडलां आहांत आणि त्याचबरोबर मी हेंहि जाणतों कीं, तुमच्या नाजुक मनावर साजुक प्रेमाचा पगडा बसत चाललेला आहे. मी तसा मनकवडा आहें बरं का ! मीच काय तो न्याय देतों. हें पहा गुणनिधान, तुम्ही भयंकर आणि या सुलोचनादेवीहि भयंकर ! अशा दोन भयंकर माणसांची जन्माची गांठ बसणंच योग्य आहे. तुम्हांला संकोच वाटत असेल तर मीच तुमची गांठ पक्की करतों. द्या तुमचे हात एकमेकांच्या हातांत ! मी वयोवृद्ध आहें, मला तुमचे हात एकमेकांच्या हातांत देण्याचा अधिकार आहे. (तसं करतो व तुळशीवृंदावनावरील हार काढून त्यांचे हात बांधतो. ) ही गांठ पक्की झाली ! मी आजपर्यंत अनेकांच्या हातांत शृंखला ठोकल्या पण तुम्ही अतिभयंकर आणि महाभयंकर माणसें असल्यामुळें मला तुमची अशी भयंकर ग्रंथी बांधावी लागते आहें. लोहशृंखला एक—ना—एक दिवस तुटतात पण प्रीतीच्या पुष्पशृंखला कधींहि तुटत नाहींत.

**प्रेम०**—( नाचत ) वाहवा, वाहवा ! कशी जम्मत झाली ! आई, यांना म्हणशील ना बाबा ? बाबा, हिला म्हणाल ना आई ?

**गुण०**—बाळ, तुझ्या बाळबोलांचा मला राग येत नाही—किती गोड आहेस रे तूं ! ( त्याला उचलून पापा घेतो. )

**फांशी०**—गुणनिधान, ऐका ! सुलोचनादेवी, तुम्हीहि ऐका ! मोहनिधान व शंकानिधान हेच खरे अतिभयंकर आणि महाभयंकर बदमाष आहेत. आतां या मंगल प्रसंगाला साक्षी ठेवून मी अशी प्रतिज्ञा करतों कीं, त्यांना मी वाटेल तिथून पकडून आणीन आणि गुणीलेच्या खुनाबद्दल फांशी देईन—तसं करीन तरच मला फांशीराम म्हणा ! ते भयंकर गुन्हेगार असले तर मी गुन्ह्याचा शोध लावण्याच्या कामांत महाभयंकर आहें बरं का ?

**प्रेम०**—फांशीराम, तुमच्यावर खूष होऊन मी तुम्हांला ही प्रसादाची केळीं देतों—हा प्रसाद खा आणि कामाला लागा ! ( केळीं देतो. )

**सुलो०**—महाराज, देवाच्या दयेने शेवट गोड झाला. पण आता त्या मंगल देवतेची–गुणीलादेवीची स्मृति जागृत रहावी म्हणून आपण या स्थानाला 'गुणीलाभुवन' नाव देऊ व याच ठिकाणी अनाथभगिनीसेवाश्रम स्थापन करू आणि दुर्गतीत सापडलेल्या आर्यभगिनींना वेश्याव्यवसायातून मुक्त करून त्याची सेवा करण्याची प्रतिज्ञा करू या. गांजलेल्या देवतांची सेवा करणे हाच माझा धर्म झाला आहे. महाराज, आपण परदु:खाने दु:खित होता तेव्हा आपण वैष्णवच आहात. मीहि आज तेच व्रत घेते आणि वैष्णवधर्माचा स्वीकार करते.

**कृष्णा०**—बाळ, भक्तराज नरसी मेहत्याचे ते गोड भजन गाऊन आम्हां सर्वांनाच वैष्णव धर्माची दीक्षा दे. ते नरसी मेहत्याचे भजन आज मोठमोठ्या महात्म्यानाहि मार्गदर्शक झाले आहे.

**सुलो०**—बर तर ऐका !

## पद

**वैष्णवजन तो तेने कहीये जे पीड पराई जाणे रे ।। परदु खे उपकार करे तोये, मन अभिमान न आणे रे ।। १ ।। सकळ लोकमां सौने वंदे, निंदा न करे कोनी रे ।। वाच काछ, मन निश्चळ राखे, धन धन जननी तेनी रे ।। २ ।। समदृष्टी ने तृष्णात्यागी परस्त्री जेने मात रे ।। जिव्हा थकी असत्य न बोले परधन नव झाले हाथ रे ।। ३ ।। वण- लोभी ने कपटरहित छे कामक्रोध निवार्या रे ।। भणे नरसैयो तेनुं दरशन करतां कुल इकोतेर तार्या रे ।। ४ ।।**

(गीत चालू असता प्रेमनिधान कृष्णासारखा उभा राहून व मुरली वाजविण्याचा अभिनय करून मोठी मौज उडवून देतो, सर्व गीतश्रवणात तल्लीन होतात. हळुहळु पडदा पडतो.)

समाप्त

# अंक १ ला

## प्रवेश १ ला

[ स्थळ–विलासबाग. मुलांमुलींचे खेळ चालले आहेत. वेळ संध्याकाळ ]

**मुलीः**—( बागेंतील झोल्यावर बसून स्त्रियांचें अत्यंत आवडतें, रुक्मिणी-कृष्णामधील विनोदाचें, गोड पण अर्थपूर्ण गीत गात आहेत. )

### नान्दी–गीत

**कोणे एके दिवशीं विनोदानें। हरिसी बोले रुक्मिणी ॥ कृपा करोनि आधीं सांगावें। विडा देईन मग शयनीं ॥ तुम्ही थोराचे आहां परंतु काळे कां हो मी गोरी ॥ध्रु०॥ हरि म्हणे मी सुत गवळयाचा मजवरि धुरळा त्रिभुवनींचा। शिशुपाल हा वर योजीला नाहीं मी कामाकाजाचा ॥ १ ॥ हरी म्हणे त्या नंदराणीनें काळें लाविलें गालाला। नाहीं पुसिलें तसेंच राहिलें, गुंतलों भक्ताकाजाला ॥ २ ॥ क्रोध न आवरी भीमक बाळी धरणीवरती मग पडली। श्रीकृष्णाला कळवळी आली कुरळे केस सांवरी ॥ ३ ॥**

**सुमतिः**—( मुलेंमुली गेल्यावर प्र. क. ) या संध्यासमयीं निसर्गाला किती अपूर्व शोभा आली आहे ही ! दिनमणी अस्ताला गेल्यामुळें सर्व पौरजन आपापल्या घरीं निघून गेले ! सूर्याच्या प्रखर तापानें शिणलेल्या निसर्गानें शांतता धारण केली

असून पौरजनांच्या त्रासांतून मुक्त झाल्यामुळे त्याला जणू पूर्ण स्वातंत्र्याचा लाभ झाला आहे! या निसर्गा, तू उपभोगीत असलेल्या पूर्ण स्वातंत्र्याचा मला हेवा वाटतो! या पूर्ण स्वातंत्र्याचा उपभोग जर प्रत्येक माणसाला लाभेल तर त्याचे आयुष्य किती सुखमय होईल बरं? खरोखर, पूर्ण स्वातंत्र्याची प्राप्ति हीच सौख्याची परिसीमा होय. देवा, मला माझ्या आयुष्यात सौख्याची ही परिसीमा गाठता येईल का?

**पद**

**तेथ सुख जाणा। जेथ नांदे सतत स्वातंत्र्य तें पूर्ण॥ ध्रु०॥**
**स्वैर खेळे शशी। नाचती तारका॥ येथ पावे जगत मोदसीमा॥ १॥**

( इतक्यात डॉ. मधुसूदन एक रंगीत रेशमी हातरुमाल घेऊन प्रवेश करतो. )

**डॉ. मधु०**—सुमति! अशा सायंकाळच्या वेळी इथं या विलासबागेत का रेंगाळत आहेस?

**सुमतिः**—कोण? मधुसूदन! हा, पण तुम्ही कशाला या वेळी इकडे आलात?

**मधु०**—तू इकडे आलीस म्हणून!

**सुम०**—पण मी इकडे आल्ये हे तुम्हाला कोणी सांगितलं?

**मधु०**—या तुझ्या हातरुमालानं! हा तुझा हातरुमाल मला बागेच्या तोंडाशी पडलेला आढळला. तू बागेंत शिरलीस तेव्हा हा तुझ्या हातांतून गळून पडला असावा असा मी तर्क केला आणि बागेत येऊन पहातो तो तू खरोखरच इथं आलेली! हा हातरुमाल तुझाच आहे ना?

**सुम०**—हो, माझाच आहे. ( त्याच्या हातांतून घेऊन तोंड पुशीत ) बर पण हा माझाच हातरुमाल असला पाहिजे हें तुम्ही कसं ताडलंत? असले हातरुमाल बाजारांत एकदोनच काही नव्हेत तर लाखोसुद्धा विकत मिळतील! मग त्या लाखांतला हा एक माझाच हातरुमाल असावा हे तुम्हाला कसं कळलं?

**मधु०**—कारण तू लाखांत एक अशीच अद्वितीय आहेस! शिवाय, तुझ्या मुखकमलाशीं स्वैरपण खेळणारा हा हातरुमाल माझ्या ओळखीचा का बरं होणार नाहीं? खरं सांगू? तुझ्या सुंदर मुखकमलापेक्षा हा हातरुमालच माझ्या नजरेंत अधिक भरला आहे!

**सुम०**—इःश ! तुमचं आपलं कांहीतरीच !

**मधु०**—आमच कांहीतरी कसं ? तुम्हां सुंदर तरुणींचेंच आपलं कांहींतरी ! मी तुम्हां तरुणींना उघड विचारतों की, तुमच्या सुंदर मुखकमलांचं आणि या हातरुमालांचं इतकं निकट साहचर्य कां ? तुम्ही स्वस्थपणं विचार करीत बसलांत तरी तळहातांतल्या हातरुमालावर आपलं मुखकमल टेऊन बसतां ! बरं, श्रांत वेळीं मुखकमल घामानं डबडबलं तरी हातरुमालाला काम आलंच ! तुम्ही तरुणी हांसलांत तरी तोंड झांकून घ्यायला हातरुमाल पाहिजे, आणि लाजलांत तरीं तुम्ही आपल्या मुखाची लाजरी शोभा हातरुमालाच्या आड लपवतां ! शिवाय हेंच पहा, यावेळी नुसतें माझें भाषण ऐकतांनाहि हातरुमालानं मुख-कमल झांकून ठेवण्याचं काम तूं चालविलंच आहेस ! मग आम्हांला तुम्हां तरुणीच्या मुखकमलापेक्षां त्याच्याशीं निकट मैत्री असणाऱ्या व निर्लज्जपणानं सदासर्वदा त्याच्याशी सलगी करणाऱ्या हातरुमालाचीच ओळख अधिक झाली तर नवल कसलं ?

**सुम०**—म्हणजे, माझ्यावर तुमची इतकी नजर आहे तर !

**मधु०**—सुमति, माझ्याकडून ही असली नजरचूक झाली असेल तर आपल्या सौंदर्यालाच त्या चुकीबद्दल दोष दे. सुमति, सुमति, तुझ्या मुखकमलाशीं सलगीनें खेळणाऱ्या या हातरुमालाचं भाग्य मला लाभेल का ?

**सुम०**—म्हणजे, मला नाहीं कळलं तुमच्या बोलण्यांतलं मर्म ! (लाजते.)

**मधु०**—माझ्या बोलण्यांतलं मर्म तुला कळलं नसलं तरी मला तुझ्या प्रेमाचं मर्म कळलं आहे ! सुमति, मला तुझ्या हातांतला हातरुमाल करशील का ? मी तुझ्या मुठीत सुद्धां रहायला तयार आहें !

**सुम०**—मधुसूदन ! तुम्ही इतक्या मार्मिक भाषेंत आपलं माझ्यावरील प्रेम व्यक्त केलं आहे की, माझं मन तुम्हांला नकार द्यायलाहि कचरतें आहे. मधुसूदन, पुनः एकदां ते गोड बोल मला ऐकवाल का ?

**पद**

**प्रेमला वदा त्या बोला । जीव हा भुकेला परिसायाला ॥ ध्रु० ॥ प्रीतिचा प्याला । द्यां क्षणिं मजला । दाखवा सुखाचा झोला ॥ १ ॥**

**मधु०**—लाडके ! मी तुझ्यावर प्रेम करतो, I love you ! मी तुझा दास व्हायला तयार आहे ! !

**सुम०**—नाही, मी तुम्हाला माझे दास करायला तयार नाही. मी पूर्ण स्वातन्त्र्याची चहाती आहे. मीहि स्वतः कुणाला दास करीत नाही आणि दुसऱ्या कुणी माझें दास्यत्वहि करावयाला नको ! प्रत्येक जीवाला या जगांत पूर्ण स्वातन्त्र्य असाव हेच माझ निश्चित मत आहे. हो पण मधुसूदन, तुम्ही सौंदर्यावर प्रेम करता की माझ्यावर ?

**मधु०**—खर म्हटल तर मी तुझ्यावरच प्रेम करतो. पण तुझ्याशीं हें सौंदर्य इतक निगडित झाल आहे की, सौंदर्यविहीन सुमतीची मला कल्पनाच करता येत नाहीं ! मला तुझ सौंदर्य नको, मला तू पाहिजेस !

**कृष्णकान्त.**—( पुढ होऊन ) पण सुमति, मला तूहि पाहिजे आहेस आणि तुझ सौंदर्यहि पाहिजे आहे. मी स्वतःसाठीं दोघांचीहि—तुझी आणि तुझ्या सौंदर्याची—मागणी करतों. सुमति, या भिकारड्या मधुसूदनाला दूर लोटून माझा स्वीकार कर—मी तुझ्या पायातला पैजण होऊन रहायलाहि तयार आहे.

**मधु०**—काळतोंड्या, तू या सुदरीच्या पायातला पैजण नव्हेस पण पैजणाच्या खाली काळा बूट मात्र शोभशील खरा ! बेट्या, तू आपले तोंड कधीं आरशात पाहिल आहेस का ? पण खरच, तुझ काळ तोंड तुला आरशात तरी दिसणार कस ? कारण तुझ्या काळया तोंडाची काळी छाया एकदा आरशावर पसरली म्हणजे त्यात हे काळ तोंड कुठून दिसेल म्हणा ! हॅ:, हॅ:, हॅ: ! बेट्या, कुठ हे सुदर गगोदक आणि कुठ हे त्याचा आश्रय घेऊ पहाणारें कृष्ण कमळ ? कुठ ही हसी आणि कुठ हा कावळा ? कुठ ही सुवर्णकेतकी आणि कुठ हा काळा नाग ?

**कृष्णा०**—हो, हो, माझ तोंड काळच आहे, पण हा निसर्गाचा दोष आहे. निसर्गाच्या अपराधाबद्दल मला फांशी देण्यात कोणता शहाणपणा ! सुमति, मी कुरूप असलो तरी श्रीमत आहे, लक्षाधीश आहें. तू माझी पत्नी झालीस तर मी तुला सुवर्णाच्या राशीवर अधिष्ठित करीन !

**सुम०**—पण कृष्णकात, मला मुळीं सुवर्णाच्या राशीवर बसायचच नाहीं ! मी मधुसूदनाच्या निर्धन पण निर्मळ प्रेमाचाच स्वीकार केला आहे !

**कृष्ण०**—कोण? हा भिकारडा मधुसूदन तुला आवडला? हा माधुकरी मागून डॉक्टरीची परीक्षा पास झाला हें तुला माहीत नाहीं वाटतं? हा जन्म-दरिद्री आहे, याची—या भिकारदासाची—का तूं गृहलक्ष्मी होणार? त्या जन्म-दरिद्याचा धिःकार कर आणि माझा—या गर्भश्रीमंताचा—स्वीकार कर! मी तुझे पाय धरतों. ( खाली वांकतो )

**सुम०**—( त्याला पायानें दूर सारून ) कृष्णकान्त, दूर व्हा! मी अश्शीच बाबांकडे जाऊन मधुसूदनांच्या व माझ्या लग्नाला संमति मिळवित्यें.

**मधु०**—चल, सुमति! इथून लौकर पाऊल उचल म्हणजे या कृष्ण-कान्ताचं काळं तोंड, आपोआपच अधिकाधिक पसरणाऱ्या काळोखांत एकरूप होऊन दिसेनासें होईल! हॅः हॅः!

**कृष्ण०**—( चिडून ) अस्सं काय? तुम्ही विवाहबद्ध होऊन माझ्या संसार-सुखावर काळी छाया पसरणार काय? सुमति, तुझ्या वडिलांची मान माझ्या हातांत आहे हें विसरूं नकोस! तूं माझा अपमान केला आहेस, मी आतां तुझ्या बापाची मान मुरगाळण्यास कमी करणार नाहीं हें लक्षांत ठेव! मी तुझ्या पायांतला कुत्राहि व्हायला तयार झालों होतों पण तूं मला लाथाडलेस, आतां मी खरोखरीचा कुत्रा होऊन तुझ्या बापाच्या प्राणाचे लचके तोडीन तरच माझं नांव कृष्णकांत!

**मधु०**—कृष्णकांत, तूं खरोखरच कुत्रा आहेस! मॅड डॉग आहेस! तूं इथं आलास हीच तुझ्या हातून चूक झाली! तुला ही पाटी दिसली नाहीं वाटतं? बागेंत शिरण्याच्या आधीं 'डॉग्ज नॉट अलाऊड' ही पाटी तूं वाचली असतीस तर हा सारा खटाटोप तरी वांचला असता! ( हंसत सुमतीसह जातो. )

**कृष्ण०**—डॉग्ज नॉट अलाऊड! अस्सं काय? मी कुत्रा ठरलों काय? अरेरे, मी कुरूप आहें म्हणून मला सुंदर स्त्रियांनीं लाथाडावं ना? गळ्यांतला ताईत म्हणून नसलों तरी पायांत घुटमळणारा कुत्रा म्हणून तरी सुंदर स्त्रिया माझ्या प्रेमाचा स्वीकार करतील असं मला वाटलं होतं पण कोणतीहि सुंदर स्त्री मला पायाशीं सुद्धां उभा करीत नाहीं. छेः, छेः, हा अपमान मला सहन होत नाहीं, या अपमानाबद्दल मला सुमतीचा सूड उगवलाच पाहिजे! सुमतीच्या बापाची अब्रू माझ्या हातांत आहे—मी आतां माझी मूट आंवळून तिच्या

बापाच्या अब्रूची गळचेपी करतो आणि सुमतीला माझे पाय चाटायला लावतों ! बापाची मान आवळली म्हणजे सुमति आपण होऊन माझे पाय चाटू लागेल ! सुमतीला आपल्या सुरूपाचा गर्व असला तर मलाहि माझ्या कुरूपाचा अभिमान धरलाच पाहिजे ! ( दात ओठ खात निघून जातो )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—बगीचा. यमुना ठुमकत व मुरडत येते )

**यमुनाः**—मेली पुरुषाची जातच चोंबडी ! आपल्या फायद्यासाठी हे पुरुष काय वाटेल ते कबूल करतील ! मी सुंदर आहे असे कोणीतरी कबूल करील का ? पाहून घ्या माझं मुखकमल ! आहे का त्यावर एकादा तरी पांढरा ठिपका ? गोऱ्या गालावर काळा तीळ असला तर म्हणे त्या गालाचं सौंदर्य खुलून दिसतं ! माझ्या गालावर तीळ आहे पण तोहि मेला काळाच ! हा काळा तीळ गालाच्या सौंदर्याला उठाव आणण्याऐवजी स्वतःच लाजून गालाच्या कृष्ण प्रभेत आपलं काळं तोंड लपवून बसला आहे. हा एवढा गालावरचा तीळ जरी गोरा असता तरी तेवढाच माझ्या सौंदर्याला उठाव आला असता ! माझं काळं सौंदर्य पाहून माझी मलाच लाज वाटते पण त्याचं या चोंबड्या पुरुषांना काय ? मेले आपल्या फायद्यासाठी काय वाटेल ते कबूल करतील, मला सुद्धा अप्सरेची उपमा द्यायला कमी करणार नाहींत !

**यमाजीः**—( पुढे येऊन ) नाहीच कमी करणार ! अग यमुने, तुला इतर पुरुष केवळ अप्सरेची उपमाच देतील पण मी तुला प्रत्यक्ष अप्सराच म्हणेन ! यमुने, तू खरोखरच अप्सरा आहेस ! तुझ्यात आणि अप्सरेत मला तरी कांहीं फरक दिसत नाहीं !

**यमुना**—पण तसा फरक दिसायला तुम्ही कधीं अप्सरेला पाहिलं पाहिजे ना ? तुम्ही मला पाहिलंत पण कधीं अप्सरेला पाहिलं आहे का ?

**यमाजी०**—नाही, मी अजून कांहीं अप्सरा पाहिली नाही. अप्सरा म्हणे स्वर्गांत राहतात ! त्यांना पहायला स्वर्गातच जायला हवं आणि मेल्याशिवाय तर स्वर्ग कांहीं दिसत नाहीं ! मग तूच सांग कीं, मेल्याशिवाय मला अप्सरा तरी

कुठून दिसणार? मेल्यावर मी यदाकदाचित् स्वर्गांत घुसलोंच तर एखादी अप्सरा पाहीन म्हणा, पण जिवंतपणीं मला तुझं रूप पाहूनच अप्सरेच्या सौंदर्य-दर्शनाची तहान भागवून घेतली पाहिजे. खरं सांगूं? यमुने, तंच माझी या मृत्युलोकांतील अप्सरा आहेस!

**यमु०**—काय, मी अप्सरा आहें? आहे का माझ्या काळ्या तोंडावर एखादा तरी गोरा ठिपका?

**यमा०**—तुझ्या काळ्या सौंदर्याला पांढरा डाग नको लागायला! मला डागळलेलं सौंदर्य मुळीच आवडत नाहीं. मला निर्मळ सौंदर्य आवडतें—मग तें एकजात काळे असो नाहीतर एकजात गोरे असो! पण यमुने, मी म्हणतों हा नसता वाद कशाला? तूं माझ्या डोळ्यांना अप्सरेपेक्षांहि सुंदर दिसतेस हें निर्विवाद आहे, तूं माझी काळी अप्सराच आहेस! तूं माझी अप्सरा आहेस, लक्ष्मी आहेस, देवता आहेस!

**यमु०**—अहो, पण लोक माझ्या काळ्या तोंडाकडे पाहून मला काळ्या कोळशांच्या खाणीची उपमा देतात ना?

**यमा०**—मूर्ख आहेत ते लोक! अग, कोळशांच्या खाणी हातीं लागल्या-मुळंच दरिद्री देशांत सुद्धां सोन्याचा धूर निघूं लागला! मी गोरा आहें आणि म्हणून मला कोळशांच्या खाणीची किंमत कळते! गोरे लोक कोळशांच्या खाणींची किंमत उत्तम रीतीनं जाणतात!!

**यमु०**—पण मला वाटतं कीं, तुम्ही नुसता चोंबडेपणा करीत आहां! नसत्या चोंबडेपणांत फायदा काय?

**यमा०**—अग, तूं जशी काळी आहेस तशीच खुळीहि आहेस! तुला तुझ्या काळ्या सौंदर्याचे फायदे कळत नाहींत म्हणून तूं असं बोलतेस! मी सांगतों तुला ते फायदे! तुझ्या मुखाच्या कृष्णकमलावरचे हे काजळी डोळे कधींहि पांढरे होण्याचा संभव नाहीं! तुझ्या शरीराच्या अणुरेणूंत काळा रंग इतका भरून राहिला आहे कीं, तुझं पाऊल दिसल्यामुळं जरी कुठं कितीहि अनर्थ ओढवला तरी तुला कोणी पांढऱ्या पायांची म्हणणार नाहीं!!

**यमु०**—हां, पुरे झाला तुमच्या स्तुतीचा भडिमार! मेली पुरुषांची जातच चोंबडी! तुमचा हा चोंबडेपणा पाहून कुणींहि अगदीं डोळे मिटून सांगेल कीं,

कसली तरी कामाची वासना धरून तुम्ही इथ आला आहात ! बोला तुमच काम काय ते आणि ..

**यमा०**—हो, मी कामाची वासना धरूनच तुझ्याकडे आलो आहे. हे कृष्णकामिनी ! तू मला आपल्या काळ्या सौदर्याचा धनी कर !

**यमुना०**—अगबाऽऽई ! म्हणजे तुम्ही माझ्याशी लग्न करायलाहि तयार आहात तर ? अहो पण तुम्ही गोरे, मी काळी.. .

**यमा०**—हा, असले भेदाभेद काढून लग्नात विघ्न उपस्थित करू नकोस ! हा गोरा नि तो काळा हे भेद मानायचे दिवस आज उरलेले नाहीत ! आज काळ्यागोऱ्याना पूर्ण स्वातत्र्य मिळाल आहे. पूर्ण स्वातत्र्य हेच आजकालच्या सामाजिक सुधारणेचे तत्त्व

**यमु०**—आणि तेच माझहि तत्त्व आहे. लग्न झाल्यावरहि मला तुम्ही स्वातत्र्य द्याल का ?

**यमा०**—हो, हो, तुला वाटेल तितके स्वातत्र्य देईन. लग्न झाल्यावर तू जरी दिवसाचे चोवीस तास घराबाहेर व्याख्याने, सभा व परिषदा याच्या घडामोडीत घालविलेस तरी मी तुला एका शब्दानेहि विचारणार नाही ! मला पूर्ण स्वातत्र्याच तत्त्व मान्य आहे.

**यमु०**—तत्त्व मान्य केलत पण तपशिलाची वाट काय ?

**यमा०**—तपशिलाच पुढच्या पुढ पाहता येईल ! कोणतेहि तत्त्व खुशाल मान्य कराव, तपशिलाची मुळीच वाटाघाट करू नये हे माझ तत्त्व आहे.

**यमु०**—हे पहा, लग्न झाल्यावर मी वाटेल तशी वागेन—

**यमा०**—तत्त्व मान्य !

**यमु०**—मी वाटेल तें करीन —

**यमा०**—तत्त्व मान्य !

**यमु०**—मग तुमची लग्नाचीहि मागणी मला मान्य आहे.

**यमा०**—मग दे तर वचन ! ( हात पुढे करतो. )

**यमु०**—हे घ्या वचन ! ( त्याच्या हातावर हात ठेवते. )

**यमा०**—हा काळागोऱ्याचा सगम चिरकाल टिको आणि तुझ्यामाझ्या संसारांतील सौख्याची वृद्धि करो !

**यमु०**—बरं, जाऊं मी आतां ? मला घरीं जायला उशीर झाला तर माझ्यावर कृष्णकान्तांचा रोष होईल ! बरं, जाऊं ना मी आतां ?

**यमा०**—जा बरं !

**यमु०**—( जातां जातां परतून ) हो पण गडे, आपण कुठं जाणार मला टाकून ?

**यमा०**—माझ्या नोकरीवर ! चंद्रकान्तांकडच्या नोकरीवर मला जायला नको का ? बाकी, माझी नोकरी फार दिवस टिकेल असं कांहीं मला वाटत नाहीं. चंद्रकांतांचा सारा कारभार गुंडाळतच आला आहे. चंद्रकांत चोहों बाजूंनीं डबघाईस आले आहेत. तुझे यजमान कृष्णकान्त आपल्या पन्नास हजारांची मागणी करीत नाहींत तोंपर्यंतच चंद्रकान्तांचा कारभार कसाबसा चालेल ! पण उद्यां जर का त्यांनीं आपल्या रकमेची मागणी केली तर आटोपलाच त्यांचा कारभार ! ( कृष्णकान्त येतो व भाषण चोरून ऐकतो. ) चंद्रकांतांच्या धंद्याची अशी हलाखीची स्थिति असल्यामुळंच त्यांनीं आपल्या मुलीच्या—सुमतीच्या पाठीमागं लग्नाचं टुमणं लावलं आहे. सुमतीचं लग्न होऊन ती एकदां नवऱ्याकडे निघून गेली म्हणजे त्यांची एक घरगुती चिंता दूर होईल ! मग राहिली त्यांच्या डळमळत्या धंद्याची काळजी...

**यमु०**—म्हणजे सुमतीचे वडील चंद्रकांत अशा घोर चिंतेंत आहेत तर ? मग मी म्हणतें तुम्ही त्यांची डळमळीत नोकरी सोडून कृष्णकांतांकडेच नोकरीला कां रहात नाहीं ? तुम्ही कृष्णकांतांकडेच नोकरी धरलीत म्हणजे आपण दोघें एका ठिकाणींच राहूं—मग मेला विरह कसा तो व्हायलाच नको !

**यमा०**—हो, तुझ्या मार्फतीनं हलुहलु हाच विषय काढण्याचा माझा विचार होता पण तो तूं आपण होऊनच काढलास तें बरं झालं ! पण यमुने, तुझे कुरूप यजमान म्हणे सुरूप माणसांचा तिटकारा करतात ! माझ्यासारख्या गोऱ्या-गोमट्या तरुणाला ठेवतील का ते नोकरीला ? तूं काळी, कुरूप म्हणून तुला नोकरी मिळाली पण मला ते नोकरी देतील का ? तुझा काळा वशिला माझ्या उपयोगी पडेल का ?

**यमु०**—हें पहा, चंद्रकान्ताविरुद्ध कांहीं तरी कारस्थान रचण्यांत माझे यजमान गुंतलेले आहेत. त्यांच्या कारस्थानाला तुमची मदत मिळेल, तर ते तुम्हांला खात्रीनें नोकरीवर ठेवतील ! पाहीन त्यांना उद्यां विचारून !

**कृष्ण०**—( पुढें येऊन ) आज होणारी गोष्ट उद्यांवर कशाला ढकलतां ? मी तुमचं सर्व बोलणं आड उभा राहून ऐकलं आहे. यमाजी, तुम्ही जर मला

चंद्रकाताच्या धंद्यातील गुप्त गोष्टी सागाल तर मी तुम्हाला आत्ताच माझ्या मुनीमाची नोकरी देतो. हे पहा, चंद्रकाताला पेचात पकडल्यान माझाहि एक हेतु सहजी साध्य होणार आहे, मग तुम्ही मला करता का मदत ?

**यमा०**—हो, अवश्य करतो. मला चंद्रकान्ताच्या धंद्यातील सर्व बिंगे माहीत आहेत !

**कृष्ण०**—पण तुम्ही रूपवान आहात, गोरे आहात, माझा नाही तुमच्यावर विश्वास बसत !

**यमु०**—महाराज, मी देत्ये याची खात्री !

**कृष्ण०**—यमुने, तुझ्यासारख्या कुरूप व काळ्या माणसाचा याच्यावर विश्वास बसला आहे हे पाहूनच मी याच्यावर विश्वास टाकायला तयार झालो आहे अहो गोरे यमाजी ! तुम्हाला यमुनेचा पाठिंबा आहे हे मी तुमच भाग्यच समजतो. बाकी, तुमच्यासारख्या गोऱ्या माणसावर मी कधी नसता विश्वास ठेवला ! यमाजी, याच घटकेपासून तुम्हाला मी माझे मुनीम म्हणून नेमल आहे. यमुने, याना लौकर घरी घेऊन ये. मी पुढे जातों बर का ? ( जाता जाता स्व० ) मी सूडाच्या सतापात गोऱ्या नोकरावर विश्वास ठेऊन अखेरीस तोंडघशी तर पडणार नाही ना ? यमाजीच साह्य मिळून जर मला चंद्रकान्ताला पेचात धरता आल तर काय मौज होईल ? आता पाहतो, ती चढेल सुमति माझ्या हातून कशी निसटते ती ! सुमति, तू मला डिवचलस खर पण त्याच प्रायश्चित्त तुला लौकरच भोगाव लागणार ! ( जातो. )

**यमु०**—आता तरी झाल ना आपल्या मनासारख ? पहा, बायकोच्या तंत्रान वागल म्हणजे कस कल्याण होत ते !

**यमा०**—अग, हे पुढच भविष्य मला दिसत होत म्हणून तर तुला आधी बायको करून घेतली ! लग्नाच तंत्र जुळल्यावर बाकीचीं तंत्रे जुळायला कितीसा उशीर ?

**यमु०**—बर चला तर ! आत्ताच्या आत्ता चंद्रकाताकडील नोकरीचा राजीनामा द्या आणि कृष्णकाताच्या नोकरीवर रुजू व्हा ! शेवटीं तुमच्यासारख्या गोऱ्या माणसालाहि काळ्या माणसाचेच पाय धरून काम साधाव लागल तर ?

**यमा०**—चल पुढें, आता मला अधिक हिणवू नकोस ! ( ती गेल्यावर ) काय शिताफीन मी या काळ्या कामिनीला फसवल पण ? आता या काळ्या

कामिनीच्या साह्यानं मी माझे काळे हेतू त्यास साधून घेणार! या काळ्या माणसांना फसवायला कितीसा उशीर लागणार? स्तुतीची साखर जरा जास्त पसरली की, चिकटलेच हे काळे मुंगळे! ( जातो. )

---

## प्रवेश ३ रा



( **स्थळ**—दिवाणखाना. चंद्रकांत आजारी असून एका आरामखुर्चीवर पडला आहे व सुमति त्याचें डोकें चेपीत गाणें म्हणत आहे. )

**सुम०**—

### पद

**राधिका पुसे श्रीहरिला। स्वर्ग कुठें वसतो बोला ॥ ध्रु० ॥**
**श्रीहरी वदे राधेला। निज मानसिं स्वर्गचि ठेला ॥ आत्म-**
**रूपिं जो जन रमला । तो अन्य सुखाला हांसे ॥ १ ॥**

बाबा, आतां तरी तुम्हांला थोडं बरं वाटूं लागलं का?

**चंद्र०**—हो बाळ, आतां मला थोडं बरं वाटतं आहे.

**सुम०**—बाबा, तुमची प्रकृति एकाएकीं अशी कां बिघडली? काय होतं आहे तुम्हांला? मला वाटतं कीं, कसल्या तरी चिंतेनं तुमचं मन व्यापलं असल्या-मुळंच तुमची प्रकृति एकाएकीं खालावली! बाबा, केवळ एकाच दिवसांत तुमच्या प्रकृतींत किती फरक पडला हा? बाबा, तुम्ही आपली चिंता मला कां बरं सांगत नाहीं? माझ्यावर तुमचा भरंवसा नाहीं का? प्रत्यक्ष पित्याचाहि भरंवसा नसावा अशा तऱ्हेचीच माझी तुमच्याशीं वर्तणूक आहे का? ( डोळ्यांत आंसवें आणून ) बाबा, तुम्ही कांहींच बोलत नाहीं तेव्हां मी तरी काय समजूं?

**चंद्र०**—बाळ, तुझ्यावर गैरविश्वास दाखविण्याइतका मी अधम आहें असे तुला वाटतं तरी कसं? बाळ, खरोखरच मी एका भयंकर चिंतेनं त्रस्त झालों आहें—तूं बरोबर ओळखलंस!

**सुम०**—मग बाबा, मला नाही का तुमच्या चिंतेचं कारण सांगणार?

**चंद्र०**—तें कारण कळून तुझ्या कोमल मनाला विनाकारण त्रास मात्र होईल.

**सुम०**—बाबा, तुमच्या चितेच कारण कळल तर माझ्या मनाला मुक्या मारामुळ होत असलेला त्रास मात्र कमी होईल ! बाबा, सागाच मला तुमच्या चिंतेच कारण !

**चंद्र०**—बर पण तुला माझ्या चितेच कारण कळल तर तू काय करशील ?

**सुम०**—बाबा, काय सागू ? वाटेल तो स्वार्थत्याग करीन, इतकच काय, पण प्राणत्याग करूनहि तुमच्या चितेच कारण दूर करीन. बाबा, तुमच्या सुखापेक्षा माझ्या प्राणाची किमत मला मुळींच अधिक वाटत नाही.

**पद**

**सुखावे आपणां जे तें । मला हो स्वर्गसुख देतें ॥ न अन्या वांछिते कन्या। पित्याचें सौख्य निज गणिते ॥ ध्रु० ॥ राहु ग्रासीत जैं चंद्रा । प्रभाहि दुःखिता होते ॥ चकाके निर्मलाकाशी । वरी तें पूर्ण तेजातें ॥ १ ॥**

( इतक्यात ‘ चद्रकात आहेत का घरी ? ’ असा आवाज ऐकू येतो. )

**चंद्र०**—बाळ, कुणीतरी माझ्या भेटीला येते आहे. तू थोडा वेळ आत जा पाहू ! ( सुमति जाते. ) कोण आल आहे ? या आत ! ( स्व. ) खास हा कुणी तरी सावकार पैशाचा तगादा लावण्यासाठी आला असावा ! देवा, तूच या वेळीं माझी अब्रू वाचव !

( एक मारवाडी येतो. )

**मारवाडी**—चद्रकातसेठ, तुमचा तब्येत काय म्हणतो ?

**चंद्र०**—( उठून स्वागतपूर्वक ) या शेटजी, बसा असे ! आता माझी प्रकृति थोडी बरी आहे. बर पण, तुम्ही का इथ येण्याची तसदी घेतलीत ?

**मार०**—हे पहा सेट ! आमी फार तगींत आहोत. आमाला आमचा पन्नास हजार रुपिया अब्बीच्च मिळाला पाहिजे.

**चंद्र०**—हे पहा शेटजी, तुम्ही मला थोडी मुदत द्याल तर लौकरच तुमच्या पैशाची मी पुरी फेड करीन—थोडी मुदत द्या.

**मार०**—नाय, आमाला थाबता येत नाय ! तसा सगवड असता तर आमी खालीं बेलीफ उभा करून कशाला तुमाला तसदी द्यायला वर आला

असता ? बेलीफ वर आणून तुमचा अब्रू घ्यावा असा आमचा विचार नाहीं. तुमी अब्बी आमचा पैसा देऊन टाका !

**चंद्र०**—( स्व० ) अरेरे, सर्व घातच झाला. अब्रू जाण्याची वेळ आली खरी ! ही वेळ वाटेल तें करून निभावून नेलीच पाहिजे. ( उघड ) हें पहा शेटजी, माझा सर्व कारखानाच मी तुमच्या स्वाधीन करतों. तेवढ्यानं तुमचं समाधान होईल ना ?

**मार०**—हां ठीक, कारखान्याचा कागदपत्र आमच्या स्वाधीन करेल तर आम्ही खुषीनें परत जाऊं !

**चंद्र०**—ठीक आहे तर ! (कागद आणून त्यावर सही करून त्यास देतो.) आतां तर झालं ना ?

**मार०**—(कागद घेऊन) अतां झाला ! ईश्वर तुमचा कल्याण करेल ! ( जातो. )

**चंद्र०**—ईश्वर तुमचं कल्याण करील !!! आतां कोणतं माझं कल्याण व्हायचं बाकी राहिलं आहे ? सावकाराच्या देण्याची भरपाई करण्यासाठीं मी सर्व कारखानाच त्याला देऊन टाकला ! मला माझी मुळींच काळजी नाहीं पण मला जी कांहीं चिंता आहे ती माझ्या मुलीबद्दल. ( मोठ्यानं ) बाळ सुमति, इकडे ये पाहूं. ( सुमतीस ) बाळ, तुझं एकदां लग्न झालं असतं तर मी चिंतामुक्त झालों असतों. लग्नाच्या बाबतींत मी तुला पूर्ण स्वातंत्र्य दिलंच आहे. बाळ, लग्नाविषयी तुझा काय विचार ठरला आहे ?

**सुम०**—पण बाबा, माझं लग्न झालं तर तुम्ही सर्व चिंतेंतून मुक्त व्हाल का ?

**चंद्र०**—हो, तेवढीच काय ती चिंता मला उरली आहे.

**सुम०**—मग बाबा, मला तुम्ही डॉ. मधुसूदनांशीं लग्न करण्याला परवानगी द्याल का ? आमचं परस्परांवर प्रेम आहे.

**चंद्र०**—वाः, तुझा विचार फार उत्तम आहे. डॉ. मधुसूदनासारखा सालस व शीलसंपन्न जांवई मला मिळेल तर मला आनंदच वाटेल. बाळ, तुला मी वरपसंतीच्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य दिलं पण तूं तुला दिलेल्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग केला नाहींस हें पाहून मला अत्यानंद होत आहे. पूर्ण स्वातंत्र्य मिळालं तरी त्याचा योग्य प्रकारें उपयोग करण्यांतच शहाणपणाची पारख होते. बाळ, मधुसूदन इकडे केव्हां येणार आहेत ?

**सुम०**—ते इतक्यांत इथ येतील! तुमची तब्येत तपासून पाहण्यासाठी मघाशीच टेलिफोन करून त्यांना बोलावलं आहे. मधुसूदन अत्ता येतील.

**मधु०**—( येऊन ) हा मी आपल्या सेवेला हजर आहे.

**चंद्र०**—मधुसूदन, तुम्हाला शभर वर्षे आयुष्य आहे—आत्ताच मी तुमची आठवण काढली होती.

**मधु०**—थँक यू! बर बाबासाहेब, आपली प्रकृति कशी काय आहे?

**चंद्र०**—आता मला पुष्कळच बर वाटत आहे. माझ्या प्रकृतीच आधी राहू दे. मला अगोदर दुसऱ्याच एका गोष्टीचा निर्णय करावयाचा आहे. डॉ. मधुसूदन, तुम्ही माझ्या सुमतीला धर्मपत्नी करण्याच कबूल केलत याबद्दल मी तुमचा अत्यत आभारी आहे. मधुसूदन, तुम्ही सपत्तीन श्रीमत नसलात तरी शीलान सपन्न आणि सद्‌गुणानी मडित असे तरुण सद्‌गृहस्थ आहात. तुमच्या-सारखे गरीब पण कर्तबगार तरुण हेच आमच्या समाजाचे खरे मौल्यवान् अलकार होत. मी मोठ्या आनदान माझ्या सुशील सुमतीचा हात तुमच्या हाती देतो. सुमति, रहा या बाजूला उभी. मधुसूदन, या तुम्ही इकडे! ( त्याचे हात एकमेकाच्या हातात देऊ लागतो तोच कृष्णकात प्रवेश करतो. )

**कृष्ण०**—चद्रकात, हे तुम्ही काय माडल आहे?

**चंद्र०**—सुमतीचा हात डॉ. मधुसूदनाच्या हाती देऊन मी एका चितेतून मुक्त होणार आहे.

**कृष्ण०**—थाबा, थोडे थाबा! आधी या चितेतून मुक्त व्हा आणि नतर त्या चितेची काळजी करा. ( कागद दाखवून ) हा पाहिलात कर्जरोखा? माझे वडील श्यामकात यानी तुम्हांला पन्नास हजार रुपये कर्जाऊ म्हणून दिले होते ना?

**चंद्र०**—होय. पण त्या रकमेची फेड करण त्यांनी माझ्या सवडीवर सोपविल आहे. तुमच्या वडिलानी मित्रप्रेमास्तव मला ती रक्कम देणगी म्हणून दिली होती आणि ते नको, नको म्हणत असताहि मी त्यास हा कर्जरोखा लिहून दिला! मी कर्जाची फेड करण्यास तयार आहे पण तुमच्या स्वर्गवासी वडिलाची सदिच्छा लक्षात घेऊन तुम्ही मला कर्जफेडीचा तगादा लावण योग्य होणार नाही.

**कृष्ण०**—हे पहा चद्रकात! वडिलाची सदिच्छा त्याच्या मरणाबरोबर मरून गेली! मी ती सदिच्छा ओळखत नाही आणि जाणतहि नाही. या कर्ज रोख्याची फेड करा नाहीतर अब्रू गमावण्यास सिद्ध व्हा! तुमचा सर्व कारखाना...

**चंद्र०**—मी सर्वांशींच मारवाड्याच्या स्वाधीन केला. आतां माझ्याजवळ कपर्दिकाहि शिल्लक नाहीं. माझ्याजवळ एकच धन शिल्लक उरलें आहे व तें म्हणजे कन्याधन !

**कृष्ण०**—त्या कन्याधनाचा स्वीकार करूनहि मी कर्जाची फेड करून घ्यावयास तयार आहें. सुमति, माझ्याशी लग्न करण्याचं कबूल करून तूं तुझ्या पित्याला ऋणमुक्त करण्यास तयार आहेस काय !

**चंद्र०**—तिची तयारी असली तरीहि तुमच्यासारख्या एका अधमाच्या स्वाधीन माझं कन्यारत्न करावयास मी तयार नाहीं. मी सुमतीला लग्नाच्या बाबतींत केव्हांच पूर्ण स्वातंत्र्य देऊन टाकलं आहे !

**कृष्ण०**—हा तुमचा विचार झाला पण सुमति कदाचित् पित्याला ऋण-मुक्त करण्याकरितां आपला विचार बदलील सुद्धां, कुणी सांगावं ? सुमति, तुझ्या पित्यावर किती भयंकर आणि बेअब्रुकारक प्रसंग आला आहे तें नीट तुझ्या लक्षांत येऊन चुकलं आहे ना ?

**चंद्र०**—बाळे, मी थोडा वेळ आंत जाऊन येतों, तूं याला काय तें खरमरीत उत्तर दे आणि त्याला निरुत्तर कर ! ( जातो. )

**मधु०**—सुमति, या सैतानाच्या धमकीला भीक घालूं नकोस ! ( कृष्ण-कान्तास ) अरे सैताना, तूं अशा अधम कृतीनं एका निष्पाप कुमारिकेचा गळा कापायला सिद्ध झालास तर ? अरे नीचा, या पातकाचं प्रायश्चित तूं कुठं भोगशील ? तूं जसा बाहेरून काळाकुट्ट आहेस तसा आंतूनहि आहेस तर !

**कृष्ण०**—वाः मधुसूदन, तूं बरोब्बर परीक्षा केलीस ! तूं हुषार शस्त्रवैद्य आहेस खरा ! माझं काळीज न चिरतांहि तुला त्याचा काळा रंग दिसला, यांतच तुझ्या ज्ञानाचा भेदकपणा दिसून येतो. मी केवळ सैतानच काय ? पण मी सुमतीच्या गोऱ्या पायांत शोभणारा काळा बूट आहें—मॅड डॉग आहें !

**मधु०**—खरोखरच तूं मॅड डॉग आहेस !

**कृष्ण०**—आणि म्हणूनच तुम्हां सर्वांच्या काळजांचे लचके तोडण्यास आलों आहें. पण डिअर मधु, तूं कां व्यर्थ तसदी घेतोस ? ही सुमति सर्व गोष्टींचा योग्य निर्णय देण्यास समर्थ आहे. सुमति, तुझ्या सुंदर मुखकमलांतून निघणाऱ्या शब्दपरागांची मी आतुरतेनं मार्गप्रतीक्षा करतों आहें !

**सुम०**—कृष्णकांत, प्रसंग किती कठीण आहे व मला काय केलं पाहिजे

ते सर्व काहीं नीट माझ्या लक्षात येऊन चुकल आहे मी तुमच्या मागणीला होकार दिला तर हा कर्जरोखा माझ्यासमोर फाडून टाकाल का ? मी प्राणाच मोल देऊनहि बाबांची अब्रू वाचविण्यास तयार आहें ! बोला, बाबा बाहेर येण्याच्या आंत काय ते बोला !

**मधु०**—सुमति, सुमति, काय करते आहेस हे ? तू जाणून बुजून या अग्निकुंडात का उडी घेतेस ?

**सुम०**—माझ माझ्या पित्यावरील पवित्र प्रेम पारखून घेण्यासाठीं ! मी अशा प्रकारे पितृऋण फेडणार आहे. मला दुसरा मार्गच नाहीं. खरोखरच, बाबांवर अत्यंत घोर संकट ओढवल आहे, अशा वेळी त्याच्या मदतीला मी धावल्यें नाहीं तर मी त्याची कन्या म्हणवून घेण्यासहि नालायक ठरेन ! कृष्ण-कांत, मी तुमच्या कठोर उत्तराची वाट पहात आहे.

**कृष्ण०**—माझ्याशी लग्न करण्याच आनंदान कबूल कर म्हणजे मीहि आनंदानच हा कर्जरोखा फाडून टाकीन !

**सुम०**—पितृऋण फेडण्यासाठी, पति म्हणून, मी तुमचा स्वीकार करावयास तयार आहे. ही घ्या माझी शपथ ! ( त्याच्या पायावर हात मारते. )

**कृष्ण०**—हा पहा कर्जरोखा फाडून टाकला !

( इतक्यात आतल्या बाजूस पिस्तुलाचा आवाज ऐकू येतो. मधुसूदन व सुमति आत धावत जातात. )

**कृष्ण०**—त्या थेरड्यान आत्महत्त्या तर केली नसेल ? करीना तो आत्महत्त्या ! सुमतीचा हात धरून मी तिला त्याच्या प्रेतावरून सुद्धा फरफरा ओढून नेईन ! हॅ., हॅः, हॅ. !

( मधुसूदन व सुमति चंद्रकांताला उचलून आणतात. तो रक्तबंबाळ झालेला दिसतो. )

**सुम०**—बाबा, बाबा, काय अविचार केलात हा ! मी तुम्हाला आतांच ऋणमुक्त केल होत मग तुम्ही आत्महत्त्या का करून घेतलीत ?

**चंद्र०**—बाळे, माझ्या पातकाच प्रायश्चित्त मीच भोगल आहे. तू आता खुशाल मधुसूदनांशीं लग्न कर आणि सुखी हो !

**सुम०**—बाबा, ती गोष्ट आता माझ्या हाती राहिलेली नाहीं. मी

कृष्णकान्तांना लग्नाचं वचन दिलं सुद्धां! माझं वचन मिळतांच त्यांनींहि कर्जरोखा फाडून टाकला आणि तुम्ही त्यांच्या ऋणांतून मुक्त झालांत!

**चंद्र०**—बाळे, तूं भलताच अविचार केलास! बाळे, मी तुला प्रेमाच्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य दिलं होतं ना? मग तूं कां जाणूनबुजून पारतंत्र्याच्या होमकुंडांत उडी घेतलीस?

**सुम०**—बाबा, मला मिळालेल्या पूर्ण स्वातंत्र्याचा मी सदुपयोगच केला. अत्यंत खडतर असा स्वार्थत्याग करावयास शिकवील तेंच खरं पूर्ण स्वातंत्र्य! बाबा, माझ्याबद्दल तुम्ही वाईट वाटून घेऊं नका—मी आनंदानंच प्रेमाचं सुवर्ण अग्नीमध्यें टाकलं आहे!

**चंद्र०**—बाळ, आतां माझ्यानं बोलवत नाही, लहानग्या सूर्यकान्ताचा संभाळ कर. देव तुझं कल्याण...( मरतो. )

**कृष्ण०**—मधुसूदन, तूं मुकाट्यानं इथून चालता हो! मी जामाताच्या नात्यानं चद्रकांतांच्या शवाची व्यवस्था लावीन! तूं आधी आपलं तोंड काळं कर. आज माझं काळं तोंड उजळ झालं असून तुझंच गोरंगोमटं थोबाड काळवंडलं आहे. चालता होतोस कीं लाथ मारून...

**मधु०**—नीचा, यापुढं एक शब्द बोलशील तर तुझंच तोंड फोडून टाकीन! अधमाधमा...( त्याच्या अंगावर धांवून जातो. )

**सुम०**—( मधुसूदनास मागं ओढून ) मधुसूदन, तुम्ही इथून निघून जावं तेंच बरं! या घटकेपासून कृष्णकांत हेच माझ्या शरीराचे धनी झाले आहेत! तुम्ही इथून जावं तेंच बरं!

**कृष्ण०**—मधुसूदन, ऐकलास माझ्या लाडकीचा हुकूम? चल, हो चालता मुकाट्यानं आणि पुनः सुमतीची भेट घेऊं नकोस! चल!

**मधु०**—माझाहि नाइलाज झाला आहे—मला या वेळी तोंड दाबून धरून बुक्क्यांचा मार सहन केलाच पाहिजे. ( हलुहलु जातो. सुमति बापाच्या शवाला बिलगून रडते. इतक्यांत बाळ सूर्यकांत शाळेंतून परत घरीं येतो. )

**सूर्य०**—( पाहून व सुमतीला बिलगून ) ताई, बाबांना ग काय झालं?

**सुम०**—बाळ, आपल्याला दुःखाच्या गर्तेत लोटून बाबा देवलोकाला निघून गेले! ( दोघेंहि रडूं लागतात. पडदा. )

**पहिला अंक समाप्त**

---

# अंक दुसरा



## प्रवेश १ ला

( **स्थळ**—रस्ता. यमुना हसत प्रवेश करते )

**यमुना०**—अहाहा ! मी किती भाग्याची आहे ! देवान मला चागले रूप दिल नाही म्हणून त्याला शिव्याची लाखोली वहात होते पण माझ्या शिव्याना ओव्या समजून देवाने मला यमाजीसारख्या सुरूप नवऱ्याची जोड करून दिली ! आम्हा भोळ्या बायकाना एक वेळ स्वत.च रूप चागल नसल तरी चालत पण नवरा मात्र चागला मिळावा अशी इच्छा असते. चागला नवरा मिळाला म्हणजे मग त्यापुढ आम्हाला स्वर्गसुखाची सुद्धा मातब्बरी वाटत नाही ! यमाजी तरी किती चागले माणूस आहेत ! जसे वरून सुदर दिसतात तसेच अतर्यामी आहेत बर का ? त्यानी मला अप्सरा म्हटल तेव्हा मला वाटल की, ते पुरुषाच्या जातीला शोभणारा चोंबडेपणा करीत असतील म्हणून ! पण छे: ऽ ऽ ग बाई ! अगदींच चुकल्यें मी !! काय माझ्या भाग्याची थोरवी वर्णावी तरी ?

### पद

**नाही कुणी भाग्यवान । माझ्यासमान ॥ ध्रु० ॥ काळी**
**असलें तरिहि लाभले । पति ग गोरे पान ॥ १ ॥**
**स्वर्गहि वाटे मला ठेंगणा। येथचि ग अस्मान ॥ २ ॥**

( इतक्यात यमाजी एका सुदर तरुणीच्या हातात हात घालून येतो पण यमुनेला पाहताच चपापतो व तिला पाठीमागे लोटून आड लपण्यास खुणावतो. ती मागे जाऊन आड उभी राहते. )

**यमुना०**—(यमाजीजवळ जाऊन) गडे, काय बर हें अस ? किती वेळ झाला तुम्हांला घराबाहेर पडून ? इतका वेळ कुठ भटकायचें ते ! मी नाहीं जा गडे !! हो, पण तुमच्या पाठीमागून कोण गोरे माणूस गेल तिकडे पलीकडे ?

**यमा०**—कोण होत माझ्या पाठीमाग ? तुला कसल्या तरी आकृतीचा भास झाला ! तुझ्या डोळ्याना काहीं विकृति झाली नाही ना ?

**यमु०**—छे:, माझी प्रकृति चांगली आहे आणि माझ्या डोळ्यांना मुळींच विकृति झालेली नाहीं. तुमच्या पाठीमागून दूर जातांना मी एक चांगली गोरी आकृति पाहिली ! कोण होती ती ?

**यमा०**—ती ?

**यमु०**—आकृति !

**यमा०**—आकृति ना ? असेल माझीच सांवली !

**यमु०**—सांवली कशी असेल ? सांवली कुठं गोरी असते का ? मी माणसाची सांवली पाहिली आहे बरं का ?

**यमा०**—तूं सांवली पाहिली आहेस पण ती काळ्या माणसाची ! तुम्हां काळ्या माणसांची सांवली काळी असणं स्वाभाविक आहे पण तुम्हां काळ्या लोकांचा नियम आम्हां गोऱ्या लोकांना मुळींच लागू नाहीं. गोरे लोक ते गोरे लोक ! आम्हां गोऱ्या लोकांचं सर्वच कांहीं न्यारं ! माझीच गोरी सांवली तूं पाहिली असशील आणि त्यामुळं तुला गोऱ्या आकृतीचा भास झाला असेल दुसरं काय ? पण लाडके, हा कसला भलताच विषय काढलास ? नवऱ्याशीं बोलतांना बायकांनीं नेहमीं प्रेमाचाच विषय काढला पाहिजे. तुझ्या सुंदर मुखांतून निघणारे दोन प्रेमळ शब्द केव्हां एकदां ऐकायला मिळतात म्हणून माझं अंतःकरण, पाण्याबाहेर पडलेल्या मासोळीप्रमाणें, सारखं तळमळ तळमळ करतं आहे आणि तूं माझ्या मनाच्या तळमळत्या मासोळीला प्रेमजलानं संतुष्ट करण्याऐवजीं, तिच्यावर कठोर शब्दांच्या खरखरीत अंगाराचा वर्षाव करावास हें तुझ्या प्रेमळ, कोमल, नाजुक आणि साजुक मनाला तरी शोभतं का ? हां, त्या सांवलीकडे संशयानं पाहूं नको, माझ्याकडे प्रेमानं पहा ! ( तिच्या हनुवटीला प्रेमानें स्पर्श करतो. )

**यमु०**—( वर पहात ) हो गडे ! किती तरी वेडी मी ? आपल्या सुंदर मुखाची गोरी शोभा पहाण्याऐवजीं मी आपली त्या सांवलींतच रमल्यें ! नाथ, आपल्या सुंदर रूपाकडे पाहिलं म्हणजे मन कसं हरखून जातं !

**यमा०**—लाडके, प्रेमळपणाची अगदीं कमाल केलीस ! तूं प्रेमाचे बोल बोलूं लागलीस म्हणजे अशी खुलतेस कीं, ' तुझ्यावरून माझा प्राण ओंवाळून टाकावा असं वाटतं !

**यमु०**—इःश ! असं नये भलतंच बोलूं ! आम्ही बायकांनीच पतीवरून आपले प्राण ओवाळायचे असतात हो ! चला घरीं म्हणजे पंचारती ओवाळून आपली दृष्ट काढत्यें !

**यमा०**—लाडके, तुझी प्रेमळ दृष्टि माझ्यावर असली म्हणजे दुसऱ्या कुणाची दृष्ट माझ्यावर पडण्याची भीतीच नको ! बर, पण तूं सुमतिबाई-साहेबाची तैनात सोडून इकडे का आलीस ? मी कृष्णकांताची तैनात करतों, तूं सुमतिबाईची मर्जी राख !

**यमु०**—हो नाथ, मी राखीन बरं बाईसाहेबाची मर्जी ! मला त्या किती आवडतात पण ! प्रत्यक्ष महालक्ष्मीची मूर्तीच आहे ती ! पण गडे, त्यांनीं काही चांगलंस स्थळ नाहीं पसंत केलं ! त्यांना नाही कृष्णकान्त पति शोभत ! कुठं ती गोरी महालक्ष्मी आणि कुठं हा काळा म्हसोबा !

**यमा०**—हा, बोलूं नको असं भलतंच ! ती तुला महालक्ष्मी दिसत असली तर मला कृष्णकान्त महादेवासारखा भासतो आहे

**यमु०**—मग तुम्ही त्या महादेवाच्या पुढं पुढं करणार तर ? तुम्ही त्या महादेवाच्या पुढं पुढं केलंत तर तुम्हाला लोक

**यमा०**—नन्दी म्हणतील हेंच की नाही ? म्हणूंद्यात मला लोक नन्दी ! मी नन्दीहि आहे आणि आनंदीहि आहें पण माझ्या मान्या आनंदाचें नंदनवन तूंच आहेस ! तुझ्या हृदयातील प्रेमाचा उमाळा म्हणजे स्वर्गीय नंदनवनातील कारंजेंच होय. त्या कारंजात शोभणारे हे कृष्णकमल पाहून

**यमु०**—इःश ! मला गडे भारीच लाज वाटते—नका माझी अधिक स्तुति करूं ! मी तुमच्या स्तुतीच्या प्रवाहात एकादे वेळीं वाहून जायची ! मी वाहून गेल्यें म्हणजे...

**यमा०**—हो, मी बोलतां बोलतां थोडा वहावलो खरा ! बर, तूं जा पाहूं सुमतीबाईकडे !!

**यमु०**—जात्ये हो ! पण इकडे होईल ना घरीं लौकर यायला, की बसाल एकाद्या सावलीशी खेळत ? ( जाते. )

**यमा०**—किती भोळा जीव आहे हा ! तिला वाटतं कीं, मी तिच्या काळ्या कांतीवर बेहद्द खूष आहे !

**सुंदरा०**—( पुढं येऊन ) हो, आहांतच तुम्ही तिच्यावर खूष ! तिची स्तुति काय केलीत, तिच्याशीं लाडीगोडी काय लावलीत, तिच्यावर सुंदर सुंदर उपमांचा वर्षाव काय केलात, तुम्हां पुरुषांचं काळीजच मेलं उलटं !

**यमा०**—माझं काळीज उलटं आहे ना? अग हो, तूं बरोबर ओळखलंस ! माझं काळीज उलटं आहे आणि म्हणूनच मी तसं उलटं बोललों ! अग, या काळ्या वशिल्याच्या जोरावर तर मी कृष्णकान्ताच्या घरांत प्रवेश करून घेतला ! हां, पण असल्या उलट्यासुलट्या बोलण्यांत आपलं कारस्थान उलटी खाईल ! माझ्या कपटकारस्थानाच्या नाटकांत तुझा पार्ट कोणता तें तुझ्या ध्यानी आलं आहे ना ? चल, योग्य संधि पाहून तुला कृष्णकान्तापुढं हजर करीन ! मग तूं आपल्या मोहजालांत ह्या कोळ्याला अडकव !

**सुंदरा०**—तें सर्व खरं पण त्या काळ्या फत्तराला पेंव्ह पाडायचें म्हणजे कठीणच काम नाही का? काय त्या कृष्णकांतांचं कळकट रूप तरी ! ( शिसारी आल्यासारखी मुद्रा करते. )

**यमा०**—तेंच कळकट रूप आतां तुला मदनाच्या रूपापेक्षांहि मोहक वाटलं पाहिजे ! कृष्णकान्ताला एकदां लुबाडलं की, आपण सुखांत आणि चैनींत राहूं !

**सुंद०**—पण मग त्या यमुनेचं काय करणार ?

**यमा०**—तिला दूर लोटून देणार ! त्या काळ्या शिडीवरून एकदां मी वैभवाच्या मंदिरांत शिरलों की, मग मला ती शिडी दूर लाथाडून द्यायला कोणती हरकत आहे ?

**सुंद०**—हें खरं ना पण ? नाहींतर वैभवाच्या मंदिरांत गेल्यावर मलाहि विसराल ! मला नाहीं तुमच्या पुरुषी अंतःकरणाचा भरंवसा वाटत ! माझ्या गळ्याची शपथ वहा पाहूं ! ( त्याचा हात आपल्या गळ्यावर ठेवते. )

**यमा०**—आतां हा माझा हात कुणाकुणाच्या गळ्यावर ठेवूं ? ज्या हातानं मी त्या कृष्णकांताचा गळा धरणार, जो हात मी फसव्या प्रेमानं यमुनेच्या गळ्यांत घालणार तोच हात तुझ्या गळ्यावर शपथेपुरता ठेवून तरी फायदा कोणता ?

**सुंदरा०**—फायदा असो किंवा नसो, माझी आपली वेडी समजूत म्हणून तरी...

**यमा०**—बर सुदरे, हा ठेवला तुझ्या गळ्यावर हात! (पाहून) हा, पण आता न् चार हात दूर जाऊन उभी रहा, ते पहा तिकडून डॉ. मधुसूदन येताहेत!

( सुदरा जाते व दुसऱ्या बाजूने डॉ. मधुसूदन येतो. )

**यमा०**—[ पुढ होऊन अदबीने ] नमस्कार डॉ. मधुसदन! कस काय ठीक आहे ना?

**मधु०**—ठीक आहे. हो, पण तुम्ही म्हणे हल्ला कृष्णकाताकडे नोकरीला असता! खर का हे?

**यमा०**—हो, माझ्या दुर्दैवान ते खर आहे. चद्रकाताची स्थिति खालावली म्हणून मला त्याच्याकडील नोकरीचा राजीनामा द्यावा लागला. ही पोटाची खळगी कुठ तरी नको का भरायला? मी अगदी नाइलाजानच त्या दुष्ट कृष्णकाताची नोकरी पत्करली! खर सागू? नुस्ता अतर्बाह्य काळा नाग आहे तो!

**मधु०**—अस भलभलत बोलू नका! कुणी ऐकल तर तुमची नोकरी जाईल!

**यमा०**—जाऊ द्या नोकरी! सत्याची गळचेपी होऊ लागली तर नोकरीवरहि लाथ मारील तोच खरा मर्द! डॉक्टरसाहेब, काय सागू? तो चाडाळ कृष्णकात सुमतिबाईसाहेबाचा असा काही अनन्वित छळ करतो आहे की, काही विचारू नका! त्या दीन गाईचा तो छळ नाही माझ्यान पहावत! सुमतिबाई सीतामाईसारख्या पवित्र आहेत तर तो कृष्णकात रावणासारखा क्रूर आहे! ( खोटे रडत ) खर सागू? डॉक्टरसाहेब, ती सीतामाई तुमच्यासारख्या रामचद्राचीच पत्नी व्हावयास पाहिजे होती! रामचद्रा, तुम्ही नाहीं का त्या सीतामाईला रावणाच्या छळातून सोडविणार? रामचद्रा, असे निष्ठुर नका होऊ! ( रडतो. )

**मधु०**—हा, हा शोक आवरा! यमाजी, मला या गोष्टी कळत का नाहींत? पण काय करायच? सुमतीन आपखुषीनच त्याचे पत्नीत्व पत्करल आहे! आता आपल्या हाती उपाय एवढाच उरला आहे की, सुमतीला शक्य ती मदत करायची! यमाजी, तुम्ही कृष्णकाताची नोकरी धरलीत हे एका अर्थी बरच झाल! तुमच्यामार्फत मला सुमतीची हालहवाल तरी कळेल आणि तिच्या विपन्न काळी मला मदत तरी पोचविता येईल! यमाजी, सुमतीची खबर मला वारवार कळवीत जाल ना?

**यमा०**—हो, मोठ्या आनदान! मी तुमची व तिची भेट सुद्धा करवून देईन!

**मधु०**—हो, बरं सुचवलंत ! यमाजी, मला एकवेळ सुमतीची भेट घ्यायचीच आहे. तिची एक आवडती वस्तु माझ्याजवळ आहे, ती एकदां तिला देऊन टाकली म्हणजे माझ्या मनाला तितकंच समाधान वाटेल ! हें पहा, मला तिची भेट राजरोसपणं कांहीं घेतां येत नाहीं ! शिवाय, मी तशा तिच्या भेटी घेऊं लागलों तर तो राक्षस तिचा अधिकच छळ करील ! पण एकदां तरी मला तिची भेट घेतलीच पाहिजे. मला एक वेळ तिची गुप्त भेट होईल का ? तुम्ही कराल का एवढी खटपट ?

**यमा०**—हो, अवश्य करीन. सुमतिबाईसाहेबाची व तुमची केव्हां गुप्त भेट होऊं शकेल तें मी तुम्हांला आधी कळवीन मग तुम्ही, मी सांगेन त्यावेळीं खुशाल त्यांची भेट घ्या !

**मधु०**—पण हे सारं तुम्ही या कानाचं त्या कानाला न कळवितां कराल ना ?

**यमा०**—हो, मोठ्या आनंदानं !

**मधु०**—मी तुमचा अत्यंत आभारी आहे. बरं, आठवणीनं भेटाल ना मला लौकरच ?

**यमा०**—हो, हो, हो ! घ्या हे वचन ! ( त्याच्या हातावर हात मारतो. )

**मधु०**—बरं तर, मी आतां निर्धास्त राहतो. जातों बरं का ? नमस्कार ! (जातो.)

**यमा०**—नमस्कार, नमस्कार, कोपरापासून नमस्कार ! काय पण सुंदर योग जुळून येताहेत ! माझ्या जाळ्यांत बरेच भोळे जीव अडकले हें ठीक झालं ! हो, पण सुंदरेचा भोळा जीवहि तिकडे पलीकडे माझी वाट पाहून कासावीस झाला असेल ! सुंदरे, अग सुंदरे ! ( सुंदरा येते. ) वाहवा, फार मौज उडाली ! आतां आपलं कपटकारस्थान खात्रीनं यशस्वी होणार ! आतां कसलीहि काळजी उरली नाहीं. त्या कृष्णकान्ताला संशयाचं विष पाजायचं आणि गंमत उडवून द्यायची !

**सूर्य०**—( प्रवेशून ) कांहो यमाजी, कसली गंमत उडवून देणार तुम्ही ? फार मजा आहे बुवा तुमची !

**यमा०**—कसली मजा घेऊन बसला आहेस ?

**सूर्य०**—मी कुठं मजा घेऊन बसलों आहें ? तुम्हीच मजा घेऊन उभे आहांत कीं ! कोण हो या ? फार मजा आहे बुवा तुमची ! कोण हो या ?

**सुंद०**—कोण हो हा !

**यमा०**—हा सुमतिबाईचा धाकटा भाऊ आहे !

**सूर्य०**—मी ताईचा धाकटा भाऊ आहे पण या कोण तुमच्या ? यमाजी, फार मजा आहे बुवा तुमची !

**यमा०**—तुला काय करायच या कोण आहेत ते ? या माझ्या–या माझ्या

**सूर्य०**—या तुमच्या ? कोण हो या तुमच्या ? फार मजा आहे बुवा तुमची ! पण सागाना, या तुमच्या कोण ? ती यमुनाबाई तुमची बायको आहे पण या तुमच्या कोण ?

**यमा०**—या माझ्या–या माझ्या

**सूर्य०**—नका अडखळू, कळल मला ! ती यमुनाबाई तुमची बायको आणि या तुमच्या मातोश्री ! होय ना ? फार मजा आहे बुवा तुमची !

**यमा०**—हो, हो, तुला काय करायच ? या माझ्या मातोश्रीच आहेत ! चल, हो चालता इथून ! आता मुकाट्यान इथून पळ काढतोस की देऊ थप्पड ?

**सूर्य०**—ह, ह, ह, नका उगाच तसदी घेऊ ! मी जातो आपला, चालू द्या तुमचच–( जाता जाता ) फार मजा आहे बुवा तुमची ! ( पळून जातो. )

**सुंद०**—मोठा मिस्किल मुलगा दिसतो हा !

**यमा०**—खराच मिस्किल आहे. इथ जर मला कुणाची भीति वाटत असली तर त्याच मुलाची ! एवढासा चिमुरडा आहे पण मोठा कारस्थानी !

**सुंद०**—हो, पण पुढचं कारस्थान कस काय रचणार ते नाहीं सागितलंत ?

**यमा०**—सागतो, कर कान इकडे ! आता मोठ्यान बोलायची सोय उरली नाही !

( तिच्या कानात सागू लागतो. दुसरीकडून सूर्यकान्त यमुनेला घेऊन येतो. )

**सूर्य०**—यमुनाबाई, पाहिलीत का ती गमत ? हे तुमचे यमाजी आणि त्या त्याच्या मातोश्री ! यमाजी, फार मजा आहे बुवा तुमची !

**यमा०**—अरे चूप ! तोड बद ठेवतोस कीं फोडू थोबाड ?

**यमु०**—त्याचं कशाला थोबाड फोडतां ? तुम्ही गोड गोड बोलून चांगल

माझं थोबाड फोडलंत बरं का ! हीच ती तुमची गोरी सांवली, होय ना ! चांगला माझा गळा कापलात बरं ! ( रडते. )

**यमा०**—अग पण तुला असं गळा काढून रडायला काय झालं ? आधीं नीट ऐकून घेशील कीं नाहीं ? ही माझी...

**यमु०**—ही तुमची होय ना ?

**सूर्य०**—हो, ही तुमची मातोश्री ! फार मजा आहे बुवा तुमची !

**यमा०**—गप्प बैस पोरट्या ! अग, ही माझी अगदीं जवळची नातेवाईक आहे.

**यमु०**—म्हणूनच ती तुमच्या अगदीं जवळ उभी होती वाटतं ! चांगला गोऱ्या सुरीनं गळा कापलात बरं ! ( रडते. )

**यमा०**—हां, रडूं नको, मी देतों हिला घालवून, मग तर झालं ना ! उगी ! उगी ! ( सुंदरेस ) ए बाई, तूं आपली इथून निघून जा कशी ! चल, चल...(तिला दूर नेऊन हळुच) पुनः भेट मला त्या पलीकडच्या कोंपऱ्यावर ! ( मोठ्यानें ) जा, एक शब्द बोलूं नको ! ( ती गेल्यावर यमुनेस ) काय बरं हा तुझा भलताच संशय ? तिचं माझ्याशीं काम होतं......

**यमु०**—तिच्याशीं काम ? चांगला माझा गळा कापलात बरं !

**यमा०**—छट्, या पोरट्यानं घोंटाळा केलान् ! उगाच कांहीं तरी विष तुझ्या मनांत भरवून दिलंन् त्यानं ! चल घरीं म्हणजे सर्व नीट समजावून सांगतों ! (तिच्या पाठीवरून हात फिरवीत) लाडके, मी त्या बाईची पुनः सांवली सुद्धां घेणार नाहीं, मग तर झालं ? राणीसाहेब, राग सोडायचा आणि घरीं चलायचं ! आतां येतेस कीं उचलून नेऊं फुलासारखी ?

**यमु०**—इःश ! नका गडे मला लाजवूं असल्या लाडिक बोलण्यानं ! चला घरी. पण घरीं गेल्यावर तरी सगळी हकीगत सांगाल ना खरी खरी ?

**यमा०**—खरोखर सांगतों, चल ! ( तिला घेऊन जाऊं लागतो. )

**सूर्य०**—काय थाप दिलीत हो पण ? फार मजा आहे बुवा तुमची !

( जातात. )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—दिवाणखाना. सुमति सचिंत बसली आहे. )

**सुमति०**—इथ मला सुख लागेलस काहीं वाटत नाही. कृष्णकान्ताचा स्वभाव इतका सशयी आहे की, त्याना माझा भरवसा मुळीच वाटत नाहीं. इथ सगळ संशयाच साम्राज्य माजल असताना मला तरी सुख कुठून लागणार ? बाबा इहलोक सोडून गेले आणि त्याच्याबरोबर माझ्या सुखाचीहि समाप्ति झाली ! माझ्या दैवातच जर मुळीं सुख लिहिल नसल तर ते मला तरी कुठून लाभणार ? देवा,

### पद

**होत अशी परदेशी । कैशी । येतिल वाटति सकटराशी । पतिमतिला कैसा संशय ग्रासी ॥ ध्रु० ॥ देईं धीरा । भ्याली अति अबला । केलें मनि निर्धारा । तारिं हृषीकेशी ॥ १ ॥**

मी मनात केवढे सुखाचे मनोरे उभारले होते पण ते सर्व ढासळून पडले ! बाबानीं मला लग्नाच्या बाबतीत पूर्ण स्वातत्र्यच दिल होत आणि त्यानीं माझी प्रेमाची निवडहि पसत केली होती. मधुसूदनाच तरी माझ्यावर किती प्रेम होत ! त्याच्याबरोबर मी सुखान ससार केला असता पण पण नकोच तो विचार ! आणि आता मला तो विचारहि करता येत नाही ! मी कृष्णकान्ताची धर्मपत्नी आहें, मला मधुसूदनासबधींचा विचारसुद्धा करता येत नाहीं.

**कृष्ण०**—( प्रवेशून ) सुमति, कसला विचार करते आहेस ?

**सुम०**—( बावरलेल्या मुद्रेने ) नाही, कसलाहि विचार करीत नाहीं.

**कृष्ण०**—मग तुझी मुद्रा अशी बावरलेली कां दिसते ?

**सुम०**—कुठ आहे माझी मुद्रा बावरलेली ?

**कृष्ण०**—खोटं बोलत्ये आहेस तू ! तुझ्या सुदर चेहऱ्याच्या आरशांत मला तुझ्या मनातल्या विचाराच प्रतिबिंब स्पष्ट दिसत आहे. पहा, तुझा चेहरा गोरामोरा झाला !

**सुम०**—नका असले भलतेच संशय घेत जाऊं! मी तुमच्या पायां पडतें...

**कृष्ण०**—मार माझ्या पायावर हात आणि वहा शपथ, खरं तेंच सांगेन म्हणून!

**सुम०**—(पायावर हात ठेऊन) नाथ, तुम्हीच माझ्या शरीराचे व मनाचे ईश्वर आहांत. मी तुमच्याशीं कधींहि असत्य बोलणार नाहीं!

**कृष्ण०**—(मायावीपणानें) आतां माझी खात्री झाली. (तिचा हात धरून) मग सांग, तुझ्या मनांत मधुसूदनाविषयींचा विचार आला होता ना? सत्य बोलण्याचं तूं मला वचन दिलंच आहेस!

**सुम०**—(स्व०) अगबाई, यांनीं तर मला माझ्याच शब्दांत पकडलं! आतां काय करूं? मघाशीं माझ्या मनांत मधुसूदनांविषयींचा विचार आला होता खरा! खरं तेंच सांगूं का पण? (विचार करून) नाहीं, मला प्राणांतींहि खोटं बोलतां कामा नये. मी खरं तेंच सांगणार मग काय व्हायचं असेल तें होवो!

**कृष्ण०**—कांहीं तरी थाप द्यायचाच तुझा विचार दिसतो! वाटेल तर खोटं सांग, माझी कांहींच हरकत नाहीं. तूं नेहमीं खोटंच बोलणार हें मी पक्कें जाणून आहें. तुला तुझ्या शपथेची किंमत वाटत असली तर खरं सांग, नसली तर...

**सुम०**—नाहीं, मी खोटं बोलणार नाहीं, मला माझ्या शपथेची किंमत कळते.

**कृष्ण०**—होय ना? मग सांग खरं! (प्रेमाचा आव आणतो.)

**सुम०**—महाराज, मधुसूदनांविषयीं माझ्या मनांत विचार आला होता पण तो वि...

**कृष्ण०**—बस्स! पुढं एकहि शब्द ऐकून घ्यायची गरज नाहीं! बेमान! माझ्याशीं लग्न करून त्या जाराविषयींचे विचार करीत बसतेस काय? हेंच का तुझं इमान आणि हाच का माझा मान? यावेळीं मी तुझी मान मुरगाळली तरी सुद्धां माझं कठोर कृत्य क्षम्यच ठरेल! मुरगाळूं का तुझी मान?

**सुम०**—हो, खुशाल माझी मान मुरगाळा, त्यामुळं माझा क्षणोक्षणीं होणारा अपमान तरी वांचेल! (त्याच्यापुढं मान करते.)

**कृष्ण०**—नाहीं, मला इतका कठोरपणा इतक्यांत करावयाचा नाहीं. शिवाय, तुझी मान मुरगाळल्यामुळं तुझ्या हृदयांत लपून बसलेला तो जार मधुसुदन कसा नष्ट होईल? आधीं त्या जाराला तुझ्या हृदयांतून हांकलून लावीन आणि नंतरच मान...

**सुम०**—महाराज, मग आधीं माझ्या हृदयाचे तुकडे करा

**कृष्ण०**—तेहि करीन पण अजून थोडा वेळ आहे ! या वेळीं मी जातों, तू खुशाल तुझ्या जाराविषयीचे गुलगुलीत विचार करीत बस !

**सुम०**—नाहीं, महाराज ! हें दुःख मला सहन करवत नाही. मी तुमचे पाय धरत्यें, याच वेळीं काय तो सोक्षमोक्ष करा !

**कृष्ण०**—तुला काय ? जितक्या लौकर सोक्षमोक्ष मिळेल तितक्या लौकर तुला तो पाहिजेच आहे. तू आपल्या सुटकेची वाटच पहात आहेस पण मी तुझ्या त्या जाराची वाट लावण्याची वाट पाहतों आहे. अशा मायावी केंविलवाण्या मुद्रेन माझ्याकडे पाहू नकोस ! हो दूर, हो दूर !

**सुम०**—नाहीं महाराज ! मी हे पाय सोडणार नाही !

**कृष्ण०**—ठीक आहे तर ! तुला दूर लोटूनच मी जातो. ( तिला लाथाडून निघून जातो. )

**सुम०**—देवा, आता मी हा छळ तरी कसा सहन करू ? देवा, काय तू माझ्यावर हा घोर प्रसग आणलास ? पण देवाला तरी मी कोणत्या तोडान दोष देऊ ? मीच आपखुषीन आपल्यावर हें सकट ओढवून घेतल नाहीं का ? पितृऋण फेडण्याकरिताच मी कृष्णकान्ताशी विवाह केला ना ? मग मला माझ्या कृतीचे परिणाम भोगावयास नकोत का ? दुर्दैवा, तू माझा वाटेल तसा छळ कर, मी कधींहि ब्रीदापासून चळणार नाहीं !

**पद**

**छळिं आज दैवा । मातें । पाळीन ब्रीदा ॥ ध्रु० ॥ काधिं**
**कांचना भय काय वाटे । जाळी ज्वाला, धरि तेजाला**
**नव मंगला । तेविं मी साहीन त्या विपदा ॥ १ ॥**

**सूर्यकांत**—( येऊन ) ताई, का ग रडतेस अशी एकसारखी ! कोण तुझा छळ करतें आहे ?

**सुम०**—( रडें आंवरून ) नाहीं बाळ, कुणी नाहीं माझा छळ करीत !

**सूर्य०**—खोटं बोलतेस तूं! कृष्णकांतांनी तुला लाथ मारली ना? मी पलीकडे उभा राहून सर्व कांहीं पहात होतों. ताई, कृष्णकांत बाहेर पडले तेव्हां त्यांना मी 'तुम्हीं माझ्या ताईला लाथ कां मारलीत?' म्हणून विचारलं सुद्धां!

**सुम०**—मग ते काय म्हणाले?

**सूर्य०**—कांहींच म्हणाले नाहींत. त्यांनी मला एक चापट मारली आणि ते निघून गेले! ते तसेच निघून गेले म्हणून बरं झालं, नाहींतर मीहि त्यांना असे धम्मकलाडू चारणार होतों कीं यंव्! काय करूं? असे हात शिवशिवताहेत ...

**सुम०**—बाळ, तसला अविचार करूं नको. मी आपण होऊन त्यांच्या पायांशीं येऊन पडलें आहें; त्यांना मी, मला लाथा मारण्याचाहि अधिकार दिला आहे. बाळ, तुला त्यांचा सूड घेतां येत नाहीं.

**सूर्य०**—पण ताई, तूं त्यांच्या लाथा कां खातेस? मी नाहीं कुणाच्या लाथा खाणार!

**सुम०**—तुझी गोष्ट निराळी आहे. तू पुरुष आहेस पण मी स्त्रीचा जन्म घेतला आहे ना?

**सूर्य०**—म्हणजे, स्त्रियांनी नेहेमी लाथाच खाव्यात वाटतं? स्त्रिया म्हणजे जशीं कांहीं माणसंच नव्हेत! मी स्त्री असतों तर कृष्णकांतासारख्या पुरुषांना लाथांनींच बडवलं असतें. ताई, या पुरुषांची खोड मोडण्यासाठीं मी देवाजवळ पुढचा जन्म स्त्रीचाच मागून घेईन!

**सुम०**—बाळ, केवढं तुझें थोर अंतःकरण हें? बाळ, तूं खात्रीनं थोर पुरुषच होणार आणि स्त्रियांचीं दुःखें दूर करणार! बरं बाळ, तूं जा बरं घटकाभर खेळायला बाहेर! तिकडे स्वयंपाकघरांत यमुना बसली असेल, तिच्याजवळ कांहीं खायला मागून घे हं! जा बाळ!

**सूर्य०**—मी जातों पण तूं आधी रडं थांबव आणि माझ्याकडे पाहून हांस पाहूं! हं, हांस, हांस, अश्शी अश्शी हांस! आतां मी जातों. (तिला हंसवून जातो.)

**सुम०**—बाळ सूर्यकांताप्रमाणंच माझे विचार होते. मीहि पुरुषांच्या लाथा न खाण्याचाच निर्धार केला होता आणि माझ्या थोर अंतःकरणाच्या बाबांनीं

लग्नाच्या बाबतीत मला पूर्ण स्वातंत्र्यहि देऊन ठेवल होत पण माझ्या दुर्दैवान मला पारतंत्र्याच्या खाईत ढकलून दिल...

**मधु०**—( प्रवेशून ) नाहीं, तुला कुणीच पारतंत्र्यात लोटल नाही ! तुझा पिता तुला नको नको म्हणत असताहि, तू आपण होऊन पारतंत्र्याचा स्वीकार केलास ! तुला मिळालेल्या पूर्ण स्वातंत्र्याचा तू दुरुपयोगच केला नाहीस का ?

**सुम०**—नाहीं, मी स्वातंत्र्याचा सदुपयोगच केला. मी स्वातंत्र्यवृत्तीचा महायश चेतवून पितृऋण फेडल ! मधुसूदन, मी माझ्या सत्यपालनाच्या ब्रीदाला काळिमा फासू का ?

## पद.

**काय बोला करूं वचा विफला । जरी छळ झाला ॥ ध्रु० ॥**
**निरयगती गणा, वचना त्यागितां । मरणहि गमे प्रिय तें मला ॥ १ ॥**

**मधु०**—कृष्णकान्तासारख्या अधमाशी वागताना जशास तसे याच न्यायान वागल पाहिजे. तो अधमाधम, तो काळा नाग, तो पिसाळलेला कुत्रा .

**सुम०**—मधुसूदन, हा शिव्याशापाचा वर्षाव एकदम थाबवा. मला असले कठोर शब्द ऐकता येत नाहींत ! कशी झाल्ये तरी मी त्याची धर्मपत्नी आहें ! मधुसूदन, तुम्हीं इथ येऊन माझ्या सकटात भरच घातली आहे. तुम्ही इथ कसे आलात ? तुम्हाला इथ येण्याला कृष्णकातानी बदी केलेली नाहीं का ?

**मधु०**—सुमति ! तुला एकदा डोळे भरून पहाव आणि तुझ्या मनाचं सात्वन कराव एवढ्याचसाठी मी इथ मोठ्या युक्तीन आलो आहें.

**सुम०**—तुम्ही अशी कोणती युक्ति केलीत ?

**मधु०**—( हळुच ) यमाजीन मला इथ गुप्तपण आणून सोडल आहे ! यमाजीला तुझ्यामाझ्याविषयी अत्यत सहानुभूति वाटते आहे.

**सुम०**—त्याच्या सहानुभूतीचा तुम्ही दुरुपयोग केलात ! तुम्ही इथ आल्याचं वर्तमान जर कृष्णकाताच्या कानावर गेल तर ते मला जिवत जाळून टाकतील ! तुम्ही एकहि अक्षर न बोलता आल्या पावली परत जा, मी तुम्हाला हात जोडतें...

**मधु०**—मी जातों पण तूं माझ्या प्रेमचिन्हाचा स्वीकार करणार नाहींस का? (स्वतःची तसबीर हातांत घेऊन) ही माझी अगदीं नवी तसबीर आहे. माझ्या पवित्र बंधुप्रेमाची खूण म्हणून मी तुला ही अर्पण करतों. ही जवळ ठेव म्हणजे संकटकाळीं तुला माझी आठवण होईल. कसलंहि घोर संकट आलं तरी मला—तुझ्या प्रेमळ बंधूला—कळव, मी तुझ्या मदतीला वायुवेगानं धांवून येईन! ही घे तसबीर!

(इतक्यांत यमाजी कृष्णकान्ताला दिवाणखान्यांत आणून सोडतो व स्वतः मागच्या मागं निघून जातो.)

**कृष्ण०**—घे, घे, सुमति! ती तुझ्या जाराची तसबीर घे आणि जाराचा विरह सहन होईनासा झाला म्हणजे तिला हृदयाशीं कवटाळून धर. ती तसबीर म्हणजे तुम्हां दोघांच्या चोरट्या प्रेमाची साक्ष आहे आणि मी तिला साक्षीदार आहें.

**सुम०**—मधुसूदन, तुम्ही ही तसबीर घेऊन जा! मला तिचं दर्शन सुद्धां नको!

**कृष्ण०**—दर्शन कां नको? माझं दर्शन झालं म्हणूनच कीं नाहीं? मधुसूदन, आण ती तसबीर इकडे!

**मधु०**—नीचा, या पवित्र प्रेमचिन्हाला तुझ्या अमंगल हाताचा पापी स्पर्श करूं नकोस!

**कृष्ण०**—बरोबर आहे तुझं म्हणणं! मी तुझ्या प्रियतमेचा पति झालों मग मी पापी कसा नसेन? मधुसूदन, या जारिणीला मी तुझ्या स्वाधीन करतों, हिला घेऊन जा! तुमच्या गोड प्रेमावर माझा काळा बिब्बा कशाला पाहिजे?

**मधु०**—कृष्णकांत, ही सुमति पवित्र आहे, जारिणी नाहीं. तिच्या पवित्र प्रेमाची किंमत तुला कळूं नये ना?

**कृष्ण०**—तिच्या पवित्र प्रेमाची किंमत तुला कळली आहे ना? बस्स झालं! ही पवित्र जारिणी आणि तूं पवित्र जार—काय पावित्र्याच्या गंगेचे पाट वाहताहेत?

**मधु०**—कृष्णकांत, तुझ्याशीं तिचं लग्न झाल्यापासून मी तिला पाठची बहीणच समजत आलों आहें.

**कृष्ण०**—भले बहाद्दर! तिला पाठची बहीण समजतोस ना? काय गाढव आहेस रे तूं? पण तुला दोष देण्यांत तरी काय अर्थ? गाढवाला गुळाची चव काय कळणार?

**मधु०**—कृष्णकांत, तोंड आंवर नाहींतर मी तें फोडून टाकीन! काळतोंड्या...

**कृष्ण०**—मी काळतोंड्या काय ? पाजी माणसा, त्या तसबिरीत तुझं पापी तोंड पहा म्हणजे तींत तुझ्या तोंडाचा डाबरी रग तुला स्पष्ट दिसेल ! चल, हो चालता मुकाट्यान...' डॉग्ज नॉट अलाऊड ' हें तू विसरलास वाटत ?

**मधु०**—पाजी पापात्म्या, या दीन गाईचा छळ करणार नाहीं अस आधीं कबूल कर, मग मी जाईन !

**सुम०**—मधुसूदन, मुकाट्यान माझ्या पतिदेवाचा हुकूम माना आणि इथून क्षणाचाहि विलब न लावता चालते व्हा ! हे माझे पतिदेव आहेत, त्याना खुशाल माझा छळ करू द्या.

**मधु०**—कोण ? हा काळा राक्षस तुझा देव आहे ?

**सुम०**—मधुसूदन, तुमच्या बधुप्रेमाचाहि अतिरेक झाला. आता इथून मुकाट्यान चालते होता कीं यमाजीला बोलावून तुम्हाला धक्के मारवू ? माझी मी स्वतत्र आहें. मी सत्याच्या पालनासाठी वाटेल तो छळ आनदान सहन करीन ! तुम्ही इथ आणखी एक क्षणहि थाबाल तर मी तुम्हाला पापी समजेन !

**कृष्ण०**—मधुसूदन, हिन पातिव्रत्याच्या आविर्भावाच इतक सुदर नाटक केल असूनहि तुला त्यातला खोल अर्थ कळू नये ना ? या जारिणीच पाप झाकाव म्हणून तरी इथून चालते व्हा की !

**मधु०**—नीचा, किती निर्दय आहेस रे तू ? पाजी माणसा, सुमतीच्या समजुतीसाठी हा मी जातो ! सुमति, देव तुझ रक्षण करो ! (जातो.)

**कृष्ण०**—सुमति, तुझ्या मायावी पातिव्रत्याच नाटक तर खूप रगल !

**सुम०**—महाराज, मी खरीच पतिव्रता आहे. मधुसूदन चागल्या बुद्धीनेच इथ आले पण त्यानीं ती घोडचूक केली त्याच्या चुकीबद्दल मला दोष देऊ नका. पतिदेवा, मी पवित्र आहें. पित्याच्या ऋणातून मुक्त होण्यासाठीं मी जिवात जीव असेपर्यंत पवित्रच राहणार आहें–तुमच्या पवित्र चरणाची शपथ !

**कृष्ण०**—डाकिनी, तुझा मायावीपणा मला पुरता कळून आला ! आता मी तुला अशीच एकसारखी लाथाडणार ! (लाथाडतो. ती कोलमडून पडते. कृष्णकान्त क्रूरपणें पहातो. यमाजी चोरून पहातो व पाजीपणानें हसत राहतो.)

**दुसरा अंक समाप्त**

---

# अंक तिसरा

—•••—

## प्रवेश पहिला

( **स्थळ:**—रस्ता, यमाजी हंसत हंसत प्रवेश करतो. )

**यमाजी०**—काय मौज उडाली पण ! त्या मधुसूदनाला फसविलं आणि त्याच्या उतावळ्या उल्लू स्वभावाचा भरपूर फायदा घेऊन त्याला सुमतीच्या रंगमहालांत हजर केलं ! त्याच वेळीं युक्ति करून कृष्णकांतालाहि जाळ्यांत अडकवून, त्याच्या विषारी दृष्टीला तें दृश्यहि दाखविलं ! त्यामुळं संशयाग्नीचा भडाग्नि इतका भडकला कीं, त्यांत सुमतीचा कोंवळा जीव पार करपून जातो कीं काय, अशी भीति वाटूं लागली आहे ! खरोखर, सुमति व मधुसूदन हे दोघेहि निष्पाप जीव आहेत हें मलाहि कळतंच आहे पण हें कळून काय करायचं ? मला लुबाडायचं आहे त्या कृष्णाकांताला ! त्याच्यावर सुंदरेची मोहिनी मी टाकलीच आहे म्हणा ! आतां तिच्यामार्फत त्या काळ्या नागाला लुबाडलं म्हणजे माझं काम झालं ! मग मी त्या भोळ्या यमीला लाथाडून आणि सुंदरेच्या मानेवर पाय देऊन वैभवाच्या मंदिरांत शिरणार आणि उरलेलं आयुष्य सुखांत घालविणार ! सुंदरा सर्व तयारी करून त्या काळ्या नागाचे दांत पाडण्यासाठीं कृष्णकांताच्या बंगल्यांत जाऊन बसलीच आहे म्हणा ! तिच्या स्वाधीन एकदां त्या कृष्णकान्ताला केलं कीं झालं काम ! ( पाहून ) हे आलेच काळे नागोपंत !

**कृष्णकान्त**—( येऊन ) अरेरे, काय करूं ? हृदयांत पेटलेली ही आग कशी शांत करूं ? त्या सुंदर मुखड्याच्या पण काळ्या काळजाच्या सुमतीला मी आतां छळून छळून ठार मारणार यांत शंकाच नाहीं. पण ही माझ्या हृदयांत भडकलेली अपमानाग्नीची आग आधीं कशी शमवूं ?

**यमा०**—प्रेमजलाचं सिंचन करून ! सुंदरा जशी सुंदर तशीच प्रेमळ आहे. ती तुमच्या लग्नाच्या बायकोप्रमाणं बेमान होणार नाहीं ही मी खात्री देतों. सुंदरेसारख्या स्त्रियांना सुमतीसारख्या तरुणींचा न्याय लावूं नका. तिच्या-वर पैशांचा पाऊस पाडा म्हणजे ती जन्मभर तुमचे पाय चाटीत राहील !

**कृष्ण०**—तुम्ही सुदरेची व माझी एकदोनदाच गाठ घालून दिलीत पण तेवढ्यातच तिच्या प्रेमळ मनाची मोहिनी माझ्यावर पडल्याशिवाय राहिली नाहीं. पण अजून तिच्या इमानाविषयी मनाची काही पूर्ण खात्री होत नाहीं !

**यमा०**—आज तुम्ही सुदरेला पैशाच्या राशीवर बसवा मग पाहतो ती कशी बेमान निघते ती ! बेमानी करायला काय ती लग्नाची बायको थोडीच आहे !

**कृष्ण०**—सुदरा इमानी निघेल तर मला सुमतीच्या छळाला तितकाच अधिक रग आणता येईल ! पाहतों प्रयत्न करून !

**यमा०**—मग आता वेळ गमावू नका. जा लौकर आपल्या बगल्यात ! सुदरेचा जीव तुमच्या विरहान घुटमळत आला असेल !

**कृष्ण०**—जातो पण

**यमा०**—आला पुनः सशय तुमच्या मनात—नका असले सशय घेत बसू !

**कृष्ण०**—जातो तर ! ( जाता जाता ) ती सुदरा इमानी निघेल तर काय गमत होईल ? ( जातो. )

**यमा०**—झाल, माझ बहुतेक काम झाल ! आता सुदरेन कृष्णकाताला लुबाडल कीं मी तिला लुबाडणार आणि पसार होणार ! ( जाऊ लागतो. )

**सूर्यकान्त**—(येऊन) यमाजी, फार मजा आहे बुवा तुमची ! कुठ चाललात ?

**यमा०**—जातो मसणात ! हो दूर !!

**सूर्य०**—काय मसणात जाता आणि जिवतपणीं ? फार मजा आहे बुवा तुमची ! जिवतपणीं मसणात जाणार अ ?

**यमा०**—आता बऱ्या बोलान बाजूला होतोस कीं वाजवू कानशिलावर फटाका?

**सूर्य०**—हा, ही फटाके वाजवायची वेळ नाहीं ! सध्या तुमचा शिमगा चालू आहे ! हा शिमगा सपू द्या, दिवाळी येऊ द्या, मग खुशाल वाजवा फटाके ! खरच, तुम्ही शिमग्यात सुद्धा फटाके वाजवणार अ ? फार मजा आहे बुवा तुमची !

**यमा०**—या गमजा थाबव नाहींतर, नाहींतर दाखवतों आता खरीच मजा !

**सूर्य०**—मजा दाखवायला ती कशाला पाहिजे ? तुमच्या तोंडावरच झळकते

आहे कीं सारी मजा ! खरं सांगा, तुम्ही त्या तुमच्या मातोश्रींकडे जाणार आहांत, होय ना ? फार मजा आहे बुवा तुमची !

**यमा०**—तुला मातोश्री आठवते आहे नाहीं का ? चांगली मुखश्री रंगली म्हणजे दिसेल तुला मातोश्री !

**सूर्य०**—पण कां हो, घरीं बायकोला रडत ठेवून मातोश्री शोधीत हिंडायला तुम्हाला लाज नाहीं वाटत ? पण हो, तुम्हांला कसली लाज ? तुम्ही तर पक्के निर्लज्ज आहांत ! फार मजा आहे बुवा तुमची !

**यमा०**—आतां तुझ्याच निर्लज्जपणाचा कळस झाला आहे ! कानशील फुटून डोळ्यांवाटे गंगायमुना वाहूं लागल्या म्हणजे कळेल तुला मजा ! (त्याला मारायला धांवतो, सूर्यकान्त त्याला चुकवितो तों यमुना येऊन सूर्यकान्ताला पोटाशीं धरते.)

**यमु०**—कां ? या बाळावर कां हात टाकतां ? बाळ कित्ती गुणी आहे पण ! हा मला देवदूतच भेटला आहे जसा कांहीं ! वयानं छोटा पण बुद्धीनं मोठा ! काय केलंन् यानं ? कां मारतां त्याला ?

**यमा०**—फार खट्याळ पोर आहे ! मला तिकडे जाऊंच देईना !

**यमु०**—बरोबर केलं त्यानं ! कशाला जातां तिकडे ? घरीं बायकोला रडत ठेऊन बाहेर हिंडत राहतां ? काय म्हणावं तुम्हाला ? चांगला गोऱ्या सुरीनं गळा कापलात बरं !

## पद

**ती पसरुनि माया अपुली । बोला कापिला गळा कां ॥ भोळी फसली अबला ॥ ध्रु० ॥ उगाच मोलाचें प्रेम पायिं वाहियलें । उगाच मानियले सत्य बोल मी अपुले ॥ फुकाच जोडियलें नाथ प्रीतिचें नातें । खरेच ढांसळळे स्वर्गिंचे मनोरे ते ॥ १ ॥**

(जवळ जाऊन) गडे, नकाच जाऊं मला सोडून ! तुम्ही माझ्या प्रेमाची सत्ता कबूल केली आहे ना ? मी सत्तेनंच तुम्हांला अडवून धरणार ! (त्याला धरून ठेवते.)

**यमा०**—तुझी प्रेमाची सत्ता कबूल केली पण तुझी अडवणूक मानण्याचं कुठं कबूल केलं आहे ? तत्त्व मान्य पण तपशील अमान्य !

**यमु०**—आता तपशील सोडा आणि चला घरी ! चला, नाहींतर मी रडेन–खरच रडेन, मोठमोठ्यानीं रडेन–( रडू लागते. )

**यमा०**—खुशाल रड ! हो दूर, हो दूर, काळी कैदाशीण कुठली ! ( तिला दूर लोटून निघून जातो, ती खाली पडते. )

**सूर्य०**—( यमुनेला वर उठवीत ) यमुनाबाई, रडून काय होणार ? तुम्ही त्याची चागली खोड मोडा आणि त्यानाच रडायला लावा. हा, रडू नका ! उगी !! उगी !!!

**यमु०**—मी काळी, ते गोरे ! त्यानीं मला तोडघशीं पाडल ! बाळ, तू फार चतुर आहेस, तूच मला काहीं मार्ग सुचव ! त्या सुद्रीन सर्वस्वीं माझा घात केला ! तिनच आपल गोर मोहजाल पसरून त्याना वश करून घेतल अशी मला पक्की बातमी कळली आहे

**सूर्य०**—मग चला तर, आपण तिचा पत्ता काढू आणि यमाजीची खोड मोडू !

**यमु०**—मग चल तर ! ( त्याच्या कानात सागते. ) आहे का तुला ही युक्ति पसत ?

**सूर्य०**—वाहवा, ही युक्ति फार चागली आहे ! मी लहान दिसतो याच्यावर जाऊ नका. मी तुमच वाटेल ते काम हुषारीनच करून दाखवीन. आहेच तसा मी अजब मुलगा ! यमुनाबाई, तुम्ही आता खास यमाजीची खोड मोडणार ! फार मजा आहे बुवा तुमची !!

**यमु०**—चल तर ! तू मला माहसी देवदूतच भेटलास खरा !!

---

## प्रवेश दुसरा

( **स्थळ:**—कृष्णकाताच्या एका दूरच्या बगल्यातील रगमहाल. सुदरा कृष्णकाताला मदिरा पाजीत आहे. )

**सुंदरा०**—महाराज, आता तरी आपल मन शांत झाल ना ? ही मदिरा नाहीं. प्रत्यक्ष इहलोकीच अमृतच आहे.

## पद

**प्याहो प्याहो सुरा। मधु मनहारी ॥ ध्रु० ॥ खरीच प्रीतीचा लाल रंग ल्याली। स्वयेंच जाउनियां स्वर्गी अमृता प्याली ॥ निज रंगीं नरा रंगवि नारी ॥ १ ॥**

**कृष्ण०**—हा स्वर्ग आहे, हें अमृत आहे आणि तूं अप्सरा आहेस. हे देवांगने, मला आणखी अमृत पाज, मग मी तुला खूष करीन. वाटेल तितकें द्रव्य देऊन तुला मी खूष करीन! हं, पाज मला अमृताच्या घागरी!

**'हे सुंदरी। हे सुंदरी। भर अमृताच्या घागरी ॥'**

**सुंदरा०**—( दारू पाजीत असतां ) महाराज, मला प्रेम मिळालं म्हणजे पुरे आहे. मला काय करायचं द्रव्य? द्रव्यापेक्षां मला आपल्या प्रेमाचीच किंमत अधिक वाटते! नको मला तें द्रव्य!!

**कृष्ण०**—याचं नांव खरं प्रेम! तुला द्रव्य नको? तुला द्रव्य कां नको?

**सुंद०**—आपलं पृथ्वीच्या मोलाचं प्रेम मला लाभलं म्हणून!

**कृष्ण०**—काय? तुला माझं प्रेम पृथ्वीच्या मोलाचं वाटतं?

**सुंद०**—होय महाराज, तुम्ही मला कितीहि पैसा दिलात तरी त्याला मी हात सुद्धां लावायची नाहीं! आपल्या गळ्याची शपथ!!

**कृष्ण०**—पहा, लोकहो पहा! ही सुंदर सुंदरा माझ्यावर पृथ्वीच्या मोलाचं प्रेम करते आहे. म्हणे गोऱ्यांचं काळ्यांवर प्रेम नसतं! पहा, ही गोरी असूनहि माझ्यावर प्रेम करते आहे. ही माझा पैसा सुद्धां घ्यायला कबूल नाहीं! सुंदरे, तुला नको ना पैसा?

**सुंद०**—माझं पैशावर प्रेम नाहीं पण खऱ्या प्रेमांतच, त्रिभुवनांतला पैसा सांठवला आहे असं मी समजत्यें. मी तुमच्या पैशाला हात सुद्धां लावायची नाहीं!

**कृष्ण०**—तूं माझ्या पैशाला हात लावायची नाहींस इतकंच ना? मग मी असं करतों. ( खिशांतून नोटा काढतो.) पाज मला तें अमृत म्हणजे मला एकादी युक्ति सुचेल! ( ती दारू पाजते. ) हं, आतां सुचली मला युक्ति! मी तुझ्या वेणीलाच नोटा बांधून तुला पैशांनीं फुलवून काढतों. ( तिच्या केसांना नोटा बांधतो.)

**सुंद०**—हें काय, हें काय महाराज?

**कृष्ण०**—हे प्रेम आहे महाराज! सुंदरे, आज मी धन्य झालों, मला स्वर्गीय प्रेमाची प्राप्ति झाली! ( दारूची शिशी तोंडाला लावतो. )

**यमा०**—(लपून बसलेला) सुंदरे, आण त्या नोटा इकडे! मी संभाळतो त्या!

**सुंद०**—बर तर! ( त्याला नोटा देते. )

**कृष्ण०**—लाडके, ये बैस अशी! तुझं माझ्यावर निर्मळ आणि निर्भेळ प्रेम आहे ना?

**सुंद०**—महाराज, तुम्हीच माझ्या प्रेमाचे परमेश्वर आहात!

( इतक्यात सूर्यकान्त पोस्टमनाच्या वेषात येतो. )

**सूर्य०**—(खोटा लिफाफा वाचीत) सुंदराजी यमाजी इथच राहतात काय? सुंदराजी यमाजी इथच आहेत ना?

**कृष्ण०**—कोण? सुंदरा यमाजीची कोण?

**सूर्य०**—सुंदरा यमाजीची बायको! मला वाटत हे पत्र या सुंदराबाईचच आहे. ही सुंदरा यमाजीचीच आहे!

**कृष्ण०**—काय? ही सुंदरा यमाजीची आहे? काय ग सुंदरे, हा यमाजी कोण तुझा? ( तिची मानगुटी धरतो. ) कुठ आहे तुझा यमाजी?

**सूर्य०**—अहो, तिला काय विचारता? शोधा म्हणजे सापडेल!

**कृष्ण०** —काय? यमाजी इथच लपून बसलेला आहे? कुठ आहे तो? कुठ आहे तो? (त्याला शोधतो, यमाजी त्याला चुकवतो पण सूर्यकान्त त्याला पकडतो.)

**सूर्य०**—वाः यमाजी! तुम्ही असे लपून बसलात? फार मजा आहे बुवा तुमची!

**कृष्ण०**—काढतो याची मजा ह! (त्याला पकडतो.) सुंदरे, हा कोण तुझा?

**सूर्य०**—( यमाजीच्या खिशातून नोटा काढून ) हा सुंदरेचा कोण ते या नोटाच सांगतील!

**कृष्ण०**—अरे बदमाषा! ( त्या दोघांची झटापट होते. यमाजी कृष्ण-कान्ताला जखमी करतो. कृष्णकान्त बेशुद्ध पडतो. )

**यमा०**—सुंदरे, चल आपण पळत जाऊ!

**सुंद०**—चला लौकर! ( तीं पळून जाऊ लागतात तों सूर्यकात यमाजीचा पाय ओढून त्याला पाडतो व त्याच्या पाठीवर बसून गुद्दे मारतो. )

**सूर्य०**—यमाजी, फार मजा आहे बुवा तुमची! चारू का आणखी धम्मकलाडू?

**सुंद०**—आतां इथं थांबल्यें तर अनर्थ ओढवेल. आपण आपलं जीव घेऊन पळून जावं! (पळ काढते.)

**यमा०**—अरे ऊठ पाठीवरून!

**यमुना०**—(सुमतीला घेऊन येते) बाळ, दे सोडून त्यांना! या पहा, तुझ्या सुमतिताई आल्या आहेत. (त्याला उठवते.)

**यमा०**—(सुमतीचे पाय धरून) ताईसाहेब, मला क्षमा करा, मीच सर्वस्वीं तुमचा अपराधी आहें.

**यमुना०**—आलांत का नीट शुद्धीवर? बोलूं नका आतां! ताईसाहेब, आधीं इकडे या. इथं कृष्णकांत बेशुद्ध होऊन पडले आहेत.

**सुम०**—यमुनाबाई, जा, जा लौकर आणि मधुसूदनांना घेऊन ये. कृष्णकांतांना मूर्च्छा आलेली दिसते. जा लौकर! (कृष्णकांताला वारा घालूं लागते.)

**यमु०**—ताईसाहेब, तुम्ही इथंच बसा, मी अत्तां मधुसुदनांना घेऊन येतें. यमाजी, करा ताईसाहेबांना मदत!

**यमा०**—तूं नको इथली काळजी करूं, जा लौकर. (यमुना जाते. पडदा. दिवाणखान्याची बाहेरची बाजू दिसते.)

**सूर्य०**—(प्रवेशून) हे डॉक्टर मधुसूदन येणार तरी केव्हा? काय करावं? कृष्णकान्त अजून कांहीं शुद्धीवर येत नाहींत!

**यमा०**—(येऊन) सूर्यकांत, आले का डॉक्टर?

**सूर्य०**—नाहीं, अजून कांहीं आले नाहींत.

**यमा०**—(एकदम त्याचे पाय धरून) बाळ, मला क्षमा करशील का? तूं खराच देवदूत आहेस. तूंच यमुनेला चार समजुतीच्या गोष्टी सांगून मला क्षमा करायला तिला सांगशील का?

**सूर्य०**—काय भलतंच विचारतां हो अशा या वेळीं? ते पहा डॉक्टर आले! (यमुना डॉ. मधुसूदनासह येते.) नमस्कार डॉक्टरसाहेब! डॉक्टर! चला लौकर. ताई तुमचीच वाट पहात आहे.

**मधु०**—हो पण आजारी कोण आहे ? आणि सुमति इथ कशी आली ! यमुना तर काहींच सांगत नाही !

**यमु०**—चला आत म्हणजे काय तें प्रत्यक्षच दिसेल

**मधु०**—चला तर !

( सर्व आत जातात व आतील महाल दिसू लागतो. )

**मधु०**—ताई, ताई ! हे कोण ? कृष्णकात ! याना काय झाल ?

**सुम०**—याना जखम झाली असून मूर्च्छा आली आहे.

**मधु०**—ताई, अशा चमत्कारिक परिस्थितींत तू दुसऱ्या एकाद्या डॉक्टराला बोलवावस तेंच बर ! याना औषधोपचार करण्याच काम माझ्या हातून होणार नाहीं. या नीचाला

**सुम०**—दादा, या वेळीं तुला असले हीन विचार सुचावेत ना ?

**मधु०**—काय करू ? ताई, मी या वेळीं कर्तव्यमूढ झालों आहें.

**सुम०**—दादा, कृष्णकान्तावर उपकार करण्याची हीच वेळ आहे. दादा, तू डॉक्टर आहेस, दुःखिताला उपचार करण हेंच तुझ पवित्र कर्तव्य आहे. अमुक रोगी तुझा मित्र आहे कीं शत्रु आहे या गोष्टीचा तुला नुस्ता विचार सुद्धा शिवता उपयोगी नाहीं. वैऱ्यावर सुद्धा उपकार करील तोच खरा उत्तम पुरुष ! दादा, आपल कर्तव्य कर आणि तुझ्या या दीन भगिनीला चुडेदान दे. दादा, हे पहा मी तुझे पाय धरतें. ( पाय धरते. )

**मधु०**—ताई, ऊठ ! तू सागतेस तेंच खर. माझ कर्तव्य मला केलच पाहिजे. ( कृष्णकाताजवळ जातो व उपचार सुरू करतो. पडदा. बाहेरचा दिवाणखान्याचा भाग दिसु लागतो. )

**यमुना०**—( प्रवेशून ) देवा, कृष्णकान्ताना आयुष्य दे आणि सुमतिताईच्या सौभाग्याच रक्षण कर.

**यमा०**—( येऊन ) हे देवते, मला क्षमा कर. तू मला क्षमा करशील तरच कृष्णकान्तांना माझी दया येऊन ते मला क्षमा करतील !

**यमु०**—पण हा तुमचा पश्चात्ताप खरा मनापासूनचा आहे का ?

**यमा०**—हो, तुझ्या पायांची शपथ !

**सूर्य०**—यमाजी, नका बायकोचे पाय सोडूं ! घट्ट धरून ठेवा. शेवटीं तुम्हांला बायकोचेच पाय धरावे लागले अं ? फार मजा आहे बुवा तुमची !

**यमु०**—यमाजी, तुम्ही आधीं माझ्या देवदूताचेच पाय धरा.

**यमा०**—बरं तर, मी या देवदूताचेच पाय धरतों. ( तसें करतो. )

**सूर्य०**—यमाजी, तुमची बायको तुम्हांला सर्व अपराधांची क्षमा करो ! उठा ! यमुनाबाई, करा यांना क्षमा !

**यमु०**—बरं तर, मी करतें यांना क्षमा. पण यांनीं मला पूर्ण स्वातंत्र्य देऊन माझ्या प्रेमाची सत्ता सर्व तपशिलासह कबूल केली पाहिजे.

**यमा०**—बायको, मी गोरा आणि तूं काळी हा माझ्या मनांतला भेदभाव आज नष्ट झाला ! मला पूर्ण स्वातंत्र्याचें तत्त्व तपशिलासह मान्य आहे.

**सूर्य०**—वाहवा, गोराकाळा हा भेद नष्ट झाला ! यमाजी, फार मजा आहे बुवा तुमची !! चला आतां कृष्णकांतांच्या दर्शनाला. ( जातात. ) ( आंतील दिवाणखाना दिसूं लागतो. मधुसूदनानें कृष्णकांताला शुद्धीवर आणून त्याची जखम बांधलेली असते. कृष्णकांत आरामखुर्चीवर बसलेला असतो. )

**मधु०**—कृष्णकांत, आतां तुम्हांला बरं वाटतं ना ?

**कृष्ण०**—आतां मला बरं वाटतं. इतकंच काय, पण मी चांगला शुद्धीवर आलों असून माझे डोळे साफ उघडले आहेत. डॉ. मधुसूदन, तुम्हीच मला शुद्धीवर आणलंत आणि तुम्हीच मला प्राणदान दिलंत, मी तुमचे उपकार कसे फेडूं ?

**मधु०**—या तुमच्या देवतेची क्षमा मागून ! ही देवता नसती तर मी कर्तव्यापासूनहि च्युत झालों असतों पण हिनंच—या माझ्या प्रेमळ ताईनंच—मला माझ्या कर्तव्याचा मार्ग दाखविला. ती होती म्हणून तुम्ही वांचलांत, तिची क्षमा मागा.

**कृष्ण०**—पण या चांडाळाला ती क्षमा करील का ? मी दुष्ट आहें, चांडाळ आहें, पापी आहें...

**मधु०**—पण तुमच्या सुदैवानें तुम्हांला सर्व तर्क्य अतर्क्य पापांपासून मुक्त करणारी ही पवित्र गंगा लाभली आहे ना ? त्या देवतेची क्षमा मागा !

**सुम०**—दादा, कायरे बोलतोस अस भलतंच ? मी स्वारीवर उपकार केले अस तू समजतोस कीं काय ?

**कृष्ण०**—मधुसूदन काहींहि समजोत पण मीं असच समजतो की, तू माझ्यासारख्या नतद्रष्टावर उपकारच केले आहेस. देवते, तुझ्या ठिकाणीं जर दुसरी एखादी सामान्य स्त्री असती तर तिनें माझ्यासारख्या चाडाळ पतीचे मरण हसत्या मुद्रेनेच पाहिल असत ! मी तसाच अधमाधम आहें.

**सुम०**—महाराज, तुम्ही आर्य स्त्रियाविषयीं आपला गैरसमज करून घेतलेला दिसतो ! खऱ्या आर्यस्त्रीला सौभाग्य हेच पृथ्वीच्या मोलाचे वाटत असते. मी तर काय, आपण होऊनच पतिदेव म्हणून आपला अगिकार केला. मी उघड्या डोळ्यानीं, मला मिळालेल्या पूर्ण स्वातत्र्याचा उपयोग करून घेऊन आपला, माझ्या सौभाग्याचे धनी म्हणून, स्वीकार केला ना ? मग मी स्वखुषीने पत्करलेल्या परिस्थितीत दुःखित का होईन ? बाबानी मला प्रेमाच्या बाबतीत पूर्ण स्वातत्र्य दिल आणि मी स्वखुषीनच मधुसूदनाना बधु मानल आणि आपणाला वरल !

**कृष्ण०**—पण मी हा असा कुरूप, काळा .

**सुम०**—महाराज, पूर्ण स्वातत्र्याला काळागोरा हे भेद दिसतच नाहीत, ते भेद पारतंत्र्यातच डोक वर काढतात ! पारतत्र्य भेदभावाच भूत उठवित तर पूर्ण स्वातत्र्य पवित्र पण कठोर कर्तव्याचा व आत्यतिक स्वार्थत्यागाचा धर्ममार्ग दाखवितें. मला मिळालेल्या स्वातत्र्यान तोच धर्ममार्ग मला दाखविला आणि पितृऋणातून मुक्त होण्यासाठी मी आपणाला माझे पतिदेव, सौभाग्याचे धनी म्हणून माळ घातली ! शिवाय, पतिव्रता आर्यस्त्रियाना पतीच्या ठिकाणी रूपहीनता दिसतच नाही. तुम्ही वरून काळे होता आणि गोऱ्या रुक्मिणीमातेन ज्याना प्रेमान वरले ते कृष्णदेव कुठ गोरे होते ? सीतामाईन नीलवर्णाच्या रामचद्रालाच माळ घातली ना ? लक्ष्मीन तर काय, शेषाच्या विषारी फूत्कारानी काळे निळे पडलेल्या, विष्णूचाच पति म्हणून स्वीकार केला. सागायच इतकच कीं, आम्हा आर्यस्त्रियाच्या पवित्र दृष्टीला बाहेरचा रगच दिसत नाहीं ! आर्यस्त्रीला पतीच प्रेमळ हृदय पाहिजे असत. महाराज, गोऱ्या माणसाच हृदय गोर आणि काळ्या माणसाच हृदय काळ असला काळाबेरा प्रकार परमेश्वरान मनुष्याच्या ठिकाणीं मुळीं निर्माणच केलेला नाहीं. आतल्या हृदयाचा आणि वरच्या कातडीच्या

रंगाचा कांहींच संबंध नाहीं. उलट, बहुधा असाच अनुभव येतो कीं, काळ्या माणसांचींच अंतःकरणें गोरीं अर्थात् पवित्र असतात आणि सुंदर माणसांचीं हृदयेंच काळ्या फत्तरासारखीं कठोर असतात! रंगांत बदल हा खरा बदलच नव्हे. अंतरांतला बदल, हृदयांतला बदल हाच खरा बदल होय! महाराज, मला आपलं अंतःकरण पाहिजे होतें, कातडीच्या वरच्या रंगाची मला पर्वा नव्हती! मला आतां तरी आपल्या पवित्र आणि प्रेमळ अंतःकरणाची प्राप्ति होईल का?

**कृष्ण०**—देवते, पापकृत्यांत गुंतलों असतां हृदयाला झालेल्या जखमेंतून काळं रक्त वाहून गेल्यामुळं आतां माझं अंतःकरण शुद्ध आणि निर्मळ झालेलं आहे. माझ्या अंतःकरणाच्या स्वच्छ आरशांत मी तुझं पावित्र्य स्पष्टपणं पाहतों आहें. सुमति, माझ्या अंगाची काळी कातडी सोलून आंतील अंतःकरणाचा, पश्चात्तापानं निर्मळ झालेला, आरसा तुला दाखवूं का?

**सुम०**—महाराज, मला पाहिजे होतें तें हेंच. तें आज मला मिळालं, मी धन्य झाल्यें! महाराज, माझ्या पूर्ण स्वातंत्र्याच्या वृत्तीचा आज विजय झाला! पूर्ण स्वातंत्र्य मिळाल्यामुळंच मी आज हा सोन्याचा दिवस पाहतें आहें. महाराज, पूर्ण स्वातंत्र्याची महतीच अशी आहे. पूर्ण स्वातंत्र्याचा परीस काळागोरा, सुरूपकुरूप असले क्षुद्र भेद नष्ट करतो!

(सूर्यकान्त, यमुना व यमाजी येतात.)

**सूर्य०**—ताई, तुझं म्हणणं खरं आहे. यमुना आणि यमाजी यांनीं एकमेकांना पूर्ण स्वातंत्र्य दिलं असल्यामुळं त्यांच्या मनांतले काळागोरा हे भेदभाव नष्ट झाले आहेत! आज बायकोच्या कृपेनं यमाजी पूर्ण सुखी झाले आहेत! खरं ना यमाजी? फार मजा आहे बुवा तुमची!!

**यमा०**—धनीसाहेब, तुम्ही मला क्षमा केलीत का पण?

**कृष्ण०**—यमाजी, तुझी निर्दय कृपा म्हणून तर आज आम्हीं सर्व इतक्या प्रेमानं या ठिकाणीं जमलों आहोंत! अरे, शेवटीं गोड तेंच खरें गोड!!

**यमु०**—महाराज, मोठ्या मनानं माझ्या यमाजींना क्षमा करा! मी त्यांच्या चांगल्या वर्तणुकीबद्दल जामीन राहतें.

**सूर्य०**—वाः यमाजी, खूप सुंदर जामीन गांठलात—फार मजा आहे बुवा तुमची!

**कृष्ण०**—सूर्यकात, तू तर आमचा देवदूत आहेस! बाळ, तुझ्या बुद्धीची कान्ति सूर्याच्या कातीप्रमाणच तळपत राहो!

**यमा०**—वा: सूर्यकात! तू देवदूत आहेस अ? फार मजा आहे बुवा तुझी!!

**कृष्ण०**—मधुसूदन, तुमच्या स्वार्थत्यागाला तर सीमाच नाहीं. तुम्ही सुमतीला पाठची बहीण मानून प्रेमाचें परमोच्च शिखर गाठलत!

**सुम०**—पूर्ण स्वातन्त्र्याच्या उज्ज्वल वृत्तीचा हा विजयच नाही का? पूर्ण स्वातन्त्र्याच तत्त्व उच्च दर्जाचा स्वार्थत्यागच करायला शिकवितें! याच तत्त्वाची आराधना करा म्हणजे परमेश्वर तुमचा पाठीराखा होईल!

**मधु०**—ताई, श्रमामुळं कृष्णकात दमल्यासारखे दिसतात, एकादे मधुर गीत गा म्हणजे त्याच्या मनाला पूर्ण शातीचा लाभ मिळेल! (कृष्णकात निद्रावश होऊ लागतो.)

**सुम०**—दादा, पतिदेवाना पूर्ण आराम वाटेल असच एकादे गीत आठवत्ये बर का!

**यमा०**—सूर्यकान्त, शेवट तर मोठा मजेशीर झाला. तू मोठा झालास म्हणजे अशाच विषयावर एकादें नाटक लिही आणि पूर्ण स्वातन्त्र्याचे पोवाडे गा बर का!

**सूर्य०**—काय बुद्धि चालते आहे पण!—फार मजा आहे बुवा तुमची! शेवटीं काळ्यागोऱ्याचा समेट झाला अ? फार मजा आहे बुवा जगाची!!!

**सुम०**—

## पद

**सुखनिद्रा घ्या नारायणा। करि कमला प्रेमें विंझणा ॥ ध्रु० ॥ पहुडले हरि नागमंचकीं। बघति देव सारे कौतुकीं॥ उसळली अहा। जयघोषणा॥ १॥**



# अंक १ ला



## प्रवेश १ ला

(सन १९४०. स्थळ–धनराजशेटचा दिवाणखाना. धनराज कागदपत्र चाळीत असून शेजारी लीलावती टाइपरायटरवर टाईप करीत बसली आहे. लीलावती आपल्या कामांत गर्क झाली असतां धनराज मधून मधून तिच्याकडे चोरून पहात असतो.)

**धनराज**—लीलावती, तें पत्र टाईप करून झालं का ?

**लीला०**—हो झालं ! आतां दुसऱ्या पत्राचा मजकूर सांगायचा असला तर सांगा.

**धनराज**—ठीक तर ! घे टिपून ! "श्रीयुत धनराज लक्ष्मीधर यांस– प्रेमपूर्वक विनंती कीं, तुम्ही माझी जी वस्तु चोरून नेलीत ती माझी मला परत द्या, नाहींतर तुमच्या जवळची तसल्याच प्रकारची मौल्यवान् वस्तु मला देऊन, तुम्हांला त्या माझ्या वस्तूची परतफेड करावी लागेल. कळावें, लोभाची वृद्धि व्हावी ही विनंती. आपली–"

**लीला०**—महाराज, हें कसलं चमत्कारिक पत्र ? हें पत्र कांहीं कामकाजाचं दिसत नाहीं ?

**धनराज**—हें पत्र कामकाजाचंच आहे. या पत्रानं एका तळमळत्या जिवाचं काम साधणार आहे. हं, कोठपर्यंत झाला मजकूर लिहून ?

**लीला०**—“ कळाव, लोभाची वृद्धि व्हावी ही विनती. आपली...”

**धन०**—छे., थोडी चूक झाली त्यात ! ‘ कळाव, प्रेमाची वृद्धि व्हावी ’ अशी तिथ दुरुस्ती कर.

**लीला०**—( स्वगत ) आज धनराज असे काय चमत्कारिक वर्तन करताहेत तेंच लक्षात येत नाही ! ( उघड ) बर, केली दुरुस्ती–‘ प्रेमाची वृद्धि व्हावी ही विनती–आपली कोण ?

**धन०**—ते तूच साग म्हणजे झाल ! तशी तू चाणाक्षच आहेस !

**लीला०**—छेः, मला नाही सागता येत !

**धन०**—वा. ! ज्यान पत्र लिहिल त्यानच त्याखाली सही केली पाहिजे.

**लीला०**—पण हे पत्र मी काहीं आपण होऊन लिहिलेलें नाही. तुम्ही सागितलत म्हणून मी तस लिहिल इतकच !

**धन०**—मग तसच आणखी मी सागतों की, तू त्याखाली आपली सही कर आणि ते पत्र माझ्या हाती दे !

**लीला०**—पण यात तर वस्तु चोरीस गेल्याचा उल्लेख आहे ! अशी माझी कोणती वस्तु तुम्ही चोरली आहे ?

**धन०**—( उठून आणि तिच्याजवळ जाऊन ) अस वेड पाघरण्यात कोणता शहाणपणा आहे ? मी तुझ मन चोरलेल नाही का ? मी तुझ मन चोरल आणि त्याच्या मोबदल्यांत मी आपल मन तुला परत द्यायला तयार आहें !

**लीला०**—( चटकन् उठून पत्र देत ) महाराज, माझ्याविषयीं आपला काहीं तरी गैरसमज झालेला दिसतो. या पत्रावर मी आपल नाव लिहिण शक्य नाहीं. हें घ्या–( तिच्या हातून पत्र खाली पडते. ती ते पत्र उचलावयास जाते. )

**धन०**—( खाली वाकून व तिचा हात धरून ) लीलावती, मी तुझ्यावर प्रेम करतो हें तुला मी आणखी निराळ्या शब्दानीं सागायलाच पाहिजे का ! लीलावती, तें पत्र राहू दे ! जें तूं मला पत्रान सांगणार तेंच तू मला स्वमुखान साग म्हणजे झाल !

**लीला०**—पण महाराज, तुमचं तर आधींच लग्न झालेलं आहे ! तुमच्या विवाहित पत्नीचें—माणकबाईचं तुमच्यावर प्रेम नाहीं का ?

**धन०**—माणक माझ्यावर प्रेम करते पण मी कांहीं तिच्यावर प्रेम करीत नाहीं. घटस्फोटाच्या नव्या कायद्याप्रमाणें मी तिला सोडचिठ्ठी देणार आणि तुला माझी पत्नी करणार !

**लीला०**—काय ? तुम्ही घटस्फोट करून माणकबाईच्या प्रेमाचा विध्वंस करणार ? महाराज ! असं करूं नका.

## पद

**नका करूं घात सुखी जीवाचा । नका करूं भंग कधीं प्रेमाचा ॥ ध्रु० ॥ पुष्पलतेवरि बैसुनि हांसे । तुटत लता तरि नाश तयाचा ॥ १ ॥**

शिवाय, मला तुमच्याशीं लग्नहि करतां येत नाहीं कारण आजच माझं लग्न होण्याचं ठरलं आहे ! आजच माझं लग्न होणार असल्यामुळं मला उद्यांपासून तुमच्या इथं कामावरहि येतां येणार नाहीं ! मला आपण रजा द्यावी.

**धन०**—पण तूं कुणाशीं लग्न करण्याचं ठरविलं आहेस ?

**लीला०**—लीलाधरांशीं ! लीलाधरांना मी लग्नाचं वचन दिलं आहे. ते लग्नाचा परवाना घेऊन इतक्यांत इथं येतील.

**धन०**—लीलाधर म्हणजे लक्षाधीश क्षेमराज यांचाच मुलगा ना ? क्षेमराज हा श्रीमंत आहे पण तो गरीबगुरीबांना कस्पटाप्रमाणं लेखतो. तो तुझ्यासारख्या गरीब मुलीला आपली सून करून घेणं शक्य नाहीं.

**लीला०**—पण मला काय करायचं आहे क्षेमराजांच्या श्रीमंतीशीं ! लीलाधरांचं माझ्यावर प्रेम आहे आणि त्यांच्या प्रेमाखातर मी त्यांच्याशीं लग्न करणार आहें. पण ते पहा, लीलाधरच आले ! ( लीलाधर प्र. क. )

**धन०**—या लीलाधर, मी तुमचं मनःपूर्वक अभिनंदन करतों.

**लीलाधर**—तुम्ही कशाबद्दल माझं अभिनदन करता ?

**धन०**—तुम्ही सुशील लीलावतीच दिव्य प्रेम सपादन केल्याबद्दल ! तुम्हाला लग्नाचा परवाना मिळाला ना ?

**लीलाधर**—परवाना मिळाला आणि आत्ताच आम्ही लग्नाची नोंदणीहि करणार आहो. उद्यापासून माझी पत्नी लीलावती तुमच्या इथ नोकरीवर येणार नाही !

**धन०**—लीलाधर, ज्या गोष्टीत लीलावतीला आनद, त्या गोष्टींत मलाहि आनदच वाटणार आहे. तुम्ही जर तिला मागणी घातली नसतीत तर मीहि तिला रजा दिली नसती ! ती तुमच्यावर प्रेम करते, तुम्ही धन्य आहात !! तुमचा ससार सुखाचा होवो !

**लीलावती**—महाराज, आपल्या या सदिच्छेबद्दल मी आपले आभार मानते.

**लीलाधर**—धनराज, नमस्कार. येतो मी. लीलावती, चल लौकर !

**लीलावती**—चला, ही मी आल्येच ! ( आपले सामान घेऊ लागते, लीलाधर पुढे होतो. )

**धन०**—लीलावती, जरा थाब. लीलावती, तुझा ससार सुखाचा झाला तर त्यात मला–तुझ्याविषयी निर्मळ प्रेम वाटणाऱ्या या तुझ्या एका हित-चिंतकाला आनदच होणार आहे. पण हे पहा, जर कधीकाळी तुला माझ्या साह्याची जरूर भासली तर मनात मुळीच सकोच न धरता माझ्याकडे ये. लीलावती, केव्हाहि हे घर तुझच आहे हे लक्षात ठेव.

**लीला०**—मी आपली अत्यत आभारी आहे. जातें मी ! ( निरोप घेऊन जाते. )

**धन०**—किती गोड मुलगी आहे ही ! तिच प्रेम मला लाभल असतं तर माझ्याहि सौख्याला सीमा उरली नसती ! पण आता त्या गोष्टीचा विचार करून तरी काय उपयोग ? ( बसतो आणि घटा वाजवितो. )

**नागानंद**—( प्रवेशून ) काय हुकूम ?

**धन०**—लीलावती नोकरी सोडून गेली. ती आज लीलाधर क्षेमराज याच्याशीं लग्न करणार आहे. या क्षणापासून तिच्या कामाचा चार्ज तुम्ही घ्या. मला थोडं बाहेर काम आहे–मी जातों. ( जातो. )

**नागा०**—अस्सं ? शेवटीं त्या फटाकड्या पोरीनं लीलाधराला आपल्या प्रेमजालांत अडकविलं तर ? मला कांहीं निराळाच संशय येत होता पण तो खोटा ठरला ! खरं पाहिलं तर ती पोरटी आमच्या यजमानसाहेबांच्याच प्रेमजालांत अडकायची पण हें कांही त्रांगडं न्यारंच झालं ! बाकी, लीलावती गेल्यानें माझा फायदाच होणार आहे म्हणा ! मला तिची जागा मिळाली हा कांहीं माझा थोडा थोडका नाहीं फायदा झाला ! या फटाकड्या पोरी नोकऱ्या करायला लागल्यापासून आम्हां कारकुनी पेशाच्या पुरुषांना प्रेमोशनें मिळण्याची मोठी पंचाईत झाली आहे. ( कागदपत्र लावतो, इतक्यांत त्याला खालीं पडलेलें पत्र आढळतें. तें पत्र उचलून ) ऑं, हें काय गौडबंगाल आहे ? ही तर लीलावतीनं धनराजांना लिहिलेली प्रेमपत्रिका दिसते ! ठेवावी ही पत्रिका जपून ! एकाद्या वेळीं कामाला यायची ! हल्लींच्या या शिकलेल्या पोरी एकाला प्रेमपत्रिका लिहितात आणि दुसऱ्याशीं लग्न लावतात, ही मोठी गंमतच आहे म्हणायची ! कालाचा महिमा अगाध आहे खरा ! (पत्र खिशांत घालून कामाला बसतो. पडदा.)

---

## प्रवेश २ रा

( स्थळ—रस्ता. एक हमाल डोक्यावर सामान घेऊन येतो. त्याच्यामागून एक कोंकणी बाई मुलीसह येते. )

**हमाल**—बाई, हाच तो धनराजमोहोल्ला ! इथंच कुठंतरी तुमचं उतरायचं ठिकाण असलं पाहिजे. तुम्हांला कोणाकडे जायचं आहे ?

**नर्मदा**—मला त्यांच्याकडे जायचं आहे. ते याच मोहोल्यांत राहतात असं मला पक्कं समजलं आहे.

**हमाल**—मोहोल्याच नाव मलाहि पक्क समजल पण तुम्ही ज्याच्याकडे जाणार ते कोण, त्याच नाव काय तें नाहीं मला समजल ! तुम्ही त्याच्याकडे जाणार होय ना ? मग तुमच्या त्याच नाव काय ?

**नर्मदा**—मेल्या, त्याच नाव मी कस घेऊ ? मी त्याची लग्नाची बायको ना ! मग बायको कुठ नवऱ्याच नाव घेते का ! तुमच हे चदनपूर सुधारलेल असल तरी आमच कोकण नाही बर इतक सुधारल ? नाही जा तुला तिकडच नाव सागत !

**हमाल**—बर, नका सागू तिकडच नाव ! पण तुमच्या तिकडच्याना इकडचे लोक काय म्हणतात ते तर सागाल ?

**नर्मदा**—इकडचे लोक तिकडच्याना दुसर काय म्हणणार ? दहा वर्षें झालीं, त्यानी माझ नाव टाकल आणि ते इकडे कुठसे आले ! ते घरून पळाले तेव्हा या कारटीच नुक्तेच बारस झाल होत ! त्यानी तेव्हापासून काही घरीं तोड दाखवले नाही. त्याचा जेव्हा कुठच पत्ता लागेना तेव्हा या कारटीला खाद्यावर घेऊन मी माहेरी आईकडे गेल्ये पण दोन महिन्यापूर्वी माझी एकुलती एक आई वारली आणि मी उघडी पडल्ये. माझी आई किती मायाळू होती, पण तीहि वारली ! ( रडते )

**हमाल**—हा, रडू नका !

**नर्मदा**—काय रडू नका ? इतकी मायाळू आई मेली तरी रडू सुद्धा नको ना ? विचार या चिमीला पाहिजे तर ! काय ग चिम्ये, होती ना ग तुझी आजी मायाळू ?

**चिमी**—हो तर आई ! आजी कित्ती मायाळू होती ! मी रडू लागल्ये म्हणजे ती माझे डोळे पुसून मला आपल्या कुशीत घेऊन झोपायची !

**हमाल**—बर, तुमची आई अथवा चिमीची आजी मायाळू होती, पुढ काय ते बोला !

**नर्मदा**—पुढ काय बोलणार ? आमचे हे चदनपुरात, धनराज—मोहोल्यात राहतात म्हणून मला नुक्तीच बातमी लागली म्हणून मी पोरीला पाठुगळीस घेऊन त्याच्या शोधाला इकडे आल्यें !

**हमाल**—बरं, पण तुमच्या पतिराजांना इकडचे लोक काय म्हणतात तें नाहीं सांगितलंत ? त्यांनीं आपलं नांवबीव बदललं नाहीं ना ?

**नर्मदा**—त्यांनीं माझं नांव टाकलं असलं, ते घरादाराचं नांव घेत नसले तरी त्यांनीं आपलं नांव बदललेलं नाहीं बरं का ?

**हमाल**—( स्वगत ) आतां या बाईला थोडं चिडवल्याशिवाय ही कांहीं नवऱ्याचं नांव सांगून टाकायची नाहीं ! तर आतां असंच करावं ! ( उघड ) अहो बाई, खोटं बोलतां तुम्ही ! तुमच्या नवऱ्याला इकडे लोक पळपुटेराव फरारी म्हणतात ! पळपुटेराव फरारी हें कांहीं तुमच्या ह्यांचं मूळचं नांव खास नाहीं !

**नर्मदा**—नाहींच त्यांचं तें नांव ! तुमच्या चंदनपुरचे लोक मोठे खट्याळ दिसतात मला ! चांगलं नागानंद नांव घ्यायचं सोडून ते तिकडच्यांना पळपुटेराव फरारी म्हणतात ! लुचे मेले सगळे !!

**हमाल**—हां, हां ! मी सांगतों तुमच्या ह्यांचं खरं नांव ! ( डोकें खाजवून ) तुमच्या ह्यांना नागानंद म्हणतात खरं ना ? नाहींच माझा तर्क चुकायचा ! मी म्हटलं चंदनपुरचा हमाल आहें ! द्या मला शाबासकी !

**नर्मदा**—शाबास आहे रे बाबा तुझी ! तुम्हां हमालांइतके सुद्धां आमच्या तिकडचे मोठमोठे गृहस्थ शहाणे नाहींत ! मग माझ्या शहाण्या बाबा, ते कुठं रहातात तें ठिकाण काढ ना हुडकून !

**हमाल**—( स्व. ) आली फजितीची वेळ ! एवढ्या या मोहोल्यांत नागानंद कुठं रहातो तें कसं सांगूं हिला ? ( उघड ) बाई, तुम्ही असं करा, माझी हमाली द्या म्हणजे मी हुडकतों त्यांना !

**नर्मदा**—ही घे पावली ! जा पाहूं आणि आण त्यांचा पत्ता !

**हमाल**—( स्व. ) आतां या कोंकणीला ठेवावं इथंच कोंकलत आणि आपण जावं आपल्या कामाला ! (उघड) बाई, मी परत येईपर्यंत नीट सामान संभाळा बरं का ? इथले सगळेच लोक कांहीं माझ्याइतके शहाणे आणि इमानी नाहींत ! ( जातो. )

**नर्मदा**—चिम्ये, तो हमाल परत येईपर्यंत एकादा देवाचा धावा तरी म्हण म्हणजे देव देईल तुझ्या वडिलाना इकडेच पाठवून !

**चिमी**—म्हणत्ये ह देवाचा धावा ! ( गाणे म्हणते. इतक्यात नागानंद दारू पिऊन झिंगलेला प्रवेश करतो. )

## देवाचा धांवा

**धांव पाव सांवळे विठाबाई । कां मनि धरिली अढी । अनाथ मी अपराधी स्मरतों । उतरा पैलथडी ॥ १ ॥ एकनाथाघरि पाणी वाहिले । गंगेच्या कावडी । कबिराचे ते शेले विणुनी । त्यांची घालिसी घडी ॥ २ ॥ गजेंद्राचा धांवा ऐकुनी । वेगें घालिसी उडी ॥ अर्जुनरथि सारथ्य करुनियां । फेडि त्याची सांकडी ॥ ३ ॥**

**नागा०**—वाहवा ! वाहवा !! एवढीशी चिमुरडी पोर आहे पण काय गोड गळ्यान गाते आहे ? ए पोरी, हे घे तुला पैसे ! एकाद नवराबायकोच्या भाडणाच गाण म्हण, तुला आणखी पैसे देईन !

**चिमी**—( घाबरून ) आई, हा मेला दारुडा बघ मला पैसे देतो आणि नवराबायकोच्या भाडणाच गाण म्हणायला सागतो !

**नर्मदा**—( त्याच्या अगावर धावून ) मेल्या दारुड्या, माझ्या पोरीची चेष्टा करतोस नाहीं का ? बापान टाकली असली तरी मी पोरीला भीक मागून पोट भरायला नाही लावायची बर ! धुणपाणी करीन, दळणकाडण करीन, रित्या पोटावर जुनेर बाधून पोरीला शिळा तुकडा खायला घालीन, पण माझ्या चिमीला नाहीं बर तुझ्यासारख्या दारुड्यापुढ भीक मागू द्यायची !

**नागा०**—भिकारीण ती भिकारीण पण दिमाख एखाद्या राणीचा !

**नर्मदा**—हो, हो, होत्येंच मी राणी ! तिकडे पळून जायच झाल नसत तर मी कोंकणात राणीच्या थाटानेंच राह्यल्ये असते !

**नागा०**—आहे ठाऊक मला तूं ओसाडपूरच्या राजाची राणी आहेस ती! सांग तुझ्या पोरटीला एकादं छबेलं गाणं म्हणायला, देईन तुला चार नि तीन आठ दिडक्या!

**नर्म०**—मेल्या, दारू पिऊन असले घाणेरडे थेर करण्याऐवजीं गटारांतलं घाणपाणी कां नाहीं पीत? ऊठ मेल्या, हो चालता इथून! ( त्याचा कान धरून त्याला दूर लोटते. )

**नागा०**—तूं भिकारीण असून या नागानंदाचा कान पकडतेस? मी नागानंद अ–सू–न ( उठून तिच्या अंगावर हात उगारतो तों नर्मदा चपापून त्याचा हात पकडते. )

**नर्म०**—( स्वगत ) अगबाई, हे तर तेच! ( उघड ) अहो, काय तुमची स्थिति ही! नीट शुद्धीवर या!

**नागा०**—मी शुद्धीवर आहें,मीच तुझं टाळकं सडकून तुला शुद्धीवर आणतों!

**नर्म०**—अहो, असं काय करतां? मी तुमची नर्मदा नव्हे का? चिम्ये, हे पहा तुझे वडील, घर त्यांना तिकडून!

**नागा०**—कुठली नर्मदा तूं? आणि ही नर्मदेंतली कोण?

**नर्म०**—मी तुमची बायको आणि ही तुमची मुलगी चिमी!

**नागा०**—मग इथं कशाला आलांत मरायला? कोंकणांत नव्हती का मसणवटी? थांब, तुला ठार मारतों आणि इथल्या मसणवटींत पोंचवतों!

**नर्म०**—अहो, मी तुमची लग्नाची बायको नव्हे का? मला घरीं घेऊन चला!

**नागा०**—नाहीं, लग्नाच्या बायकोला नाहीं घरीं नेणार! इथं घटस्फोटाचा कायदा पास झाला आहे. काडीमोड करीन आणि तुला उकिरडा फुंकायला लावीन! हो दूर, माझा हात सोड! लग्नाची बायको असलीस तरी माझा हात धरूं नको. ( हात हिसाकावून घेऊन व खिशांतली दारूची बाटली काढून तिच्यावर उगारीत ) हो दूर, नाहींतर फोडतों टाळकं! घटस्फोटाचा कायदा पास झाला असूनसुद्धां माझ्यावर बायकोपणाचा हक्क सांगतेस? ( मारायला धांवतो. ती बाटली पकडते. )

**चिमी**—धावा, धावा, बाबा दारू पिऊन आईला मारताहेत, धांवा !

**एक गृहस्थ**—( धावत येऊन ) कोण ? नागानद ! हें काय तुम्ही माडलं आहे ? चला घरात ! ( त्याला धरतो. )

**नर्म०**—कुठ आहे याच ठिकाण ?

**गृ०**—इथच शेजारी, त्या तिथ ! तुम्ही त्याच्या पत्नी का ?

**नर्म०**—होय हो, मी याची बायको आणि ती आम्हा दोघांची मुलगी !

**नागा०**—ए गुडोपत, ही माझी बायको होती पण तिला मी दहा वर्षा- पूर्वीच टाकून दिली ! आता भेटली हे बर झाल, घटस्फोटाचा कायदा पास झाला आहे, देतों तिला सोडचिठ्ठी !

**गृ०**—आधीं घरी चला मग सावकाश करा घटस्फोटाचा विचार ! चला ! बाई, तुम्ही सामान घेऊन माझ्यामागून या. मुली, चल माझ्याबरोबर !

**नर्म०**—महाराज, तुम्ही मला प्रत्यक्ष देवच भेटलात, चला, ही मी आल्यें. ( सामान घेते. )

**नागा०**—( जाता जाता ) घटस्फोट करीन आणि बायकोला उकिरड्यावर टाकीन ! आता घटस्फोटाचा कायदा पास झालाय् ! ( जातात. )

---

## प्रवेश ३ रा

( क्षेमराजाचे घर. दिवाणखान्याच्या बाहेरच्या बाजूस लहानगा पण खोडकर चतुर अभ्यास करीत आहे. )

**चतुरः**—( पाठ करतो. ) कपाटातला क आणि डब्यातला ड, कपाटातला क आणि डब्यातला ड ! कटाळलें बुवा या कपाटातल्या ‘ क ’ ला आणि डब्यातल्या ‘ ड ’ ला ! काय हे लेकाचे मास्तर तरी लबाड आहेत ! कपाटात म्हणे क आहे आणि डब्यात म्हणे ड आहे ! तस मास्तर खुशाल म्हणोत, मी नाहीं ते कबूल करायचा ! कपाटात आहे डबा आणि डब्यात आहेत लाडू !

मी मास्तरांना कपाट उघडून डबा दाखवला आणि डबा उघडून लाडू दाखाविले; तरीसुद्धां मास्तर कांहीं आपला हट्ट सोडीत नाहींत आणि उलट मलाच चोपून काढतात. आतां काय कपाळ फोडून घेऊं या 'ढ' मास्तरांच्या पुढं? ढ लेकाचे! पगड्या घालतात आणि मास्तर बनून माझ्यासारख्या चतुर मुलांना चोपून काढतात आणि मलाच खट्याळ ठरवितात. माझा लीलाधरदादा आला म्हणजे मी त्याला मास्तरांची ही लबाडी खास सांगेन! दादा, अरे लीलाधरदादा! (लीलाधर लीलावतीला घेऊन येतो.)

**लीलाधर**—चतुर, कां हांक मारलीस मला?

**चतुर**—दादा, तूंच सांग, आईच्या कपाटांत डबा आहे कीं नाहीं?

**लीलाधर**—हो, आहे!

**चतुर**—आणि त्या डब्यांत आई लाडू ठेवते कीं नाहीं?

**लीलाधर**—हो ठेवते! अरे गुलामा! त्या डब्यांतले लाडू चोरून खातोस आणि मलाच त्यांत लाडू आहेत कीं नाहींत म्हणून विचारतोस काय? अरे लबाडा!

**चतुर**—दादा, मी लबाड नाहीं बरं का? मास्तरच लबाड आहेत! डोक्यावर पगडी ठेवून दिली म्हणजे डोक्यांत अक्कल उतरते असं कांहीं नाहीं! दादा, मास्तर लबाड आहेत!

**लीलाधर**—अरे कांहीं झालें तरी ते तुझे मास्तर आहेत, पूज्य आहेत—

**चतुर**—मी तरी तेंच म्हणतों, त्यांच्या डोक्यांत पगडीएवढें मोठं थोरलं गरगरीत पूज्य आहे. ते मला शिकवतात कीं, कपाटांत क आहे आणि डब्यांत ड आहे. मग तूंच सांग दादा! मास्तरच लबाड आहेत कीं नाहींत?

**लीलाधर**—बाळ, मास्तर लबाड नाहींत आणि तूंहि लबाड नाहींस. तूं नांवाप्रमाणं बराच चतुर आणि थोडा खट्याळ आहेस! खट्याळ कुठला! (त्याच्या गालावर चापट मारतो.)

**चतुर**—ऊं, ऊं, मी नाहीं जा! मास्तरच लबाड आहेत! (लीलावतीस) कांहो तुम्ही? मास्तर लबाड आहेत कीं नाहींत तें तुम्हीच सांगा आणि दादाची

चागली फजिती उडवा ! 'दादा–मास्तर मिळाले आणि लाडू घेऊन पळाले !' ( नाचतो. )

**लीलावती**—बाळ, तुझे मास्तरहि चुकले नाहीत आणि दादाहि चुकत नाहींत !

**चतुर**—म्हणजे ? तुम्ही सुद्धा दादालाच मिळालात तर ? दादा, कुठं रे या बाई तुला मिळाल्या ?

**लीलाधर**—बाळ, या तुझ्या वहिनी आहेत बर का ?

**चतुर**—माझ्या वहिनी ? वहिनी म्हणजे रे काय दादा ?

**लीलाधर**—मोठ्या भावाची बायको !

**चतुर**—अस्स ? म्हणजे तू याना बायको करून पळवून आणलस वाटत ? समजलों, तुम्ही सगळींच एका माळेचे मणी आहात ! लबाड नाहीतर ! थाब ह, तुझी ही लबाडी मी बाबाना जाऊन सागतो ! मग बाबा पहा, तुझ्यावर रागावतात कीं नाहीत ते ! सागतोंच बाबाना, सागतोंच बर का ? मग दादा, तुला आणि वहिनीला पळता भुई थोडी होईल ! सागतोंच बाबाना ! ( जातो. )

**लीलाधर**—लीलावती, बाळ चतुरानं मोठ्या चतुराईनच बाबाच्या रोषाची ही प्रस्तावना केली यात शका नाही. तुझ आणि माझ लग्न झाल हें कळताच बाबा संतापान लाल होतील—

**लीलावती**—आणि आपणाला, चतुराच्या म्हणण्याप्रमाण पळता भुई थोडी होईल हेंच की नाहीं ? मला मामजींची श्रीमती नकोच आहे ! हे पहा, मामजी रागावले तर तुम्ही निराळा ससार थाटण्याच मला वचन दिलच आहे !

**लीलाधर**—आणि प्रसग पडला तर मी तें वचन खर करून दाखवीन ! मी तुझ्या स्वर्गीय प्रेमाखातर घरादाराला आणि आप्तस्वकीयाना सोडायला तयारच आहें. लाडके, तुझ निर्मळ प्रेम हाच माझा खरा स्वर्ग !

**लीलावती**—लीलाधर, तुम्ही सत्य तेंच बोललात ! मलाहि प्रेम हेंच स्वर्गाइतक श्रेष्ठ वाटतं !

## प्रेमगीत

**प्रेमा रमवी मनाला । भामा भजते तयाला ॥ ध्रु० ॥**
**दुःख सुखाला मानित ललना । जरि ना लाभे प्रेमा ॥ १ ॥**

**लीलाधर**—बरं, चल तर! बाबांना भेटून एकदांचा सोक्षमोक्ष करून घेऊं! बाळ चतुरानं आपल्या प्रेमळ ग्रंथाची खरमरीत प्रस्तावना लिहून ठेवलीच असेल! (जातात. आंतील दिवाणखाना दिसूं लागतो.)

**क्षेमराज**—(चतुरासह प्र. क.) चतुरा, तूं काय म्हणतोस तेंच मुळीं माझ्या लक्षांत येत नाहीं. तुझ्या दादानं कुठली वहिनी मिळवून आणली म्हणतोस?

**चतुर**—बाबा, दादानं एक फक्कडशी वहिनी बरोबर आणली आहे आणि ती किनई, दादाइतकीच लबाड आहे! बाबा, त्या दोघांनीं एक होऊन मलाच लबाड ठरवलं! तो पहा, दादाच वहिनीला घेऊन इकडे तुमच्याकडे येतो आहे! त्यांना खूप रागं भरा बरं का? मी आड उभा राहून सर्व गंमत पाहतों! (जातो व लीलाधर व लीलावती येतात.)

**लीलाधर**—लीलावती, बाबासाहेबांना नमस्कार कर. बाबा, आम्हांला आपला आशीर्वाद द्या! (वंदन करतात.)

**क्षेमराज**—लीलाधर, ही कोण तुझी?

**लीलाधर**—ही माझी पत्नी! मी आतांच लग्नाची नोंदणी करून हिला पत्नी करून घेतलं!

**क्षेम०**—मग तूं मला तुझ्या लग्नाची बातमी अगोदर कां नाहीं कळविलीस? आणि तूं असं चोरून कां लग्न नोंदलंस? आणि ही आहे तरी कोण कुठली?

**लीलाधर**—बाबासाहेब, हिचं नांव लीलावती! ही शिकलेली असून धनराज लक्ष्मीधरांजवळ टाइपिस्ट म्हणून नोकरी करीत होती. तिच्यावर माझं प्रेम बसलं आणि म्हणून तिच्याशीं मी लग्न करण्याचं ठरविलं. पण तुम्हांला माझी निवड पसंत पडणार नाहीं म्हणून मी तुम्हांला न कळवितांच लग्न नोंदलं.

बाबासाहेब, माझ्या हातून कांही चूक झाली असेल तर मला क्षमा करा आणि मोठ मन करून आपल्या या सुनेला आशीर्वाद द्या !

**क्षेम०**—लीलाधर, तुझ्या या उतावळ्या कृतीत मला काहींतरी भानगड दिसते आहे ! तू ज्या मुलीला पत्नी म्हणून पसत केलस तिच्या कुलशीलाचा तरी आधी काहीं शोध केला होतास का ? बाकी, ही धनराजाकडे नोकरीला होती या एकाच गोष्टीवरून तिच्या कुलशीलाचा अदाज बाधतां येतोच म्हणा ! अरे, श्रीमताकडे नोकऱ्या करणाऱ्या तरुण आणि सुदर पोरी म्हणजे आपल्या अशातशाच.. ...

**लीलावती**—क्षेमराज, पुढ एकहि शब्द बोलू नका ! मी गरीब असल्ये, मला नोकरी करावी लागली असली तरी मलाहि माझ्या कुलशीलाचा, तुम्हा चढेल श्रीमताइतकाच, अभिमान वाटतो. मी तुमच्या तोंडून निघणारे अपमानाचे शब्द मुळीच सहन करणार नाहीं.

**क्षेम०**—बाई ! रागावू नको अशी ! तू दरिद्री असूनहि जर तुला तुझ्या कुलशीलाचा अभिमान वाटत होता तर तू माझ्या मुलाला प्रेमाची मोहिनी घालून का फसविलस ? लीलाधर हा या क्षेमराजाच्या पोटी जन्माला आला आहे हें तू कस विसरलीस ? त्याला आपल्या तोलाच्या श्रीमत घराण्यातील मुलीशीच लग्न लावल पाहिजे. उद्या जेव्हा आमच्या घरदाज आप्तेष्टाना, लीलाधरान एका हलक्या कुळातील नोकरपेशाच्या मुलीशी लग्न केल्याच कळेल, तेव्हा ते सगळे माझ्या तोंडात शेण घालतील ! तुझ्यासारख्या हलक्या कुळातील सत्रा मुलींना नोकर म्हणून बायकोच्या तैनातीला ठेवण्याइतक ऐश्वर्य परमेश्वरान, माझ्या लीलाधराला दिल आहे. बाई, उगाच सतापान लाल होऊन दातओठ खाण्यात काय अर्थ आहे ? हलक्या आणि दरिद्री कुळात जन्म घेऊन सुद्धा लीलाधरासारख्या उच्च घराण्यातील मुलाला प्रेमाच्या मायावी लीलांनीं फसविण्याच पातक तूच आधी अविचारान केल आहेस. मग मी तुझ हलक कूळ काढल म्हणून का बर रागावतेस ?

**लीलावती**—लीलाधर, तुमच्या वडिलाच्या तोंडून निघणारे हे नीच शब्द तुम्हांला ऐकवतात तरी कसे ? हे जर तुमचे वडील नसते तर मीहि त्याना तसल्याच हलक्या शब्दानी उत्तर दिल असत ! पण मला तसला

नीच अविचार करावयाचा नाहीं. तुम्हांला कुलशीलाच्या खोट्या उच्चपणाचा आणि श्रीमंतीच्या खोडसाळ गुलामगिरीचा अभिमान असेल तर तुम्ही खुशाल असले हीन शब्द सहन करा. मी दारिद्याच्या स्वतंत्र वातावरणांत वाढलेली स्वाभिमानी मुलगी आहें—तुम्ही थोरामोठ्यांच्या पोटीं जन्म घेतला आहे, वाटलं तर तुम्ही त्यांच्या लाथा खुशाल खा, मी गरीब असलें तरी स्वातंत्र्याची भोक्ती आहें—मी माझ्या दरिद्री स्वातंत्र्याचा उपभोग घ्यावयाला जातें ! मला या श्रीमंतीच्या घाणींत यापुढं एक क्षणभरहि उभं रहावत नाहीं !

## धिःकारगीत

**धनसंपदा । धिःकारितें मी । जरि तेथ रमे हीन मती मलिना अवनता ॥ ध्रु० ॥ चमकत नभिं शुभ तारा । जरि संभ्रमें तोहि पथ नीच अनुसरे ॥ तरि ये तया झडकरि पाषाणता नीचता ॥ १ ॥**

( जाऊं लागते. )

**लीलाधर**—लीलावती, जरा थांब. मीहि बाबासाहेबांच्या हीन विचारांना रौरव समजून तुझ्या निर्मळ प्रेमाच्या नंदनवनाकडे येतों. बाबासाहेब, मी प्रेमहीन श्रीमंतीला कवडीमोल लेखतों आणि प्रेमाच्या श्रीमंतीला पृथ्वीच्या मोलाची किंमत देतों.

**क्षेम०**—पण असल्या तुझ्या उतावळ्या अविचारांत तुझ्या हातीं करवंटी येईल आणि तुला वारसहक्काला मुकावं लागेल या गोष्टीचा तूं कांहीं विचार केला आहेस का ? तारुण्य हें उतावळं असतं आणि उतावळ्या तारुण्याच्या ऐन भरांत माणसाच्या हातून अविचार होतो. तसा अविचार तुझ्या हातून झाला आहे. पण झालं तें झालं, आतां तरी जोंपर्यंत गोष्टी भलत्या थराला पोंचल्या नाहींत तोंपर्यंत सावध हो आणि या बाईशीं घटस्फोट करून लग्नाच्या भानगडींतून मोकळा हो ! असल्या पोरीशीं प्रेम जोडल्यानं पुढं तुला पश्चात्तापांत पडावं लागेल हें विसरूं नकोस. तुला सांगतों तें नीट लक्षांत ठेव, असल्या दरिद्री प्रेमगंगेला पुढं पुढं गढूळ पाण्याचे ओहोळ येऊन मिळत असतात !

**लीलावती**—हा, क्षेमराज ! तोंड आवरा. लीलाधर, मी जाते, मला इथल्या हीन विचाराच्या नरकात उभ रहावत नाही !

**लीलाधर**—लीलावती, तुझ म्हणण अक्षरशः खर आहे. पण थोडी थाब, आपण आईसाहेबाचा आशीर्वाद घेऊ आणि मग जाऊ ! ( आत जाऊ लागतो. )

**क्षेम०**—( त्याला अडवून ) लीलाधर, माग फीर ! तुझ काळ तोंड माझ्या पत्नीन पाहिलेल मला पसत पडणार नाही. आपल काळ तोंड घेऊन असाचा असा चालता हो !

**लीलाधर**—जशी आपली मर्जी ! आई तरी काय, तुमचीच गुलाम आहे ! बाबासाहेब ! जातो, या तुमच्या मुलाला कायमच विसरून जा ! ( जाऊ लागतो. )

**चतुर**—( धावत येऊन व लीलाधराला मिठी मारून ) दादा, वहिनीला घेऊन कुठरे चाललास ? मी तुम्हाला लबाड म्हटल म्हणून तुम्ही रागावलात होय ? दादा, वहिनी, या तुमच्या खोडकर बालकाला क्षमा करा आणि मला टाकून जाऊ नका. दादा, तू गेलास तर मी एकसारखा रडत बसेन आणि रडून रडून मला मरणसुद्धा येईल ! मी मेलो तर तुला बर वाटेल का ?

**लीलाधर**—नकोरे असे मर्मभेदक बोल बोलून माझ्या हृदयाला घरे पाडू ! बाळ, तुझा काहीच अपराध नाही बर ! तू शतायुषी हो !

**लीलावती**—बाळ, तुझ्यावरून प्राण ओवाळून टाकले तरी मला ते कमीच वाटेल ! बाळ, तू जसा चतुर तसाच तेजस्वी आहेस. शतायुषी हो—तू मला क्षणार्धात मोहून टाकल आहेस ! ( त्याचा मुका घेते. )

**क्षेमराज**—लीलावती, सोड त्याला ! माझ्या एका मुलावर मोहजाल पसरून त्याला दारिद्र्याच्या नरकाकडे ओढून नेते आहेस तेवढ बस्स आहे. आणखी दुसऱ्या एका कोवळ्या पोराचा घास घेऊ नकोस ! चतुर, चल ये इकडे ! जाऊ दे त्याना नरकात !

( क्षेमराज चतुराला ओढून घेतो. लीलाधर व लीलावती जातात. चतुर ‘ दादा, वहिनी ’ अशा हाका मारतो. )

**पडदा पडतो**

---

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

( सन १९४१. लीलाधराची झोंपडी. चिमी मुलाला पाळण्यांत घालून गाणें गात आहे. झोंपडीच्या बाहेरची बाजू दिसते. )

**धनराज**—( प्रवेशून ) हीच ती पलीकडची लीलाधराची झोंपडी. काय दैवगती विचित्र आहे पहा! लीलावतीनं प्रेमाखातर लीलाधराशीं लग्न लावलं खरं पण क्षेमराजाच्या घमेंडखोर हट्टामुळं लीलाधराला लीलावतीसह घराबाहेर पडावं लागलं. लक्षाधीशाच्या पोटीं जन्माला आलेल्या लीलाधरावर आज झोंपडींत राहण्याची पाळी आली आहे. आपण तरी लीलावतीची भेट घेऊन तिला मदत करावी. लीलावतीनं जर माझी लग्नाची मागणी स्वीकारली असती तर तिला, मी श्रीमंतीच्या सौख्यांत ठेवली असती! त्या गोड पोरीनं माझ्या मनाला तशीच भुरळ पाडली आहे. असो, झालं तें झालं, आतां तिला शुद्ध बुद्धीनंच मदत करावी. ती सुखांत असली तर त्यांत मलाहि सुखच होणार आहे. ( आंतील बाजूस जातो. झोंपडी दिसूं लागते. )

**चिमी**—( पाळणा हालवीत गाते. )

### पद

**हें कोण बोललें बोला । राजहंस माझा निजला ।। ध्रु० ।।**
**दुर्दैवनगाच्या शिखरीं । नव विधवा दुःखी आई ।।**
**तें हृदय कसें आईचें । मी उगाच सांगत नाहीं ।।**
**जें आनंदेंहि रडतें । दुःखांत कसें तें होई ।।**
**हें कुणी कुणा सांगावें ।**
**आईच्या बाळा ठावें ।**
**प्रेमाच्या गांवा जावें ।।**
**ऐकेल कोण या बोला । राजहंस माझा निजला ।। १ ।।**

[आंतून लीलावती धांवत येते.]

**लीला०**—चिमे, हे ग कसल गाण म्हणते आहेस? बाळ, असल गाण म्हणू नये!

**चिमी**—का बर, हे गाण का म्हणू नये? मुलाला निजवायच्या वेळीं म्हणायचच गाण आहे ना तें?

**लीला०**—चिंमे, तू अजून लहान आहेस, तुला नाही कळायच या गाण्यात काय आहे ते! जा तू दुसऱ्या कामाला, मी निजवत्ये बाळाला! (गीत गाते.)

## अंगाईगीत

**घे शांतिसुखें निद्रा बाल कन्हैया। तूं वृंदावनिचा राया॥**
**घरिं आल्या ना? वनाहुनी त्या गाई। करि आतां तूं अंगाई॥**
॥ चाल ॥ **गोपाल वाजविति पांवा। आळविती तुझिया नांवा।**
**हें दीन दयाघन देवा** ॥ चाल ॥ **तूं दीनांची अससी प्रेमळ आई॥ करि आतां तूं अंगाई॥ १॥**

**धन०**—(प्रवेशून) गरिबी आली म्हणून सौदर्याच तेज कमी होत असं नाहीं. ही लीलावती या गरिबीच्या थाटातच माझ्या प्रेमळ दृष्टीला अधिक मोहक दिसते आहे. लग्नबधनान ही सुदरी जर माझ्या हृदयाशी निगडित झाली असती-पण नकोच तो विचार! (पुढ होऊन) लीलावती!

**लीलावती**—कोण? धनराज, केव्हासे आलात इथ? गीत गाण्याच्या नादात माझ्र तुमच्याकडे लक्षच गेल नाहीं! या बसा त्या आसनावर! तुम्ही आठवण ठेवून आम्हा गरीबगुरिबांच्या घरीं पायधूळ झाडलीत हे तुमचे उपकारच आहेत.

**धन०**—(बसून) लीलावती, असे परकेपणाचे दीन शब्द बोलून तू मला लाजवूं नको. लीलावती, तू काहीं मला कुणी परकी नाहींस, मी माझ्र सर्वस्व तुझ्या चरणावर वहायला तयार होतों, हे तू विसरलीस वाटत? माझ्यासारखा प्रेमळ मित्र तुला वाटेल ती मदत करायला तयार असता तू अशा दारिद्र्यांत खितपत पडावंस हें माझ्या मनाला रुचत नाही.

**लीलावती**—महाराज, मी दरिद्री आईबापांच्याच पोटीं जन्माला आल्यें आणि दारिद्र्यांतच वाढलें, तेव्हां आज माझ्यावर जरी दारिद्र्यांत रहाण्याचा प्रसंग आला असला तरी मला त्यांत दुःख होणें शक्य नाहीं. मला लीलाधरांचं प्रेम लाभलं आहे—पतीच्या प्रेमाची श्रीमंती मिळाल्यावर खऱ्या सतीला दारिद्र्याचें दुःख कसं होईल ? महाराज, मी लीलाधरांच्या प्रेमळ सहवासांत पूर्ण सुखीच आहें.

**धन०**—पण मी म्हणतों, तूं माझी मदत कां घेत नाहींस ? अगदीं निर्मळ मनानंच मी तुला मदत करायला तयार आहें. ( खिशांतून दोनशें रुपयांच्या नोटा काढून ) बरं, तूर्त ही घे लहानशी रक्कम ! असूं दे तुझ्याजवळ !

**लीलावती**—महाराज, मला क्षमा करा, मला आपली मदत घेतां येत नाहीं—मला क्षमा करा.

**धन०**—ठीक तर, तुझी मर्जी. बरं जातों मी, कधी जरूर पडली तर मला हांक मारायला विसरूं नकोस. लीलावती, हा धनराज तुझाच आहे ! ( जातां जातां स्वगत ) आतां असं करावं, हिच्या जवळ असलेल्या नागानंदाच्या मुलीच्या हातीं या नोटा देऊन तिला त्या लीलावतीला देण्यास सांगावें. चिमीच्या हातानं हातीं आलेली रक्कम नाइलाजानं तिला आपल्याजवळच ठेवावी लागेल ! ( जातो. )

**लीलावती**—धनराजांना वाटतं कीं, मला दारिद्र्याचं दुःख होत असेल म्हणून ! पण मी परमेश्वराला स्मरून सांगत्यें कीं, मला जोंपर्यंत लीलाधरांच्या प्रेमाची श्रीमंती मिळाली आहे तोंपर्यंत मला दारिद्र्यांत सुद्धां स्वर्गसुखच लाभेल !

## प्रेमगीत

**प्रेमा झुलवि जीवा । प्रीत मनास विसावा ।। ध्रु० ।। रंगुनि प्रेमसुरंगीं । बांधियलें मानसा ।। बंध कसा तरि दाविल । दुजा भावा ।। १ ।।**

**लीलाधर**—( प्रवेशून ) लाडके, तूं धन्य आहेस. तुला दारिद्र्यांत सुद्धां आनंदच वाटतो आहे ना ? मी तुला श्रीमंतीनें फुललेल्या नंदनवनांत नेवून ठेवणार

होतों पण दुर्दैव आडव आल आणि तुला असा वनवास भोगावा लागला! लीलावती, मी सारा जन्म श्रीमतीच्या ऐदीपणात घालविला असल्यामुळ मला आता पोटाची खळगी भरण्याइतकहि द्रव्य मिळविण मुष्किलीच झाल आहे. कोणी मला साध्या कारकुनाचीहि नोकरी देत नाहीं. आता हमाली करूनच पोट भरायला हव! लीलावती, धनराज तुला सौख्याच्या राशीवर बसवावयाला तयार झाले असता मी तुला तिथून दारिद्याच्या गर्तेत ओढून आणल, याबद्दल तूं मला क्षमा कर. शिवाय, तुला पूर्वीप्रमाण नोकरीहि करता येत नाहीं कारण तू माझी पत्नी—

**लीलावती**—नाथ, असे दीनवाणे उद्गार का काढता बर? आपण माझ्यावर जोपर्यंत पृथ्वीच्या मोलाच प्रेम करीत आहा, तोपर्यंत मी वनवासात सुद्धा स्वर्गसौख्याचा उपभोग घेईन. नाथ, उगीच मनाला वाईट वाटून घेऊ नका. तुमच्या सहवासात मला काहीहि कमी नाही.

**चिमी**—(येऊन) बाईसाहेब, मघाशी ते शेटजी इथ तुमच्याजवळ बोलत बसले होते ना, त्यानीं तुम्हाला देण्यासाठी या नोटा दिल्या आहेत. या घ्या.

**लीलाधर**—(सशयाने) कोण शेटजी आले होते? त्यानी या दोनशे रुपयाच्या नोटा का बर पाठवून दिल्या चिमीच्या हातीं? काय ग चिमे, ते आणखी काही म्हणाले का?

**लीलावती**—मी सागत्ये काय घोटाळा झाला तो!

**लीलाधर**—तू आधी थोडी थाब, चिमीला काय माहीत आहे ते तिला आधीं सागू दे! चिमे, साग पाहू.

**चिमी०**—ते दुःखाचा सुस्कारा टाकून आणखी अस म्हणाले कीं, 'चिमे, तू लीलावतीला साग की जेव्हा जरूर लागेल तेव्हा आणखी पैसे माग, सकोच धरू नकोस, मी तुझाच आहें, माझ्याशी परकी भाव धरण तुला शोभत नाही!' अस ते म्हणाले व तोड वाईट करून आणि एकदा झोपडीकडे पाहून ते डोळे पुशीत निघून गेले!

**लीलाधर**—त्या शेटजींनीं जातांना तोंड वाईट केलं ना? बरोबर आहे, लीलावतीसारखी सुंदर स्त्री माझ्यासारख्या हतभाग्याच्या गळ्यांत पडली तेव्हां त्यांना वाईट वाटणं सहाजिकच आहे! आणि त्यांनीं जातांना झोंपडीकडे पाहिलं म्हणतेस?

**चिमी**—होय महाराज!

**लीलाधर**—होय ना? मग आण त्या नोटा इकडे!

**लीलावती**—नाथ, नका त्या नोटा घेऊं! चिमे, त्या नोटा परत धन-राजांना नेऊन दे आणि त्यांना बजाव कीं, असला वेडेपणा पुनः करूं नका!

**लीलाधर**—म्हणजे ते शेटजी धनराज होते एकूण? लीलावती, तुला हे त्यांनीं दिलेले पैसे घ्यायला कांहींच हरकत नाहीं, कारण एका काळीं तुझ्यावर त्यांचं प्रेम होतं, शिवाय—

**लीलावती**—पण आतां काय त्याचं? त्यांनीं माझ्यावर प्रेम केलं असलं तरी मी कधींच त्यांच्यावर प्रेम केलं नाहीं आणि आजहि त्यांच्याविषयीं माझ्या मनांत प्रेमभाव वसत नाहीं. उलट, असली वेडेपणाची कृति केल्यामुळं त्यांच्या-विषयीं माझं मन विटूनच गेलं आहे!

**लीलाधर**—पण मी म्हणतों, तुला धनराजाची मदत घ्यायला काय हरकत आहे? मी हा असा दरिद्री, दुबळा, करंटा...

**लीलावती**—नाथ, आपण स्वतःला असले हीन शब्द लावून घेतल्यानं माझ्या मनाला अधिकच दुःख होणार नाहीं का? नाथ, धनराज खरा भिकारी, तुम्हीच माझ्या प्रेमाचे कुबेर आहांत! चिमे, घरीं गेलीस म्हणजे त्या नोटा तुझ्या वडिलांच्या स्वाधीन कर म्हणजे ते धनराजांना परत नेऊन देतील!

**चिमी**—बरं तर! (जाते.)

**लीलाधर**—लीलावती, आधींच दारिद्र्याच्या खरखीत अंगारानं होरपळून गेलेल्या तुझ्या कोमल मनाला कांहींतरी वेडेवांकडे शब्द बोलून मी दुखवावें असं मला वाटत नाहीं. मला आज बरं वाटत नाहीं. मी थोडासा बाहेर फिरून येतों.

**लीलावती**—नाथ, तुम्हाला बर वाटत नसल तर बाहेर कशाला जाता ? घरींच रहा, मी तुमची सेवा करत्ये—

**लीलाधर**—नको, यावेळीं मला कसलाच आग्रह करू नको—मी जातो. ( जातो. )

**लीलावती**—श्रीमतीत आणि ऐश्वर्यविलासात वाढलेला लीलाधराचा जीव दारिद्याच्या झळीनं कोमेजून जाण सहाजिक आहे. धनराजाना तरी काय म्हणाव ? त्याच्या मूर्ख कृतीन लीलाधराचे मन कलुषित झाल नाही म्हणजे बर ! दुर्दैवा, तू माझा वाटेल तसा छळ कर पण माझ्या हृदयेश्वराला सुखात ठेव !

## प्रार्थनागीत

**राखी सुखी हे देवा । प्रियाला ॥ सुखमय मानिन दैवा छलाला ॥ ध्रु० ॥ मनिचा विसावा । तो सौख्यठेवा ॥ जाळो जीवा । तीहि पतिप्रेम ज्वाला ॥ १ ॥**

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—धनराजमोहोल्यातील रस्ता. नर्मदा प्रवेश करते )

**नर्मदा**—( शोधक दृष्टीने पाहून ) नाही, कुठहि याचा पत्ता लागत नाही. त्यानी चिमीला, ती कोणशी लीलावतीबाई आहे, तिच्या स्वाधीन केल. म्हणे तिच्या जवळ राहिली तर चिमी शहाणी होईल ! बर पण यानी तरी वेळेवर घरी याव की नाही ? पण याच कधी तोंड दिसेल तर शपथ !

**नागानंद**—( येऊन ) माझ तोंड पहायला शपथ काय करायची ? हा मी तुझ्यापुढ उभा आहे, पहा माझ तोंड !

**नर्मदा**—पण मी म्हणत्ये की, तुम्हाला वेळेवर घरी येऊन तोंड दाखवायला काय झाल ? कुठ असता, कुठ भटकता, काय खाता, काय पिता .

**नागा०**—कुठ असतो नि कुठं भटकतो तें नाही तुला सागणार पण काय खातो नि काय पितो ते मात्र सागेन ! हे पहा मी XX खातो आणि गटारगगा पितो. पाहिलीस ही गटारगगा ? ( बाटली काढून थोडी दारू पितो. )

**नर्मदा**—शीः शीः शीः ! काय निलाजरे आहांत हो पण ! चोवीस तास दारूच पितां ?

**नागा०**—चोवीस तास नाहीं दारू पीत ! चोवीस तास दारू जवळ बाळगतों आणि मधून मधून तिचा आस्वाद घेऊन अंगावर चोवीस तास तिचा अंमल कायम राहील अशी तजवीज ठेवतों.

**नर्म०**—मग असं जर शेणखाऊ वर्तन करायचं होतं तर माझ्याशीं लग्न तरी कशाला केलंत ?

**नागा०**—मी नाहीं हें पातक केलं ! तुझ्यामाझ्या आईबापांनीं स्वतःच्या मनाची हौस पुरवून घेण्यासाठीं, आपण अगदीं लहान होतों तेव्हां, तुझ्यामाझ्या लग्नाचा बेंडबाजा वाजवला !

**नर्म०**—पूर्वीचीं माणसं मूर्ख होतीं आणि तुम्ही शहाणे आहांत, होय ना ? मग मला सुखाचा संसार थाटून देऊन आतां शहाणपणा दाखवा !

**नागा०**—शहाणपणा दाखवतों पण संसार थाटून नव्हे तर संसार मोडून ! संमति दे म्हणजे आत्तां घटस्फोटाचा थाट उडवतों !

**नर्म०**—अहो पण घटस्फोट झाल्यावर मी कुणाच्या नांवानं कुंकूं लावूं ?

**नागा०**—वाटेल त्याच्या ! मी कायद्यानं नवरेपणाचा हक्क सोडून दिला म्हणजे तुला भटकभवानीचा कायदेशीर हक्क मिळेल—

**नर्म०**—असलं अभद्र कां बोलतां ? जीभ झडेल ! चांगला देवाब्राह्मणांसमक्ष तुमचा मी हात धरला आहे बरं ? लग्नाची बायको कधीं भटकभवानी होते का ? जळलं तुमचं सुधारलेलं शहाणपण !

**नागा०**—अग, तुला सुधारणेची मौज कळत नाहीं ती हीच ! केव्हांहि लग्न जोडावें आणि मन चाहेल त्यावेळीं तें मोडावें यालाच अस्सल सुधारणा म्हणतात. चंदनपूरचे महाराज युरोपची यात्रा करून परत आले आणि त्यांनीं प्रजाजनांना हा सुधारणेचा तीर्थप्रसाद बहाल केला ! एकतर तूं माझ्यावर किंवा मी तुझ्यावर घाणेरडा आरोप ठेवून तो न्यायकोर्टापुढें सिद्ध करून दाखविला पाहिजे किंवा

तुझ्यामाझ्या स्वखुषीच समतिपत्र हजर करून लग्नबधन तोडून घेतल पाहिजे—यालाच घटस्फोटाचा पाश्चिमात्य तीर्थप्रसाद अस म्हणतात! हा घटस्फोटाचा कायदा आज इतकासाच ढिला झाला आहे पण उद्या जेव्हा चदनपूर सुधारणेच्या शिखरावर विराजमान होईल त्यावेळीं घटस्फोट हा, बूच उडालेल्या सोड्याच्या बाटलीप्रमाणें लग्नाच्या घडामोडीचा फसफसाट उडवून देईल! आता या घटस्फोटाच्या कायद्याचा फायदा घेऊन मी तुला सोडचिठ्ठी देणार!

**नर्म०**—काय म्हणून, काय म्हणून तुम्ही सोडचिठ्ठी देणार मला? का मी तुमच्या लग्नाची बायको नाही, का मी वेडीवाकडी आहें, का माझे नाकडोळे धड नाहीत, का मी क्षयरोगी आहें, का मी ....

**नागा०**—बस्स, बस्स, पुरे कर हा भडिमार! लौकर बोल, तू घटस्फोटाला समति देतेस कीं नाही?

**नर्म०**—बर समजा, समति नाही दिली तर काय कराल?

**नागा०**—बेदम मारीन!

**नर्म०**—सोडून द्या गोष्टी!

**नागा०**—खायला घालणार नाही!

**नर्म०**—नाहीं तर नाहीं! मी काही चदनपुरची शिकलेली, बिजलीच्या बत्तीजवळ अभ्यास करकरून डोळे फुटलेली, मरतमढी नाहीं. चागली कोंकणच्या राकट हवापाण्यावर पोसलेली बायको आहे—चार अगमेहनतीचे धदे करीन आणि तुम्हांला सुद्धा गिळायला घालीन! नवरे आहात ना? बसा घरी, मी काबाडकष्ट करून खायला घालत्यें तुम्हाला! आता का तोंड मिटल?

**नागा०**—जगदबे, महिषासुरमर्दिनी! तुझा हा रुद्रावतार पाहून माझी दातखिळी बसली! तुला घटस्फोट नको ना? मग अस कर, त्या क्षेमराजशेटकडे जाऊन धुणपाणी कर आणि माझी तैनात राख—माझ्या मर्जीप्रमाणे वागशील तर कदाचित् बदलीन माझा घटस्फोटाचा विचार! (स्व.) ही क्षेमराजाकडे राहिली म्हणजे मला तिथल्या हकीगती तरी समजतील!

**नर्म०**—हें मला कबूल आहे. वाटेल तें काबाडकष्टाचं काम सांगा पण गडे, लग्नाच्या बायकोला उकिरड्यावर फेंकूं नका ! खरं ना—गडे—( लाडिकपणानें जवळ जाते. )

**नागा०**—हां, इतक्यांतच नको मला तुझ्या रांगड्या प्रेमाचा झपाटा दाखवूं ! तुझ्या वाग्बाणांच्या मारानं आधींच मी घायाळ झालों आहें, तेव्हां आणखी भलता भाडिमार करून माझी अधिक भंबेरी उडवूं नकोस. थांब, आधीं मी शुद्धीवर येतों. ( दारू पितो. ) मग ठरलं ना ? तूं क्षेमराजाच्या घरीं राहून पोट भरायचं...

**नर्म०**—अहो, पण अशानं आपल्या संसाराची त्रिस्थळी यात्रा होणार नाही का ? तुम्ही धनराजांकडे, मी क्षेमराजांकडे आणि चिमी लीलावतीकडे, या त्रिस्थळी यात्रेनं—

**नागा०**—या त्रिस्थळी यात्रेनंच आपल्याला संसारांतील सुखाचा मोक्ष गांटतां येणार आहे. ( पाहून ) हो, पण ती पहा चिमीच आली ! ( चिमी येते. ) चिमे, काय ग बातमी आणलीस ?

**चिमी०**—बाबा, धनराजांनीं लीलावतीबाईना दोनशें रुपये दिले पण त्यांनीं ते न घेतां तुमच्याजवळ देण्यास सांगितलं आहे. बाबा, या घ्या त्या नोटा !

**नागा०**—दे त्या इकडे ! तिनं न घेतलेल्या नोटा घ्यायला मी तयार आहें ना ? ( नोटा खिशांत ठेवतो. ) असो, धनराजांनींहि सांगितल्यासारखं बरंच काम केलेलं दिसतं. चिम्ये, तुझ्या या कामगिरीबद्दल मी तुला पुढच्या शिमग्यांत एक धारवाडी खणाचा परकर विकत घेईन, बरं का ?

**नर्म०**—शिमग्याचा वायदा कशाला करतां ? आतांच तिला परकर घ्या आणि याच वेळीं शिमगा साजरा करा !

**नागा०**—तूं आधीं आपला शिमगा थांबव—हे पैसे धनराजांचे आहेत. तूं आपली क्षेमराजांकडे नोकरीला जा कशी ! जा, नाहींतर घटस्फोट—

**नर्म०**—हं एवढे भेडसावूं नका. कराच तर घटस्फोट, नाहींच जात क्षेमराजांकडे ! ( खाली बसते. )

**नागा०**—छेः छे, बायको ! अस नको ग करू ! तू क्षेमराजांकडे राहिल्यान माझ पुष्कळ काम साधणार आहे. माझी बायको ती–सोड रुसवा आणि जा कशी ! अग, तू माझ्या मनाप्रमाण वागू लागल्यावर मी तरी कशाला घटस्फोटाचा हट्ट धरू ? माझी बायको ती–जा बर !

**नर्म०**—जात्यें बर ! पण पुनः घटस्फोटाच नाव काढाल तर याद राखून ठेवा !

**नागा०**—नाहीं काढणार नाव !

**नर्म०**—काय, माझ नाव काढणार नाहीं ?

**नागा०**—तुझ नव्हे, घटस्फोटाच नाव काढणार नाहीं.

**नर्म०**—होय ना ? मग जात्ये तर ! ( जाते. )

**नागा०**—चिम्ये, तू जा आपल्या कामगिरीवर आणि अशाच बातम्या येऊन सागत जा बर का ?

**चिमी**—पण बाबा, धनराजानी दिलेल्या नोटा पाहताच लीलाधर हो का रागावले ?

**नागा०**—त्यातल इगित तुला कळायच नाहीं ! तू आपली जा पाहू लीलावतीकडे !

**चिमी**—बर हो बाबा ! ( जाते. )

**नागा०**—ह, हे ठीक जुळल ! हें त्रागड आता खूप गमत उडवून देणार ! घटस्फोटाची भीति दाखवताच बायको ताळ्यावर आली ! बा घटस्फोटा, तुझा –या नाहीं पण त्या प्रकारान उपयोग झाला खरा ! चला, आता आपण आपल्या कारस्थानाला लागाव ! ( जातो. )

---

## प्रवेश ३ रा

( **स्थळ**—रस्ता. क्षेमराज चतुराला घेऊन येतात. चतुर रडत असतो. )

**क्षेम०**—उगी बाळ, उगी. अस रडू नये. चल, तुला मी एक गमत दाखवतों.

**चतु०**—बाबा, मला नको तुमची ती गमत नि फिंमत ! ऊ, ऊ !

**क्षेम०**—अरे तुला मी फक्कड नाटक दाखवतों, नाहीं तर सिनेमा दाखवतों, नाहीं तर सर्केशीला नेतों. सर्केशींत कीं नाहीं, एक माकड आलं आहे—तें डोक्यानं चालतं ! तें माकड जसं काय माणूसच बघ !

**चतु०**—बाबा, माकडें सुद्धां माणसांसारखीं वागूं लागलीं मग माणसांनींच तेवढा कां ताळ सोडला हो ? तुम्ही माझ्या लीलाधरदादाला घरांतून घालवून दिलंत हें कांहीं तुमच्यासारख्या माणसाला शोभत नाहीं ! बाबा, मी आपला जातों लीलाधरदादाकडे ! मला नाहीं त्याच्याशिवाय चैन पडत !

**क्षेम०**—(स्व.) हा पोरटाहि लीलाधरासारखाच बहकला आहे. हीं आम्हां श्रीमंतांचीं पोरं हल्लीं अशीं कशीं बहकूं लागलीं आहेत तेंच समजत नाहीं ! लीलाधर म्हणजे श्रीमंताचा पोर, पण तो प्रेमासाठीं लग्न करतो आणि प्रेमासाठीं वनवास सुद्धां पत्करतो ! मी काय तरुण नव्हतों का ? पण मी नाहीं लग्नाच्या बाबतींत प्रेमाचा हट्ट धरला ! आपले खानदानी रीतिरिवाज सोडायचे आणि प्रेमाच्या पाठीमागं पळून वनवास पत्करायचा, याला मी तरी शहाणपणा म्हणत नाहीं !

**चतु०**—( धांवत येऊन ) बाबा, बाबा ! तो पहा, लीलाधरदादा तिकडे रस्त्याच्या कडेला मान खालीं घालून उभा आहे ! दादा, अरे लीलाधरदादा, इकडे ये. ( त्याला आणावयास जातो. )

**क्षेम०**—म्हणे लीलाधर मान खालीं घालून रस्त्यावर उभा आहे ! चांगला श्रीमंतींत लोळत होता तो प्रेमाच्या फसव्या नादीं लागून रस्ते भटकूं लागला मग आतां मान खालीं न घालील तर काय करील ? त्याच्यामुळं माझ्यावरहि मान-हानीचा प्रसंग आला असून मलाहि खालीं मान घालण्याची पाळी आली आहे !

**चतु०**—( लीलाधराला ओढून आणीत ) दादा, ये ना रे इकडे, असं काय करतोस ? ये, ये, ते बघ बाबा तिथं उभे आहेत !

**लीला०**—बाळ, काय करायचं आहे बाबासाहेबांजवळ जाऊन ? त्यांना मी नकोसा झालों आहें.

**क्षेम०**—मला तूं नकोसा झालास पण तुझ्या मूर्ख आईला आणि या तुझ्या महामूर्ख भावाला तूं अजून हवा आहेस ! ती तुझी आई एकसारखी रडत असते

आणि हल्ली तर तिन अथरूण धरल आहे. हा कारटा तर अगदींच बहकला आहे—एकाद्या वेळीं तुझ्या शोधासाठी हा घरातून पळून सुद्धा जायचा !

**लीलाधर**—बाळ, तू चतुर आहेस, बाबा सांगतात तें ऐकाव !

**चतुर**—मग दादा, तू रे का नाहीं बाबाच ऐकत ? बाबा भलतच सांगतात म्हणून ना ? मी नाहीं ऐकणार बाबाच ! मी आपल तुझ ऐकेन. दादा, मी येतों तुझ्याकडे रहायला ! चल ना ? दाखव ना मला वहिनी कुठ रहाते ती ?

**क्षेम०**—लीलाधर, जा या कारट्याला घेऊन ! मला त्यान अगदी नकोसा जीव केला आहे. मला तुम्हीं तोंड दाखवू नका ! ज्याना आपल्या खानदानी घराण्याच्या इज्जतीचा अभिमान नाही तीं कारटीं जिवत काय आणि मेलीं काय सारखींच !

**चतुर०**—चल दादा, बाबाची मला मरायला सुद्धा परवानगी मिळाली. चल, चल ! ( त्याला ओढीत नेतो. )

**क्षेम०**—जा, जा, खरच चालते व्हा !

**लीलाधर**—बर चल तर ! (जाता जाता) बाबा, आईला माझा प्रणाम सागा.

**चतुर०**—आणि बाबा, आईला वहिनीकडेच पाठवून द्या बर का ? (जातात.)

**क्षेम०**—गेलीं, दोन्हीं कारटीं गेलीं. आता त्याना काय युक्ति करून परत आणावं तेंच कळत नाहीं !

**नागा०**—( पुढ येऊन ) हे पहा, मी सागतों युक्ति ! पण इथ नको, जाऊ बाजूला !

**क्षेम०**—पण तुम्ही कोण ?

**नागा०**—मी, तुमच्या इथ नोकरीला राहिलेल्या नर्मदाबाईचा लग्नाचा नवरा ! माझ्यावर विश्वास ठेवा आणि चला बाजूला !

**क्षेम०**—बर तर चला !

**नागा०**—( जातां जाता स्व. ) आता यांना चांगल बनवतो. बनवाबनवीच्या कामात हा नागानद तरबेज आहे. असल्या बाबतींत पदव्या देणारी

जर एखादी युनिव्हर्सिटी असती तर तिनं मला टी. बी. म्हणजे 'तरबेज इन बनवाबनवी' अशी पदवी बहाल केली असती ! ( जातात. )

---

## प्रवेश ४ था

( **स्थळ**—लीलाधराची झोंपडी. बाहेरचा भाग दिसतो )

**नर्मदा**—( प्रवेशून ) ते पहा लीलाधर चतुराशीं बोलत बसले आहेत. त्यांना क्षमाबाईसाहेबांचा निरोप सांगावा. ( जाते. आंतील भाग दिसूं लागतो. )

**लीलाधर**—बाळ, कपाटांत डबा आहे आणि डब्यांत लाडू आहेत असा हट्ट तूं धरून बसला होतास पण आतां तें कपाटहि गेलं आणि लाडूहि संपले. आज तुला भाकरीचे तुकडे चघळून पोटाची आग शमवावी लागते आहे !

**चतुर**—पण मला त्याबद्दल मुळींच वाईट वाटत नाहीं. इथल्या हवेवर सणसणीत भूक लागते आणि भाकरी लाडूपेक्षांहि गोड लागते. खा–खा–खाऊन ते घरांतले लाडू मला मातीसारखे लागूं लागले होते बघ !

**नर्मं०**—( पुढं होऊन ) रावसाहेब ! इकडे या, मला तुमच्याकडे तुमच्या आईनं पाठविलं आहे !

**लीलाधर**—( जवळ जाऊन ) काय, काय, निरोप आहे आईसाहेबांचा ?

**नर्मं०**—आईसाहेब कांहीं आतां फार दिवस जगत नाहींत. तुम्ही लौकर जाऊन त्यांचं अखेरचं दर्शन घ्या. त्यांनीं तुम्हांला अगदीं असाल तसे बोलावलं आहे. आतां मला आणखी कांहीं विचारूं नका–चतुरांना घेऊन लौकर घरीं या–बाबासाहेब यावेळीं घरांत नाहींत–या हं लौकर–मी पुढं होत्यें. ( जाते. )

**लीलाधर**—चतुरा, चल बाबा आईसाहेबांचं अखेरचं दर्शन घ्यायला ! मातोश्रींचा आशीर्वाद मिळेल तर त्यांत आपणां सर्वांचं कल्याणच होईल ! ( चतुराला घेऊन जातो, दुसऱ्या बाजूनं क्षेमराज आणि नागानंद प्र. क. इतक्यांत चिमी बाळाला घेऊन बाहेर येते व खेळवूं लागते. )

**चिमी**—'अडगुलं मडगुलं सोन्याचं कडगुलं, रुप्याचा वाळा, तान्ह्या बाळा तीट लावूं !' अरे गुलामा, कसा हंसलास पण ?

**नागा०**—चिम्ये, ये इकडे त्या बाळाला घेऊन, चल ये माझ्यामागून तिकडे पलीकडे! (जाता जाता क्षेमराजाच्या कानात काहीं सांगतो आणि चिमीला मुलासह घेऊन जातो.)

**क्षेम०**—(स्व.) या नागानदान खूप व्यूह रचला खरा! आता लीलावतीला हाक मारावी. (मोठ्यानें) लीलावतीबाई, जरा बाहेर या पाहू! मी क्षेमराज तुमच्या दर्शनासाठी आलो आहे.

**लीलावती**—(बाहेर येऊन) मामजी, आपण या करटीच दर्शन कशाला घेता? मी हतभागिनी आहे.

**क्षेम०**—लीलावती, तू हतभागिनी असलीस तरी आम्हाला जीवदान देण्याच भाग्य तुझ्या हातीं आहे. देवते, मी तुझ्यापुढ नम्र होऊन दयेची भिक्षा मागतो आहे, या दरिद्री श्रीमताला एवढी भिक्षा घाल! (तिच्यापुढ नम्र होतो.)

**लीलावती**—मामजी, उठा आणि काय ते स्पष्ट सांगा.

**क्षेम०**—लीलाधर आणि चतुर याच्या विरहामुळ माझ्या पत्नीन अथरूण धरल आहे. ती आता लौकरच इहलोक सोडून जाणार आणि तिच्या वियोगामुळ माझ्यावरहि इहलोक सोडण्याचा प्रसग लौकरच येणार! आम्हा सर्वांच जीवित तुझ्या हातात आहे. दयेच्या देवते, आम्हाला जीवदान दे.

**लीला०**—मामजी, मग मी या वेळी काय करू ते तरी सांगा.

**क्षेम०**—पण मी सांगेन त्याप्रमाण वागशील ना?

**लीला०**—तें काय सांगू? देव काय बुद्धि देईल तें खर!

**क्षेम०**—दुसरा देव कशाला पाहिजे? तूच आमची देवता आहेस. लीलावती, मन घट्ट करून या कागदावर सही कर. (कागद पुढे करतो.)

**लीला०**—या कागदात काय लिहिल आहे?

**क्षेम०**—तुझ्या व लीलाधराच्या घटस्फोटाला समति!

**लीला०**—काय? मी पवित्र लग्नबधन तोडून टाकण्याला समति देऊ म्हणता? पण तस केल्यावर मी जगेन तरी कशी? प्रेमबध तुटल्यावर या माझ्या शरीरातून जीवात्माहि स्वर्गाचीच वाट धरील!

## शोकगीत

**तो भंगुनि जातां प्रेमा। जाणा घाव तो जिव्हारीं ॥**
**झाली बावरी बाला ॥ ध्रु० ॥**
**मनीं बांधियले थोर सुखाचे झोले।**
**कसे सुटले हो दुरितवात या वेळे ॥**
**कशी अशुभा ही हाय! पातली वेला।**
**करूं काय अतां, मारुं हांक कवणाला ॥ १ ॥**

**क्षेम०**—तें मलाहि कळतें; पण तुझ्या अपूर्व स्वार्थत्यागानं आम्हां सर्वांनाच जीवदान मिळणार आहे ना? दयेच्या देवते, एवढी भिक्षा घाल!

**लीला०**—पण लीलाधरांना माझी ही कृति पसंत पडेल का? लीलाधर, लीलाधर...

**क्षेम०**—लीलाधर आत्तांच मृत्युशय्येवर पडलेल्या आपल्या मातोश्रीला भेटावयास गेला. मातोश्रीची अखेरची इच्छा म्हणून तो घटस्फोटाला आपली संमति देणार आहे.

**लीला०**—तसं असेल तर माझ्या एकटीच्या हट्टाचा तरी उपयोग काय? माझ्यावर चोहोंबाजूंनीं आकाश कोसळलेलं दिसतं! मला आतां वेड लागायची वेळ आली आहे. मामंजी, मी शुद्धीवर आहें तोंपर्यंत माझी सही घ्या!

**क्षेम०**—(कागद पुढें करून व फाउंटनपेन तिच्या हातांत देऊन) दयेच्या देवते, मी तुझा अत्यंत आभारी आहें.

**लीलावती**—(सही करतांना) दुःखातिशयानं फुटूं पाहणाऱ्या प्रेमळ हृदया, मी एवढी सही करीपर्यंत तरी थांब......(सही करते व दुःखावेग न आंवरल्यामुळं निश्चेष्ट होऊन खालीं पडते.)

**क्षेम०**—हाः हाः! झालं माझं काम!

**पडदा पडतो.**

---

# अंक तिसरा



## प्रवेश १ ला

(**स्थळ**—नागानदाच्या घराच्या बाहेरची बाजू. नागानद दारु पीत बसला आहे.)

**नागा०**—जे लोक नावाप्रमाण कृति करतात तेच खरे मोठे ! मीहि मोठाच आहे. कारण माझी कृति माझ्या नावाचा महिमा वाढविण्यासारखीच अजब आहे. अहो, मी नागानद टी. बी. आहें आणि खऱ्या नागाला, जहरी सापाला, सज्जनाचा चावा घेण्याशिवाय दुसऱ्या कशात आनद वाटणार ? मी नागानद असून शिवाय टी. बी. म्हणजे तरबेज–इन–बनवाबनवी आहे. त्या धनराजाला लीलावतीविषयींच्या खऱ्याखोट्या बातम्या सागून बनवला आणि तिच्या नावावर त्याच्याकडून पैसे उपटले ! इकडे क्षेमराजाला बनवल आणि त्याच्या मनात लीलावतीच्या चारित्र्याविषयी विष पसरून घटस्फोटाची घडामोड घडवून आणली ! ज्या किमयेच्या जोरावर मी हे सार केल, ती किमयेची जादू या पत्रात आहे. ही खरी नव्हे, खोटी प्रेमपत्रिका आहे पण ती लीलावतीच्या हातची आहे. तिच्यावर लीलावतीची सही नाही हे एक तिच्यात वैगुण्य होत म्हणा, पण मी ते वैगुण्य अक्कलहुषारीच्या जोरावर काढून टाकल आणि नकली सही अस्सलच आहे अशी क्षेमराजासारख्या बेअकली माणसाला भुरळ पाडली. लीलाधराच मन काय, धनराजाविषयी आधीच कलुषित झालेल आणि त्यात त्याच्या सशयाध दृष्टीला हे विषमय पत्र दिसल, मग तर तो पुरताच आधळा बनला आणि आईच्या शपथेला मान देण्याला तयार झाला ! ही प्रेमाध माणस कधी कधी विचाराध बनतात ती अशी ! इतकी अघटित घटना घडून आल्यावर घटस्फोटाला लीलाधराची समति मिळण मुळींच कठीण नव्हते. आता धनराजाच्या नोकरीला नमस्कार ठोकणार...

**धन०**—(प्रवेशून) नमस्कार नागानद !

**नागा०**—या धनराजशेट, आता तुम्हालाहि नमस्कार आणि तुमच्या नोकरीलाहि नमस्कार !

**धन०**—तुम्ही माझी नोकरी कां सोडणार आणि नोकरी सोडून काय करणार ?

**नागा०**—त्या बैलोबाकडे—त्या लक्षाधीश क्षेमराजाकडे—माजलेल्या पोळा-सारखा खातपीत—बहुधा पीतच—पडून रहाणार ! हें पहा धनराज, तुम्ही आतां इथं वेळ घालवूं नका. तिकडे तुमची ती प्यारी लीलावती यमराजाच्या मुलाखतीला जाण्याच्या तयारींत आहे. जा लौकर, तिनं इहलोक सोडला नाहीं तोंपर्यंतच जा, नाहींतर तिची भेट घ्यावयाला तुम्हांला यमराजाच्या दरबाराकडेच स्पेशल ट्रेन एंगेज करून जावं लागेल ! बाकी, तुम्हां श्रीमंतांना आपल्या पापांचे झाडे देण्यासाठीं आज—ना—उद्यां यमराजाच्या दरबारांत हजर रहावं लागणारच म्हणा !

**धन०**—बरं जातों मी तिच्याकडे ! ( स्वगत ) हा दारूच्या धुंदींत तर असं बरळत नसेल ना ? पण कांहीं असलं तरी मला समक्ष जाऊन लीलावतीची अवस्था पाहिलीच पाहिजे ! ( जातो. )

**नागा०**—हा धनराज तर वाटेला लावला पण तो क्षेमराज अजून कसा येत नाहीं ?

**चिमी**—( येऊन ) बाबा, बाबा ! चला लौकर, तिकडे लीलावतीबाईंचा जीव कासावीस झाला आहे. त्यांनी आपल्या बाळाच्या व लीलाधरांच्या नांवाचा सारखा जप चालविला आहे. त्यांची ती अवस्था पाहून मला भीति वाटली आणि म्हणून तुम्हांला तिकडे नेण्यासाठीं आल्यें.

**नागा०**—आलीस ना तिकडून ? आतां इथंच रहा ! तुझ्याकडे सोंपवलेली कामगिरी संपली—आतां तुला पुढच्या शिमग्यांत मी धारवाडी खणाचा परकर...

**चिमी**—मला नको परकर ! तुम्ही आधीं लीलावतीबाईकडे चला. चला लौकर. नाहींतर एकाद्या वेळीं चट्कन त्यांचा प्राणहि निघून जायचा ! चला—

**नागा०**—जा, मग तूंहि मर तिच्याबरोबर आणि तुला कोणी सोबतीण पाहिजे असेल तर तुझ्या आईला तिकडे मरायला घेऊन जा !

**चिमी**—बरं, बरं ! तुम्ही येत नाहीं ना ? मी आपली आईलाच घेऊन जात्यें कशी ! ( जाते व क्षेमराज येतो. )

**क्षेम०**—नमस्कार, नागानद !

**नागा०**—नमस्कार ! कस काय क्षेमराज, सर्व काही क्षेम आहे ना ? काय ? झाली सर्व तयारी ? आणलत माझ बक्षीस ?

**क्षेम०**—हें घ्या तुमच बक्षीस. ( नोटाचें पुडकें देतो. चिमी नर्मदेला घेऊन बाहेर येते. नर्मदा आड उभी राहते. )

**नागा०**—बर पण ते जहरी पत्र कुठ आहे ? तुमचं काम झाल, ते माझ मला परत मिळाल पाहिजे, विष आहे ते—आणखी कुणाचा प्राण घ्यायच ! ( स्व. ) एकाद्या वेळीं तें विषारी पत्र मलाच डसायच ! त्याच्यावर मी लीलावतीची खोटी सही केली आहे ना ?

**क्षेम०**—बर, हे घ्या ते पत्र ! ( पत्र देतो. ) हे पहा, तुमच्या सल्ल्या-प्रमाण मी लीलाधराच्या तान्हुल्या मुलाला एका नर्सच्या स्वाधीन करून तिला त्याच योग्य सगोपन करावयाला सागितल आहे. ते मूल जरी त्या भिकारड्या लीलावतीच्या पोटी जन्माला आल असल तरी ते माझ—या खानदानी क्षेमराजाच—नातवड आहे ! त्या मुलाची व्यवस्था लागली. आम्हीहि आजच्या आज हे चदन-पूर सोडून आरोग्यगिरीवर जाण्याच ठरविल आहे. तिथ माझ्या पत्नीची प्रकृति सुधारल्याशिवाय राहणार नाहीं. हें सर्व यथास्थित जुळून आल पण तो हट्टी लीलाधर काही माझ ऐकत नाही. त्यान आता प्रेमसन्यास घेतला आहे म्हणे ! ही तरुण पोर प्रेमाच्या वेडान इतकी कशी वेडावतात तेच कळत नाही ! त्याच एक झाल पण तो कारटा चतुर, त्याचाच सख्खा भाऊ—

**नागा०**—त्याचा भाऊ आणि तुमचा मुलगा नव्हे का ?

**क्षेम०**—तो माझा मुलगा आहे पण तो भावाच्या वळणावर गेला आहे ! आता काय कराव त्या पोरट्याला ?

**नागा०**—काहीं करू नये, त्या दोघाना इथच टाकाव आणि तुम्ही सर्वांनीं तावडतोब आरोग्यगिरीवर निघून जाव ! ते दोघे येतील आपोआप ताळ्यावर, नका करू त्यांची काळजी !

**क्षेम०**—बरं तर जातों. नागानंद, तुम्ही आमच्या घराण्याची इज्जत राखण्याच्या कामीं जी मदत केली ती केवळ अमोलिक आहे. तुम्ही आजपासून आमच्या घराण्याचे हितचिंतक दोस्त झालां आहांत! बरं, मी जातों, नमस्कार! (जातो.)

**नर्मदा**—(पुढें येऊन) कांहो, हे क्षेमराज कसल्या भानगडींत गुंतले आहेत?

**नागा०**—अग, आपण त्यांना जी मदत केली त्याबद्दल त्यांनीं आपले—तुझे सुद्धां—आभार मानले आहेत! आपल्या कारस्थानामुळंच तो घटस्फोट घडून आला नाहीं का? तूंहि मला उत्तम मदत केलीस!

**नर्म०**—म्हणजे आपणच का त्या नवराबायकोची ताटातूट केली? दोन प्रेमी जीवांची ताटातूट करणं हें पातकच नाहीं का?

**नागा०**—त्यांत कसलं पातक? तूं नुस्ती मला मदत केलीस पण मीच सर्व पातकाचा भार उचलला! ये इकडे म्हणजे कानांत सांगतों. (कानांत) हें पहा तें विषारी पत्र. या पत्रावर मींच लीलावतीची खोटी सही केली आणि क्षेमराजाला बनवलं. मी म्हटलं, टी. बी. म्हणजे 'तरबेज–इन–बनवाबनवी' आहें. या कारस्थानांत आपल्या चिमीचीहि कांहीं कमी मदत झाली नाहीं! तिनंच तर मोठ्या शिताफीनं लीलावतीचं पोर लांबवलं! शाबास ग माझे चिम्ये!

**नर्म०**—खरं का ग हें सारं?

**चिमी**—हो आई! बाबांच्या सांगण्यावरून मी तसं केलं खरं! पण आतां त्याबद्दल मला फार वाईट वाटतं आहे! लीलावतीबाईनीं त्या मुलासाठीं असा हंबरडा फोडला म्हणतेस...नको, ती आठवणच नको, नुस्ती आठवण झाली तरी काळजांत चर्रर्र होतं!

**नर्म०**—चांडळणी, आईची आणि मुलाची ताटातूट केलीस, आतां कुठं फेडशील हें पाप?

**नागा०**—तुम्ही कुणीहि नका तीं पापें फेडूं! मी सर्व पातकांचं प्रायश्चित्त घ्यायला तयार आहें. हें पहा, मी आपली नरकांतली जागा एव्हांपासूनच 'रिझर्व' करून ठेवली आहे!

**नर्मदा**—तुम्हाला जनाची तर लाज नाहींच, पण मनाचीहि नाहीं!

तुम्ही स्वतः पातकी आहातच पण मलाहि तसल्या अघोर पातकाची भागीदारीण केलीत ? काय म्हणाव तुम्हाला ?

**नागा०**—नवरा म्हणाव ! मी तुझा नवरा आहे आणि तू माझी अर्धांगी आहेस ! मग अर्धांगीच्या नात्यान तुला माझ्या पातकाची भागीदारीण करायला नको का ? नवऱ्यावर धर्माचार्यांनीं फार मोठी जबाबदारी टाकलेली आहे !

**नर्म०**—आणि शिवाय या कोवळ्या पोरीच्या हातूनहि तुम्ही पातक करवलत ना ?

**नागा०**—त्या चिमुकल्या चिमीच्या मानान आपण फार मोठीं माणसे आहोंत ना ? आईबापाचा कित्ता गिरवणारी तीच खरी कन्यका !

**नर्म०**—खरोखरच तुम्ही निलाजरे आहात, निगरगट्ट आहात, पातकी आहात—

**नागा०**—आहे, मी सर्व काहीं आहें, मग तुझ म्हणण काय ?

**नर्म०**—असल्या नवऱ्याची बायको म्हणवून घ्यावयालाहि मला शरम वाटते.

**नागा०**—तर मग बेशरम हो आणि घटस्फोटाच्या कायद्याचा आधार .....

**नर्म०**—मला नको तुमच्या कायद्याचा आधार ! तुम्ही मला घटस्फोटाच्या कायद्याची भीति दाखवीत होता नाही का ? आता मी माझाच कायदा तुम्हाला लावत्ये आणि तुमच्या नावाच हे कुकू अस्स पुसून टाकत्ये. तुम्ही हो कसले नवरे ? दीन गाईंचे गळे कापणारे कसाई आहात कसाई ! नवरदेव, पतिदेव समजून तुमची पूजाअर्चा केली पण शेवटीं महापातकाची धनीण झाल्ये. पोरी, चल लौकर, त्या लीलावतीदेवीचे पाय धरून क्षमा मागू. कसे हो दुष्ट चाडाळ निघालात तरी ?

**नागा०**—दुष्ट निघालो पण अस्सल प्रतीचा ! नाटकातल्या व्हिलनसारखा अखेरच्या अकात क्षमा मागणारा मी नाहीं. आकाश कोसळल तरी हृदयातला दुष्टपणा टाकणार नाहीं ! ( इतक्यात लीलाधर व चतुर येतात. )

**लीलाधर**—नीचा नागानदा, तूच या कपटकारस्थानाच्या मुळाशीं आहेस असं मला बाबासाहेबाच्या हालचालीवरून वाटत !

**नर्म०**—हो, यानींच तुमचा घात केला ! त्यांच्या खिशात एक कागद आहे तो बाहेर काढा म्हणजे कळेल तुम्हाला सार !

**नागा०**—अहो, मी अट्टल दारुबाज आहें; माझ्या खिशांत दारूच्या बाटल्यांशिवाय दुसरं काय असणार बरं ?

**लीला०**—पाजी माणसा, खोटं बोलतोस तूं ! ( त्याची मानगुटी धरून ५।७ दारूच्या बाटल्या त्याच्या खिशांतून बाहेर काढतो. शेवटीं त्याला पत्र सांपडतें. )

**नर्म०**—तेंच तें विषारी पत्र ! त्याच्याखालीं यांनींच स्वतःच्या हातानं लीलावतीबाईसाहेबांची सही केली आहे !

**नागा०**—केली, मग तुझं काय म्हणणं ?

**लीला०**—पापात्म्या, तूं या विषानं लीलावतीचा प्राण घेतलास !

**चतु०**—काय ? हा इतका नीच आहे ? मी याची खोडच मोडतों ! ( त्याला बडवतो. )

**नर्म०**—महाराज, तिकडे लीलावतीबाईसाहेब मृत्युशय्येवर पडल्या असल्याची वाईट बातमी आत्तांच चिमीनं आणली. महाराज, चला आधीं त्या साध्वीला हें पत्र दाखवा आणि मरणकाळीं तरी त्यांना आनंदाची वार्ता सांगा !

**लीलाधर**—चला तर नर्मदाबाई, आपण लीलावतीकडेच जाऊं. (स्व.) लाडके लीलावती, मी तुझ्या दर्शनाला येतों, तूं या पाप्याला क्षमा करशील ना ?

**चतु०**—दादा, तूं हो पुढं. नर्मदाबाई, तुम्हीहि दादाबरोबर जा. मी आणि चिमी या दुष्ट नागाला ठेंचून टाकतों. दादा, असल्या नीच दारुड्यांची खोड मोडण्याचं काम आतां तुम्ही आम्हां तरुण पिढीवरच सोंपवा ! आजची तरुण पिढी दुष्टांचा समाचार घ्यायला एका पायावर तयार आहे. ( लीलाधर व नर्मदा जातात. ) चिमे, तूं माझी थोरली बहीणच आहेस. तूं ती बाटली घे आणि मी ही घेतों. आपण दोघांनीं मिळून या नागाचं डोकं ठेंचूं या ! हुड्त् ! हुड्त् ! ! हुड्त् ! ! !

**नागा०**—आतां नाहीं इथं बसायची सोय उरली ! या वेळीं पलायनास्त्राचा अवलंब करून आपला जीव वांचवला पाहिजे ! ( पळून जातो. )

**चतु०**—हाः हाः हाः ! कशी उडाली मजा !

**चिमी०**—भाऊराया, या दीन भगिनीला क्षमा कर. ( पाय धरते. )

**चतु०**—छट्, मोठ्या माणसानी अस नाहीं करायच बर ! चल, आपण त्या दुष्टाला चदनपुरातून हद्दपार करू !

**चिमी०**—चल तर ! ( जातात. )

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—लीलावतीची झोपडी. लीलावती मृत्युशय्येवर पडली असून धनराज तिला औषध देत आहे. )

**धन०**—लीलावती, हे औषध घे म्हणजे थोड बर वाटेल ! डॉक्टर-साहेबानी हे औषध मधूनमधून घ्यायला सागितल आहे.

**लीला०**—( ओढल्या आवाजानें ) पण डॉक्टराना माझ्या रोगाची परीक्षा झाली का ? मला कोणता रोग झाल्याच त्यानीं सागितल ?

**धन०**—त्याना रोगाची काही बरोबर परीक्षा झाल्याच त्याच्या एकदर चर्येवरून दिसल नाही. पण रोग कोणताहि असला तरी त्याचा हृदयाशी सबध आहे अस मात्र त्यानीं निक्षून सागितल !

**लीलावती**—भोळे बिचारे डॉक्टर ! त्याना कशी परीक्षा होणार ? माझा रोग हृदयाचा आहे हे खरं पण तो डॉक्टरी औषधानी बरा होणारा नाही. कशाला मला ही औषधे पाजता विनाकारण ? धनराज, मी आता काही क्षणाचीच सोबतीण आहे. मला मरणसमयी जर तुम्ही माझ्या तान्हुल्याची भेट करवाल तर तुमचे माझ्यावर अगणित उपकार होतील ! गाईची आणि वासराची ताटातूट करायला त्या क्षेमराजाना तरी कसा धीर झाला ? ते श्रीमत आहेत, खानदानी आहेत—

**धन०**—आणि म्हणूनच असे हृदयहीन आहेत, निष्ठुर आहेत. त्यानीं तुमच्या मुलाला कुठतरी गुप्त ठिकाणी ठेवल असाव ! लीलाधर खात्रीन तुमच्या तान्हुल्याच सगोपन करतील—तुम्ही निर्धास्त रहा !

**लीलावती**—नाहीं, लीलाधर त्या बाळाकडे ढुकूनहि पहाणार नाहीत. त्यानी आपल कोमल हृदय दगडापेक्षा घट्ट केल आहे.

**लीलाधर**—( नर्मदेसह प्रवेशून ) लीलावती, प्रेमदेवते, मला क्षमा कर. मी तुझा आणि बाळाचा सर्वस्वी अपराधी आहें. मी तुझ्या उज्ज्वल चारित्र्या-

विषयीं संशय घेतला आणि बाबांनीं पसरलेल्या मोहजालांत अडकलों. लीलावती, ज्या पत्रावर विश्वास ठेवून मी घटस्फोटाला संमति दिली, त्या पत्रावर नागानंदानं तुझी खोटी सही केल्याचं आतांच मला समजलं आहे.

**लीलावती**—तें कोणतं पत्र तुम्ही म्हणतां ?

**लीलाधर**—( पत्र काढून ) हें पहा तें पत्र ! हें पत्र तूं धनराजांना लिहिलं असावं—

**धन०**—काय ? लीलावतीनं मला पत्र लिहिलं आणि केव्हां ? ( पाहून ) अरेरे, घात झाला ! केवळ थट्टा म्हणून करायला गेलों पण तीच शेवटीं प्राणघातक ठरली. लीलाधर, त्या पत्राची सर्व जबाबदारी माझ्या शिरावर आहे. त्या पत्रावर सही करण्याचं लीलावतीनं साफ नाकारलं हें मी तुम्हांला शपथेवर सांगतों.

**लीलावती**—कशाला विनाकारण शपथा घेतां ? लीलाधरांनीं आणि मी, एकमेकांवर मरेपर्यंत प्रेम करूं अशा नव्हत्या का शपथा घेतल्या ? त्या आम्ही कुठं पाळल्या ?

**लीलाधर**—लाडके, पण आतां त्या पातकाला कांहीं प्रायश्चित्त नाहीं का ? मी प्रेमाखातर वाटेल तें दिव्य करायला तयार आहें.

**लीलावती**—लीलाधर, माझ्या हातून जी चूक झाली तिच्याबद्दल मीच प्रायश्चित्त घेत्यें आहें. मी तुमच्या खानदानी घराण्याची अब्रू घालविली—

**लीलाधर**—आग लागो त्या माझ्या घराण्याच्या खोट्या अब्रूला !

**लीलावती**—नको तसं व्हायला ! लीलाधर, मी आतां थोड्याच क्षणांत मरणाला कवटाळणार आहें. मी प्रेमाला कवटाळायला गेल्यें पण मरणाच्या द्वारीं येऊन पडल्यें. आतां मी मरणालाच कवटाळतें, मग तरी तुमच्या खानदानी वडिलांचं समाधान होईल ना ? लीलाधर, गरिबांनीं श्रीमंतांशीं स्नेहसंबंध जोडणं म्हणजे अग्नीशींच खेळण्यासारखं आहे, असं जें म्हणतात तेंच खरं ! मी तुमच्याशीं प्रेमसंबंध जोडला म्हणून आतां क्षणार्धांत अग्निदिव्य करणार आहें. तुमच्या वडिलांनीं माझ्या प्रेमळ हृदयावर घाव घातला आणि मी तत्काळ विव्हल होऊन पडल्यें. हृदयाचंच चूर्ण झाल्यावर मी जगणार तरी कशी ? नर्मदाबाई, इकडे या जवळ ! तुम्ही चिमूच्या आई आहांत—तिला श्रीमंतांच्या सांवलीला उभी करूं नका ! गरिबी हेंच आपलं भूषण बरं !

**नर्म०**—लीलावतीबाई, तुमच म्हणण खर आहे. खानदानीपणाचा खोटा अभिमान धरून गरिबाना छळणारे हे श्रीमतच खरे पापी आहेत—हेच आज कालचे अस्पृश्य—मी नाही बर माझ्या बाळीला त्याच्या सावलीला उभी करणार ! त्याची सावली पडली तर आघोळच करायला हवी ! !

**लीलावती**—धनराज, तुम्ही श्रीमत असूनहि आजपर्यंत माझ्यावर जी निर्मळ कृपादृष्टि ठेवलीत त्याबद्दल मी तुमचे आभार मानत्ये. लीलाधर, तुम्ही तर प्रेमाची गाठ तोडूनच टाकलीत आणि या हतभागिनीशी घटस्फोट केलात—

**लीलाधर**—लाडके, नाहीं. मी प्रेमाची गाठ तोडलेली नाही. कायद्याचे पाश झुगारून देऊन प्रेमळ धर्मपत्नी म्हणून मी पुनः तुझा स्वीकार करतो. लाडके लीलावती, मला क्षमा कर आणि पुनः एकदा मला तुझ हृदय दे.

**लीलावती**—नाथ, कायद्यान आपल्या प्रेमग्रथीवर घाव घातला असला, घटस्फोटान आपल्या हृदयाचा स्फोट केला असला, तरी मी तुमचीच आहे आणि तुम्ही माझेच आहात ! नाथ, मामजीना आणि सासूबाईना या कगाल सुनेचा प्रणाम सागा. बाळाचा नीट साभाळ करा आणि मला स्वर्गाची पायरी चढायला आपला प्रेमळ हात द्या. (हात धरून) नाथ, तुमच्या हाताचा प्रेमळ आधार मला मिळाला, ही मी स्वर्गाला मोठ्या आनदान जात्ये. ली ला ध-र-(मरते.)

**लीलाधर**—हाय ! हाय ! माझी लाडकी लीलावती मला टाकून गेली ! त्या दुष्ट घटस्फोटान माझ्या लाडकीच्या प्रेमळ हृदयावर वर्मी घाव घातला ! हाय !! हाय !!! (चतुर व चिमी येतात.)

**चतुर**—दादा, वहिनी रे का बोलत नाहीं ? ही रुसली होय ?

**लीलाधर**—हो बाळ ! ती या पापी इहलोकावर रुसली आणि जेथे प्रेमाचे बध तोडल्या तुटत नाहीत अशा दिव्य लोकाला निघून गेली ! (चतुर लीलावतीला बिलगतो.)

**पडदा**



# अंक १ ला

—~—

## प्रवेश १ ला

(**स्थळः**–रस्ता. वेळ–सायंकाळ. मुली शाळा सुटल्यावर घरीं जायला निघतात.)

**मुलीः**—

### उल्हासगीत

**सुटलि अतां शाळा। चला या खेळाया खेळा ॥ ध्रु० ॥ फुगडीझिम्मा खेळ खेळुनी। रमवूं चित्ताला ॥ १ ॥ आंधळी कोशिंबीर खेळुनी। करुं या मौजेला ॥ २ ॥ नातरि नाटक-नाटक खेळुनी। फेडूं हौसेला ॥ ३ ॥ बाई ग! संवगडि हा आला ॥ ४ ॥**

**विमल**—अग, तो पाहिलास का? तिकडून गुलाब येतो आहे! तो जर आपल्याबरोबर भातुकलीचा नाहींतर नाटकाचा खेळ खेळायला येईल तर किती किती गंमत होईल म्हणतेस?

**कमल**—खरंच ग खरंच! चल, गुलाबलाच घेऊन आपण भातुकलीचा खेळ खेळायला जाऊं! तो गमत्या गुलाब तरी नाटकांतलीं भाषणें किती सुरेख म्हणतो! त्याचं तें ऐटदार भाषण सुरू झालं म्हणजे मन किनई हरखून जातं आणि असं वाटतं कीं, त्याच्यावरून प्राण ओंवाळून टाकावा! हा गमत्या गुलाब जर कधीं नाटकांत गेला तर लोकांना वेड लावील बाई!

**गुलाब**—(गंमत करीत प्रवेश करतो.) मॅन म्हणजे माणूस आणि कॅट म्हणजे मांजर! मॅन म्हणजे माणूस आणि कॅट म्हणजे मांजर! मॅन–मॅन–मॅन,

माणूस—माणूस—माणूस! कॅट—कॅट—कॅट, मांजर—माजर—मांजर! (एका मुलीला धक्का देऊन पुढें चालू लागतो.)

**विमल**—अरे, हो, हो, हो! गुलाब, रस्त्यान चालताना माणूस पहाव म्हटल!

**गुलाब**—(पाहून) मीहि माणूसच पाहतो आहें म्हटल. मॅन म्हणजे माणूस—माणूस, माणूस, माणूस!

**कमल**—गुलाब, तू जर माणूस पाहून चालतो आहेस तर मग तुझा धक्का या विमलला कसा लागलारे? ही माणूस नाहीं का?

**गुलाब**—कोण? ही होय? ही माणूस नाहीं! ही विमल आहे अर्थात् 'वूमन' आहे, ही काहीं 'मॅन' नाही. मॅन म्हणजे माणूस आणि कॅट म्हणजे माजर!

**विमल**—(चिडून) मी माणूस नाही का? मग गुलाब, मी कोण आहें रे?

**गुलाब**—ह, रागावू नकोस! नीट विचार करून सागतों. एकाद्याला माणूस म्हणायच म्हणजे चागला विचारच केला पाहिजे! थाब ह! तू विमल आहेस अर्थात् मॅन नाहींस. हो, तू कॅट मात्र आहेस खरी! कॅट म्हणजे मांजर!

**कमल**—(टाळ्या वाजवीत) 'विमल झाली माजर आणि गुलाब खाई गाजर!' विमल माजर—विमल माजर! (हसून चिडविते.)

**विमल**—कमल, मला काहीं चिडवू नकोस अशी! गुलाब, तू मला कॅट म्हणजे माजर ठरवलस नाही का? थाब, तुझा फाजीलपणा मी आईला जाऊन सागतें—मग बघ, आई तुला झोडपून काढील! (रडते.)

**गुलाब**—खुळीरे खुळी, अगदीच खुळी! अग विमल, तुला मी माजर ठरविल्याबद्दल तुझी आई मला रागावणार तर नाहीच, उलट ती मला शाबासकीच देईल! हें बघ! आजकाल चागल्या चागल्या मुली स्वतःला माजरच म्हणवून घेतात! तूं सुद्धा मुलीच्या माजरसेनेंत दाखल हो म्हणजे तुला बघ केवढा मान मिळेल! माजरसेना म्यॉंव म्यॉंव!

**विमल**—बर हो! (वेडावते) मी माजरसेनेंत जातें आणि तू वानर-सेनेंत जा! वानरसेना हुप् हुप्!

**कमल**—विमल, गुलाब गंमत्या मुलगा आहे, त्यानं थोडी थट्टा केली तर त्यांत तुला एवढं नाक लाल करायला काय झालं ? विमल, चल आपण गुलाबला घेऊन भातुकलीचा खेळ खेळूं !

**गुलाब**—छेः, अं हं ! आम्ही नाहीं येत मुलींत खेळायला ! आतां मी कपाटांतला क आणि डब्यांतला ड करणारा लहान मुलगा राहिलों नाहीं. आतां मी मॅन म्हणजे माणूस आणि कॅट म्हणजे मांजर घोकायला लागलों आहें. आतां मी मोठा झालों. आतां जर मी बायकांत खेळूं लागलों तर तुम्हीच मला 'बायकांत पुरुष लांबोडा आणि भाजून खातो कोंबडा' असं म्हणून चिडवाल ! अं हं, नाहींरे बुवा ! * ( पळत जातो. )

**कमल**—अरे गुलाब ! थांब ! असा पळत जाऊं नकोस ! ती पहा तिकडून मोटार आली ! पळूं नकोस–थांब ! ( त्याच्यामागें धांवत जातात. इतक्यांत मोटारीचा पों पों आवाज ऐकूं येतो. लोकांची ओरडहि ऐकावयास येते आणि मोटारीच्या धक्क्यानें बेशुद्ध पडलेला गुलाब दिसूं लागतो. एक इसम त्याला उचलून बाजूला आणतो. )

**भंपकराव**—अरेरे ! या मोटारवाल्यांनीं अगदीं कहर केला ! यांना वाटतें कीं, आपण काय तें दौडत जावें आणि पायीं चालणारांनीं खुशाल आपल्या मोटारीखालीं चिरडून मरून जावं ! माझ्या हातीं कुणी सत्ता दिली तर मी या मोटारवाल्यांना जिवंतपणीं फांशीं देईन ! काय गोजिरवाणा मुलगा आहे हा ! पण त्याचं या मोटारवाल्यांना कांहीं आहे का ? मोटारीच्या धक्क्यानं बिचारा दाण्दिशीं पडला ! हाय, हाय !

**मालती**—( घाबरलेली धांवत येऊन ) कांहो, मुलाला फार लागलं कीं काय ? कसा मुलगा धांवत आला आणि त्याला माझ्या मोटारीचा धक्का लागला कांहींच कळत नाहीं !

---

## विनोदगीत *

**आहे 'मॅन' बडा । राखा मान अहो ॥ नाहीं खेळ बरा । तुम्ही 'वूमन' हो ॥** चाल ॥ **मॅन म्हणजे माणुस आणि । कॅट म्हणजे मांजर तें ॥ मॅनकॅट जोडीचें जमतें ना तें नातें ॥** चाल ॥ **म्हणुनी जातों अतां मीहि पळुनी हो ॥ १ ॥**

**भंपकराव**—अस्स ! म्हणजे ती मोटार तुम्ही हाकीत होता तर ! या बायकानीं ताळ सोडला अगदी ! अहो, या बायका आता मोटारी सुद्धा हाकू लागल्या ! बाई, काय म्हणाव तुम्हाला ? तुम्ही वूमन आहात पण तुम्हाला हार्टसुद्धा नसाव ना ? ‘ काऊ हॅज नो सोल इन इंग्लड, बट वूमन हॅज नो हार्ट इन इंडिया ’ अस म्हणायची पाळी आणलीत खरी ! मुलगा किती गोजिरवाणा आहे, पण तुमच्या मोटारीच्या एकाच दणक्यान तो बेशुद्ध पडला !

**मालती**—काय, मुलाला मूर्च्छा आली आहे ? मग बोलण्यात काय वेळ घालवता ? द्या त्याला माझ्याजवळ, मी त्याला मोटारींत घालून डॉक्टराकडे घेऊन जात्ये ! आणा त्याला इकडे ! ( काकुळतीला येते. )

**भंपक०**—नाहीं देत त्याला तुमच्याजवळ ! तुम्ही बायका शिकलात, स्वतंत्र झालात आणि हार्टलेस बनलात ! काय म्हणाव तुम्हाला ?

**मा०**—तुम्ही आम्हाला काय वाटेल ते म्हणा पण त्या मुलाला आधीं माझ्या स्वाधीन करा, मी त्याला डॉक्टराकडे नेऊन औषधोपचार करत्ये.

**देवदत्त**—( पुढे येऊन भंपकरावास ) अहो, तुमचीच बडबड आधी थांबवा आणि त्या मुलाला या बाईच्या स्वाधीन करा. या बाई तशा वाईट दिसत नाहीत. द्या त्याला त्याच्याजवळ !

**भंपक०**—तुम्हाला त्या वाईट दिसत नसतील पण त्या कशा हार्टलेस आहेत हे मी प्रत्यक्ष पाहिल आहे ! या बाईन मुलाच्या अंगावर मोटार घातली आणि त्याला बेशुद्ध पाडल—

**मा०**—नाहीं हो, मी या मुलाच्या अंगावर मुद्दाम नाहीं मोटार घातली ! तोच माझ्या मोटारीपुढं धावत आला आणि मी चटकन् ब्रेक दाबला तरीहि त्याला मोटारीचा निसटता धक्का लागला ! आता मेहेरबानी करा आणि त्याला माझ्या स्वाधीन करा—मी त्याची सर्व काळजी घेत्ये. आणा त्याला इकडे !

**भंपक०**—वूमन ती वूमन पण स्वतः अपराधी असूनहि वर तोंड काढून बोलते आहे !

**देवदत्त**—आता ही बडबड बंद करा आणि त्या मुलाला या बाईच्या स्वाधीन करा.

**भंपक०**—बरं बुवा ! तुम्हीच त्या बाईचा कैवार घेऊं लागलांत, मग मी तरी कशाला अडवून धरूं ? मला काय करायच्या नसत्या भानगडी ! बाई, हा घ्या मुलगा—त्याला शुद्धीवर आणा किंवा नका आणूं, मला काय करायच्या नसत्या भानगडी ! ( मुलाला देतो. )

**माल०**—( मुलाला घेऊन ) आत्तां मी या मुलाला डॉक्टराकडे नेऊन शुद्धीवर आणत्यें ! ( घेऊन जाते. )

**भंपक०**—कांहो सद्‌गृहस्थ ! तुम्ही जो त्या बाईचा एवढा कैवार घेतलात तो कां ? आतां मी तुम्हांला स्पष्टच विचारतों कीं, या शिकलेल्या बायका आतांशा इतक्या चवताळल्या कां ?

**देव०**—बायका नाहीं चवताळल्या पण त्यांची स्वतंत्र वृत्ती पाहून तुम्ही पुरुष मात्र बावचळून गेलां आहांत ! मी म्हणतों कीं, तुम्हांला तरी एवढं चवताळायला काय झालं हो ? मुलगा धांवत सुटला, बाईला कांहीं मोटार आंवरली नाहीं आणि मुलाला मोटारीचा धक्का अचानक लागला ! हा ॲक्सिडंट आहे, त्याबद्दल बिचाऱ्या शिकलेल्या बायकांच्या नांवानं एवढा शिमगा करून तुम्हांला तरी काय मिळणार ?

**भंपक०**—हो, तो ॲक्सिडंट होता हें मीहि कबूल करतों पण माझा खरा आक्षेप आहे या बायकांच्या स्वतंत्रपणावर ! अहो, या बायका स्वतंत्र झाल्या आणि मोटारीसुद्धां हांकूं लागल्या !

**देव०**—मग त्यांत बिघडलं कुठं ? तुम्ही पुरुषांनीं हातांत बांगड्या भरल्यात तेव्हां बायकांनीं हातांत सुकाणूं घेतलं—मोटारीचं ! तुम्ही मॅन म्हणजे पुरुष आहांत ना ? मग तुम्ही नुस्ती बडबड करण्यापलीकडे त्या मुलाला शुद्धीवर आणण्याचा कांही उपाय केलात का ? तुमच्यापेक्षां ती बाईच बरी ! बिचारी झट्‌कन त्या मुलाला घेऊन डॉक्टराकडे तरी गेली ! पण तुम्ही ? वाः रे तुम्ही बडबडे पुरुष !

**भंपक०**—अहो, तुम्हांला नाहीं माहीत ! मी नाहीं कधीं नसत्या भानगडींत पडत ! अहो, मला काय करायच्या नसत्या भानगडी ? तो मुलगा कोण, कुणाचा आणि मला तरी काय करायचं होतं त्याच्याशीं ? आपलं डोळ्यांना दिसलं आणि रहावेना म्हणून बोललों इतकंच ! बेशुद्ध पडलेल्या मुलांना

शुद्धीवर आणण्यापेक्षा मला दुसरे माझे स्वतःचे पुष्कळ उद्योग आहेत. बर आहे नमस्कार ! जातो मी माझ्या कामाला. मला काय करायच्या नसत्या भानगडी ! (जाता जातां) बाकी दिसतय् ते स्पष्ट बोलायला कुणाच्या बापाची भीति आहे ? ' दीज शिकलेल्या बायका हॅव्ह नो हार्ट !' ( डुलत डुलत निघून जातो. )

**देव०**—काय लेकान पौरुषाचा आव आणला पण ? खर म्हटल तर त्याला काहींएक करायच नव्हतें, पण त्यान प्रसग साधून शिकलेल्या बायकाना शिव्या मात्र हासडून घेतल्या खऱ्या ! या असल्या बडबड्या पुरुषाना हल्लीच्या बायकाची स्वतत्र वृत्ती कशी सहन होणार ? तो म्हणाला की ' वूमन हॅज नो हार्ट ' पण मी म्हणतो की ' मॅन हॅज नो हार्ट बट वूमन हॅज ! ' खर बोलायच म्हणजे असल्या स्वतत्र वृत्तीच्या बायका पाहिल्या कीं, मला आनद होतो आणि मनाला खात्री वाटते की आम्ही बडबड्या पुरुषानी घालविलेले वैभव या स्वतत्र वृत्तीच्या बायकाच एक–ना–एक दिवस परत मिळवून आणतील ! वूमन काय, आणि मॅन काय, वृत्ति कशी स्वतत्र पाहिजे.

( इतक्यात मुली मधुकराला घेऊन येतात. )

**कमल**—मधुकरदादा, गुलाब मोटारीचा धक्का लागून इथच पडला ! ' अरे पळू नको, धावू नको ' म्हणून त्याला कित्ती सागितल पण तो जो धावत सुटला तो मोटारीचा धक्का लागून कोलमडून पडला !

**मधुकर**—( गृहस्थास ) काहो, इथ कुणी लहान मुलगा मोटारीचा धक्का लागून पडला होता का ? सागा लवकर, तो माझा लहानगा भाऊ आहे !

**देव०**—हो, पण त्याला मोटारवाल्या बाईन तत्काल डॉक्टरकडे नेल ! बाई मोठी मायाळू दिसली बर का ? तिच्या मोटारीचा नबर ( आठवून ) एम्. ५६७८ असावा अस मला स्मरत ! चला, आपण काढू ती बाई शोधून, मी तुम्हाला मदत करतो हवी तर !

**मधु०**—थॅंक यू ! मुलींनो, घरी जा बर का ? ( जातात. )

---

## प्रवेश २ रा

( वार–शनिवार–मारुतीचें देवालय–बाहेरील भाग दिसतो. भंपकराव दर्शन घेऊन बाहेर येतो. )

**भंपक०**—हरि विठ्ठल ! हरि विठ्ठल ! बजरंग बली की जय ! ( नाकाला शेंदूर लावून ) खरं म्हटलं तर मी खराखुराच भंपकराव आहें. माझ्यासारख्या गृहस्थाला काय करायच्या नसत्या भानगडी ? आणि खरं म्हटलं तर मी या मारुतीच्या किंवा त्या विठोबाच्या दर्शनाच्या भानगडींत पडणारा माणूस नव्हे, पण काय करणार ? या मारुतीचं दर्शन घेतल्याशिवाय मला चैनच पडत नाही. शिवाय, शनिवार उजाडला म्हणजे केव्हां एकदां मारुतीचं दर्शन घडेल असं मला होऊन जातें ! मारुतीरायाच्या कृपेनं इथ इतरहि पुष्कळ सुंदर सुंदर दर्शनें घडतात ! आणि म्हणून तर मला शनिवारची मारुतीची वारी चुकवितां येत नाहीं ! पण आज तें सुंदर दर्शन कां बरं घडत नाहीं ? ( पाहून ) ती पहा, त्या सुंदरीबरोबर नेहमीं येणारी मुलगीच आली, तिच्याजवळ काढावी बातमी !

**कमल**—( पूजेचें साहित्य हातांत घेऊन येते. ) *

**भंपक०**—अग मुली, काय बरं तुझं नांव ?

**कमल**—तुम्हांला काय करायचं आहे माझ्या नांवाशीं ? अनोळखी मुलीला नांव विचारणारे तुम्ही कोणी भंपकरावच दिसतां मला !

**भंपक०**—हो, मी भंपकरावच आहें. आतां तरी झाली ना माझी ओळख ! काय बरें तुझें नांव ? मला काय करायच्या नसत्या भानगडी म्हणा, पण म्हटलं इतक्या सुंदर मुलीचं गोड नांव ठाऊक असावं ! मी तुला दर शनिवारीं इथं मारुतीरायाच्या दर्शनाला येतांना पाहतों...

**कमल**—म्हणजे, मी मारुतीच्या दर्शनाला येतें तेव्हां तुम्ही माझ्या दर्शनाला येतां वाटतें ? धरा माझे पाय म्हणजे मीच मारुती बनून तुमच्या

---

**भावगीत** *

**प्रति शनिवारीं भज मनुजा हनुमंता ।। ध्रु० ।। भजनमोद देई चित्ता । हरुनियां भवाची चिंता ।। हनुमंत एक जगीं त्राता दे मंगल मति भगवंता ।। १ ।।**

टाळक्याला शेंदूर फांसल्यें ! चोंबडा मेला, म्हणे ‘ मुली, तुझ नाव काय ? ’ (वेडावते.) जळ्ळ तुझ नाव तें !

**झंपक०**—वाः हुशार आहेस–कस मला झणझणीत उत्तर दिलस पण ! मला असल्या चुणचुणीत मुली फार आवडतात ! बर, मुली ! तुझ नाव तुला माझ्यापासून लपवून ठेवायच असल तर खुशाल ठेव, पण तुझ्या बापाच नाव तरी तू मला सागशील कीं नाहीं ? ( स्वगत ) या मुलीन बापाच नाव सांगितल तर मिटलीच कटकट ! पण हिला जर बापाच नाव सागता आले नाही तर माझा तर्क खरा ठरल्याशिवाय मात्र राहाणार नाहीं ! ( उघड ) तुझ नाहीं तर निदान तुझ्या बापाच नाव तरी सागशील की नाही ? छेः, छेः, हल्लीच्या मुलींना इतकी लाज कामाची नाहीं !

( इतक्यात देवदत्त येतो व बाजूस उभा राहतो. )

**कमल**—मेल्या, मुलीनी तुझ्याइतक निर्लज्ज बनाव हीच की नाही तुझी इच्छा ? मला नाही ठाऊक बापाच नाव !

**झंपक०**—( स्व० ) अरेच्या, हिला हिच्या बापाच नाव ठाऊक नाही, अर्थात् माझा तर्क खरा ठरणार ! ( उघड ) बर, नाही बापाच नाव ठाऊक तर नाहीं. पण तुझ्या त्या–ती तुझ्याबरोबर नेहमी येते ती–तिच नाव तर ठाऊक आहे कीं नाहीं ! कोण बरें ती तुझी ?

**कमल**—कोण ? ती माझी चपाताई होय ? पण मेल्या, तुला काय करायच्या आहेत रे नसत्या भानगडी ? मी आपली जात्येंच कशी इथून ! (जाते.)

**झंपक०**—एरवी मला तरी काय करायच्या नसत्या भानगडी ? पण नसत्या भानगडी करता करता एक भानगड तरी आपोआप मिटली खरी ! तिच नाव चपाताई ! हिला वडिलाच नाव ठाऊक नाहीं, तेव्हा हिच्या चपाताईलाहि वडिलाच नाव ठाऊक नसणारच ! एकदरीत बरीच माहिती कळली ! आता त्या मुलीच्या घरीं राजरोसपणान जायला हरकत नाही !

**देवदत्त**—( पुढ होऊन व पाठीवर थापटी मारून ) वाः राजेश्री ! देवदर्शनाच्या निमित्तान बऱ्याच भानगडी उरकून घेता तर ? बाकी तुम्ही म्हणालांच कीं मला काय करायच्या नसत्या भानगडी म्हणून ?

**भंपक०**—( दचकून पहात ) हो, खरंच आहे तें ! मला काय करायच्या नसत्या भानगडी ? हो पण, परवां त्या मोटारॲक्सिडंटच्या गडबडींत तुमचं नांव विचारायचं मी विसरलों! आतां सांगा तुमचं नांव! अस्मादिकांचं नांव आहे भंपकराव!

**देव०**—आणि माझं नांव आहे देवदत्त ! पण कां हो भंपकराव, देवदर्शनाला येतां आणि याच भानगडी करीत बसतां का ? हें चांगलं नव्हे ! त्या मुलीचं नांव विचारून तुम्हांला काय करायचं आहे हो ?

**भंपक०**—मला काय करायचं आहे त्या चिमुरड्या पोरीच्या नांवगांवाशीं ? मला पाहिजे होती तिच्या चंपाताईची माहिती ! नाहीं नाहीं म्हणतां तीहि माहिती बरीच कळली म्हणा ! त्या मुलीला बापाचं नांव ठाऊक नाहीं या एकाच गोष्टीवरून मी सर्व कांहीं ताडलं बरं का ?

**देव०**—आणि मींहि सर्व कांहीं ताडलं !

**भंपक०**—काय ताडलंत हो तुम्ही ? बोला तर खरं !

**देव०**—मीं ताडलं कीं, तुम्ही एक पाजी गृहस्थ आहांत ! तुमच्या समाजांतील मुलींना बापाचं नांव ठाऊक नसावं यांत तुमच्यासारख्या गृहस्थाला आनंद वाटण्यासारखं तें काय आहे ? अहो, ही तर आमच्या समाजाला अत्यंत लज्जास्पद गोष्ट आहे.

**भंपक०**—पण तुम्हांला जी गोष्ट लज्जास्पद म्हणून वाटते तीच मला आनंदास्पद वाटते. ज्या मुलींना आपल्या बापाचं नांव ठाऊक नाहीं, त्यांच्याशीं ओळख पाडणं माझ्यासारख्या भंपकरावांना फार सोपं जातं !

**देव०**—काय पाजी आहांत हो ! चला, व्हा चालते इथून ! तुमच्यासारख्या पाजी माणसाचं तोंड पाहिलं तरीसुद्धां पाप लागेल !

**भंपक०**—मग त्यांत कुठं बिघडलं ? माझं तोंड पाहून पाप लागलं तर मारुतीरायाचं तोंड पाहून तें पाप धुवून टाका ! बाकी मला काय करायच्या नसत्या भानगडी ? मी हा जातों बापडा ! ( पाहून, स्वगत ) हो, ती पहा मघांची मुलगी चालली आपल्या घराकडे ! तिच्या पाठीमागून जावं म्हणजे तिच्या चंपाताईचा ठावठिकाणा तरी समजेल ! ( जातो. )

**देव०**—बस्स, झाला माझ्या मनाचा निश्चय! आता मी पतिता भगिनीच्या उद्धाराचच कार्य हाती घेणार आणि वेश्याच्या घरातील तरुण मुलींचीं मनें वळवून त्याना धर्मविहित ससाराचा राजमार्ग दाखविणार! वेश्यामध्यें लग्नाची चाल पडेल तर हळुहळु त्याच्या अनीतिकारक धद्याला आळाच बसेल! धर्मविहित लग्नबधन हाच पतिता स्त्रियाच्या उद्धाराचा खरा राजमार्ग होय!

**निसर्गराज**—( प्रवेशून ) का हो, देवदत्त? राजमार्गावर उभे राहून एवढा कसला विचार करता आहात?

**देव०**—राजमार्गाचाच विचार करतों आहें. आताच मी एक चमत्कारिक दृश्य पाहिल आणि मनाला वाईट वाटल! स्त्रियाच्या उद्धाराचा खरा राजमार्ग म्हणजे—

**निसर्ग०**—विवाहसस्था नष्ट करून स्त्रीपुरुषाना निसर्गाकडे पुनः खेचून नेणें हाच होय असें या निसर्गराजाच तरी ठाम मत आहे.

**देव०**—पण हें तुमच मत चुकीच आहे अस या देवदत्ताचे ठाम मत आहे. विवाहसस्थेंत योग्य त्या सुधारणा घडून आल्यान जर सर्व दर्जाच्या स्त्रीपुरुषाना सुखमय आणि प्रेममय ससाराचा लाभ मिळेल तरच हल्लींची अवनति थाबेल.

**निसर्ग०**—देवदत्त! तुम्हीच चुकत आहा. अहो, लग्न हेच तर सर्व विघ्नाचें मूळ आहे. लग्न नाही तर सुखात विघ्नहि नाहीं.

**देव०**—मग वेश्याच आयुष्य सुखात जात असेल असंच का तुम्हाला वाटत? वेश्या ह्या लग्नाच्या विघ्नापासून अलिप्तच राहिलेल्या नाहीत का? त्याना लग्नसस्काराचा लाभ मिळत नाहीं म्हणून त्याचें आयुष्य दुःखमय होत असं निदान मला तरी वाटत!

**निसर्ग०**—चुकता तुम्ही देवदत्त! काही स्त्रियाचीं लग्ने होतात आणि काहीं स्त्रियाची लग्नें होत नाहीत ही विषमताच वेश्याच्या दुःखी जीवनाच्या मुळाशीं आहे. लग्नसस्था नष्ट करा अस हा (पुस्तक काढून) गोरा तत्त्ववेत्ता मिस्टर स्टोनहार्ट ओरडून सागतो आहे! पहा.

**देव०**—तुम्हीच हें पुस्तक बद करून नीट डोळे उघडून आपल्या समाजाकडे पहा! तो तत्त्ववेत्ता स्टोनहार्ट आहे, तसे दगडी अतःकरणाचे आम्ही लोक नाही!

**निसर्ग०**—मग तुम्ही मिस् वॉटरलिली यांनीं लिहिलेला हा समाजशास्त्राचा नवा ग्रंथ वाचा. वॉटरलिली ही जुनी पुराणी विदुषी नाहीं. ती अगदीं आज-कालची, कालचीसुद्धां नव्हे, अगदीं अजची, १९३१ सालची कुमारी आहे. या १९३१ च्या कुमारीनें लग्नसंस्थेचा निषेधच केला आहे—पहा...

**देव०**—त्या गोऱ्या वॉटरलिलीचं अप्-टु-डेट तत्त्वज्ञान आमच्या समाजांतील शिकलेली आणि स्वतंत्र विचारांची एकहि कुमारी मान्य करणार नाहीं. आमच्या समाजांतील शिकलेल्या कुमारिका फार तर प्रीतिविवाहाची मागणी करतील. लग्नच नको असं या घटकेपर्यंत एकाहि कुमारीनं या देवदत्ताला सांगितलेलं नाहीं.

**निसर्ग०**—पण या निसर्गराजाला तसं अनेक कुमारींनीं सांगितलेलं असून त्या कुमारींच्या सहकारितेनं मी विवाहविध्वंसक मंडळ स्थापन केलं आहे. या मंडळाची अध्यक्षीणबाई मालती नांवाची अप्-टु-डेट विदुषीच आहे. मालतीबाई या स्वतःला 'कुमारी १९३१ or Miss 1931' असं म्हणवून घेतात. त्यांनीं आमच्या मंडळासाठीं अनेक कुमारी सभासद मिळविण्याचं काम जोरानं सुरू केलं आहे. पाहिजे तर एखाद्या दिवशीं मी तुमची व त्यांची गांठ घालून देईन.

**देव०**—आणि त्यांची व माझी गांठ पडली म्हणजे मीहि त्यांचं मन लग्नसंस्काराला अनुकूल करून घेईन. मीहि सुधारकच आहें पण लग्नसंस्था मोडून टाकण्याच्या मात्र विरुद्ध आहें. मी विधवाविवाह मानतों, प्रीतिविवाह मानतों. पण लग्न हें एक विघ्न आहे असं मात्र मानीत नाहीं!

**निसर्ग०**—लक्षांत ठेवा कीं हें १९३१ साल आहे, या सुधारलेल्या सालांत लग्नसंस्था हवी म्हणणाऱ्यांना खरे सुधारक कोण म्हणणार! १९३१ सालचा सुधारक लग्न नको असंच ठांसून सांगणार! पण या वादाचा निकाल मालती-बाईच्या भेटीअंतीं होणारच आहे, मग कशाला इथं डोकंफोड करीत बसा? एक दिवस तुमची व मालतीबाईची भेट झाल्यावर तुमचे सर्व संशय फिटल्या-शिवाय रहाणार नाहींत! चला. (जातात.)

---

## प्रवेश ३ रा

( स्थळ—बगीचा. मालती व मधुकर गुलाबला हातगाडीत बसवून घेऊन येतात.)

**मधुकर**—मालती, तू गुलाबला योग्य ते उपचार केलेस आणि म्हणूनच तो इतक्या लवकर बरा झाला. मालती, हे तुझे माझ्यावर आणि माझ्या लहानग्या भावावर उपकारच झाले आहेत. मी तुझे आभार मानतो.

**मालती**—छेः, छेः, मधुकर! मलाच उलट तुमचे आभार मानले पाहिजेत. गुलाबला धक्का लागला तो माझ्याच मोटारीचा ना? अर्थात् चूक झाली ती माझ्या हातून! मीच खरी अपराधी आहे. मलाच तुमची व तुमच्या लहानग्या भावाची क्षमा मागितली पाहिजे. मधुकर, तुम्हीच मला थोर मनान क्षमा करा.

### सौजन्यगीत

**विनति पदा मान्यवरा अवधारा ॥ ध्रु० ॥ होतें ना ध्यानि मनी। आले तें घडुनी। थोर मनें शांति वरा ॥ १ ॥**

**मधु०**—मालती, तू काही मुद्दाम गुलाबच्या अगावर मोटार घातली नाहीस! खरी चूक झाली असेल गुलाबच्याच हातून! मोठा दाडगोबा आहे तो! कोणाची खोडीच काढील, नाहीतर कोणाची चेष्टाच करील! त्यान त्या दिवशीं कुणाची काहीं थट्टामस्करी केली असेल आणि तो थट्टामस्करीच्या नादात रस्त्यावरून धावत सुटला असेल दुसर काय? मग असा धादरा मुलगा ॲक्सिडटमध्ये सापडला तर त्यात दुसऱ्याला दोष देण्यात काय अर्थ? चूक त्याच्याच हातून झाली अर्थात् त्याच्या वतीन मलाच तुझी क्षमा मागितली पाहिजे.

**मालती**—तें काही नाही, तुम्ही माझ्याकडून काहीतरी नुकसानभरपाई करून घेतल्याशिवाय माझ्या मनाच तरी समाधान होणार नाही. तुम्ही मागाल तें द्यायला मी तयार आहें.

**मधु०**—गुलाबच्या ॲक्सिडटच्या निमित्तान गेला आठवडाभर तुझा गोड सहवास मला लाभला हा माझा अकल्पित फायदाच झालेला आहे. असाच तुझा गोड सहवास मला कायमचा लाभेल तर मी स्वतःला धन्यच समजेन!

**माल०**—म्हणजे माझ्या मैत्रीची तुम्ही मागणी करतां हेंच ना ? हें घ्या वचन ! ( हातांत हात देऊन ) मधुकर, आजपासून मी तुम्हांला माझे परमप्रिय मित्र समजत्यें. मधुकर, आतां तरी झालं ना तुमच्या मनासारखं ? कीं आणखी कांहीं देऊं ?

**मधु०**—( स्वगत ) ही या वेळीं माझी कोणतीहि मागणी पुरी करायला कबूल झाली आहे, मग मी ही संधि साधून हिला मागणी घालूं का ?

**माल०**—मधुकर, इतका कसला विचार करतां ? मागा म्हटलं, मागावं ! ' मागा म्हणजे मिळेल ' हें तत्त्व तुम्हांला माहीत नाहीं वाटतें ? मी तुमच्यावर प्रसन्न झाल्यें आहे, वाटेल तें मागा ! एवढी साधी मागणी करायलाहि तुम्हांला इतका विचार पडावा ना ?

**मधु०**—पण माझी मागणी साधी नाहीं !

**माल०**—म्हणजे ! अशी कोणती कठीण मागणी तुम्ही माझ्याजवळ मागणार आहांत ?

**मधु०**—खरं सांगूं ? मी तुझ्याजवळ दुसरी एकादी मागणी न करतां तुला मात्र मागणी घालणार आहें. मालती, तूं माझी मागणी मान्य करशील का ? तूं माझ्याशीं लग्न करून माझी धर्मपत्नी होशील का ? मालती, मागा म्हणजे मिळेल म्हणून तूंच मला सांगितलंस ना ? आतां मला काय पाहिजे तें मी मागितलं, मग कां बरं अशी विचारांत पडलीस ?

**माल०**—कारण ही तुमची मागणी अविचाराची आहे. लग्न म्हणजे अविचार हें माझं ठाम मत आहे. मी विवाहविध्वंसक मंडळाची अध्यक्ष आहें. मी या जन्मांत तरी कोणाशीं लग्न करणार नाहीं. १९३१ सालची स्वातंत्र्य-वादी कुमारी कधींहि कुणाची पत्नी होणार नाहीं हें पक्कें ध्यानांत ठेवा !

## निर्धारगीत

**शुभ विवाह तो । अशुभ अजि गणा ॥ नव मत अतां माना ॥ ध्रु० ॥ व्यापी जगा स्वातंत्र्यं सारें । तेंच रुचतें मम मना ॥ करिं ना वृथा वल्गना ॥ १ ॥**

**मधु०**—असली विक्षिप्त मतें तुझ्यासारख्या विदुषीला शोभत नाहीत. मालती, तू विदुषी असून शिवाय विचारी आहेस. कोणाहि स्त्रीनं, अनुरूप वरानें केलेली लग्नाची मागणी नाकारण हा अविचारच होय. मी तुझा पति व्हायला योग्य नाही का ?

**माल०**—नाही, मुळींच नाही.

**मधु०**—का बरं ?

**माल०**—कारण तुम्ही मॅन आहात, पुरुष आहात ! मी कोणाहि पुरुषाची गुलाम होणार नाही. मी १९३१ सालची कुमारी आहे हे विसरू नका.

**मधु०**—पण मालती, तू जशी कुमारी आहेस तशीच 'वूमन' आहेस, कोणाहि स्त्रीला मनाचा असला कठोरपणा शोभत नाही ! वूमन म्हणजे

**गुलाब**—( गाडींतून उतरून व जवळ जाऊन ) वूमन म्हणजे बायको ! मधुभाऊ, ही वूमन म्हणजे बायकोच आहे ! भाऊ, ही बायको व्हायला कबूल नाहीं वाटत ?

**माल०**—मी नाही कुणाची बायको होणार ! बायको म्हणजे गुलाम !

**गुलाब०**—छे. छे., मालतीबाई, चुकता आहात तुम्ही ! बायको म्हणजे गुलाम नव्हे, बायको म्हणजे वूमन ! भाऊ, या मालतीबाई वूमन म्हणजे बायको व्हायला तयार नाहींत की काय ?

**मधु०**—नाही, गुलाब ! मालती बायको व्हायला तयार नाही.

**माल०**—मधुकर, मला या गोष्टीची फार चीड आहे. कुणी माझ्या लग्नाची गोष्ट काढली की, माझ्या तळपायाची तिडिक मस्तकाला जाऊन भिडते. मधुकर, हा विषय असा थट्टेवारी नेऊ नका. गुलाब, तू असा आजारी आणि गाडींतून खालीं का उतरलास ?

**गुलाब**—तुमच मॅन आणि वूमनच भांडण तोडायला ! मी आजारी आहे ना ? मग मला तिकडे गाडींत टाकून तुम्ही का इकडे एका बाजूला गुलगुल गोष्टी करीत बसलात ? मी नाही जा आजारी !

**मधु०**—अरे, तू आजारीच आहेस ! त्या दिवशीं मोटारीच्या धक्क्यानं तू बेशुद्ध पडला नव्हतास का ? डॉक्टर म्हणतात की, तुला जरी एकादी मोठी जखम झालेली नाहीं तरी तुझं हार्ट वुईक झाल आहे—तुझ्या हार्टला जपलं पाहिजे.

**गुलाब**—हार्ट म्हणजे काळीज! माझं काळीज चांगलं आहे. तुम्हीच आपल्या काळजाची काळजी घ्या!

**मधु०**—मालती, ऐकलंस ना गुलाब काय म्हणतो तें? तो हार्टची काळजी घ्यायला सांगतो आहे. एक तर तूं आपल्या हार्टची काळजी घे किंवा तें हार्ट मला देऊन टाक, मी घेईन त्याची काळजी!

**गुलाब**—मालतीबाई, द्या ना एकदां तुमचं हार्ट मधुभाऊला!

**माल०**—मी नाहीं कुणाला माझं हार्ट देणार आणि मी नाहीं कुणाची बायको होणार! बरं बाळ, आतां जास्त बोलण्याचे श्रम करूं नकोस आणि बैस गाडींत जाऊन!

**गुलाब**—वाहवा! म्हणजे तुम्हांला माझी अडचण झाली, होय ना? मी जातों बापडा, बसा तुम्हीच एका बाजूला गुल्गुल गोष्टी करीत! माझ्या आजारी-पणाच्या ढोंगानं जर तुमचा फायदा होत असेल तर मी तरी कशाला इतक्यांत बरा होऊं? पहा, भाऊ! मी आजारी पडायला जातों. तुमच्या गप्पागोष्टी संपल्या म्हणजे सावकाश घरीं या बरं का? (धांवत जाऊन गाडी ढकलीत नेतो.) *

**मालती**—अरे गुलाब! धांवूं नकोस असा! पडशील, थांब ना!

**मधु०**—अरे थांब, संपल्या आमच्या गप्पा बरं! (जातात.)

**पहिला अंक समाप्त**

---

---

## थट्टा-गीत *

**नाहिं मी अजारी आजारी। कां छळितां मज भारी॥ध्रु०॥ भाऊ येतो नाडी बघतो। म्हणतो तूं आजारी। मारी गप्पा मग बैसुनियां मालतिच्या शेजारीं॥ १ ॥ मालति येते तीहि म्हणते। बाळा तूं आजारी॥ तुमचें साधे काम जरी हो। पडतों मी आजारी॥ २ ॥**

# अंक दुसरा

-⊂∘⊃-

## प्रवेश १ ला

( **स्थळ**—बगीचा. निसर्गराज प्रवेश करतो. )

**निसर्ग०**—नको ते लग्न, कारण त्यात आहे विघ्न! विवाहविध्वसक मडळाची खास बैठक भरून लग्नाविरुद्ध जगी चळवळ करण्यासबधाचा ठरावहि पास झाला. मालतीबाईने आमच्या मडळात कुमारी सभासदाची भरती करण्याचे कार्य चालविलच आहे आणि ती अनेक कुमारिकाकडून 'लग्न करणार नाही' अशा शपथाहि घेववीत आहे. मी आहें त्या मडळाचा सेक्रेटरी, अर्थात् मलाहि कुमाराच्या सह्या गोळा केल्याच पाहिजेत. ( समोरून भपकराव येतो त्यास ) नमस्कार. तुमचं लग्न झाल का ?

**भंपक०**—नमस्कार ! तुमचा प्रश्न जसा चमत्कारिक, तस या भपकरावाच उत्तरहि चमत्कारिकच आहे. लग्न झाल अस तर मला म्हणावच लागेल, पण लग्नाची जबाबदारी मी मानीत नसल्यामुळ मला स्वतःला तें न झाल्यासारखच आहे. म्हणून तुमच्या प्रश्नाला हा भपकराव होकारार्थी आणि नकारार्थी असे दुहेरी किंवा दुटप्पी उत्तर देतो. बर, तुम्ही हा असा चमत्कारिक प्रश्न का केलात मला ?

**निसर्ग०**—कारण मला लग्नाविरुद्ध जगी प्रोपागॅंडा करावयाचा असून 'लग्न नको' अस म्हणणाऱ्या लोकाच्या सह्या गोळा करावयाच्या आहेत. करा या विवाहविध्वसक मडळाच्या प्रतिज्ञापत्रकावर सही ! मी निसर्गराज त्या मडळाचा मत्री आहें.

**भंपक०**—नाहीं, मला तुमच्या प्रतिज्ञापत्रकावर सही करता येत नाही. मी लग्न नको अस म्हणणारा नाहीं—लग्न असाव, पण लग्नाची जबाबदारी नसावी असं म्हणणारा मी आहें.

**निसर्ग०**—पण मी म्हणतों कीं, लग्नच नाहीं तर जबाबदारी तरी कुठून येणार ? लग्न नाहीं तर विघ्नहि नाहीं !

**देवदत्त**—( प्रवेशून ) पण मी म्हणतों कीं, तुमचं विघ्न या भंपकरावाच्या पाठीमागें कां ? त्यांचं तर लग्न झालेलं आहे !

**निसर्ग०**—पण लग्नाची जबाबदारी त्यांना नको आहे ना ? ते हळुहळु निसर्गाकडे धांव घेत आहेत ! निसर्गांत बायको नाही आणि निसर्गात पुढच्या मागच्या पिढ्यांचं विघ्नहि नाहीं. चला बंधूंनों, निसर्गाकडे चला ! मी अमक्याचा मुलगा, मी अमक्याचा नातू, अमुक माझा मुलगा आणि अमुक माझा नातू, या पिढ्यान्–पिढ्यांच्या भानगडी निसर्गांत नाहींत. म्हणून म्हणतों कीं बंधूंनों, निसर्गाकडे चला !

**भंपक०**—हो, हा तुमचा उपदेश जर तुम्ही, लग्नाच्या विघ्नापासून अलिप्त असलेल्या आपल्या वेश्यांना कराल तर बरं होईल ! हल्लीं वेश्यांमध्यें लग्नाचें वेड माजत चाललं आहे. नसत्या भानगडी करणाऱ्या या सुधारकांनीं प्रथम मुलींच्या शिक्षणाची ओरड केली. बरं, मुली शिकल्या तर त्यांच्यामागं आतां त्यांनीं लग्नें करा म्हणून टुमणं लावलं आहे.

**देव०**—आणि तेंच बरोबर आहे. वेश्यांच्या मुली धर्मविहित लग्नें करून संसार थाटूं लागतील तर आमच्या समाजाला लागलेला वेश्याव्यवसायाचा कलंक धुवून जाईल ! वेश्यांमध्यें धर्मविहित लग्नाची चाल पडणंच इष्ट आहे.

**भंपक०**—छेः, तुम्ही सुधारकांनीं फार अनर्थ केलात बुवा !

**निसर्ग०**—अहो, हे देवदत्त कसले सुधारक ? हे जुनेपुराणे बुरसलेले सुधारक ! यांची मजल प्रौढविवाह, प्रीतिविवाह, विधवाविवाह आणि वेश्याविवाह यापलीकडे जाणं शक्य नाहीं. हे बुरसलेले सुधारक अजून विवाहाच्या कोंडाळ्यांतच धडपडताहेत ! १९३१ साली यांना सुधारक म्हणणं म्हणजे नवयुगाचा अपमान करण्यासारखं आहे. १९३१ सालचे सुधारक देवदत्तासारख्यांना सुधारक म्हणायला तयार नाहींत ! ‘ निसर्गाकडे चला ’ हा नवयुगाचा महामंत्र ज्याला माहीत नाहीं तो कसला सुधारक ?

**भंपक०**—पण मला तुम्ही दोघेहि पक्के सुधारकच वाटतां ! वेश्यांच्या मुलींना शिक्षण देऊन त्यांना लग्नें करावयास सांगणारे देवदत्त हेहि सुधारक आणि गृहस्थांच्या मुलींना लग्नापासून परावृत्त करणारे तुम्ही निसर्गराजहि सुधारकच ! तुम्हां दोघांत

फरक इतकाच कीं, एक पीठा दगड तर दुसरा काळा फत्तर ! बाकी मला काय करायच्या नसत्या भानगडी ? मला तुम्हा दोघांचाहि उपयोग नाही.

**निसर्ग०**—छे', छेः ! चुकता तुम्ही भपकराव ! मी तुमची डिफिकल्टी सॉल्व्ह करून देतों. बोला तुमची डिफिकल्टी !

**भंपक०**—बोला, चपावतीला खेचून नेता का निसर्गाकडे ? ती वेश्येची मुलगी असून सुद्धा लग्नाचा छंद घेऊन बसली आहे.

**देव०**—आणि तेच बरोबर आहे ! पतिता स्त्रियाची उन्नति पवित्र लग्न-सस्कारानच होईल !

**निसर्ग०**—अहो भपकराव, हा देवदत्त पागल आहे, त्याच्या काय नादी लागता ? मी तुम्हाला मदत करतो आणि चपावतीला निसर्गाकडे खेंचून आणतों. लग्नान उन्नति होते हे १९३१ साली तरी कोणी मान्य करणार नाही. चला भपकराव ! याच्या नादी काय लागता ?

**भंपक०**—चला तर ! (स्व०) बाकी, त्या चपावतीपुढ या निसर्गराजाचीहि डाळ शिजण शक्य नाही. ती चपावती वेश्या-कुमारी असली तरी शिकलेली आहे, आणि ' दीज शिकलेल्या बायका हॅव नो हार्ट ' हें तर माझ ठाम मत आहे.

**निसर्ग०**—दवदत्त, बसा चुरमुरे खात ! मी लग्ने मोडणार हे लक्षात ठेवा.

**देव०**—आणि मी लग्ने जोडणार हे तुम्हीहि लक्षात ठेवा ! (ते गेल्यावर) हा बदमाष भपकराव चपावतीला कुमार्गाला लावण्याची खटपट करीत आहे काय ? ठीक आहे, आपण आपल्या प्रयत्नाची शिकस्त करून त्याचा व्यूह ढासळून पाडला पाहिजे. ( जातो. )

( दुसऱ्या बाजूने मालती व चपावती येतात. )

**माल०**—चपावती, आज तरी मी तुझ्या घरी येणारच ! मला तू नको का म्हणतेस तेच माझ्या ध्यानीं येत नाही. तू माझी जिवलग मैत्रीण नाहीस का ?

**चंपा०**—मालती, तू माझी मैत्रीण होतीस आणि आहेसहि—पण मी तुला माझ्या घरी कशी घेऊन जाऊ ?

**माल०**—का बर ? माझे पाय लागले तर तुझ घर अपवित्र होईल वाटत ?

**चंपा०**—उलट तूं पायधूळ झाडलीस तर माझं अपवित्र असलेलं घर पवित्रच होईल पण...

**माल०**—पण काय ? सांग, मला सर्व हकीगत सांग. माझ्यापासून कांहींहि लपवून ठेवूं नकोस ! चंपावती, मैत्रिणीपासून खऱ्या गोष्टी लपवून ठेवणं तुला तरी बरं दिसतं का ?

## स्नेहगीत

**कां सत्य लपविसी तें । मी स्नेह दिला गे ॥ तुजला ॥ कां दीप राही तिमिरीं । त्या स्नेह दिला गे ॥ जरि त्या ॥ ध्रु० ॥ मानितें तुला भगिनी । हृदयीं स्थान दिलें गे ॥ तुज मी ॥ कां बोल अबोला । धरिसी ॥ १ ॥**

**चंपा०**—मालती, या वेळीं तरी मला अधिक आग्रह करूं नकोस. आज माझ्यावर कांहीं भलतंच संकट येण्याचा संभव आहे, त्या संकटांतून मी निभावल्यें तर तुला मी खात्रीनं घरीं घेऊन जाईन !

**माल०**—असं कोणतं संकट आज तुझ्यावर येणार आहे ?

**चंपा०**—त्या संकटाचा नुसता उच्चारहि माझ्यानं करवत नाहीं. बरं, पण तें राहूं दे. मी एक गोष्ट तुला विचारूं का ? होय म्हणत असशील तर विचारतें.

**माल०**—हो, हो, वाटेल ती गोष्ट विचार. माझ्याशी दुजा भाव धरूं नकोस ! बोल, काय तूं मला काय विचारणार आहेस ?

**चंपा०**—मालती, माझ्यावर येणाऱ्या संकटांतून सुटण्यासाठीं मी जर कधीं तुझ्या चरणांचा आश्रय घेतला तर तूं मला दूर लोटणार नाहींस ना ?

**माल०**—चंपा, काय हें असं वेड्यासारखं विचारतेस ? चंपा, वाटेल त्या वेळी तूं माझ्याकडे ये, मी तुला माझी प्रिय भगिनीच समजत्यें.

**चंपा०**—पण मी तुझ्या घरीं राहिल्यानं तुझ्या घरच्या मंडळीचा तुझ्यावर रोष तर होणार नाहीं ना ? नाहीं तर करायला जाईन एक आणि व्हायचं आपलं भलतंच !

**माल०**—छे:, तसला संशय सुद्धां मनांत आणूं नकोस. तूं काय म्हणतेस आणि तूं कोणत्या संकटांत आहेस हें थोडंसं माझ्या लक्षांत येऊन चुकलं आहे. माझं घर हें सुधारक कुटुंबाचं घर आहे, माझ्या घरांत भेदभाव मुळींच पाळला

जात नाही. सुप्रसिद्ध सुधारक रावबहादुर मानधन याच्या पोटी मी जन्म घेतला असून नवविचाराच्या बाबतींत तर मी वडिलाच्याहि पुढें गेल्ये आहें. माझे वडील विधवाविवाह, प्रौढ विवाह इ. इ. वैवाहिक भानगडींतच गुरफटलेले होते पण मी त्याच्यापुढ एक पायरी गाठली असून विवाहसस्थाच नष्ट करण्याची प्रतिज्ञा केली आहे. विवाहाच्या चालीमुळें समाजात भलभलते भेदभाव निर्माण होतात आणि उच्च आणि नीच असला जातीजातीचा तटा माजतो. मी स्वत. लग्न न करण्याचा निश्चय केला असून विवाहसस्थेचा नायनाट करण्यासाठीं मी विवाहविध्वसक मडळ काढल आहे. तूसुद्धा आमच्या मडळाची सभासद हो. विवाहसस्था नष्ट झाल्यान स्त्रियाची गुलामगिरीहि नष्ट होईल. लग्नबधनामुळ, स्वतत्र असलेली स्त्री आपल्या पतीची गुलाम होते. चपावती, तू सुद्धा लग्न न करण्याची शपथ घे.

**चंपा०**—मालती, सुधारलेल्या विचाराच्या बाबतीत मला तुझ्याइतक पुढ जाता येत नाहीं. मी शक्य तोवर लग्न करण्याचाच निश्चय केला आहे. पवित्र लग्नसस्कारामुळ माझ्या अमगल कुलाला पावित्र्यच येईल. पण हे पहा मालती, मी जर कधी तुझ्या आश्रयाला येऊन राहिल्ये तर मात्र तुझ्या सतोषासाठीं मी जन्मभर कुमारीच राहीन—मी तुझ्या शब्दाबाहेर जाणार नाही.

**माल०**—इतक कबूल केलस तरी मला पुरे आहे. मी १९३१ सालची कुमारी आहे, तूहि तशीच हो.

**चंपा०**—बर तर जात्ये मी ! हो, पण सकटकाळी तुझ्या चरणाचा आसरा मी घेऊ ना ?

**माल०**—अस पुनः पुनः काय विचारतेस ? केव्हाहि अगदीं निर्धास्त मनान माझ्या घरी रहावयाला ये. तू माझी पाठची बहीणच आहेस, मग तर झाल ना !

**चंपा०**—आणि मालती, तूहि माझी थोरली बहीणच आहेस. प्रसग पडला तर मीहि तुझाच कित्ता गिरवीन ! बर येत्ये तर ! ( जाते. )

**माल०**—किती प्रेमळ मुलगी आहे ही ? पण तिच्या प्रेमळपणाची किंमत आमच्या निर्बुद्ध आणि वठून गेलेल्या समाजाला मुळीच वाटत नाही. तिच्या आईबापानी कदाचित् समाजान घालून दिलेला लग्नबधनाचा गुलामगिरीचा मार्ग आक्रमिला नसेल आणि म्हणूनच तिला आमचा समाज हीन

दर्जाचा समजत असेल ! आमच्या समाजांत एकाचें लग्न होतें आणि त्याच्या मुलाबाळांना उच्च दर्जा मिळतो आणि दुसऱ्याचं लग्न झालेलं नसतं म्हणून त्याच्या मुलांना हीन दर्जा प्राप्त होतो. हा उच्चनीचपणा घालविण्याचा एकच उपाय म्हणजे...

**मधुकर**—( गुलाबसह प्रवेशून ) सर्वांना लग्नसंस्काराचा धर्ममार्ग खुला करून देणें हाच होय. मालती, मी तुम्हां दोघींचं भाषण दुरून ऐकलं आणि म्हणून मी तुला स्पष्ट सांगतों कीं, विवाहसंस्था नष्ट करण्यासंबंधाचे सर्व वेडगळ विचार सोडून दे आणि लग्नसंस्कारांत योग्य त्या सुधारणा घडवून आणून समाजाला उन्नतीचा योग्य मार्ग दाखव. भलभलते कल्पित आणि अकल्पित भेद नष्ट झाले आणि सर्वांना प्रीतिविवाहाचा सन्मार्ग खुला झाला तर समाजाला अधिक सौख्याचे दिवस दिसणार नाहींत का? पवित्र लग्नबंधनामुळं समाजाची अवनति होईल असं तुला कां वाटतें तेंच मला समजत नाहीं.

**माल०**—आणि तें तुम्हां पुरुषांना समजणारहि पण नाही ! कारण अजून शिकलेल्या स्त्रिया सुद्धां लग्नाची शृंखला अडकवून घेऊन स्वतः तुमच्या गुलाम व्हावयाला तयार होत आहेत. लग्न झालं कीं, स्त्रीचं स्वातंत्र्य नष्ट झालं असं खुशाल समजावं ! मधुकर, तुमचीं मतें आतां जुनीं पुराणीं आणि त्याज्य झालीं आहेत. आतां १९३१ साल उजाडलं आहे हें विसरूं नका आणि मला लग्नाचा उपदेश करण्याच्या भानगडीत पडूं नका. मी तुमची मित्र असल्यें तरी तें मित्रत्व दृढ करण्यासाठीं मी स्वतःच्या गळ्यांत लग्नाची शृंखला कधींहि अडकवून घेणार नाहीं.

**मधु०**—मग मी गुलाबला बरोबर घेऊन घरी जाऊं ना ? तूं नाही ना येत माझ्या घरीं ? तूं माझ्याशीं लग्न केलं असतंस तर मी सुखी झालों असतों. तुझा सहवास न लाभल्यामुळें आतां माझं आयुष्य दुःखांतच जाणार हें तूं लक्षांत ठेव म्हणजे झालं ! जाऊं ना मी गुलाबला घेऊन? ठीक आहे तर, तुझं मौन हीच तुझी संमति असं समजून मी घरीं जातों. चल गुलाब, आपण आपल्या घरीं जाऊं !

**गुला०**—पण भाऊ, मालतीबाई कां नाहीं तुझ्याबरोबर येत ? त्यांच्याशिवाय तुला घरीं चैन पडेल का ?

**मधु०**—चैन पडणार नाहीं हें तर खरंच ! पण काय करायचं ? माझ्या सहवासांत दुःख होईल अशी त्यांना भीति वाटते.

**गुला०**—का भाऊ ? त्याना का बर तुझी भीति वाटते ? तू मालतीबाईना राग भरशील होय ?

**मधु०**—नाही बाळ, मी त्याना मुळींच राग भरणार नाही, उलट मी त्याची प्रत्येक आज्ञा मानीन आणि त्याच्या सुखासाठीं मी स्वतःचा प्राणहि देईन.

**मधु०**—मालतीबाई, भाऊ तुमच्या सुखासाठी स्वतःचा प्राण सुद्धा द्यायला तयार आहे मग तुम्ही त्याचा प्राण का घेत नाही ?

**माल०**—बाळ, तुझे मधुभाऊ पुरुष आहेत, अत्ता असच गोडगोड बोलतील पण एकदा मी त्याच्याशी लग्न केल म्हणजे मग तेच माझा प्राण घ्यायलाहि कमी करणार नाहीत ! बाळ, तुझ्यामुळ माझे थोडे दिवस सुखात गेले आणि म्हणून तुला निरोप देताना मला फार दु.ख होत आहे. पण काय करू ? गुलामगिरीचा हीन मार्ग टाळण्यासाठी मला हे दुःख सहन केलच पाहिजे.

**गुला०**—मग मालतीबाई, मी असच करतो. माझ्या मधुभाऊला सुखाचे दिवस दिसावे म्हणून मी तुमच्या घरीं वाटेल तितके दिवस आजारी पडायला तयार आहे. मालतीबाई, लौकरच माझ्या अगावरून मोटार नेऊन मला आजारी पाडा बर का ?

**मधु०**—गुलाब, खुळा आहेस तू ! तू पुनः आजारी पडूहि नकोस आणि मला तसल सुख देऊहि नकोस. मालती, आम्ही जातो. तुला आमच्यामुळ इतके दिवस तसदी पडली त्याबद्दल आम्हाला क्षमा कर चल गुलाब, जाऊ आपण आपल्या घरी !

**गुला०**—बर चल तर ! मालतीबाई, मी जातो पण लौकरच आजारी पडून तुमच्या घरीं रहायला येईन बर का ? ( जातात. )

**माल०**—किती चागली, किती सुशील आणि किती प्रेमळ माणस आहेत ही ! त्याच्या सहवासात मी खरोखरच स्वर्गसुखाचा अनुभव घेत होत्ये, पण यापुढ लग्नाची शृखला गळयात अडकवून घेतल्याशिवाय मला ते सौख्य मिळण शक्य नाहीं. मधुकराचा सहवास मलाहि हवासाच वाटतो पण मी मधुकराची विवाहित पत्नी झाल्ये तर त्याची गुलाम होणार नाहीं का ? पण छेः, मला असल्या दुबळ्या विचाराना माझ्या मनात थारा देता कामा नये. असल्या विचारानी माझीं ठाम मते पालटतील की काय अशी सुद्धा मला भीति वाटू लागली आहे.

मधुकर प्रेमळ आहेत, सुशील आहेत आणि माझे जन्माचे मित्र व्हायलाहि योग्यच आहेत पण म्हणून मी त्यांची पत्नी होऊं का ? एकदां लग्न होऊन मी स्वतःला त्यांची पत्नी म्हणवून घेऊं लागल्यें म्हणजे माझ्या स्वातंत्र्याला आळा पडल्याशिवाय राहणार नाहीं. मी दुबळ्या विचारांना बळी पडणारी जुन्या वळणाची स्त्री नाहीं. मी १९३१ सालची, अगदीं नव्या विचारांची कुमारी आहें, मला लग्नामुळं प्राप्त होणाऱ्या गुलामगिरीचे कुविचार टाकलेच पाहिजेत ! काय वाटेल तें होवो, मी आपलं मन स्वातंत्र्याच्या निश्चयापासून कधींहि ढळूं देणार नाहीं.

## निर्धारगीत

**मळवुं कां शीला । मंगला । त्यजुनी धीरा ॥ ध्रु० ॥ प्रेम वदे सोडीं व्रीडा । व्रीद वदे साहीं विपदा । सोडुं काय नवमतछंदा । विवश होउनी अविचारा ॥ १ ॥**

**देवदत्त**—( प्रवेशून ) नमस्कार, मालतीबाई !

**माल०**—नमस्कार. आपण कोण ? आपलं कांहीं काम आहे का माझ्याशीं ?

**देव०**—माझं नांव देवदत्त. तुमच्या विवाहविध्वंसक मंडळाचे मंत्री श्रीयुत निसर्गराज यांनीं मला तुमच्या भेटीला पाठविलं आहे.

**माल०**—काय काम आहे आपलं ?

**देव०**—मला तुमच्याजवळ एक भिक्षा मागावयाची आहे.

**माल०**—म्हणजे, आपण कुठल्या सार्वजनिक संस्थेसाठीं वर्गणी मागायला आलां आहांत वाटतं ?

**देव०**—सर्व समाजाच्या कल्याणासाठीं मी आपल्याजवळ वर्गणीच मागायला आलों आहें पण ती द्रव्याची नसून मतांची आहें.

**माल०**—मतांची वर्गणी ? हें मी आज नवंच ऐकल्यें आहें. माझीं मतें प्रसिद्धच आहेत आणि समाजाच्या कल्याणासाठींच स्वार्थत्यागपूर्वक मी त्या मतांचा संभाळहि केलेला आहे. माझीं मतें......

**देव०**—तुमचीं मतें समाजाचं कल्याण करणारीं नाहींत. तुमच्या मतांचा प्रसार झाला तर समाजावर दुःखाचा पर्वतच कोसळेल. म्हणून म्हणतों, आपलीं

नवी मते सोडा आणि समाजाच शाश्वत कल्याण करणारी समतोल मते अगिकारा. एवढी भिक्षा तुम्ही मला घालणार नाही का ?

**माल०**—ही काय भलतीच भिक्षा मागता बर ? माझी निश्चित झालेली नवमतें मी तुमच्या आग्रहास्तव सोडणच शक्य नाहीं. दुसरी वाटेल ती मागणी करा पण माझीं मते पालटावयास मला सागू नका.

**देव०**—पण मालतीबाई, लग्नसस्काराविरुद्ध असलेली तुमचीं मतें जर समाजाच अकल्याण करीत असतील तर ?

**माल०**—तें शक्य नाहीं. माझ्या मतानी समाजाच कल्याणच होईल हे पक्के लक्षात ठेवा. लग्नाच्या शृखलामुळच आमचा समाज गुलामगिरीत खितपत पडलेला आहे. लग्नसस्काराचा नायनाट झाला तरच आपल्या समाजातील स्त्रीपुरुषाना पूर्ण स्वातत्र्याचा उपभोग घेता येईल.

**देव०**—मालतीबाई, प्रौढविवाहाची सुधारणा मागा, प्रीतिविवाहाची सुधारणा मागा, विवाहसस्कारातसुद्धा योग्य ती सुधारणा मागा पण लग्नसस्काराचा नायनाट करण्याच्या विध्वसक कार्याला हात घालू नका. वेश्याच्या उद्धारासाठी मोठमोठ्या नामाकित सुधारकानी लग्नाचाच राजमार्ग सुचविलेला नाहीं का ? आपले वडील रावबहादुर मानधन याची सुधारलेलीं मतेसुद्धा लग्नाच्या विरुद्ध नव्हती !

**माल०**—पण तो जुना काळ आता काढून काय उपयोग ? आज जगावर सामाजिक विचाराची भयकर क्राति होत असून १९३१ सालाने लग्नसस्काराविरुद्ध बड पुकारले आहे. मीहि आधुनिक काळातील बडखोर कुमारी आहे. उगाच कशाला शीण घेता ? मी माझे विचार पालटण शक्य नाही.

**देव०**—पण मला वाटत की, योग्य विचाराती तुम्हाला, समाजाच्या शाश्वत कल्याणासाठी तरी तुमची मतें बदलावी लागतील. लग्नसस्काराचा आधार नसल्यामुळे पतिता स्त्रियावर मोठा घोर प्रसग ओढवलेला आहे

( इतक्यात मधुकर, गुलाब, चपावती व कमल प्रवेश करतात. )

**मधु०**—मालती, तुझी मैत्रीण चपावती घोर प्रसगात सापडली आहे, तिला आसरा दे.

**चंपा०**—( मालतीचे पाय धरून ) मालती, मला आपल्या घरीं घेऊन चल, मी कमलसह तुझ्या आश्रयाला आल्ये आहें.

**कमल**—मालतीबाई, मला तुमच्या घरीं न्या. मला हरिणीताईकडे पाठवूं नका—ती दुष्ट आहे, तिनं माझ्या चंपाताईचा छळ चालविला आहे. हरिणीताई आली तर चंपाताईला झोडपून काढील !

**माल०**—उठा, भिऊं नका. मी तुम्हांला माझ्या घरांत आसरा द्यायला तयार आहें. मधुकर, चंपावती कोणत्या संकटांत सांपडली होती ?

**मधु०**—मालती, मी तुझा निरोप घेऊन खिन्न मनानं हळू पावलांनीं गुलाबसह घरीं चाललों असतां वाटेंत एका घरांतून रडण्याचा सूर ऐकूं आला व मी त्या घराशीं थबकलों. थोड्या वेळानं त्या घरांतून आरडाओरड ऐकूं येऊं लागली. मी तत्काल गुलाबसह त्या घरांत शिरलों तों एक बाई चंपावतीला मारझोड करीत असून एक बदमाष माणूस तिला मदत करीत असल्याचं मला आढळलं. मी तत्क्षणीं त्या बदमाषाच्या कमरेंत लाथ मारून त्याला दूर लोटलं.

**गुला०**—मालतीताई, मधुभाऊनं त्या बदमाषाला अशी जोराची लाथ मारली म्हणतां कीं यंव ! तो दाण्‌दिशीं भिंतीवरच जाऊन आदळला ! मग मींसुद्धां काय केलं सांगूं का ? त्याला असा बडवला की कांही विचारूं नका. तो मोठमोठ्यानं ओरडत सुटला बघा ! होय ना ग कमल ?

**कम०**—होय गुलाब ! एकदां मागं मीसुद्धां एका चावऱ्या कुत्र्याच्या टाळक्यांत सोटा मारून त्याला असंच रडविलं होतं !

**माल०**—शाबास बाळांनों ! मधुकर, मग पुढं काय झालं ?

**मधु०**—मग मी हरिणीबाईच्या हातांतून काठी हिसकावून घेतली आणि चंपावतीच्या सांगण्याप्रमाणं तिला कमलसह तुझ्याकडे घेऊन आलों.

**देव०**—पण हरिणीबाई चंपावतीला कां मारीत होती ?

**मधु०**—तिच्या अनीतीच्या धंद्यांत ही सामील होईना म्हणून !

**माल०**—अगबाई, म्हणजे, चंपावती ! तुझी बहीण इतकी दुष्ट आहे तर ? म्हणूनच वाटतं तूं मला घरीं नेत नव्हतीस ती ?

**चंपा०**—मालती, तुझ्यासारख्या पवित्र देवतेला मी तिथल्या नरकांत घेऊन जाणं कसं शक्य होतं ? माझी बहीण प्रत्यक्ष जखीण आहे. ती अनीतीच्या धंद्यावर आपलं पोट जाळते. तिनं मलाहि तसला नीच धंदा करावयास सांगितलं,

पण मीं ते माफ नाकारल. तिच्या मदतीला एक कोणसा बदमाष भपकराव आला आणि त्या दोघानी माझा छळ माडला. मालती, मला आणि कमलला आता तुझ्या चरणाशिवाय दुसरा आधार राहिलेला नाही. तो भपकराव माझ्यावर अजूनहि आणखी एकाद सकट आणल्याशिवाय राहणार नाही.

**देव०**—बाई, घाबरू नको, आम्ही सर्वजण तुझ रक्षण करू आणि तुला वाटेल त्या सकटातून सोडवू !

**चंपा०**—मग मी तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाहीं.

( इतक्यात भपकराव व हरिणी फौजदारासह प्रवेश करतात. )

**भंपक०**—विसर ती गोष्ट आणि मुकाट्यान फौजदारसाहेबाच्या स्वाधीन हो. फौजदारसाहेब, ती चपा हरिणीबाईकडे चोरी करून इकडे पळून आली आहे.

**चंपा०**—नाही, फौजदारसाहेब, मी मुळीच चोरी केली नाही—हा बदमाष खोट सागतो.

**कमल**—फौजदारसाहेब, या बदमाषाला चोपून काढा म्हणजे पुनः हा खोट बोलणार नाही

**गुला०**—याची खोड मोडायला फौजदारसाहेब कशाला पाहिजेत ? ( फौजदाराच्या हातातील काठी घेऊन ) मीच याची पाठ फोडून काढतों. ( मारावयास धावतो. )

**फौज०**—( त्याला दूर करून ) बाळ, तू शूर आहेस बर ! पण तुझा शूरपणा या वेळीं नको दाखवूस ! वेळ आली म्हणजे मी तुला हाक मारून नेईन बर का !

**गुला०**—हाक माराल ना पण मला ? नाहींतर विसराल आयत्या वेळीं !

**कम०**—आणि गुलाब, तू या नीचाची खोड मोडावयास निघालास म्हणजे मी तुझ्या हाती चुलीतल जळक लाकूडच आणून देईन बर का ?

**फौज०**—मुलानो, तुम्ही थोडी गप्प बसा. मला सारी नीट चौकशी केली पाहिजे.

**हरिणी०**—चौकशी कसली करता फौजदारसाहेब ? या चपीन माझे दागिने चोरले हो, दागिने चोरले ! माझ वाटोळ केल सटवीन ! ( रडते. )

**फौज०**—गप्प बसा तुम्ही ! मी मालतीबाईनाच विचारतो. मालतीबाई, ही कोण आहे तुमची ?

**माल०**—ही माझी मैत्रीण आहे.

**फौज०**—मग तिला माझ्या स्वाधीन करा; मी तिला पकडून घेऊन जातों.

**देव०**—हिला काय म्हणून पकडतां तुम्ही ?

**फौज०**—तिच्यावर चोरीचा आरोप आहे म्हणून !

**देव०**—खोटी गोष्ट आहे. ही चंपावती माझी पत्नी आहे. ती या नीच वृत्तीच्या हरिणीसारखी अनीतीच्या धंद्यावर उपजीविका करीत नाहीं. हरिणी आणि भंपकराव यांसारख्या नीच माणसांच्या शब्दावर विश्वास ठेवून तुम्ही माझ्या पत्नीला गिरफदार करूं नका. पति या नात्यानं मी तिला जामीन राहतों.

**फौज०**—काय, ही तुमची पत्नी आहे ? मग मी बोलावीन त्यावेळीं तुम्ही हिला कचेरीत हजर कराल का ?

**देव०**—हो, अवश्य करीन.

**भंपक०**—फौजदारसाहेब, हा देवदत्त निव्वळ खोटं बोलतो आहे.

**हरिणी०**—फौजदारसाहेब, ती चंपी माझ्यासारखीच आहे.

**फौज०**—गप्प बैस, बदमाष कुठली ! स्वतः नीच धंदा करून लग्नाच्या बायकोवर आळ घेतेस ? तुझ्यासारख्या वेश्येच्या शब्दावर विश्वास ठेवून मी एका सद्‌गृहस्थाच्या धर्मपत्नीला गिरफदार करणें शक्य नाहीं.

**भंपक०**—अहो पण असं काय करतां फौजदारसाहेब ?

**फौज०**—वेश्येचा साथीदार तूं ! तूंहि बदमाषच असला पाहिजेस. असं असलं तरीहि मी तुमची फिर्याद दाखल करून घेतल्यावर योग्य ती चौकशी करीनच ! चला चौकीवर आणि आपली लेखी फिर्याद दाखल करा. देवदत्त, ही तुमची धर्मपत्नी आहे आणि म्हणून तूर्त बचावली ! पण हें पहा, मी पुनः चौकशीला येईन बरं का ? मालतीबाई, तुम्ही या सर्व हकीकतीला साक्षी आहांतच !

**भंपक०**—अहो पण ही देवदत्ताची पत्नी...

**फौज०**—बोलूं नकोस जास्ती ! चल या हरिणीला घेऊन चौकीवर ! (जातात.)

**चंपा०**—(देवदत्ताचे पाय धरून) महाराज, तुम्ही मला प्रत्यक्ष देवच भेटलांत !

**देव०**—( स्व० ) देवा, मी चांगल्या उद्देशानेंच खोटं बोललों याबद्दल तूं मला क्षमा कर. ( सर्व आश्चर्यचकित होतात. )

**पडदा**

# अंक तिसरा

## प्रवेश १ ला

( **स्थळ**—देवदत्ताचे घर. चपावती तादूळ निवडीत बसली आहे. )

**चंपा०**—ससारसुखाची चव काही अजब आहे खरी ! माझ्यावरच सकट टळाव म्हणून देवदत्तानी कृपालु होऊन नवरेपणाच लटक सोंग घेतल आहे तर मला इतका आनद प्राप्त झाला आहे आणि ते जर माझे खरेखुरेच लग्नाचे पतीच झाले तर ? तर काय ? माझ्या आनदाला पारावारच उरणार नाही. त्यानी माझ्याशीं लग्न केले तर मी त्याची प्रेमाची बटीक होऊन राहीन ! मालतीबाईना लग्नाची भीति वाटते पण मला नाही तशी भीति वाटत ! जिथ प्रेम नाही तिथ कदाचित् लग्न म्हणजे गुलामगिरी अस वाटत असेल पण जिथ प्रेम आहे तिथ कसली गुलामगिरी ? देवदत्त जर माझे प्रेमाचे पतिदेव व्हायला तयार झाले तर मी तरी का त्याच्या प्रेमाची दासी होऊ नये ?

**मधुकर**—( प्रवेशून ) हे पहा चपावती ! तू खुशाल देवदत्ताच्या प्रेमाची दासी हो. देवदत्त तुझ्या प्रेमाचे दास झाल्याशिवाय राहणार नाहींत. पण नूर्त तरी मी स्वत. तुझ्या प्रेमाचा दास व्हायला तयार आहे.

**चंपा०**—( रागावून ) मधुकर, काय बोलता हे भलतच ? मी वेश्येच्या पोटी जन्माला आल्ये असल्ये तरी मी वेश्याव्यवसायाला नरकाप्रमाण मानत्ये. मधुकर, तुम्ही मालतीवर प्रेम करता ना ?

**मधु०**—पण ती नाही ना माझ्यावर प्रेम करीत ?

**चंपा०**—खोटी गोष्ट आहे. ती तुमच्यावरच मनापासून प्रेम करत्ये आणि तुम्ही थोडा धीर धरलात, तर ती तुमच्याशीं लग्न लावून तुमची प्रेमाची धर्मपत्नी म्हणून सुद्धा मिरवील ! धीर धरा, असला भलताच उतावळा वेडेपणा करू नका.

**मधु०**—चपावती, माझ खर प्रेम मालतीवरच आहे पण तिच्या मनात मत्सराची भावना उत्पन्न व्हावी म्हणून मी हें तुझ्यावरील प्रेमाच खोट सोंग

आणलं आहे. हें पहा, मालती इथं बाहेरच्या बाजूस कुणाशीं बोलत उभी आहे. ती आतां इतक्यांत तुझ्या भेटीला येईल. ती आली म्हणजे तिच्या दृष्टीला तुझ्यामाझ्यामधील खोट्या प्रेमाचं दृश्य दिसलं पाहिजे, म्हणजे तिच्या मनांत मत्सराची प्रेमळ भावना उत्पन्न होईल आणि माझ्या प्रेमाचं काम साधेल ! मत्सरामुळंच प्रेमाची वृद्धि होत असते. हं, पण ती पहा मालतीच आली, मी आतां प्रेमाच्या खोट्या नाटकाला सुरवात करतों. ( प्रेमाचा आविर्भाव आणून ) हे चंपासुंदरी, माझ्यावर प्रेम कर, मी तुझ्या प्रेमाचा गुलाम व्हायला तयार आहें. ( मालती येऊन बाजूला उभी राहते व ऐकते. ) प्रेमाची गुलामगिरी हें कोणाहि पुरुषाचं भूषणच आहे.

**माल०**—( स्वगत ) अस्सं ! मधुकरांनीं हा फाजिलपणा आरंभला आहे काय ? पुरुषांची जात लबाड खरी ! हे कालपरवां माझ्या प्रेमाचे गुलाम व्हायला तयार झाले होते पण तेच आज चंपाची गुलामगिरी करायला सिद्ध झाले आहेत—मला यांची चांगली खोडच मोडली पाहिजे.

**मधु०**—चंपा, तूं बोलत नाहींस, मुग्धपणा स्वीकारला आहेस यावरून तुझं माझ्यावर प्रेम आहे असंच मी समजतों आणि मी प्रेमानंच तुझा हात धरतों. ( चंपाचा हात धरावयास जातो. )

**माल०**—( पुढें होऊन ) म्हणे मी प्रेमानं तुझा हात धरतों ! पण मी म्हणत्यें, असं भलभलतं बोलायला तुम्हांला लाज कशी वाटत नाहीं ? जनाची नाहीं तर निदान मनाची तरी...

**मधु०**—कोण ? तूं मालती का ? आणि तूं कां माझ्या प्रेमांत लुडबुडायला आलीस ? माझा मी स्वतंत्र आहें, मी वाटेल त्याच्यावर प्रेम करीन !

**माल०**—अहो पण तुम्ही तर कालपरवांपर्यंत माझ्यावर प्रेम करीत होतां ?

**मधु०**—कुणी सांगितलं तुला ?

**माल०**—तुम्हीच तर तसं मला सांगितलंत ! तुम्ही माझ्याशीं लग्न करून मला आपली धर्मपत्नीहि करून घ्यायला तयार झालां होतां ना ?

**मधु०**—पण तूं नव्हतीस ना धर्मपत्नी व्हायला तयार ? कालचं बोलणं कालच संपलं. कालचं वचन जर आजला टिकलं तर मग तें बंधनच झालं आणि तूं

१९३१ ची स्वतंत्र कुमारी असल्यामुळ तुला तर कोणतच बधन पाळायचं नाहीं ! तू तर बधनाला–धर्मबंधनालासुद्धा गुलामगिरीच समजतेस !

**माल०**—मी काय वाटेल ते समजेन पण हे पहा, तुम्ही चपावर प्रेम करता कामा नये.

**मधु०**—हा तुझा जुल्मच झाला ! माझा मी स्वतंत्र आहे. आता जर का तुझ प्रेम माझ्यावर असल तर ..

**माल०**—ते काय ते मी तुम्हाला मागाहून सागेन ! पण हे पहा मधुकर, तुम्ही चपावर प्रेम केलेल मला मुळीच पहावणार नाही ! तुम्ही चपावर प्रेम करता कामा नये. तुम्ही अस भलतसलत वागू लागलात तर मी जीवसुद्धा देईन !

**मधु०**—तू १९३१ सालची कुमारी आणि माझ्यासाठी जीव देणार ? का बर ?

**माल०**—का म्हणजे ? माझ तुमच्यावर प्रेम नाही वाटत ?

**मधु०**—छेः, छेः, छे ! तुझ नाहीं माझ्यावर प्रेम ! प्रेम, बधन, लग्न हे शब्द १९३१ च्या कुमारीच्या तोडून निघता कामा नयेत !

**माल०**—ते काही असो, तुम्ही चपावर प्रेम करता कामा नये–बजावून ठेवित्ये आणि चपा, तूंहि मधुकराना प्रेमाची मोहिनी घालता कामा नये. मला नाहीं इथ उभ रहावत ! मी जात्ये–माझ मस्तक भलभलत्या विचारानी भणाणून गेल आहे.

### पद

**मम भावना दुखावे । ना देइं प्रेम अन्या ॥ मज एक प्रेम ठावें । जरि मी निसर्गकन्या ॥ ध्रु० ॥ मानी न बंधनाला । तरि नीति मानितें मी ॥ लावा न लांछनाला । शीलासि राखिं भावें ॥ १ ॥**

(जाते.)

**मधु०**—चपावती, झाल माझ काम ! मत्सराच्या भावनेन मालतीच्या विचारात पालट होऊ लागला ! आता योग्य सधि साधून मला माझ्या लग्नाच काम साधलच पाहिजे ! मी खात्रीन सागतो की, ही १९३१ ची कुमारी लौकरच माझी धर्मपत्नी होणार ! चपा, जातों मी ! तूहि लौकरच देवदत्ताना घेऊन मालतीकडे ये बर का ! ( जातो. )

**चंपा०**—मालतीच्या विचारांत क्रांति झाली तर माझाहि फायदाच होणार आहे. मालती मधुकरांशीं लग्न करील तर मीहि देवदत्तांशीं लग्न करायला मोकळी होईन! ( हरिणी भंपकरावाला घेऊन येते. )

**हरिणी**—चंपा, हे लग्नाचे चाळे सोडून दे आणि माझ्याबरोबर चल. तूं लग्नाचे वेडे विचार टाकून दिलेस तर मी तुला चोरीच्या आरोपांतून मुक्त करायला तयार आहें. नाहीं तर...

**चंपा०**—नाहीं तर काय कराल तुम्ही?

**हरिणी**—नाहीं तर तुला मारझोड करीत घरीं घेऊन जाईन. हे पहा भंपकराव मला मदत करायला आले आहेत!

**भंपक०**—एरवीं मला काय करायच्या नसत्या भानगडी? पण मला तुझी अवनति होत असलेली पहावत नाहीं. वेश्येचं लग्न—छे; ही असली सुधारणा मला तरी मान्य नाहीं. या सुधारकांनीं ताळ सोडला अगदीं! गृहस्थांच्या मुलींना लग्नं नकोत आणि वेश्यांच्या मुलींना लग्नं पाहिजेत—काय हे वेडे सुधारकी चाळे? मला वाटतं, असल्या पापविचारांनीं लौकरच पृथ्वी बुडणार!

**चंपा०**—बुडूं द्या पृथ्वी म्हणजे तुमच्यासारखीं माणसं तरी कायमचीं नष्ट होतील!

**हरिणी**—आधीं तुला नष्ट करूं तेव्हांच आम्ही नष्ट होऊं हें ध्यानांत ठेव! भंपकराव, काढा तो चाबूक आणि ओढा हिला फटकारे—ही तशी नाहीं बऱ्या बोलानं ऐकायची!

**भंपक०**—एरवीं मला काय करायच्या नसत्या भानगडी? पण केवळ वेश्यांनीं आपला धर्म सोडून लग्नाच्या भानगडींत पडूं नये एवढ्याचसाठीं मला असं उग्र स्वरूप धारण करावं लागतं आहे. ( चाबूक सरसावून ) चंपा, हें पाहिलंस चौदावं रत्न?

**चंपा०**—भंपकराव, हरिणीताईला घेऊन इथून मुकाट्यानं चालते व्हा, नाहीं तर तुमच्यावरच चाबकाचा प्रसाद खायचा प्रसंग ओढवेल हें लक्षांत ठेवा! देवदत्तांसारख्या देवपुरुषाच्या सहवासानं मी आतां धीट बनल्यें आहें. हरिणी-ताईनं मला दुबळेपणा शिकवला होता पण आतां मी दुबळी राहिलेली नाहीं...

**भंपक०**—चपा, तू बायको असूनहि जास्त बडबड करत्येस? हो मार खायला तयार! ( चाबूक उगारतो, चपा त्याचा हात पकडते आणि पिळवटते. भपकराव चाबूक टाकतो. )

**चंपा०**—( चाबूक घेऊन व फटकारा मारून ) आता मुकाट्यान पळ काढा नाहीं तर...

**भंपक०**—नाही तर बाईच्या हातचा मार खा हेंच की नाहीं? मी पळ काढायला तयार आहे, मला काय करायच्या नसत्या भानगडी?

**हरिणी०**—हें पहा भपकराव, ही चपा अशी नाही ताळ्यावर यायची! तिला फौजदाराकडूनच ताळ्यावर आणली पाहिजे. तिच्या लग्नाच ढोंग बाहेर पडल म्हणजे येईल ती शुद्धीवर! चला. ( जातात. )

**चंपा०**—चला, व्हा चालती! ( ती गेल्यावर ) आता सर्व भानगडीतून मुक्त व्हायला लग्नाचा एकच राजमार्ग उरला आहे. मालती आपला हट्ट सोडील तर माझ्याहि लग्नाचा मार्ग मोकळा होईल! देवदत्त आले म्हणजे त्याना घेऊन मालतीकडेच जाव आणि तिच मन वळवाव!

( **पडदा** )

---

## प्रवेश २ रा

( स्थळ—रस्ता, देवदत्त प्रवेश करतो. )

**देवदत्त**—खोट्या आणि तात्पुरत्या ससाराच का होईना, पण ते सुख चंपावतीला मिळवून देण माझ कर्तव्यच होय. केवळ चपावतीला सकटमुक्त करण्याकरिता मी तिचा खोटा पति झालों. आता फौजदाराची चौकशी पुरी होईपर्यंत मला हे नवरदेवाच सोंग टिकवलच पाहिजे. गेले दोन दिवस चपावती तरी किती सुखात आहे? खोटा का होईना, तात्पुरता का होईना, आपल्याला ससार लाभला याच एका भावनेन ती सौख्यसागरात पोहू लागली आहे. आपल्याला हक्काचा ससार असावा, आपली काळजी घेणारा पति मिळावा, अशी स्त्रियाना नैसर्गिक इच्छा असते पण हल्लींच्या या भडकलेल्या तत्त्वज्ञानान मुळीं ससारतरूच्या मुळावरच कुऱ्हाड घातली आहे. मीहि सुधारकच आहे.

स्त्रियांना योग्य पतीची निवड करण्याचा हक्क असावा असं प्रतिपादन करून प्रीतिविवाहाला जोराचा पाठिंबा देणारा मी गृहस्थ आहें. विवाहच नको, निसर्गाला शरण जावं हें मत मात्र मला बिलकुल ग्राह्य वाटत नाहीं. विवाहच नष्ट झाले तर आपल्या समाजमहर्षींनीं घडवून आणलेल्या वैवाहिक सुधारणेची तत्काल इतिश्रीच होणार ! छेः, विवाहसंस्था नष्ट झालेली मला तरी पाहवणार नाहीं. पण मी हा असा विचारांच्या प्रवाहांत वहावत काय चाललों ? तिकडे चंपावती घरीं माझी वाट पहात बसली असेल ! वेश्येच्या पोटीं जन्म घेणारी मुलगी इतकी सद्गुणी आणि प्रेमळ असेल हें कुणाला खरंसुद्धां वाटणार नाहीं ! ( जाऊं लागतो तों गुलाब रडत प्रवेश करतो. ) अरे गुलाब, उगी, उगी ! असा रडतोस कां ? काय झालं तुला ? कां रडतोस ? काय झालं तुला ?

**गुला०**—मला कांहीं झालं नाहीं म्हणून मी रडतों आहें. मला जर एखादा आजार झाला असता तर कित्ती गंमत झाली असती !

**देव०**—काय विचित्र मुलगा आहेस रे ? आजारीपणांत रे तुला कसली गंमत वाटते ?

**गुला०**—मला नाहीं गंमत वाटत ! मला नुसतं आजारी पडावंसं वाटतें आणि मी आजारी असलों म्हणजे भाऊला आणि मालतीबाईंना गंमत वाटते ! मी लौकर आजारी पडेन कां हो ? पहा माझी नाडी !

**देव०**—( नाडी पाहून ) छेः, तूं नाहीं आजारी पडणार ! तुझी नाडी चांगली ठणठणीत चालते आहे !

**गुला०**—मग कां हो, माझी नाडी बंद पडायला कांहीं उपाय नाहीं का ? सांगा ना मला आजारी पडायचा एकादा उपाय !

**देव०**—छट्, असं कांहीं बोलूं नये ! खुळा नाहीं तर !

**गुला०**—मी नाहीं खुळा, भाऊच खुळा आहे. मालती त्याची बायको होत नाही म्हणून तर तो एकसारखा दुःखाचे सुस्कारे सोडीत असतो ! जेव्हां पहावें तेव्हां आपला आकाशाकडे डोळे लावून तोंड वाईट करून बसलेला ! ती मालतीबाई तरी भाऊशीं एकदां कां लग्न करीत नाहीं कोण जाणे ?

**देव०**—हें पहा गुलाब, तूं मोठा गंमत्या मुलगा आहेस. तूं असं कर, मालतीबाईंच्या घरीं जा आणि आजारीपणाचं सोंग घे; आणि मालती मधुकराशीं

लग्न करायला कबूल होईपर्यंत आजारीपणाचं सोंग टाकूं नकोस! तुला नाटक-नाटक खेळता येतच आहे! आहेसच तसा तू गमत्या गुलाब!

**गुला०**—हो, हो, मला साधत नाटक! मी मालतीबाईच्या घरीं जाऊन असा भयकर आजारी पडतों कीं, तुम्ही माझी पाठच थोपटाल! जातोंच बर का आजारी पडायला आणि देतो उडवून गमत! (जातो.)

**देव०**—हा तिकडे आजारीपणाच नाटक करायला गेला आणि मलाहि इकडे खोट्या संसाराच नाटकच करायच आहे! चला, जाव लौकर घरीं, नाहीं तर उशीर झाला म्हणून चपावती रडत बसायची! (जातो.)

---

## प्रवेश ३ रा

(**स्थळ**—मालतीचा महाल. मालती चिडलेली घरी येते आणि हातातील वस्तू फेंकून देऊन आसनावर बसते पण मन स्वस्थ बसत नाहीं म्हणून उठते आणि इकडे तिकडे अस्वस्थ अशी फिरते.)

**मालती**—हा काय मेला सगळाच जुलूम? मी १९३१ सालची कुमारिका झाल्यें हे पापच केले वाटते! माझ्या मनाची अगदी खेचाखेच चाललेली आहे. इकडे जुने विचार सागतात कीं, लग्न करून सुखी हो आणि तिकडे नवे विचार सुचवितात कीं, लग्नाची गुलामगिरी पत्करू नको! आता मी करू तरी काय? मी कोणाला मान देऊ? देव आहे का? कोणी म्हणतात आहे, कोणी म्हणतात नाहीं! धर्म आहे का? कोणी म्हणतात आहे, कोणी म्हणतात नाही! मग आहे तरी काय? एक निसर्ग!

**मधु०**—मालती, तू निसर्गाला तरी मान देतेस ना? मग निसर्गानं आणून दिलेल्या परिस्थितीपुढ तू आपली मान का वाकवीत नाहींस?

**माल०**—कारण मी गुलाम नाही, स्वतत्र आहें. स्वतत्र माणूस बिकट परिस्थितीपुढेंहि नमत नसत!

**मधु०**—बर आहे, तू आपला हट्ट सोडायला तयार नाहींस ना? मी जातों आपला!

**माल०**—थांबा थोडे! मधुकर, आधीं माझ्या मनाचं समाधान करा आणि मग जा.

**मधु०**—पण आधीं तूं माझ्या मनाचं समाधान करायला तयार आहेस का? तूं माझ्या मनाचं समाधान कर, मी तुझ्या मनाचं समाधान करीन!

**माल०**—पण तुमची मागणी अशक्य कोटींतील आहे. तुम्ही तर लग्नाची मागणी करतां!

**मधु०**—मग हें चांगलं कीं वाईट? लग्नाचं लोढणं गळ्यांत अडकवून घेऊन मी तुझा जन्माचा दास व्हावयाला तयार झालों हें चांगलं कीं वाईट?

**माल०**—हें चांगलं कीं वाईट तेंच मला समजेनासं झालं आहे. तें कांहीं असलं तरी तुम्ही दुसऱ्या कोणाहि स्त्रीवर प्रेम करतां कमा नये. मधुकर, नाहीं ना करणार तुम्ही दुसऱ्या कुणा स्त्रीवर प्रेम?

**मधु०**—त्याला माझी ना नाहीं! पण तुला कुठं आहे माझ्या प्रेमाची किंमत?

**माल०**—वाः, मी तर तुम्हांला माझे पंचप्राण समजतें—पण...

( देवदत्त चंपावतीला घेऊन येतो. )

**देव०**—मालतीबाई, हा तुमचा भलता पणच सारी घाण करतो आहे. लग्न न करण्याचा पण सोडा आणि मधुकरांशीं लग्न करून सुखी व्हा!

**चंपा०**—मालती, देवदत्त सांगतात तेंच सत्य आहे. तुझा लग्न न करण्याचा पण तुझ्या स्वतःच्याच नव्हे तर माझ्याहि सुखाच्या आड येतो आहे, हा पण...

**माल०**—मी अशा चमत्कारिक वेळीं काय करावं तेंच मला समजत नाहीं. मी खरोखरच विचारमूढ झाल्यें आहें.

( निसर्गराज गाडाभर पुस्तकें घेऊन येतो. )

**निसर्ग०**—म्हणूनच हे नव विचारांनीं भरलेले मोठमोठे ग्रंथ वाचा आणि ज्ञानसंपन्न व्हा. मालतीबाई, तुमच्या विचारांत चलबिचल होऊं लागल्याचं वर्तमान माझ्या कानावर आलें म्हणून मी हें ग्रंथभांडार तुमच्या मदतीला घेऊन आलों आहें.

**देव०**—निसर्गराज, तुम्ही खरेखुरेच पढतमूर्ख आहांत! इतके ग्रंथ वाचलेत, घोकलेत आणि पाठ केलेत पण तुम्हांला चालू परिस्थितींत त्यांचा कसा उपयोग करून घ्यावा तें मुळींच कळलेलें नाहीं.

**निसर्ग०**—पण मी परिस्थितीचा गुलाम व्हायला तयार नाही—मी निसर्गाचा गुलाम आहें. रूढीपेक्षा निसर्गाचे गुलाम व्हा अस हा (एक पुस्तक हातात घेऊन) तत्त्ववेत्ता मिस्टर इंपॉसिबल कथन करतो. तो पहा दुसरा तत्त्ववेत्ता मि. स्ट्रीट-वॉकर तिथ पडला आहे, आणखी तो पहा तिसरा मि. फिश्मॉकर

**देव०**—आत्ताचा प्रश्न तत्त्वाचा नसून परिस्थितीचा आहे. चपावतीला लग्नबंधनानच सौख्याचा मार्ग दिसणार असून मालतीबाईनाहि मधुकराशीं लग्न केल्याशिवाय खरें सौख्य प्राप्त होणार नाही. मालतीबाई तर मधुकराच्या प्रेमासाठी सारख्या तळमळताहेत ! मधुकराशी लग्न झाल्यानच त्याच आयुष्य सुखात जाणार आहे !

**निसर्ग०**—हायरे निसर्गा ! मालतीबाई, खर का हो हें सार ?

**मालती**—निसर्गराज, देवदत्ताचंच म्हणण खर आहे अस क्षणभर धरून चाला आणि मला योग्य तो उपदेश करा.

**मधु०**—निसर्गराज, तुम्ही जे क्षणभर खर म्हणून धरून चालणार तेच जन्मभर खर ठरणार आहे हे मात्र विसरू नका.

**निसर्ग०**—हायरे निसर्गा ! आमच्या अध्यक्षीणबाईच बारगळल्या मग मी मत्री तरी काय बोलणार ? मालतीबाई, पुनः एकदा या सर्व ग्रथाच पारायण करा म्हणजे तुमच चचल झालेल मन ताळ्यावर येईल ! हायरे निसर्गा !

**देव०**—पढतमूर्ख निसर्गराज, तुम्हीच आधी ताळ्यावर या. मीहि तुमच्या-सारखाच सुधारक आहें पण परिस्थितीकडे दुर्लक्ष करणारा नाही. निसर्गराज, ही परप्रत्ययनेय बुद्धि टाका आणि आपल्या समाजाच्या खऱ्या सेवेला लागा. सातासमुद्रापलीकडच हे खार पाणी आणून ते आमच्या गोड्या पाण्याच्या विहीरींत टाकण्यात शहाणपणा कोणता ? गोऱ्या ग्रथाचीं काळीं भाषातरें, गोऱ्या नाटकांचीं काळी रूपातरें, गोऱ्या कादबऱ्याचीं काळी अनुकरणे आपल्या उपयोगी पडण शक्य नाहीं. सातासमुद्रापलीकडच्या खाऱ्या पाण्याचे हडे जरूर भरून आणा पण ते पाणी फिल्टर केल्याशिवाय आपल्या बधुभगिनींना प्यावयास देऊ नका. आपल्याकडील सुधारक समाजमहर्षीनीं हाच फिल्टरिंगचा मार्ग

अनुसरलेला आहे. समाजमहर्षि राजा राममोहन रॉय, पं. ईश्वरचंद्र विद्यासागर, प्रो. आगरकर, न्या. रानडे, न्या. चंदावरकर, न्या. तेलंग, डॉ. भांडारकर यांनीं विवाहसंस्थेची तरफदारीच केलेली आहे. विवाहसंस्थेंत योग्य त्या सुधारणा घडवून आणा पण विवाहसंस्थेचा विध्वंस करूं नका हाच सर्व आर्य समाजमहर्षींचा पवित्र संदेश आहे. मालतीबाई, तुमचे वडील रा. ब. मानधन हेहि सुधारकच होते पण विवाहाचा निषेध करणारे नव्हते ! तुमचं प्रेम मधुकरांवर जडलं आहे, मधुकरांचं प्रेम तुमच्यावर आहे, मग आतां लग्नाच्या मार्गांत विघ्न तें कोणतं उरलं आहे ? १९३१ सालानं प्रीतिविवाहापर्यंत मजल मारली तरी ती प्रगति अभिनंदनीयच ठरेल ! पतिता भगिनींच्या उद्धाराचा, लग्न हाच एक धर्ममार्ग आहे. मालतीबाई, ही चंपावती लग्नाचा राजमार्ग न सांपडल्यामुळं जर पुनः हरिणीबाईच्या जाळ्यांत जाऊन पडली तर तें तुम्हांला पसंत पडेल का ? पतिता स्त्रियांचा उद्धार व्हावा आणि सुशील स्त्रियांचा अधःपात टळावा म्हणून तरी आपला लग्न न करण्याचा हट्ट सोडा आणि आर्यमहर्षींनीं उपदेशिलेला, समाजमहर्षींनीं सांगितलेला आणि पतिता स्त्रियांनाहि मान्य झालेला धर्मविहित लग्नाचा राजमार्ग अनुसरा. लग्नबंधनामुळेंच समाजाला सौख्याचा लाभ होतो आणि लग्नबंधनामुळंच संसाराला पावित्र्य लाभतं.

**माल०**—पण देवदत्त ! लग्नबंधन हें तरी बंधनच ना ? हें बंधन, ही गुलामगिरी, १९३१ सालच्या स्वतंत्र विचारांच्या कुमारींनीं कशी बरं मान्य करावी ?

**निसर्ग०**—जय निसर्गा ! मालतीबाईची शंका बरोबर आहे, द्या उत्तर ! निसर्गा, तुझा जयजयकार असो !

**देव०**—पण बंधन म्हणजे गुलामगिरी हें तुम्हांला कुणी सांगितलं ? मालतीबाई, तुम्हांला अनीतीचा मार्ग मान्य आहे का ?

**माल०**—छेः, मुळींच नाहीं. प्रत्येकानं नीतीनंच वागलं पाहिजे.

**देव०**—म्हणजे नीतीचं बंधन तुम्हांला पाहिजेच आहे. वाटेल तें खावं असं म्हटलं तरी स्वतंत्र माणूससुद्धां कांहीं माती खात नाहीं—अन्नच खातो ! माणूस स्वतंत्र झाला तरी त्याला बंधन हें पाहिजेच. जुलूम नको, जबरदस्ती नको पण नीतीचं बंधन अवश्य पाहिजे. स्वातंत्र्याच्या शिखरावर विराजमान झालेले देश जुलूमजबरदस्तीचं बंधन मानीत नसलें तरी योग्य त्या कायद्याचं बंधन मानतातच

ना? स्वतंत्र समाजहि नीतीचं बंधन मानतोच मानतो. मालतीबाई, जुलमाच्या लग्नाला संमति देऊ नका पण प्रीतीनं पवित्र झालेलं लग्नबंधन माना आणि आपल्या आर्यसमाजाला पवित्र लग्नबंधनाचा राजमार्ग खुला करून द्या. मालतीबाई, धर्माच्या रक्षणासाठी आणि समाजाच्या कल्याणासाठी हा देवदत्त तुमच्यापुढं नम्र होऊन एवढी भिक्षा मागत आहे–( नम्र होतो. )

( इतक्यात आजाराचं ढोंग केलेल्या गुलाबला घेऊन कमल येते. )

**माल०**—देवदत्त, उठा. तो पहा गुलाब .

**मधु०**—(पुढं होऊन) गुलाब, गुलाब! तुला काय झालं? (त्याला जवळ घेतो.)

**गुला०**—भाऊ, तुला पुनः सुखाचे दिवस दिसावे म्हणून मी आजारी पडलो आहे. अयाऽऽई! बाहेरून रडतो पण मनात हसतो. )

**माल०**—बाळ, हा काय बरं वेडेपणा?

**गुला०**—मग तुम्ही भाऊशी लग्न करून शहाणपणा दाखवा. तुम्हा दोघाचं लग्न होईपर्यंत आणि तुम्ही भाऊकडे रहायला येईपर्यंत मी असाच आजारी पडेन आणि काहीएक खाणार नाहीं.

**माल०**—बाळ, सोड तुझा हट्ट! मी मधुकराशीं लग्न करून तुम्हा सर्वांना सौख्याचा लाभ करून देणारच आहे. ज्यांत तुम्हा सर्वांना सुख त्यांत मलाहि सुखच! मधुकर, पत्नी म्हणून प्रेमानं तुम्ही माझा हात धरा आणि गुलाबाची तशी खात्री करून द्या. (मधुकर मालतीचा हात धरतो.) आता तरी झालं ना?

**निसर्ग०**—हायरे निसर्गा!

**गुला०**—( उठून ) आता ठीक झालं! मालतीवहिनी, मी भलताच हट्ट धरला याबद्दल तू मला क्षमा कर. भाऊ, आता तरी घरीं जाऊन आकाशाकडे डोळे लावून बसणार नाहींस ना?

**मधु०**—बाळ, आता मी धन्य झालो मग खिन्न का होईन बरं?

**माल०**—चंपा, तू तर लग्नासाठी हपापलेलीच आहेस! तुझं देवदत्तावर प्रेम आहे ना? देवदत्ताशीं लग्न झाल्यानं तुला सुखाचा लाभ होईल ना? ही १९३१ सालची कुमारी माल्ती प्रीतिविवाहाला जाहीरपणं पाठिंबा देऊन समाजाला कल्याणाचा धर्ममार्ग खुला करून देते आहे.

**चंपा०**—मालती, देवदत्तांशीं लग्न झाल्यानं मला स्वर्गसुखच लाभणार आहे. विवाह हाच पतिता स्त्रियांच्या उद्धाराचा धर्ममार्ग होय.

**माल०**—देवदत्त, इकडे या. तुमच्या नीतिधैर्याची आणि तत्त्वनिष्ठेची प्रशंसा करावी तेवढी थोडीच होणार आहे. एका पतिता भागिनीचा उद्धार करून तुम्ही फार मोठं धर्मकार्य साधलेलं आहे. ( त्यांचे हात एकमेकांच्या हातांत देते. )

**देव०**—मालतीबाई, मी चंपावतीचा, पत्नी म्हणून स्वीकार केल्यानं रूढीचे गुलाम मला नांवं ठेवतील आणि तूं मधुकरांना पति मानल्यानं निसर्गाचे गुलाम तुझीहि निंदाच करतील. पण १९३१ साल उजाडल्यावर दोन्ही टोंकांचा योग्य समन्वय घडवून आणल्याशिवाय समाजाचं खरं हित साधणं शक्य नाहीं. धर्माचं पावित्र्य राखा आणि समाजाचं कल्याण साधा हाच १९३१ सालचा संदेश नाहीं का ?

**निसर्ग०**—हायरे निसर्गा ! माझ्यानं आतां हा अधःपात पहावत नाहीं. मालती, मी हा अस्साच निसर्गाकडे जातों. रूढीचा, धर्माचा आणि समाजाचा गुलाम होऊन राहण्यापेक्षां मला निसर्गाची गुलामगिरी अधिक पसंत आहे. हायरे निसर्गा ! ( ग्रंथाचा गाडा घेऊन जाऊं लागतो तों फौजदार, भंपकराव व हरिणीला घेऊन येतो. ) फौजदारसाहेब, अनर्थ ओढवला, चंपावतीचं लग्न झालं, मालतीहि रूढीची गुलाम झाली !

**हरिणी**—काय, चंपीचं लग्न झालं ? कारटीनं वेश्येच्या कुलाला कलंक लावला !

**भंपक०**—अरेरे, पृथ्वी बुडणार ! वेश्यांनीं आपला धर्म टाकून लग्नाचा मार्ग स्वीकारावा ना ?

**फौज०**—कांहो भंपकराव, यांत तुम्हांला कां वाईट वाटतं ? पतिता स्त्रीचा उद्धार झाला तर पृथ्वी कशी बुडेल ? कांहो मालतीबाई, चंपावतीच्या लग्नाला तुम्ही साक्षीदार आहांत का ?

**माल०**—चंपा ही देवदत्तांची धर्मपत्नीच आहे.

**भंपक०**—निसर्गराज, चला मी तुमच्याबरोबर येतों. मला काय करायच्या नसत्या भानगडी ?

**फौज०**—( त्याला धरून ) अहो भंपकराव, कुठं चाललांत ? चंपावतीवर

तुम्ही खोटी फिर्याद दाखल करून एका सुशील स्त्रीला पापमार्गात अडकविण्याची भानगड केलीत. चला परत चौकीवर!

**हरिणी**—नाहीं हो, त्या सटवीनं खरोखरच माझे दागिने चोरले आहेत!

**फौज०**—बदमाष कुठली! आता तुझ्या शब्दावर माझा विश्वास बसणं शक्य नाहीं. तुम्ही खोट बोलण्यात पटाईत आहात. चला चौकीवर! मालतीबाई, वेश्याच जीवन किती कष्टमय असत हे आम्हा पोलिसाशिवाय इतराना कळण शक्य नाहीं. समाजान दूर लोटल्यामुळ त्याच्या भोळेपणाचा फायदा बदमाष लोक घेतात आणि त्याचा अधःपात करतात! तुम्ही चपावतीला त्या अधःपातापासून सोडवून तिच्यावर फार मोठे उपकार केले आहेत. मी तुम्हाला धन्यवाद देतों. ( भपकराव व हरिणी यास घेऊन जातो. )

**निसर्ग०**—हायरे निसर्गा! इथला हा चमत्कारिक प्रकार पाहून माझ मस्तक भणाणून गेलं आहे. आता निसर्गाकडे धाव घेतल्याशिवाय सोयच उरलेली नाहीं. (जातो.)

**मधु०**—मालती, फौजदार काय म्हणाले ते तू ऐकलस ना?

**माल०**—हो ऐकल आणि माझी खात्रीहि झाली कीं, पुढची साले कांहींहि सागोत, चालू १९३१ साली तरी विवाहबधनाच पावित्र्य मान्य केल्याशिवाय गत्यतरच नाहीं. आर्यधर्मांच्या रक्षणासाठीं आणि समाजाच्या कल्याणासाठी मी आता विवाहविध्वसक मडळाचा विध्वस करून प्रीतिविवाहाच्या राजमार्गाचाच उपदेश लोकाना करणार आणि समाजमहर्षींनीं सुरू केलेले कार्य तडीस नेणार!

## संदेशगीत

**विवाहमार्ग बरा। सुमंगल ॥ ध्रु० ॥ स्वैरविचारां। द्या नच थारा। धर्मपथासि वरा ॥ १ ॥ सीता–रामीं पथ जो वरिला। त्याचि पथासि धरा ॥ २ ॥ देवां रुचला। मंगल झाला ॥ कां न रुचेल नरा ॥ ३ ॥**



# अंक पहिला



## प्रवेश १ ला

( **स्थळ**—दिवाणखाना. आंतील बाजूस राजाराम पलंगावर झोंपीं गेला असून आंत सर्व सामसूम आहे. बाहेरील बाजूस तीन मुलें नाटकाचा खेळ खेळत असून त्यांचा सूत्रधाराचा प्रवेश चालू आहे. वेळ—सकाळीं १० वाजण्याचा सुमार. )

**तीन मुलें**—( मध्यें सूत्रधार व त्याच्या बाजूस दोन पारिपार्श्वक—सर्व नान्दीचा थाटमाट.)

### नान्दीगीत.

**वंदन त्या जननीला ॥ विश्वाच्या प्रेरक शक्तीला ॥ ध्रु० ॥**
**ब्रह्मा बोले मी निर्माता ॥ झाला तो विश्वाची माता ॥ परि**
**निर्मात्या निर्मी ॥ वंदन विधिच्या त्या मातेला ॥ १ ॥**

**सूत्र०**—ताई आणि अक्का, तुमच्या हातांतील तबकें आंत नेऊन ठेवा, कारण झालें इतकं स्तवन पुरे आहे.

**कुसुमताई**—अरे पण आनंदा, मी बाहेर येतांना काय घेऊन येऊं ? माझा भावला आणूं का ? चांगला नवरदेवासारखा सजवून ठेवला आहे हो !

**सुमनअक्का**—आणि आनंदा, कुसुमताईनं भावला आणला तर मी भावली घेऊन येईन बरं का ? मी सुद्धां भावलीला चांगली नवऱ्यामुलीसारखी नटवून ठेवली आहे. तूं हो भटजी आणि करून टाक भावलाभावलीचं लग्न !

**आनंद०**—वाः ! तुम्हाला काय ? तुम्ही आहात उतावळ्या नवऱ्या, पण नाटकात कुणाहि नवरानवरीच सुरवातीला लग्न लागत नाही बर का ? नाटकाच्या सुरवातीलाच जर लग्न लागल तर पुढ नाटक ते काय करायच ? पहिल्या अकात लग्न जुळत, दुसऱ्या अकात लग्नाला विघ्न येत आणि तिसऱ्या अकात सर्व विघ्नें नाहींशीं होऊन लग्नाचा बेंडबाजा वाजतो, अस हे नाटकी लग्नाच त्रागड आहे बर का ? मी नाटकात पक्का मुरलेला मुलगा आहे. मला नाटकी लग्नाची सर्व तत्रें माहीत आहेत. ताई आणि अक्का, तुम्ही आत जाऊन भावलाभावलीच लग्न जुळवून या, मग मी व्हिलन बनून त्यात विघ्न आणीन. इतक झाल्यावर मग लग्नाची बात ! जा पाहू !

**कुसुम०**—बर तर ! मी आत जाऊन बाहुला आणत्ये आणि सुमनच्या बाहुलीला मागणी घालत्ये.

**सुमन०**—आणि मीहि बाहुलीला आणून कुसुमच्या भावल्याला आपली मुलगी देण्याचं कबूल करत्ये.

**आनंद०**—ठीक तर ! जा तुम्ही आत. ( मुली जातात. ) आता ताई व अक्का बाहेर येईपर्यंत मी व्हिलनचें भाषण म्हणून टाकतो. ( राक्षसाचा आविर्भाव आणून अलललल डुर्रर्र अललल डुर्रर्र !! या सिहाची नवरी तो कोल्हा नवरा कशी नेतो तेच पहातो.

**कोण येतो तें पहातों मजसि माराया !**

**राजाराम**—( आनदाच्या ओरडाओरड्यान जागा होऊन ) थाब ह कारट्या, मी येतो तुला मारायला ! नाटकी खेळ खेळून माझी झोप मोडलीस नाही का ? थाब, तुझी चागली चामडीच लोळवतो. ( उठतो. )

**आनं०**—अर्रर्रर्र ! घात झाला ! माझ्या राक्षसपार्टान राजाभाऊची स्वारी जागी झाली वाटत ? आता आली कबक्ती ! आता या नाटकी व्हिलनला पळ काढून जीव बचावण्याशिवाय गत्यतरच नाहीं. हे आलेच राजाभाऊ हातात बडगा घेऊन ! इकडेच पळाव ! (एका बाजूकडे धावतो ) पण नको, तिकडेच पळून कोपऱ्यांत लपून बसाव तें बर ! आलेच राजाभाऊ...( बाजूला पळत जातो. )

**राजा०**— ( पुढें येऊन ) कुठं गेला तो कार्टा ? मला कोण गाढ झोंप लागलेली आणि हा लेकाचा आनंद्या नाटकाचा खेळ खेळतो आहे ! कुठं गेला तो कार्टा—त्याला बडवूनच काढतों ! आईला किती सांगितलं कीं, हीं असलीं आई-बापांचा पत्ता नसलेलीं कारटीं गोळा करूं नकोस म्हणून ! ती कुठं माझं ऐकते आहे ? रस्त्यावर पडलेलीं अनाथ पोरं गोळा करून त्यांचं संगोपन करण्याचा नाद तिला लागला आहे ना ? कुठं गेला तो कार्टा ? ( इकडे तिकडे शोधतो. )

**सुमन०**—( आंतूनच ) आनंदा, जीव बचावरे बाबा, नाहींतर राजाभाऊ तुला आज कांहीं जिवंत ठेवीत नाहींत !

**राजा०**—नाहींच ठेवीत मी आज त्याला जिवंत ! कुठं गेला तो कार्टा ?

**आनं०**—( लपलेल्या जागेवरून ) ताई—अक्का ! तुम्ही घाबरूं नका. तुम्हीच आपला जीव वांचवा ! मी इकडे नीट लपून बसलों आहें. स् स् स् !

**कुसुम**—( आंतूनच ) अरे आनंदा, पळून जा कुठं तरी ! नाहींतर राजाभाऊ तुला झोडपून काढतील !

**राजा०**—हा कार्टा या बाजूला लपून बसला आहे काय ? ठीक आहे ! आणतोंच त्याला पकडून आणि करतों लंबा !

**कुसुम व सुमन**—( आंतूनच ) आई, धांव ग धांव ! राजाभाऊ आज कांहीं आनंदाला जिवंत ठेवीत नाहींत ! आई, धांव ग धांव !!

**राजा०**—( आनंदाला ओढीत आणून ) आनंदा, आज तूं चांगला माझ्या पकडींत सांपडलास ! माझी झोंपमोड करण्यांत तुला तरी कसला आनंद वाटलारे ? काय मला गोड साखरझोंप लागली होती पण ? बोल काय तें सरळ, नाहींतर करतों लंबा तुला !

**आनं०**—राजाभाऊ, तुम्ही मला खुशाल मारा पण सरळ बोलायला तेवढं सांगूं नका ! सरळ बोलणं सरळ माणसाला रुचतं, तुम्हांला तें कसं रुचणार ?

**राजा०**—हो, हो, मी वांकडाच आहें—त्यांत तुझ्या बापाचं काय खर्च झालं ? अँ ?

**आनं०**—हा, माझा बाप काढू नका, सरळ काय ते बोला. येऊन जाऊन काय, तुम्ही मला मारणार हेंच कीं नाही ? मारा, खुशाल मारा पण वाकड्यांत शिरू नका ! सरळ बोललात तर काय जीभ वाकडी होईल ? सरळ बोला, सरळ बोला, चागल देवान सरळ तोड दिल आहे ते वाकडे का करता ? सरळ बोला, सरळ बोला... .

**राजा०**—काय तोडाळ पोर आहे हा ! आनद्या, हे तीन तेरा थाबव आणि सरळ उत्तर दे, तू माझी साखरझोंप का मोडलीस ?

**आनं०**—काय, सरळ उत्तर देऊ म्हणता ? ( ठोके ऐकून ) हे पहा, सकाळ सपून दुपारचे दहा वाजले ! ही काय साखरझोपेची वेळ आहे ? साखरझोप पहाटे लागते–आणि शिवाय पहाटेची साखरझोप घेणे हे सरळ आहे, पण दुपारची साखरझोप–दुपारची साखरझोप– हॅ, हॅ, हॅ, ( खूप हसतो. )

**राजा०**—( चिडून ) तू भिकारड्याचा पोर आणि मला हसतोस ? मी दुपारपर्यंतच काय पण सध्याकाळपर्यंत सुद्धा झोपून राहीन, समजलास ?

**आनं०**—आणि मग मी सुद्धा तुम्हाला पोट धरधरून हसेन, समजलात ? हॅ , हॅ , हॅ ! दुपारची साखरझोप ! सध्याकाळची साखरझोप ! हॅ , हॅ , हॅ !

**राजा०**—काढतो ह तुझ हॅ हॅ हॅ ! थाब, आता तुला पलगाच्या खाबाशी बाधून पाठ फुटेपर्यंत झोडपून काढतो. ( आनंद हसतच असतो. राजाराम त्याला उचलून नेऊन पलगाच्या खाबाला बाधतो व त्याला मारू लागतो. इतक्यात राजारामाचे वडील नदाराम प्रवेश करतात. )

**नंदा०**—( पाहून ) राजा, हे तू काय माडल आहेस ? त्या लहान मुलाला का मारतोस ? काय केल त्यान ?

**राजा०**—या कारट्यान माझी साखरझोप मोडली ! फार चढून गेला आहे कारटा !

**नंदा०**—अस्स ? या मुलान तुझी साखरझोप मोडली, होय ना ? पण कायरे राजा, या आनदान तुझी साखरझोप मोडली ती केव्हा ?

**राजा०**—आत्ता ! हा पोरटा कुसुमला आणि सुमनला बरोबर घेऊन माझ्या खोलीच्या बाहेरच्या बाजूस नाटकाचा खेळ खेळत होता. त्याच्या

आरडाओरड्यानं मी जागा झालों. मला त्या वेळीं या पोरट्याचा असा संताप आला कीं कांहीं विचारूं नका !

**नंदा०**—मूर्खा, मलासुद्धां तुझा संतापच आला आहे. अरे, दुपारची दहा वाजण्याची वेळ, ही काय साखरझोंपेची वेळ आहे ? आमच्या कुळांत आजपर्यंत अशा झोंपा कुणीच काढल्या नव्हत्या. राजा, अरे तुला सगळे लोक हंसताहेत पण पाठीमागें. आज तुझ्या तोंडावर आनंदा हंसला हें ठीकच झालं ! जगांत तुझी केवढी छीः थूः होते आहे हें तुला प्रत्यक्ष कळलं हें पाहून मलासुद्धां आनंदच होत आहे. बाळा आनंदा, इतर लोक या राजाला पाठीमागं हंसतात पण तूं धीटाईनं राजाच्या तोंडावर हंसलास याबद्दल मी तुझी पाठच थोपटतों. शाबास आनंदा !

**राजा०**—बाबा, हा पोर मला हंसला म्हणून त्याला तुम्ही शाबासकी देतां ? बाबा, हें कृत्य तुमच्या पितृपणाला तरी शोभतं का ? आनंदासारख्या फाजील पोराचा कैवार घेऊन आपल्या स्वतःच्या मुलाची छीः थूः करणं कुणाहि पित्याला शोभत नाहीं !

**नंदा०**—आणि चांगल्या कुळांत जन्म घेऊन स्वच्छंदीपणानं वागणं हेंहि तुझ्यासारख्या पुत्राला शोभत नाहीं. काय करूं ? तुला जर तुझ्या आईची फूस नसती तर मी तुला घरांतून हांकूनच लावला असता ! असला स्वच्छंदी कारटा जन्माला येण्यापेक्षां...

**यशोदा०**—( देवदर्शनाहून परत येऊन ) काय झालं ? बाळाला इतक्या कठोर शब्दांनीं कां बोलतां ? काय केलं त्यानं ?

**राजा०**—आई, बाबा बघ मला उगीचच्या उगीच शिव्याशाप देताहेत, मी कांहीं सुद्धां केलं नाहीं, मी आपला चांगला स्वस्थपणं झोंपलों होतों......

**नंदा०**—दुपारची दहा वाजण्याची वेळ, ही काय स्वस्थ झोंपायची वेळ आहे ? कारटा वाटेल तसा स्वच्छंदीपणानं वागतो आणि वर कांगावा करतो !

**यशोदा०**—करूं दे कांगावा, लहान आहे अजून तो ! एकुलता एक मुलगा, नवसासायासानं दीर्घायुषी झाला आणि त्याला कठोर शब्दांनीं बोलणं इकडे तरी बरं दिसतं का ? बाळ थोडा अल्लड आहे म्हणून वागतो थोडा स्वच्छंदानं, त्यांत एवढं रागवायला कशाला हवं ? नका बोलूं त्याला, उगीच मनाला हुरहुर लावून घेईल ! माझा बाळ तसा फार शहाणा आहे हो ! त्याला सगळं कांहीं कळतं...

**नंदा०**—कळत सगळ पण वळत नाहीं कांही मुद्धां ! यशोदे, तूं याचे लाड केलेस तेवढे पुरे झाले. आता हा घोडा वाढला आहे, त्याला नीट लगाम घाल, नाहीं तर हा कारटा कुठल्या तरी भयंकर फदात सापडून स्वतःच्या गळ्याला फास लावून घेईल आणि कुलाच्या सत्कीर्तीलाहि कलंक लावील! लाड–लाड तरी किती करायचे आणि कोठपर्यंत ? आता हा राजा कांहीं लहान नाहीं !

**यशोदा०**—मला तो लहानच वाटतो आहे. नका त्याला बोलू ! थोड्या दिवसांनीं होईल आपोआप शहाणा ! एकुलता एक मुलगा, त्याला मी म्हणत्यें, अस उण बोलवतें तरी कस ? आपण जायच, मी करत्यें त्याची समजूत ! मुलाना नीट समजुतीनच वागवलं पाहिजे, बर का ? आणि तशात माझा राजा, माझा एकुलता एक कन्हैय्या ! बाळा, शतायुषी हो !

**नंदा०**—यशोदे, तू मायाळू आहेस, ममताळू आहेस पण आधळी आहेस. मला तरी चिन्ह काहीं ठीक दिसत नाही. केलेन् घोटाळे म्हणजे आपोआप उघडतील डोळे ! जय हरि ! जय हरि ! ( जातो. )

**यशोदा०**—बाळा, ये बैस असा माझ्याजवळ. ( त्याला कुरवाळून ) काय बर हें ? बाळ, आता तू मोठा झालास, अस करू नये. हा पहा आनदा, इतका लहान आहे तरी किती शहाणा आहे ? कधीं त्याचा त्रास आहे का आम्हाला ? आपला नीट वागतो, अभ्यास करतो, हसतो, खेळतो...

**राजा०**—आणि मला भडावून सोडतो ! वाईट कारटा आहे तो ! त्याच्यामुळेंच तर मला बाबाचीं दुरुत्तरें बोलून घ्यावी लागलीं. हा आनदा म्हणजे तुझा आनद पण माझा वैरी आहे ! रस्त्यावर पडलेल पोर, कशाला जवळ बाळगलस ग आई ? कारटा मलासुद्धा हसतो ! कारटा...

**यशो०**—अस वाईटसाईट बोलू नये बाळ ! पोरक मूल आहे ते, त्याच्यावर आपण जास्तच माया केली पाहिजे. बाळ, त्याला आईच सुख लाभल नाहीं आणि म्हणून मीच त्याची आई झाल्यें आहे, बाळा, तू जसा मला आवडतोस तसाच तोहि मला आवडतो बरं का ? तुला आई आहे, पण त्या बाळाला मायेच कोण आहे बर ? मी आनदाची आई झाल्यें आहे, आता तूहि त्याचा वडील भाऊ हो.

**राजा०**—मी नाहीं होणार असल्या फाजील पोराचा वडील भाऊ! कुणी याला रस्त्यावर टाकला, कां याला रस्त्यावर टाकला याची तरी तुला कांहीं माहिती आहे का? कुणा तरी पापिणी स्त्रीनं हें आपल्या पापाचं फळ रस्त्यावर टाकून दिलं असेल.

**यशो०**—असेल, तसंहि असेल पण त्यांत या अर्भकाचा दोष कोणता? आईचं पाप आईजवळ, त्याचा संपर्क आनंदाला लावणं गैर आहे. बरं,राहूं दे हा वादविवाद! जा, आधीं तोंड धू आणि आंत जाऊन चहा घे. किती उशीर झाला हा? जा बाळ!

**राजा०**—हो खरंच! बरी आठवण झाली. लौकर चहा घेऊन मला एका ठिकाणीं जायचं आहे. उशीर झाला तर माझी तिथं फजिती उडेल! आई, मी थोड्या वेळानं माझ्या एका मित्राकडे जाणार आहें; कदाचित् मला दुपारीं घरीं यायला वेळ होणार नाहीं. मग मी मित्राकडेच जेवण उरकून घेईन, बरं का? [ जातां जातां परतून ] आणि हें बघ आई, मी आज रात्रीं कदाचित् मित्राकडेच राहीन म्हणतों.

**यशो०**—अरे पण रात्रींचा तरी वेळेवर घरी ये, नको बाहेर राहूं! तूं घरीं आला नाहींस म्हणजे माझं मन बावरून जातं आणि कांहीं सुचत नाहीं. म्हणून म्हणत्यें...

**राजा०**—हें पहा, आतां कांहीं म्हणूं नकोस. मी जातों, मला जायला उशीर होत आहे.

**यशो०**—अरे पण बाळ, तुझ्या असल्या करणीमुळं मला तिकडचं बोलणं ऐकून घ्यावं लागतं म्हणून...

**राजा०**—आई, आजचा दिवस नको मला अडवूंस! उद्यांपासून पाहिजे तर मी तुझ्याजवळ चोवीस तास बसून राहीन! जातोंच आतां—उशीर होईल! [ तांतडीनें निघून जातो. ]

**आनंद०**—आई, कां बरं तूं असं वाईट तोंड करत्येस? राजाभाऊ गेले तरी मी आहें ना तुझ्याजवळ? आई, मी काय करूं म्हणजे तुला सुख होईल? तुझे पाय चेपीत बसूं का? तुझ्यापुढं, सीतामाईपुढं हनुमान हात जोडून उभा राहतो ना, तसा मी हात जोडून रात्रंदिवस उभा राहूं का? हें ग काय? रडूं काय लागलीस अशी? मी तुझे डोळे पुसतों पाहिजे तर!

**यशो०**—बाळ, तू जसा काहीं माझा मूर्तिमत आनदच आहेस. तू माझा, या यशोदेचा बाल—कृष्णच आहेस.

**आनंद**—आई, थाबव ना हें रड !

**यशो०**—बाळ, तू हें कुणाशी बोलत आहेस, माहीत आहे का तुला ? मी तुझी कोण आहें बर ?

**आनंद**—आई, तू माझी आई आहेस.

**यशो०**—बाळ, मी तुझी खोटी आई आहें. तुझी खरी आई तुला रस्त्यावर टाकून

**आनंद**—खोट बोलतेस तू ! आई, तूच माझी आई, तूच माझ दैवत.

## मातृस्तवन

**गमे आई मला दैवत माझें ॥ ध्रु० ॥ जगांत एक असे देव काय तो मोठा । असा करितीं कुणी वाद, खास तो खोटा ॥ दया दावी परि देव मागतो मोला । मुला मागतसे मोल माय का बोला ॥ १ ॥**

( आनद यशोदेला मिठी मारतो. )

**यशो०**—बाळ, किती गोड आहेस रे तू ? आणि अशा गोड मुलाला रस्त्यावर टाकून देण्याचा लाजिरवाणा प्रसग एका माउलीवर यावा ना ? बाळ, जा तू खेळायला बर ! ( आनद जातो. ) देवा, मी पवित्र मातृपदावर आरूढ झाल्यें आहें खरी, पण जगाची खरी माता तूच आहेस. देवा, या मातृपदाच्या जबाबदारींतून पार पडण्याची सुबुद्धि मला दे, हीच तुझ्या चरणीं माझी प्रार्थना आहे.

---

## प्रवेश २ रा

( वेळ–अंधारी रात्र. इच्छाराम एका बालकाला फडक्यांत गुंडाळून घेऊन चोरट्या पावलांनीं प्रवेश करतो. )

**इच्छाराम**—या पोरट्याची कांहीं तरी वासलात मला लावलीच पाहिजे. हें पाप आहे पण तें अजून जिवंत आहे. या पापाला मी जिवंत ठेवूं का ? नको असला भलताच अविचार ! पाप जिवंत ठेवलं आणि त्याला एकाद्या वेळीं वाचा फुटली तर ? नको, हें पाप जिवंत ठेवण्याचा विचारच नको. एक पाप जिवंत ठेवण्याचा अविचार मी केलेलाच आहे. तें पाप आतां सहा वर्षांचें झालें असेल ! झालं तें झालं ! आतां त्याचा विचार करून काय उपयोग ? हें पाप तरी आज मी खास जिवंत ठेवीत नाहीं ! कुठं गाडूं हें पाप ? ( इकडे तिकडे जागा शोधतो तों राधा बाळंतिणीच्या वेषांत प्रवेश करते. )

**राधा०**—कोण तें ? इच्छाराम ! तुम्ही माझी नजर चुकवून इकडे माझ्या बाळाला कां घेऊन आलांत ? काय शोधीत आहां तुम्ही ?

**इच्छा०**—जागा !

**राधा०**—जागा ? ती कां ?

**इच्छा०**—कारण मी जागा आहें, मी तुझ्यासारखा घोर निद्रेंत घोरत पडलेला नाहीं.

**राधा०**—म्हणजे ? तुमचा विचार तरी काय आहे ? या बाळाचं कांहीं बरं वाईट करून टाकण्याचा तर तुमचा विचार नाहीं ना ?

**इच्छा०**—हें बाळ नाहीं, हा माझ्या अब्रूवर घाला घालणारा जिवंत काळ आहे. याला जिवंत ठेवलं तर माझ्या अब्रूला डाग लागेल ! मी याचं बरं वाईटच करणार आहें, कारण याचं वाईट झालं तर माझं बरं होईल. हा पापाचा गोळा गाडला गेला तरच माझी अब्रू जिवंत राहील ! त्याला सुखानं वर्षांनुवर्षें निद्रा घेतां यावी म्हणून मी चांगलीशी निवाऱ्याची जागा शोधतों आहें. ती पहा, ती पलीकडची जागा हा पापाचा गोळा सुरक्षित ठेवण्याला योग्य आहे.

**राधा०**—इच्छाराम, इच्छाराम, नका हो माझ्या बाळाचे काळ होऊं ! तुम्ही त्याचे जन्मदाते वडील आहात ना ? मग त्याला जिवतपणीं मरण देण्याच घोर कर्म तुमच्या हातून होत तरी कस ? इच्छाराम, त्या अर्भकावर दया करा आणि त्याला जिवत ठेवा ! मी तुमचे पाय धरत्ये—माझ्या पोटच्या गोळ्याला जिवत ठेवा.

**इच्छा०**—नाही, मला हे पाप आता जिवत ठेवता येत नाहीं. तुझी विनवणी मी एक वेळ ऐकली आणि सहा वर्षापूर्वी एक पाप जिवत ठेवल. ते पाप कुठ कोणत्या रूपान वावरत आहे तेच मला समजत नाही. आज त्याला वाचाहि फुटली असेल ! आता तसला अविचार माझ्या हातून होण शक्य नाही. मी हे पाप जिवतपणींच गाडून टाकणार आणि मोकळा होणार ! ती पहा, ती निवाऱ्याची जागा पाप झाकून ठेवायला फार चागली आहे. तिथ खळगा खणतों आणि ..

**राधा०**—तुम्ही निष्ठुर होऊन तो खळगा भरून काढाल, पण माझ्या पोटाला पडलेला खळगा कसा हो भरून निघेल ? इच्छाराम, नका हो असे निष्ठुर होऊं ! तुम्ही माझ्या बाळाचे जन्मदाते वडील आहात ना ? मग असे निष्ठुर का होता ? त्याला मरण का देता ?

**इच्छा०**—ज्याला मी जन्म दिला त्याला मरण देण्याचा अधिकारहि मला आहेच ! मी या जिवत पापाला मरण देणार आणि माझी अब्रू जिवत ठेवणार !

**राधा०**—पण असल्या पापकृतीन तुमची अब्रू कशी जिवत राहील ? समाजाला जर तुमच्या पापाची वार्ता कळेल तर तो तुमची छीः थूः करणार नाही का ?

**इच्छा०**—आमचा हिंदुसमाज तसा मोठा क्षमाशील आहे. आजपर्यंत ज्या ज्या विधवाच्या हातून चोरटीं पातक झाली त्याना आमच्या हिंदुसमाजान आपण होऊन कोणती शिक्षा दिली ? शिवाय विधवाची पातक जिवत गाडली गेली किंवा कायमचीं अधारात दडून राहिली तर शिक्षेची गोष्ट बोलावयासच नको. एकाद्या तरुण विधवेनें राजरोस लग्न केल तर तिच्याकडे समाज तुच्छतेने पाहतो, पण तेंच, जर ती विधवा अधारात पापकृत्ये करून तीं अधारातच पचवून दाखवील तर तिला समाजाकडून क्षमा मिळते. अधारातल पाप आमच्या क्षमाशील हिंदुसमाजाला मानवत !

**राधा०**—पण त्या क्षमाशीलपणाच प्रायश्चित्तहि हिंदुसमाजाला भोगाव लागत नाहीं का ? तरुण विधवाना लग्नाचा पवित्र मार्ग खुला करून न दिल्यामुळे

हिंदुसमाजाला स्वतःच्या शिरावर पातकांचे मेरुपर्वत रचून घ्यावे लागले आहेत. विधवा पातकी असली तरी तिला मातेचें हळवं हृदय नसतं असं नाहीं! विधवा बिचाऱ्या काय, दीन गाई त्या, त्यांना समाजाच्या अन्यायी वागणुकी-पुढं मान वांकवावीच लागते. त्यांनीं केलेल्या बालहत्यांचं पातक शेवटीं समाजाच्याच माथ्यावर बसतं. विधवामातांचे हंबरडे कुणाला ऐकूं न आले तरी परमेश्वराच्या कानावर ते गेल्याशिवाय कसे राहतील? बालहत्या करतांना विधवामातांचीं हृदयें दुभंग होतात आणि हृदयांत वास करणाऱ्या परमेश्वराला धरणीकंपाचा धक्का बसतो. विधवामातांचे शाप शिरावर घेतल्यामुळें आपला हिंदुसमाज चोहोंबाजूंनीं खिळखिळा झाला आहे. हिंदुधर्माचा त्याग करणाऱ्यांत सर्वांत मोठी संख्या विधवामातांचीच आहे. हिंदुसमाज केव्हां डोळे उघडील तेव्हां उघडो, पण इच्छाराम, तुम्ही तरी डोळे मिटूं नका. या बालहत्येचं पातक तुम्ही तरी कुठं फेडणार हो?

## सविनय धिःकारगीत

**पाप हें अघोर कां। शिरिं बळेंचि घेतसां॥ हीन कृति करीतसां॥ध्रु०॥ धाम खरें मंगलमय। जननीमन॥ अदय बनुनि कापित कां॥ १॥**

**इच्छा०**—माझी काळजी तूं करूं नको. मी हें पाप अंधारांत गाडणार आणि उजळ माथ्यानं समाजांत वावरणार! चल, हो दूर! सोड मला, हो दूर!

**राधा०**—नाहीं, मी तुम्हांला सोडणार नाहीं. माझं अर्भक माझ्याजवळ द्या. मी त्याच्यासाठीं रानावनाचासुद्धां आश्रय करीन, पण त्याला जिवंत ठेवीन!

**इच्छा०**—छट्, तें शक्य नाहीं. मी हें पाप जिवंत गाडणार!

**राधा०**—मग असं तरी करा. माझ्या पोटीं जन्म घेतलेल्या माझ्या पहिल्या बाळाला ज्याप्रमाणं रस्त्यावर जिवंत टाकलंत तसं तरी करा. कुणा माउलीला दया आली तर ती बाळाचा संभाळ तरी करील!

**इच्छा०**—छेः छेः, तसला अविचार पुनश्च माझ्या हातून होणं शक्य नाहीं. तुझं तें पहिलं पोर आज सहा वर्षांचं झालं असेल, त्याला जर वाचा फुटली तर माझी धडगत उरणार नाहीं. मीं मूर्खपणानं त्याच्या गळ्यांत तुला

ताईत बांधू दिला आणि त्याला रस्त्यावर सोडल. तो ताईत कुणाच्या हाताला लागला कुणाला ठाऊक? त्या ताईतात एक कागद घालून तू त्याच्यावर त्याच नाव लिहून ठेवल होतस! त्या नावाचा मुलगा तुला आढळला तर तू आनदान नाचू लागशील आणि माझ्या पापाला वाचा फुटेल!

**राधा०**—हो, तो माझा आनदच होता आणि आनदच आहे. तो मला भेटला तर मला का बर आनद होणार नाही?

**इच्छा०**—बस्स, पुरे झाला हा वितडवाद! हो दूर, मला माझ काम चटकन् उरकून दुसऱ्या कामाला गेल पाहिजे.

**राधा०**—मी तुम्हाला इथून हलू देणार नाही. मुलाला माझ्याजवळ मुकाट्यान द्या, नाही तर आरडाओरडा करून मी सारा गाव इथ जमवीन!

**इच्छा०**—त्यात तुझीच अब्रू जाईल! ओरड पाहू कशी ओरडतेस ती? हा पहा मी तुला दूर लोटून देऊन या पोरट्याला खड्यात लोटण्यासाठी तिकडे जातों. ( तिला लोटून देतो व जाऊ लागतो. )

**राधा०**—धावा, धावा, हा नराधम एका अर्भकाला जिवत गाडतो आहे, धावा!

**इच्छा०**—(परतून) अग, अशी बेफाम कशी झालीस? (तिचे तोंड दाबून) आरडाओरडा थांबव! अग, काय केलस हे चांडाळणी? तुझी आरडाओरड ऐकून ते पहा कोणस इकडे आल! आता मला इथ थांबता येत नाहीं! हे कारटे घे—मी आपली अब्रु बचावतो. पण लक्षात ठेव की, तू जर मला कधी या पोरासह जिवत आढळलीस तर मी तुला, या कारट्यासह, जिवत पुरीन! ते आलच कुणी तरी! मी जातों, पण लक्षात ठेव की, तू किंवा हे कारट मला पुनः दिसता कामा नये! ( जातो. )

**राधा०**—अगबाई, तें कोण येत आहे? मी विधवा आहे. मी बाळासह कुणाच्या दृष्टीला पडल्यें तर अनर्थ ओढवेल! आपणहि कुठ तरी पळून जाव! बाळा, चल! तुझ्या कपाळी मरणच लिहिलेल असेल तर ते तुला, आईच्या प्रेमळ हृदयाचा आधार मिळाला असताना तरी येऊ दे. मी तुला एकट्याला कधीहि मरू देणार नाही. आलच कोणस तिकडून! ( पळून जाते. )

**दयाराम**—(हातात काठी व कदील घेऊन प्र. क. ) ती बाई तिकडे कुठ पळाली? आणि तिच्या हातात काय आहे तें? अरे बापरे, ती तर नदी-

तीराकडे धांवत चालली ! चला, तिचा पाठलाग तरी करावा ! काय भानगड आहे कुणास ठाऊक ! ( जातां जातां ) अरे, कोणी तरी धांवा लौकर ! ती कोणशी बाई नदींत जीव द्यायला चालली ! पकडा तिला ! पकडा त्या बाईला !

( जातो. )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—नदीकांठ. सर्वत्र सामसूम. राधा मुलासह प्रवेश करते. )

**राधा०**—

### करुणागीत

**पापिणी अम्हां म्हणती । दोष आमुचा नसतां ॥ वाट सरळ आडविती । जीव कोंडिती पुरता ॥ ध्रु० ॥ अम्हां विधवांना तुच्छ मानिती सारे । जगीं वागविती जेविं कां गुरेंढोरें ॥ जरी गाय कधीं जाय तोडुनी दावें । ठरे पापिणी ती, हाय ! नीचता पावे ॥ १ ॥**

अंधारी रात्र आणि अंधारी कर्म. सर्वच अंधार ! जगाचा डोळा चुकवून मी अगदीं एका बाजूला आल्यें, पण या अंधारांतून मला एकहि आशेचा किरण दिसत नाहीं. मी बालविधवा आहें, पण पापिणी आहें का ? समाजानं जर मला मोडलेला संसार थाटण्याचा धर्ममार्ग खुला करून दिला असता तर मी तरी कशाला आडमार्गांत शिरल्यें असतें ? परमेश्वर साक्ष, मला लग्नाचा धर्ममार्गच आक्रमावयाचा होता आणि त्याच उद्देशानं मीं इच्छारामांच्या चरणांचा आश्रय घेतला. त्यांनींहि मला वचनं देऊन झुलवीत ठेवलं, पण शेवटीं फशीं पाडलं ! ते अनयपूरच्या सर्वाधिकाऱ्यांचे पुत्र, त्यांना समाजाच्या दूषणाची भीति वाटली आणि कुळाच्या अब्रूला धक्का लागूं नये म्हणून त्यांनीं माझ्यासारख्या हतभागिनी विधवेशीं लग्न करण्याचं नाकारलं ! मी काय, दीन गाय ! त्यांनीं बांधून दिलेल्या गोठ्यांत मी खुशाल पडून राहिल्यें. माझ्या पोटीं जन्माला आलेल्या पहिल्या बाळाची तशी वासलात लागली. पण त्यांत आनंद इतकाच कीं, माझा आनंद कुठं

तरी जिवत आहे ! पण तेहि भाग्य या बाळाच्या भालप्रदेशी लिहिलेल दिसत नाहीं. बाळा, तुझी हत्या मी उघड्या डोळ्यानीं पाहू का ? माझ मातेच हृदय या निष्ठुर कृत्याला कशी समति देईल बर ? आता मी करू तरी काय ? बाळाला कुठ लपवू ! माझे प्राण कसे वाचवू ?

## निराशागीत

**भाग्यहीनां गतधवांना मोक्ष ना मरणाविना । थोर कुळिं त्या जन्म घेती अंतिं वरिती लांछना ॥ ध्रु० ॥ मलयगिरिच्या भव्य शिखरी । जन्म यावा दिव्यसा ॥ मृत्यु ये परि नागदंशें । मीच गति नारीजनां ॥ १ ॥**

अगबाई ! हे कोण तिकडून दिवा घेऊन येत आहे ? कुणी माझा पाठलाग तर करीत नसेल ? माझ्या हृदयाचा हा नदादीप मालवून टाकण्यासाठीं तो राक्षस दिवा घेऊन तर येत नसेल ? अगबाई ! हा आलाच ! आता कुठ पळू ? बाळा, चल आपण दोघहि जलसमाधि घेऊ ! मी तुझ्याबरोबर असल्यें म्हणजे मातेच्या प्रेमळ हृदयाचा आसरा लाभल्यामुळे तुला मरणाची तितकीशी भीति वाटणार नाही ! आलाच हा अगदी जवळ ! आता नदीच्या तळाला लपून बसण्याशिवाय दुसरा मार्गच दिसत नाहीं ! गगामाई, मी बाळाला घेऊन आता तुझ्याच आश्रयाला येत्यें ! (नदीच्या काठावर उभी राहून) गगामाई, मला कृपा करून पोटात घे ! (मुलासह उडी टाकते. इतक्यात दयाराम दिवा घेऊन येतो.)

**दयाराम**—अरेरे ! त्या अभागिनीन नदींत उडी घेतली वाटत ? आता काय करू ! मी नदींत उडी टाकून त्या अभागिनीला वाचवू का ? छेः, माझ्या हातून त्या स्त्रीला वाचविण्याच काम होईलस वाटत नाही. माझे पाय थरथरू लागले. (अगातला कपडा काढीत) पण पहावाच प्रयत्न करून ! (तो जाऊ लागतो तों इच्छाराम मागाहून येऊन त्याला तोंडघशीं पाडतो आणि दिवा घेऊन पळून जातो.)

**दया०**—अयाई ! आई ! आऽऽई !

**नदीतून आवाज**—आई ! आई ग ! आऽऽई !

**पडदा**

---

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

( **स्थळ**—रस्ता. यशोदा देवदर्शन करून घराकडे जात आहे. )

**यशोदा**—देवदर्शन घेतल्यानं मला किती आनंद होतो पण ! ती विठोबाची मूर्ति डोळे भरून पाहिली कीं मनाला कसं समाधान होतें.

**आनंद**—( प्रवेशून ) आई, कुठं ग गेली होतीस इतका वेळ ?

**यशो०**—बाळ, कुणालाहि कुठं म्हणून विचारूं नये, कुणीकडे म्हणून विचारावं !

**आनंद**—कुठं म्हणून कां विचारूं नये ? कुठं म्हणजेच कुणीकडे असा अर्थ मला मास्तरांनीं शिकवला आहे ! कुठं म्हणून विचारलं तर काय पाप लागतं का ग आई ?

**यशो०**—हो पाप लागतं आणि अपशकुन होतो.

**आनं०**—अपशकुन म्हणजे काय ग आई ?

**यशो०**—अपशकुन म्हणजे काम बिघडणं. कुणालाहि कुठं म्हणून विचारलं तर त्याचं काम बिघडतं असं मोठीं माणसं म्हणतात !

**आनं०**—मग आई, मी तुला कुठं गेली होतीस म्हणून विचारलं तेव्हां तुझं काम आतां बिघडेल का ग ?

**यशो०**—तुझ्या प्रेमळ बोलण्यानं नाहीं माझं काम बिघडायचं ! शिवाय, माझं काम व्हावं म्हणून मी विठोबाला नवस बोलल्यें आहें—आतां नाहीं माझं काम बिघडायचं बरं ! देव माझे सर्व मनोरथ खात्रीनं पूर्ण करील !

**आनं०**—पण आई, तुझ्यावर असं कोणतं संकट आलं आहे तें तरी सांग मला ! तुझं संकट दूर करण्याच्या कामीं मी देवाला सुद्धां मदत करीन ! सांगना, कोणतं संकट तुझ्यावर आलं आहे ?

**यशो०**—माझा राजा काही हल्ली नीटसा वागत नाही, म्हणून त्याला सुबुद्धि देण्यासाठी मी विठोबाला नवस बोलल्ये आहे. देवाच्या दयेन माझा राजा सर्व सकटातून मुक्त होईल.

**आनं०**—आई, माझ्यावर सकट आल तर मी काय करीन सागू का ?

**यशो०**—काय करशील तू ?

**आनं०**—मी देवाला नाही नवस करायचा ! मी तुला नवस बोलेन ! देव नाहीं मोठा ! आईच मोठी ! माझ्या आईला मी नवस बोललों की, माझीं सर्व सकटें आपोआप दूर होतील बघ ! आई हाच माझा देव !

**यशो०**—तसच बाळ, देव हीच जगाची आई ! तुकाराम विठोबाला काय म्हणतात ठाऊक आहे का तुला ? ते विठोबाला विठाई म्हणतात ! पढरपुरास विटेवर उभा असलेल्या विठोबाला तुकारामानीं विठाईमाउली असच म्हटल आहे !

**आनं०**—वाहवा ! म्हणजे तुकारामानी, विठोबान घातलेल ते भलथोरल पागोट सुद्धा पाहिलेल दिसत नाही ! पागोट घातलेला विठोबा आई कसा होईल ? काही तरी बोलत्येस तू ! विठोबा तो विठोबा आणि आई ती आई ! आई, तुझी सर त्या विठोबाला सुद्धा येणार नाहीं बघ !

**यशो०**—वेडा नाही तर ! देवाला अस काही बोलू नये बर ! चल घरात, तुला भूक नाही का लागली ?

**आनं०**—मला भूक लागली म्हणून तर तुला मी शोधीत होतों. पण आई, तुला पाहिल्यावर कीं नाहीं, माझी भूक कुठच्या कुठ पळून गेली ! तुझ्या गोड बोलानी माझ पोट अगदीं भरून गेल बघ ! ही पहा, मला ढेकर सुद्धा आली ! ( ढेकर देतो. )

**यशो०**—बाळ आनदा, किती गोड मुलगा आहेसरे तू ! मी तुझी खोटी आई असूनसुद्धा तू मला इतका आनद देतो आहेस, मग कधी खऱ्या आईन तुला असा हृदयाशी धरला तर तिचा आनद, तिच चिमुकल हृदय फोडून गगनालाच व्यापून टाकील ! किती गोड मुलगा आहेस तरी ! ( त्याचा मुका घेते. )

**आनं०**—आहाहाहा! आई, तूं आतां माझा पापा घेतलास ना, तेव्हां मला काय वाटलं सांगूं का? मला असं वाटलं कीं, भरल्या पोटावर मी बासुंदीचाच भुरका मारला! आहाहाहा!

**यशो०**—बाळा आनंदा! नको बोलूंस आणखी, तुला कुणा चांडाळाची दृष्ट लागेल! चल, तुला पदराखालीं झांकून घेऊन घरीं नेत्यें. (पदराखाली झांकून घेऊन जाते.)

**इच्छाराम**—(पुढें येऊन) हें काय गौडबंगाल आहे? ती बाई त्या मुलाची खोटी आई आणि तो तिचा लटका मुलगा आनंद! ज्याला मीं रस्त्यावर टाकून दिलं, तो कारटा आनंद तर हा नसेल? असेना, आतां काय भीति? राधेनं पोरासह नदींत उडी टाकली आणि सर्व पाप पाण्याच्या पुरानं धुऊन गेलं! असेना तो आनंद! राधा मेली ही तरी काय कमी आनंदाची गोष्ट आहे? राधा मेली, आतां माझ्याहि आनंदाला पारावार उरलेला नाहीं. आतां आपण आनंदीकडे जाऊन आनंद लुटावा! (जाऊं लागतो तों वेड लागलेली राधा वेडेचार करीत प्रवेश करते.) ऑं, ही कोण वेडी? अरे ही तर ती राधा! आणि ही मेलेली जिवंत कशी झाली? ही खरीच जिवंत आहे की, समंधाच्या रूपानं वावरत्ये आहे? बाळंतिणी अपघातानं मेल्या म्हणजे भूत होतात असं जें म्हणतात तें तर खरं झालं नसेल? आतां असंच करावं, ही काय बरळत्ये तें आड उभें राहून ऐकावं! (आड उभा राहतो.)

**राधा०**—(पदरांत घेतलेल्या दगडाला हृदयाशीं धरून थोपटीत) अंगाऽऽई! माझा बाळ कान्हा। उभा ग अंगणीं। पाहते चांदणी। रूप त्याचें॥ छेः ग बाई, मी नाहीं कुणाला माझ्या बाळाचं रूप दाखवणार! दृष्ट पडायची कुणाची! चांडाळांनों, दूर व्हा. मला बाळासह नदींत उडी घ्यायची आहे! बाळ, तुला बरोबर घेऊनच मी स्वर्गाला जाईन बरं? त्या स्वर्गात किनई देव राहतात आणि तिथं कुणाची कुणाला दृष्ट लागत नाहीं! अगबाई! पण हा कुणाचा शब्द? हें कोण रडतें आहे? (रडण्याचा सूर काढून) ऊं-ऊं-ऊं-ऊं, अगबाई, हें माझ्या बाळाचंच रडं! बाळ, नको रडूं, मी तुला बरोबर घेतल्याशिवाय नाहीं बरं स्वर्गाला जायची! स्वर्गात सारे देव राहतात, तिथं राक्षसांना येतांच येत नाहीं. उगी बाळ, उगी बरं! बाळ, कां रडतोस? मी तुझी आई आहें ना तुझ्यासाठीं रडायला इथं? बाळ, तूं आनंदानं हंसावंस आणि तुझा आनंद

पाहून मी रडाव, आनदान रडाव, हेच योग्य नाही का? बाळ, मी रडून रडून नदीला सुद्धा पूर आणीन, तू आपला आनदान हसत रहा! आनद! आनद! कुठ आहे तो माझा आनद? कुठ आहे माझा आनद?

## वेडं प्रेमगीत

**बाळ माझा येथ दिसला। हळुच हांसला। छकुला॥ ध्रु०॥**
**फूल फुलले, रंग खुलले। खुडुनि काय घेतां॥ लता माउली रडूं लागली। चुरगळूं नका॥ १॥**

(इकडे तिकडे शोधते. इतक्यात वृद्ध दयाराम राधेला शोधीत येतात. त्याना पकडून) हाच माझा आनद! हाच माझा आनद! आनदा, किती दिवसानी तरी तू मला भेटलास रे पण? हो, पण तुझ्या गळ्यातला ताईत कुठ आहे? नाहीं, तुझ्या गळ्यात ताईत नाही, तू नव्हेस माझा आनद! हो दूर, हो दूर! अगबाई, पण माझ सोनुल कुठ गेल? आत्ता रडत होत ना इथ? कुठ गेल माझ सोनुल? अगबाई, हे कोण माझ्या हृदयात खोल खोल दडून रडत आहे? आत, आत अगदी आत, हृदयात दडून कुणी तरी रडत आहे! आईच्या हृदयातला खोल रडण्याचा सूर तुम्हाला ऐकायला येतो का हो? बोला ना! हा पहा, (मुलाप्रमाण रडून) मला माझ्या हृदयातला रडण्याचा सूर ऐकायला येतो आहे! ऐका, चाडाळानो, आईच्या हृदयातला रडण्याचा खोल सूर ऐका आणि माझ्या बाळाला खड्डयात लोटू नका! हे माझ छकुल मी हृदयाशी घट्ट बाधून ठेवल आहे, नाही ना हो तुम्ही त्याला जिवत गाडणार?

**दया०**—जगन्माते विठाई, काय ग तुझा या अनाथ विधवावर कोप तरी? बाई, चल घरीं, अशी सैरावैरा हिंडू नकोस, चल घरीं!

**राधा०**—चला पण मला माझा आनदा दाखवाल का? आता मोठा झाला आहे हो तो! चला, तो पहा माझा आनदा, त्या पलीकडच्या झाडाशीं उभा आहे, त्याला मी आणत्ये बर का धरून? आनदा, अरे आनदा.. (ती धावत जाते, दयाराम तिच्या मागून जाऊ लागतो, पण इतक्यात इच्छाराम पुढ येऊन त्याला हटकतो.)

**इच्छा०**—अहो आजोबा, थांबा कीं थोडे ! काय त्या वेडीच्या नादी लागतां ? ती वेडी आपल्या पातकांचं प्रायश्चित्त भोगत्ये आहे, नका तिच्या नादीं लागूं ! तुम्हांला माहीत आहे का ती कोण आहे ती ?

**दया०**—मला नाहीं माहीत ती कोण आहे ती !

**इच्छा०**—मग तुम्हांला ती कुठं सांपडली हो ?

**दया०**—तिनं एका काळरात्रीं लहानग्या मुलासह नदींत उडी घेतली. मला तिची चाहूल लागली तेव्हां मी तिच्या मागं तिला अडवायला गेलों, पण कुणी चांडाळानं धक्का मारून मला तोंडघशीं पाडलं. तो चांडाळ अंधारांतून माझ्या हातांतील कंदील घेऊन पळाला म्हणून बरं झालं; नाहीं तर मी या काठीनं त्याचं टाळकंच फोडलं असतं ! ( त्वेषानं काठी उगारतो. )

**इच्छा०**—हं, हं, कळलं मला ! बरं, पुढं काय झालं ?

**दया०**—पुढं मीं कसाबसा उठलों आणि धडपडत नदीपर्यंत गेलों. ती बाई नदीच्या तळाला बुडी मारून वर आली आणि तिच्या आयुष्याची दोरी बळकट म्हणूनच नदीकांठचा एक लव्हाळा तिच्या हाताला लागला. ती आई–आई करीत त्या लव्हाळ्याला घट्ट धरून बसली होती—मग मी मोठ्या प्रयासानं तिला वांचवलं ! ती वांचली पण तिच्या मुलाचा कांहीं पत्ता लागला नाहीं. ती तेव्हांपासून अशी वेडी होऊन सैरावैरा हिंडत असते. मी तरी काय करूं ? माझ्या हातून होईल तितका मी तिचा संभाळ करतों—पण मी तुमच्याशीं असा बोलत काय बसलों ? जाऊं द्या मला, नाहीं तर ती वेडी माउली कुठं भलतीकडेच जायची !

**इच्छा०**—ती नाहीं जात कुठं ! ती पाहिलीत का, त्या झाडालाच आपलं मूल समजून त्याला कवटाळून उभी आहे. मला वाटतं, तिचं हें आईचं वेड आहे !

**दया०**—मलासुद्धां तसंच वाटतं. एकंदर प्रकारावरून ती कुणीतरी फसगत झालेली विधवा माउली असावी !

**इच्छा०**—विधवा असून माउली झाली, तेव्हां ती पापिणीच नव्हे का ? त्या पापिणीला तुमच्यासारख्या एका वयोवृद्ध पुरुषानें आसरा द्यावा हें मला तरी कांहीं योग्य दिसत नाहीं. असल्या पापिणींची, तुमच्यासारख्यांनीं तरी कींव करतां कामा नये.

**दया०**—काय बोलता हे तुम्ही, एकाद्या दीन गाईचा गळा कापणाऱ्या कसाबासारखे ? आम्ही हिंदूनी दीन विधवाची कीव केली नाही म्हणून तर हिंदुसमाजाला हे दुबळे दिवस आले आहेत ! बालविधवाचा अमानुष छळ करणाऱ्या आम्हा हिंदूना धिःकार असो ! त्या विधवा फसतात आणि माता झाल्या म्हणजे समाजाच्या तिरस्काराला भिऊन बालहत्त्या करण्याला प्रवृत्त होतात—पण अस असल तरी त्याच हृदय पिळवटून गेल्याशिवाय रहात असेल का ? त्या वरून हसल्या तरी आईच्या आतड्यान आतल्या आत रडतात—त्या दीन विधवामाताचे शिव्याशापच आपल्या हिंदुसमाजाला बाधताहेत बर ! दुसऱ्या कुणाचेहि शिव्याशाप सहन करवतील पण आयाचे शिव्याशाप—नको, तो विचार सुद्धा नको—मी जातो—

**इच्छा०**—अहो पण जरा थाबा, ती वेडी कुणा पाप्याच नाव घेते का ? ज्या कुणा चाडाळान तिला फसवल तोच खरा पापी नव्हे का ?

**दया०**—ती बिचारी कुणाचहि नाव घेत नाही, नुस्ती आनदा—आनदा करीत एकसारखा टाहो फोडीत असते ! ती जर त्या पाप्याच नाव घेती तर त्याला हुडकून काढून मी त्याच्या मानेचा घोंटच घेतला असता ! पण ती माउली वेडाच्या भरात सुद्धा कुणाच नाव घेत नाही. नुस्ता मुलाच्या नावान टाहो फोडते—तिच वेड म्हणजे आईच्या प्रेमळ अतःकरणाची जागती ज्योत आहे ! बर जातो आता, ती अजून तिथच उभी आहे. ( जातो. )

**इच्छा०**—हें ठीक झाल ! ती कुणाच—म्हणजे माझच—नाव घेत नाही, हें ठीक झाल ! आता चिंता नाही. ती वेडी झाली तरी माझ्यापुरती तरी शहाणपणान वागते आहे ही तरी मेहेरबानीच ! आता निर्धास्त झालों, आता आनदीकडे जायला जीव आनदित झाला आहे.

( जातो. )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—आनंदीच्या दिवाणखान्याच्या बाहेरची बाजू. राजाराम प्रवेश करतो. )

**राजा०**—आनंदी ही तरी किती सुंदर आणि किती गोड तरुणी आहे ! ती जर माझ्याशीं लग्न करायला कबूल होईल तर काय मौज उडेल ! तिला म्हणे येथील सर्वाधिकाऱ्यांचा पुत्र इच्छाराम यानें मागणी घातली असून तिला दुसरी मागणी घालायला येथील धनाराम सावकाराचा मुलगा माणीकरामहि तयार झाला आहे ! आतां गोष्टी या थराला येऊन पोंचल्यानंतर माझ्या मागणीचं प्रकरण लांबणीवर टाकण्यांत अर्थ नाहीं. आनंदी ही स्वच्छंदी मुलगी असल्यामुळं तिला सून करून घ्यायला आई तर कधींच परवानगी देणार नाहीं आणि आमचे जमदग्नि वडील कधींकाळीं माझ्या या कृतीला संमति देतील ही आशाच नको. पण प्रेमाच्या बाबतींत आईबापांच्या आवडीनिवडीवर विसंबून राहण्याचे दिवस आतां उरलेले नाहींत. आतां माझ्या या स्वच्छंदी वर्तनानें बाबा रागावतील आणि मला घरांतून घालवूनहि देतील हें खरें, पण प्रेमाच्या पूर्तीसाठीं मला या संकटाला तोंड देण्यास तयार असलंच पाहिजे. आई थोडे दिवस रुसेल, रागावेल आणि कदाचित् रडतहि बसेल; पण कांही दिवस लोटले म्हणजे तिचंहि मन निवळेल आणि ती पूर्ववत् माझ्यावर प्रेम करूं लागेल. पण अशा विचारांत वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. चांगली गोष्ट केव्हांहि तांतडीनंच करावी.

**आनंद०**—( हळूच त्याच्या पाठीमागून येऊन त्याला हुप् करून हटकतो. ) हुप् ! काय हो राजाभाऊ, बिचकलांतसे ? आणि कां हो राजाभाऊ, असे तांतडीनें कुठं चाललांत ?

**राजा०**—( राग आंवरून उसन्या लडिवाळपणानें ) ओ हो ! कोणरे तूं ! वा:, तूं तर आमचा आनंदा ! इकडेरे कुठं आलास ?

**आनंद०**—जिकडे तुम्ही तिकडे मी ! तुम्ही माझे वडील भाऊ ना ? मग तुमच्या पावलावर पाऊल ठेवून मला चालायला नको का ? जसे तुम्ही तसा मी ! तुम्ही जिथं जाणार तिथं मीहि येणार !

**राजा०**—(स्वगत) म्हणजे हा कारटा माझ्या पाळतीवर आहे वाटत! याला आनदीकडे नेला तर घात करील माझा! छे:, वाटेल ती युक्ति करून याला वाटेला लावलाच पाहिजे.

**आनं०**—काहो राजाभाऊ, एवढा विचार कसला करता? न्या ना मला तुमच्याबरोबर!

**राजा०**—(पुनः उसन्या लडिवाळपणानें) बाळ, मी जातो आहें फार मोठ्या कामाला! तिथ तुझ्यासारख्या लहान मुलाच काही काम नाहीं बर! जा तूं घरी. आईला टाकून अस बाहेर भटकू नये!

**आनं०**—राजाभाऊ, मी तरी तेंच म्हणतो, आईला टाकून अस बाहेर भटकू नये. चला घरी, आई तुमचीच वाट पहात बसली आहे.

**राजा०**—बर मग तूं अस कर, तू पुढ हो, हा मी आलोच तुझ्या मागून!

**आनं०**—मग तुम्हीहि असच करा, तुम्ही आईकडे चला, हा मी आलोच तुमच्या मागून! मी तुम्हाला बरोबर घेतल्याशिवाय घरीं जाणार नाहीं. (त्याला अडवतो.)

**राजा०**—(स्वगत) हे कारटे आडवें आल आहे, कापून काढू का याला? आडव आलेल कापून काढाव अस म्हणतात. पण नको, आणखी थोड याला चुचकारून पाहिल पाहिजे. (लडिवाळपणानें) बाळ, हा असला हट्ट तुला शोभत नाहीं. मोठ्या माणसाच ऐकाव.

**आनं०**—मी तरी तेंच म्हणतों, मोठ्या माणसाच ऐकाव आणि आईची आज्ञा मानावी.

**राजा०**—आतां प्रश्न आहे माझ्या आज्ञेचा, आईच्या आज्ञेचा नव्हे! (रागानें) आई राहिली घरीं, इथं तुला माझीच आज्ञा मानली पाहिजे. बऱ्या बोलान घरीं जा.

**आनं०**—तुम्हीहि बऱ्या बोलान घरीं चला.

**राजा०**—जास्त फाजीलपणा करशील तर मी तुला मारीन.

**आनं०**—खुशाल मारा—जाणार नाहीं !

**राजा०**—झोडपीन.

**आनं०**—खुशाल झोडपा, जाणार नाहीं !

**राजा०**—चामडी लोळवीन.

**आनं०**—खुशाल लोळवा, जाणार नाहीं !

**राजा०**—भावाची आज्ञा मोडायला तुला शरम नाहीं वाटत ?

**आनं०**—आईची आज्ञा मोडायला जर तुम्हांला शरम वाटत नाहीं, तर तुमची आज्ञा मोडायला मला तरी शरम कां वाटावी हो ? जसे तुम्ही तसा मी ! तुम्ही आईची आज्ञा मोडतां म्हणून मी तुमचंच उदाहरण गिरवून तुमची आज्ञा मोडतों. खरं सांगा, आतां तरी मी तुमचा धाकटा भाऊ शोभतों कीं नाहीं ?

**राजा०**—कारट्या, तूं माझा भाऊ नाहींस आणि मी तुझा भाऊ नाहीं. अरे, तूं आम्हांला रस्त्यावर पडलेला सांपडलास--तुझ्या आईबापांचा सुद्धां पत्ता नाहीं.

**आनं०**—पण तुमच्या आईबापांचा पत्ता तुम्हांला माहीत आहे ना ? नसला माहीत तर मी दाखवतों त्यांचा पत्ता ! जें ज्याला माहीत नसेल तें त्याला दाखवून ठेवावं, खरं कीं नाहीं राजाभाऊ ?

**राजा०**—कमाल केलीस कारट्या !

**आनं०**—कमाल केलीत राजाभाऊ !

**राजा०**—भंडावून सोडलंस मला !

**आनं०**—भंडावून सोडलंत आईला !

**राजा०**—जातोस कीं भडकावूं ?

**आनं०**—म्हणजे तुम्ही नाहींच ऐकत, होय ना ? ठीक आहे, जातों मी ! पण...पण—तें नाहींच सांगत ! जा तुम्ही खुशाल.

**राजा०**—हो, हो, जातोंच मी, मला काय कुणाच्या बापाची भीति आहे ?

( जातो. )

**आनं०**—खरच राजाभाऊ, तुम्ही स्वतःच्या बापाचीहि भीति बाळगीत नाहीं, मग तुम्ही दुसऱ्यांच्या बापाना काय भिणार? आता असाच जातों आणि आईला इकडे घेऊन येतों—बर झाल इथला ठावठिकाणा तरी कळला! (जातो.)
( आतील महाल दिसूं लागतो. इच्छाराम व आनदी बोलत बसली आहेत. )

**इच्छाराम**—आनदी, तुझ खर प्रेम कुणावर आहे? माझ्यावर, त्या माणक्यावर कीं त्या राजावर? आम्हीं तिघानीं तुला मागणी घातली आहे, मग तू कुणाला वरणार?

**आनं०**—इच्छाराम, खर सागू? माझ प्रेम तुमच्यावरच आहे.

**इच्छा०**—तुझ खर प्रेम माझ्यावर आहे, खर ना? मग गगोदकाची शपथ वहा!

**आनं०**—मी वाटेल त्याची शपथ वहायला तयार आहे, पण इच्छाराम, इथ गगोदक कुठ आहे?

**इच्छा०**—मी आहें इच्छाराम! मनांत इच्छा करीन तें घडवून आणीन! या कलशात ( मद्याच्या शिशीकडे बोट दाखवून ) मद्य आहे अस मूर्ख लोक म्हणतील हे मला माहीत आहे, पण मी, या कलशात गगोदक भरलेल आहे असच म्हणेन! या कलियुगातील खरा आनद म्हणजे तुझ्यासारखी चटकचादणी आणि या कलियुगातील अस्सल गगोदक म्हणजे हें मद्य! वहा, या गगोदकाची शपथ वहा!

**आनंदी०**—( स्व० ) या वेळी स्वारी काही तितकीशी शुद्धीवर दिसत नाहीं, तेव्हां द्यावी याना थाप आणि लावाव वाटेला! ( उघड ) इच्छाराम, मी तुमच्याशिवाय इतर कोणालाहि वरणार नाहीं. ( शिशीवर हात ठेवते. )

**इच्छा०**—ठीक आहे. मी जातों आता. ( जाता जाता ) पण लक्षात ठेव, जर मला इथ तो माणक्या किंवा तो राजा दिसला तर मी त्याला ठार मारीन! आणि त्याना ठार मारल्यावर तुला सुद्धां या यक्षिणीच्या कांडीन यमसदनाला पाठवीन! ( तिला पिस्तुल दाखवतो. ) काय समजलीस?

**आनं०**—( कापत ) सर्व काहीं समजल्यें. इच्छाराम, मी तुमच्याशिवाय इतर कोणालाहि इथं थारा देणार नाहीं. पण हें पहा, तें पिस्तुल जरा बाजूला धरा, मला बाई, त्याची भारीच भीति वाटते!

**इच्छा०**—तुला या यक्षिणीच्या कांडीची भीति वाटते हें उत्तम आहे. नीट पाहून ठेवलंस ना ? आतां मी जातों. ( परतून ) पण हें बघ, तो माणक्या किंवा तो राजा इथं मला आढळतां कामा नयेत. जाऊं मी ? ( बरळत निघून जातो. )

**आनं०**—( सुस्कारे सोडीत ) अगबाई, काय पण घाबरून गेल्यें मी ? इच्छारामाशीं कुठून स्नेह जोडला असं मला झालं आहे. मेला एखाद्या वेळीं माझा खून पाडायला सुद्धां कमी करायचा नाहीं ! आधींच कसाब आणि त्यांत सर्वाधिकाऱ्याचा मुलगा !

**माणिकराम**—( प्रवेशून ) असे ना तो सर्वाधिकाऱ्याचा मुलगा ? त्याला एवढी काय घाबरतेस ? करून करून काय करील तो ?

**आनं०**—माणिकराम, तुम्हांला माहीत नाहीं, तो इच्छाराम कुणाचा खून सुद्धां करील ! मला बाई, त्याचा भरंवसा मुळींच येत नाहीं !

**माणिक०**—पण माझा भरंवसा येतो ना तुला ? झालं तर ! एकदां तूं माझ्याशीं लग्न लाव म्हणजे त्याची भीति तुला मुळींच बाळगायला नको ! तूं एकदां माझी पत्नी हो मग उडवतों त्याचं चंदन !

**इच्छा०**—( बाहेरून ) आनंदी ! ए आनंदी !

**आनं०**—अगबाई ! तो कसाब आला वाटतं परतून ? माणिकराम, तुम्ही लपा पाहूं तिथं, नाहीं तर——

**माणि०**—नाहीं तर तो काय करील ?

**आनं०**—नाहीं तर तो तुमचा खून पाडून माझाहि खून पाडील ! लपा आधीं, आलाच तो खाटीक !

**माणि०**—तर मग माझा नाइलाज आहे. तुझ्या आग्रहास्तव लपतों हवा तर !

**आनं०**—लपाच तर ! आला तो ! ( त्याला लपविते. )

**इच्छा०**—हें बघ आनंदी, तुला पुनः बजावतों, मला तुझ्या घरीं तो माणक्या किंवा तो राजा दिसतां कामा नयेत. ठार मारीन त्यांना आणि मग तुलाहि जिवंत ठेवणार नाहीं ! जाऊं मी ? वहा या यक्षिणीच्या कांडीची शपथ !

**आनं०**—हें पहा, मी वहात्ये शपथ, पण ही यक्षिणीची कांडी जरा बाजूला धरा !

**इच्छा०**—मग जाऊ मी ? ( वरळत जातो. )

**आनं०**—सुटल्यें बाई एकदाची त्या कसाबाच्या हातून ! काय पण भिऊन गेल्ये मीं !

**राजा०**—( प्रवेशून ) हे सुदरी ! भिऊ नकोस, मी तुझ रक्षण करीन, मग तर झाल ना ?

**आनं०**—हें पहा, मी तुमच्या पाया पडत्ये, तुम्ही आधी इथून जा कसे !

**राजा०**—का जाऊ मी ? तुझ माझ्यावर प्रेम नाही ? हे बघ आनदी, माझ्याशीं लग्न करून टाक म्हणजे तुला कुणाचीहि भीति बाळगायला नको ! तुझ्यासारख्या सुदर तरुणींनीं अस लग्नाशिवाय राहताच कामा नये. आनदी, तुझ प्रेम माझ्यावरच आहे ना ?

**आनं०**—हें पहा राजाराम ! आज जर मी जिवत राहिल्यें तर उद्या तुमच्या प्रश्नाच उत्तर देईन ! तुम्ही इथून जा पाहू बऱ्या बोलान, माझी बोबडी वळायची वेळ आली आहे !

**राजा०**—मला वाटत, तू त्या बावळट, खुळचट आणि आचरट माणक्याला भिते आहेस ! तो माणक्या दृष्टीला तर पडू दे, मी त्याला जिवत पुरीन !

**इच्छा०**—( बाहेरून ) आनदी, ए आनदी !

**आनं०**—आला, तो कसाब आला ! लपा आता, मेहेरबानी करून लपा तिथ !

**राजा०**—छट्, नाहीं लपणार ! त्या माणक्यालाच इतकी भित्येस कीं नाहीं ? मी त्या माणक्याला मातीला मिळवायला तयार आहें.

**आनं०**—नका आता माझा अत पाहू ! मी जिवत रहाव अस तुम्हांला वाटत असेल तर लपा लौकर ! मी तुमच्या पाया पडू का ?

**राजा०**—तर मग नाइलाज आहे. केवळ—केवळ तुझ्या आग्रहास्तव मी लपतों. ( लपतो. )

**इच्छा०**—ए आनंदी ! छट्, विसरलों काय तें ! काय सांगायला आलों मीं तुला ? सांग काय तें, नाहीं तर मारीन तुला ठार ! (तिच्यावर पिस्तुल रोंखतो.)

**आनं०**—हें पहा इच्छाराम, तुम्ही जा घरीं ! तुम्हीं सर्व कांहीं मला सांगून ठेवलं आहे ! पण हें पहा, ती यक्षिणीची कांडी बाजूला धरा, मला बाई भारीच भीति वाटते.

**इच्छा०**—म्हणजे तूं मला भित्येस, होय ना ? ठीक आहे तर, जातों मी ! (बरळत जातो.)

**आनं०**—छेः, मी आज जिवंत राहीन असं कांहीं मला वाटत नाहीं !

(राजाराम व माणिकराम एकमेकांचे गळे धरून बाहेर येतात.)

**माणि०**—राजा, बोल–मीच तो बावळट, आचरट आणि खुळचट नाहीं का ? तूं मला मातीला मिळवणार, होय ना ?

**राजा०**—हो, हो, तुला मी मातीला मिळवणार आणि आनंदीशीं लग्न करणार !

**माणिक०**—तुझ्या गळ्याला आनंदी केव्हां लग्नमाळेचा फांस घालील तेव्हां घालील, पण मी मात्र तुला आत्तांच गळा दाबून ठार मारणार आहें. (दोघांची झटापट सुरू होते व ते दोघे झगडत आंत जातात.)

**आनं०**—(घाबरून) अगबाई, हे दोघे आतां एकमेकांना ठार मारणार ! धांवा, धांवा, खून, खून !

**इच्छा०**— (येऊन) आनंदी, भिऊं नकोस ! ही पाहिलीस यक्षिणीची कांडी ? ऑं, तिकडे काय गडबड चालली आहे ? अरे हरामखोरांनो, तुम्हीच नव्हत का ते ? थांबा, तुम्हांलाच ठार मारतों. (पिस्तुल झाडतो.) आनंदी, आतां तूं आनंदानं झोंप घे, मीं कुणाला तरी ठार मारलं आहे खास ! पण हें बघ, माझं नांव कुणाला सांगूं नकोस, नाहीं तर तुला सुद्धां मी ठार मारीन !

**आनं०**—हें पहा इच्छाराम, तें पिस्तुल द्या माझ्याजवळ आणि तुम्ही जा इथून ! ती यक्षिणीची कांडी माझ्याजवळ असली म्हणजे मला कुणाचीहि भीति वाटणार नाहीं. द्या तें पिस्तुल !

**इच्छा०**—बर तर हे घे, मी जातो! (बरळत जातो.)

**आनं०**—आता असच कराव, टेलिफोन करून पोलिसाना बोलवावे. (टेलिफोन करावयास जाते.)

(आनदी गेल्यावर राजाराम माणिकरामाचे प्रेत घेऊन बाहेर येतो व प्रेत खालीं ठेवतो.)

**राजा०**—(घाबरलेला) अयाई! हे काय झाल? माणिकराम ठार झाला! पण याला कुणी मारल? याला कुणा तरी दुष्मनान गोळी घातली, पण तो दुष्मन कुठं आहे? आता हा खुनाचा आरोप माझ्यावर तर येणार नाही? इथ कुणीच दिसत नाहीं! ही वेळ पळून जायला बरी आहे. (जाऊ लागतो तो आनदी पिस्तुल रोखून त्याला अडवून धरते.)

**आनं०**—राजाराम, कुठ चाललात भेकड भागूबाईसारखे?

**राजा०**—आनदी! आनदी? हे ग काय? तूच माझ्यावर पिस्तुल रोखतेस? मी काय केल?

**आनं०**—तुम्ही माणिकरामाचा खून केलात!

**राजा०**—मीं खून केला आणि तो कशान?

**आनं०**—या पिस्तुलान!

**राजा०**—म्हणजे तूहि माझ्यावर उलटलीस?

**आनं०**—मी नाही तुमच्यावर उलटल्यें—तुमच कर्मच तुमच्यावर उलटल आहे.

**राजा०**—खरं आहे तुझ म्हणण! तुझ्या गोऱ्या गोमट्या थोबाडावर भाळून मी अखेरीस माझच थोबाड माझ्याच हातान फोडून घेतल! (चिडून) आईला सुद्धा तुच्छ लेखल, आणि तिची आज्ञा पायाखाली तुडवून तुझ्यासारख्या एका सुंदर सटवाईची पूजाअर्चा करायला इथ आलों त्याच प्रायश्चित्त तू मला अस देतेस काय! थांब, तुझीच नरडी प्रथम दाबतों, मग पाहतों माझ्यावर खुनाचा आळ कसा येतो तें! (तिच्या अगावर धांवून जाऊ लागतो.)

**आनं०**—दूर व्हा मुकाट्यानें, नाहीं तर ही यक्षिणीची कांडी तुमच्या पंचप्राणांवरून फिरेल ! राजाराम, तुम्हींच माणिकरामाचा खून केलांत.

**यशोदा**—( आनंदासह प्रवेशून ) काय ? माझ्या राजारामानं खून केला ? कशावरून तुम्ही असं म्हणतां ?

**आनं०**—या भक्कम पुराव्यावरून !

**यशो०**—राजा, राजा, काय रे केलंस हें ?

**आनंद**—राजाभाऊ, शेवटीं तुम्हीं आपला हट्ट पुरा केलात ना ? आई तुम्हांला असले छंद करूं नका म्हणून सांगत होती ना ? मग तिचं तुम्हीं कां ऐकलंत नाहीं ? आईची आज्ञा......

**राजा०**—मीं मोडली आणि त्याचं घोर प्रायश्चित्त भोगण्याची पाळी माझ्यावर आली आहे. आनंदा, मी तुझंहि ऐकलं नाहीं, आईचंहि ऐकलं नाहीं. किती घोर पातकी मी ?

**यशो०**—राजा, राजा, तूं माझ्या उदरीं जन्माला येऊन खुनी ठरावंस ना ?

**राजा०**—आई, पाहिजे तर तुझ्या पायांची शपथ घेऊन सांगतों, मीं खून केलेला नाहीं. कुणी तरी तिसऱ्याच माणसानं हा खून केला, पण त्याचा आळ मात्र माझ्यावर आला ! आई, मी खुनी नाहीं, आनंदा, मी खुनी नाहीं !

**आनं०**—खोटं बोलतां आहां तुम्ही ! माणिकरामाचा खून तुम्हीं या पिस्तुलानंच केलात ! ( पिस्तुल बाजूला ठेवते. )

( पोलीस अंमलदार शिपायांसह येतो. )

**अंमल०**—तुम्हीं टेलिफोनमधून कळवलंत तोच हा राजाराम होय ना ? आणा तें पिस्तुल इकडे ! ( पिस्तुल घेऊन ) माणिकरामाचें प्रेत कुठं आहे ?

**आनं०**—त्या तिथं !

**अंमल०**—ठीक आहे. ( शिपायांस ) या खुनी इसमाला गिरफदार करा आणि पंचनाम्याच्या तयारीला लागा. ( शिपाई तसें करतात. )

**यशो०**—बाळ, कायरे तुझी ही स्थिति ?

**आनंद**—राजाभाऊ, हें हो काय झाल ? आम्हाला टाकून कुठ हो चाललात ? तुम्ही गेल्यावर आई रडून रडून आकान्त करील ! राजाभाऊ, हें हो काय झाल ?

**राजा०**—आईच्या अवज्ञेच हें जहरी फळ माझ्या हातीं आल ! बाळ, आता तूच आईची सेवा कर. आई, मी आता फासावर चढायला जातो.

**यशो०**—काय, तू फासावर चढणार ?

**अंमल०**—होय, हा तुमचा खुनी पोर आता फांसावरच लटकणार !

**राजा०**—होय आई ! मी जरी खरा खुनी नसलो तरी मातृद्रोही आहे—मला अत्यत घोर अशा मातृद्रोहाच प्रायश्चित्त भोगलच पाहिजे. आई, तू मला उदार मनान क्षमा कर ! आई, हा घे तुझ्या मातृद्रोही पुत्राचा प्रणाम ! आऽऽई ! [पायावर डोकें ठेवावयास जातो, शिपाई त्याला मागे खेचतात.]

**पडदा**

---

# अंक तिसरा



## प्रवेश १ ला

( **स्थळ**—श्रीविठ्ठलमंदिराच्या बाहेरील बाजू. एका बाजूला राधा वेडेचार करीत बसली असून एक लंगडा भिकारी प्रवेश करतो. )

**लं. भिकारी**—लंगड्याला पैसा द्या. दया करा, लंगड्यावर दया करा !

**एक गृ०**—( प्रवेशून ) या भिकाऱ्यांनीं अगदीं भंडावून सोडलं बुवा! रस्त्यानं सरळ जायचीहि सोय उरली नाहीं. ती तिकडे वेडी ब्याद बसली आहे, तर ही इकडे लंगडी ब्याद उभी आहे. ( वेडीस ) काय ग सटवाई, काय झालं तुला दगड जमवायला ? बोल, काय हवं तुला !

**राधा०**—मला होय ? मला हवा आहे माझा आनंद ! त्याला कुठं तुम्हीं पाहिलांत का हो ? द्याना माझा आनंद मला !

**गृह०**—अग वेडे, ज्याचा आनंद त्याच्याजवळ ! आनंद हा कुणी कुणाला आणून द्यायचा नसतो.

**राधा०**—नाहीं हो ! माझा आनंद मला सोडून गेल्याला झालीं सहा वर्षे ! द्याना मला तो आणून !

**गृह०**—हो, हो, देतों आणून आनंद ! वेडी कुठली, तुला आनंद हवा आहे ना ? हा पहा तुझा आनंद ठेवलाय् खिशांत ! वेडी कुठली !

**राधा०**—( त्याचा कोट धरून ) काय ? माझा आनंद तुमच्या खिशांत आहे ? द्या, द्या ना मला तो !

**गृह०**—( तिला दूर करून ) हट्, हो दूर ! वेडे, तुझा आनंद तुझ्याजवळच आहे बरं का ? पहा नीट !

**लं. भिका०**—लंगड्याला पैसा द्या, दया करा, लंगड्यावर दया करा !

**गृह०**—बर समज, तुझ्यावर मी दया केली तर काय होईल रे?

**लं. भिका०**—तुमच्यावर तो लुल्यापांगळ्याचा देव लंगडा बाळकृष्ण दया करील बघा!

**गृह०**—लुच्चा कुठला! थाब, मीच तुझ्यावर दया करतो आणि तुझा अर्धवट मोडलेला पाय साफ मोडून टाकतो. पळतोस इथून कीं मारू तुझ्या मोडक्या तंगडीवर एक रट्टा? (काठी उगारतो व लंगडा भिकारी 'अयाईऽग' करीत धूम ठोकतो.) हा लेकाचा आत्तापर्यंत लंगडत होता पण काठी उगारताच सरळ पायानी चाऽगला पळत गेला! श्रीमंताची गोष्ट तर विचारायलाच नको, पण आताशा हे भिकारी सुद्धा फार लुच्चे झाले आहेत! (पाहून) हः, हः, हः! तो पहा, दूर जाताच लागला पुन. लंगडायला! हः, हः, ह. !

**एक चिंध्या पांघरलेली बाई**—(प्रवेशून) महाराज, मी बाळंतीण आहे, मुलाला पांघरायला एक फटकूर सुद्धा नाही माझ्याजवळ, एक धोतर तरी द्या! मुलावर दया करा, बाळंतिणीवर दया करा!

**गृह०**—ही आली तिसरी ब्याद! आहे भणंग भिकारीण, पण मूल झाल आहे गोंडस! काय ग ए सटवाई, काय मांडल आहेस हें? मूल काय, बाळंत-पण काय, काय आहे काय हा सारा प्रकार—अ?

**भि० बाई०**—महाराज, हा देवाचा प्रसाद आहे! देव प्रसन्न झाला आणि त्याने माझ्या फाटक्या ओंटीत हे मूल टाकल बघा! महाराज, दया करा आणि बाळाला झाकायला एकादे धोतर द्या. मी कशीहि जगेन पण हें लहानगें बाळ थंडीवाऱ्यात पांघरुणाशिवाय कस जगेल हो?

**गृह०**—काय लेकाची लुच्ची आहे? म्हणे हें मूल म्हणजे देवाचा प्रसाद आहे! बाई, 'हासत कर्म करावे भोगावें रडत तेंचि परिणामी' हा सुद्धा देवाघरचाच न्याय आहे बर? मुलाला हृदयाशीं कवटाळून धरून रडत बैस आता! 'बीज पेरावें तैसें फळ तोडुनि घ्यावें!' (गात जातो. यशोदा, मोलकरीण व आनंद यासह प्रवेश करते.)

**भि०बाई**—काय तो मेला निष्ठुर आहे तरी! मी भिकारीण असून आई

झाल्यें हें मीं पातकच केलं का? मी काय, वाटेल तसे दिवस काढीन पण या लहानग्या बाळानं काय करावं? बाळ, तुझे हाल झालेले मला कसें पाहवतील बरं? (रडते.)

**आनं०**—आई, ती बघ त्या बाळाची आई रडते आहे विचार ना तिला ती कां रडते तीं?

**यशोदा**—हो बाळ, विचारत्यें बरं तिला! (भिकारीण) बाई, कां बरं रडतेस अशी?

**भि० बाई०**—आईसाहेब, दया करा! मीं भिकारीण असून आई झाल्यें, हें मीं पापच केलं का हो? असंहि समजा कीं, मीं पाप केलं, पण या लहानग्या बाळानं काय केलं? या माझ्या बाळाचा संभाळ मी थंडीवाऱ्यापासून कसा करूं? एकादं जुनेर द्या, बाळाला झांकून ठेवत्यें. आईसाहेब, तुमच्या मुलाचे हाल झाले तर तुम्हांला दुःख होतं, मग माझ्या मुलाचे हाल मला उघड्या डोळ्यांनीं कसे पाहवतील बरं?

**यशो०**—बाई, तुझं म्हणणं बरोबर आहे. (डोळे पुसून) बाई, हा घे शेला तुझ्या बाळाला पांघरायला. आईचं अंतःकरण आईलाच कळतं! (शेला देत) घे हा शेला! (ती नको म्हणते.) कां नको म्हणतेस?

**भि० बाई०**—आईसाहेब, हा एवढा मोलाचा शेला माझ्याजवळ सांपडला तर लोक मला चोरटी म्हणतील! तो शेला तुमच्या मुलासाठीं ठेवा आणि माझ्या मुलाला जुनेर द्या!

**यशो०**—(स्वगत) माझ्या मुलासाठीं शेला ठेवून मी काय करूं? माझा राजा खुनी ठरला आणि त्याला फांशीची शिक्षाहि झाली! माझा बाळ आतां लौकरच इहलोक सोडून जाणार! देवा, मुलाची आणि आईची ताटातूट करून तुला तरी काय मिळालं रे? माझा राजा आतां फांसावर चढणार! देवा! देवा!!

**भि० बाई०**—आईसाहेब, नाहीं ना एकादं जुनं लुगडं देत मला? जाऊं ना मी?

**यशो०**—बाई, नको जाऊंस! (मोलकरणीस) मंजुळे, जा घरीं या बाईला घेऊन आणि तिला एक चांगलं जुनं लुगडं दे! बाई, जा बरं मंजुळेबरोबर!

**भि० बाई**—आईसाहेब, तुमच्या मुलाला उदड आयुष्य लाभेल ! माझ्या बाळाची काळजी तुम्हीं केलींत, तुमच्या बाळाची काळजी तो देव घेईल !

**यशो०**—मजुळे, हिला लुगड दे आणि हिच्या तोडात साखर घाल ! या बाईन आईच्या प्रेमळ हृदयानच मला आशीर्वाद दिला आहे. हिच्या तोडून देव तर बोलला नसेल ?

**भि० बाई**—आईसाहेब, मी भिकारीण असून या बाळाची आई झाल्यें म्हणून लोक मला वाटेल ते अपशब्द बोलून फाडफाडून खाताहेत ! मी जरी भिकारीण असल्ये, लोकाच्या मतान मी जरी पातकी ठरल्ये असल्यें, तरी मी आई झाल्यें आहे. मला माझ्या बाळाचे हाल कसे बर पाहवतील ? तुम्हीच सागा !

**यशो०**—बाई, बोलू नकोस आणखी. तुझ्या बोलानी माझ हृदय पिळवटून जात आहे ! जा तू मजुळेबरोबर !

**भि० बाई**—बर आईसाहेब ! (मजुळेबरोबर जाते.)

**यशो०**—बाळ आनदा, चल जाऊ देवाच्या दर्शनाला ! त्याच्या दर्शनान कदाचित् माझ्या राजाला उदड आयुष्य मिळेल !

**आनं०**—आई, कशाला ग जातेस त्या दुष्ट देवाच्या दर्शनाला ? त्या देवाच तू रोज दर्शन घेतेस तरी सुद्धा देवानं राजाभाऊला मरणाची शिक्षा द्यावी ना ? हे बघ आई, त्या दुष्ट देवाच तोड सुद्धा पाहू नकोस ! चल घरी !

**यशो०**—अस बोलू नये ! बाळा आनदा, चल आपण देवालाच अनन्य भावान शरण जाऊ !

**आनं०**—बर आहे, तुझी मर्जी ! मी नावाचा आनद आहे ना ? मी तुझी प्रत्येक आज्ञा मानून तुला आनदच देणार बघ !

**राधा०**—कोण कुणाला आनद देणार ? बाळ, तू याना आनद देणार ना ? मग मला कां नाहीं आनद देत ? बाई, द्या ना मला माझा आनदा ! बाई, हा कोण तुमचा ?

**यशो०**—हा माझा आनद आहे.

**राधा०**—काय, हा तुमचा आनद आहे ? मग बाई, माझा आनद कुठें

आहे हो ? माझा आनंद मला सोडून गेला त्याला सहा वर्षें झालीं ! कुठं बरं असेल तो माझा आनंद ? त्याला मीं पाण्यांत शोधलं, दगडांत शोधलं, सर्व ठिकाणीं शोधलं, पण मला तो सांपडला नाहीं. मग तुमचा हा आनंद देतां का मला ?

**यशो०**—( स्व० ) हा आनंद याच बाईचा तर नसेल ? हिच्या एकंदर बोलण्यावरून मला कांहीं निराळाच संशय येऊं लागला आहे. आतां असंच करावं ! ( उघड ) बाई, हा घे तुझा आनंद ! ( आनंदाला तिच्या हातीं देते. )

**राधा०**—( आनंदाला कुरवाळीत ) बाळ, तुझा स्पर्श होतांच मला आनंदाचं एवढं भरतं कां आलं बरं ? बाळ, तूंच माझा आनंद ! काय बरं तुझं नांव ?

**आनं०**—माझं नांव आनंद ! आई, ही वेडी अशी ग काय बोलते आहे ?

**राधा०**—बाळ, मला वेडी कां म्हणतोस ? तुझं नांव जर आनंद असलं तर मी तुझ्यावरून माझे पंचप्राण ओंवाळून टाकीन ! बाई, याचं खरं नांव काय तें सांगा ! याला स्पर्श केल्यापासून मला गेल्या सहा वर्षांत घडलेल्या सर्व गोष्टी आठवूं लागल्या आहेत. मला आतां वेडी म्हणूं नका. या बाळाचं नांव जर आनंद नसेल तर मात्र मला खरोखर वेड लागेल ! बोला, याचं नांव आनंदच आहे का ?

**यशो०**—होय, याचं नांव आनंदच आहे. त्याच्या गळ्यांत जो ताईत होता, त्यांतील चिठीवर आनंद हेंच नांव लिहिलेलं होतं !

**राधा०**—होय ना ? होय ना ? मग हाच माझा बाळ आनंद ! बाई, मला वेडी म्हणूं नका. हा तुम्हांला रस्त्यावर पडलेला सांपडला ना ? होय ना ?

**यशो०**—होय, मला हा रस्त्यावर पडलेला सांपडला !

**राधा०**—मग हाच माझा आनंद ! बाळ आनंदा, तूंच माझा बाळ आणि मीच तुझी आई ! ( त्याचे पटापट मुके घेते. )

**यशो०**—बाई, चल तिकडे देवळांत म्हणजे सगळं सांगत्यें तुला ! बाई, चल देवाच्या दर्शनाला !

**राधा०**—तुम्ही म्हणाल तिकडे येत्यें, पण पुनः नाहीं ना माझा बाळ मला सोडून जाणार ? मला तुमच्याकडे न्या पाहिजे तर, पण माझी आणि आनंदाची

ताटातूट करू नका. बाळाजवळ रहायला मिळावं म्हणून मी तुमची बटीकसुद्धां होईन! (पाय धरून) मला अभय द्याल तरच मी तुमचे पाय सोडीन!

**यशो०**—बाई, तू माझ्याजवळच रहा, मग तर झाल ना? चल तर!

(जातात.)

---

## प्रवेश दुसरा

(अधारी रात्र. भाग्यदेवता दृश्यरूपाने वावरताना भास होतो.)

**भाग्यदेवता**—

### यशोगीत

**दैवाला जे देव मानिती ते दुबळे जाणा।**
**दीनपणा जिंकाया यत्ना देव तुम्ही माना॥ ध्रु०॥**
**गिरिशिखरावरि चढुनी बैसे जेव्हां रविराणा।**
**तिमिरहि नासे जगही हांसे। तत्त्व न अवमाना॥ १॥**

(देवता निघून गेल्यावर राधा प्रवेश करते.)

**राधा०**—इतक्या काळ्याकुट्ट अधःकारात सुद्धा मला प्रकाश दिसला! तो कसला प्रकाश होता बर? निराशेच्या अधारात चाचपडणाऱ्या अभाग्यांना आशेचा किरण दाखविण्याकरिता अशा रूपान भाग्यदेवता तर फिरत नसेल?

### आशागीत

**किरण दावि मज आशा कीं। जरि पसरे निराशातम॥**
**तोडिन वाटे संकटपाशा॥ ध्रु०॥**
**माता दुःखिता। जरि दिसतां मला॥**
**जातें बावरुनी। होतें मी। अति विवशा॥ १॥**

मला कसल्या तरी प्रकाशाचा भास झाला हें मात्र खर! आता मनाचा घडा करावा आणि त्या प्रकाशामागून जाव! यशोदाबाई माझ्या बाळाच्या माता झाल्या, तेव्हां त्यांच तें उपकाराच ऋण फेडण्याकरितां मला शक्य तो यत्न केलाच

पाहिजे. ती देवतातुल्य यशोदामाता आज दुःखसागरांत बुडाली आहे. तिच्या एकुलत्या एका मुलाचे, राजारामाचे प्राण मला वांचवितां आले तर मी धन्य होईन ! राजारामाच्या खुनाच्या बाबतींतहि मला इच्छारामाचाच संशय येतो. त्याच संशयाचा छडा लावण्यासाठीं मीं अशा अंधाऱ्या रात्रींहि इकडे येण्याचं धाडस केलं आणि मला अचानक आशेचा किरण दिसला ! तो खरोखरीचाच प्रकाश होता, कीं माझ्या मनाला तसा भास झाला तें एक देव जाणे ! (पाहून) हा कुणाचा आवाज ऐकूं येतो आहे ? आपण जरा बाजूला उभं राहून काय होतं तें पहावं ! ( बाजूला उभी राहते. दुसऱ्या बाजूनें इच्छाराम येतो व त्याच्यामागून आनंदी येते. )

**आनं०**—( इच्छारामाला अडवून धरून ) इच्छाराम, मला एकटीला इकडे टाकून तुम्ही कुठं जातां ? मीं तुमच्यावर आंधळ्या प्रेमानं विश्वास ठेवला, त्याचं मला असं प्रायश्चित्त भोगायला लावतां कीं काय ?

**इच्छा०**—आनंदी, मला जें सुख मिळावयाचं तें मीं मिळविलें ! माझं कार्य झालं, आतां तुझा माझा काय संबंध ? तुला तुझ्या मूर्खपणाचं प्रायश्चित्त भोगलंच पाहिजे. जास्त बोलशील तर तुझी मान मुरगाळून इथं तुला फेंकून देईन ! बस्स, माझ्या इच्छेला येईल तसं मी वागणार !

**आनं०**—तुम्ही जर अशा रीतीनं माझा घात करणार असाल तर मीहि माझ्या इच्छेला येईल तसंच वागेन, हें नीट ध्यानांत ठेवा. तुम्हीं माणिकरामाचा खून केलांत हें इतक्यांतच विसरलांत वाटतं ? तुम्ही जर माझा घात कराल तर मीहि तुमचा घात करीन; आणि राजाराम निर्दोषी असून खरे खुनी इच्छारामच आहेत असं सर्व जगाला ओरडून सांगेन ! खुनी इच्छाराम, एक तर माझा त्याग करूं नका, किंवा फांसावर चढायला तयार व्हा ! खुनी इच्छाराम......

**इच्छा०**—छेः, छेः, आनंदी ! आतां तर तुला जिवंत ठेवणं म्हणजे मुद्दाम पदरांत अंगार बांधून ठेवण्यासारखं आहे. मी खरा खुनी आहें हें तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणाला माहीत नाहीं. अर्थात् तुझा नायनाट करण्याशिवाय माझ्या संरक्षणाचा दुसरा मार्गच उरलेला नाहीं. खुनाचं रहस्य बाहेर फुटं नये म्हणून

मी याच क्षणीं तुझी मान मुरगाळून टाकतों. तू नाहींशी झालीस म्हणजे माझी चिताहि नाहींशी होईल. काय ओरडायच तें ओरडून घे, मी अशी तुझी मान आंवळून......

( आनंदी ओरडते, इच्छाराम तिची मान आवळतो. )

**राधा०**—( किंचाळून ) धांवा, धावा, हा खुनी इच्छाराम आनंदीचा खून करतो आहे !

**इच्छा०**—अरेरे, घात झाला ! कुणी तरी माझं हें काळ कृत्य पाहिल वाटत ! आता इथून पळ काढण्याशिवाय गत्यतरच नाहीं ! ( बेशुद्ध झालेल्या आनंदीला खालीं टाकून पळून जातो. )

**राधा०**—( पुढे येऊन व आनदीला सावध करून ) आनदी, भिऊ नको ! तो खुनी पळून गेला ! चल माझ्याबरोबर, मी तुझ रक्षण करत्यें.

**आनं०**—कोण तुम्ही ?

**राधा०**—ते मी तुला घरीं गेल्यावर सागेन ! चल हळुहळु ! ( तिला सांवरीत घेऊन जाते. )

---

## प्रवेश ३ रा

( **स्थळ**—सर्वाधिकारी अचलराम यांचा दिवाणखाना. )

**अचलराम**—( घटा वाजवितो. पोलीस अंमलदार येतो त्यास ) काय ? राजारामाला पलीकडच्या कोठडींत आणून ठेवलत ?

**अंमलदार**—होय सरकार !

**अचल०**—राजारामाला फांशी देण्यापूर्वी मी त्याच्या मातेच्या विनतीवरून ही तांतडीची चौकशी करणार आहें. खऱ्या खुनी इसमाचा शोध लागेल तर त्यांत माझ्या न्यायनिष्ठुर हृदयाला आनदच होईल. मी इशारा देईन त्या वेळीं तुम्ही राजारामाला इथ हजर करा.

**अंमल०**—होय, सरकार ! ( सलाम करून जातो. )

**अचल०**—आज माझ्या न्यायनिष्ठुर हृदयाच्या परीक्षेची वेळ आली आहे यांत शंकाच नाहीं. राजारामावर खुनाचा आरोप आला आणि तो पुराव्यानं सिद्ध झाल्यामुळें मला त्यास फांशीची शिक्षा द्यावी लागली. पण राजारामाच्या आईनं, फांशीची शिक्षा प्रत्यक्ष अमलांत येण्याच्या पूर्वी एकदां माझी मुलासमक्ष मुलाखत मागितली आणि मलाहि तिची विनंती अमान्य करतां येईना ! माणिकरामाचा खून राजारामानं केला नाहीं, असा सबळ पुरावा ती दाखल करील तर त्यांत न्यायाच्या कार्याला मदतच होणार आहे. फांशीं जाणाऱ्या मुलाच्या समक्ष आईची भेट घेणं म्हणजे एक दिव्यच आहे म्हणायचं ! परमेश्वरा, मला या दिव्यांतून पार पडण्याचं सामर्थ्य दे. यशोदाबाई, सर्वांना घेऊन इकडे या. ( यशोदा, राधा, आनंदी व आनंद बाहेर येतात. ) बसा तिथं. ( तीं बसल्यावर ) यशोदाबाई, राजारामानं खून केला नाहीं हें तुम्ही कशावरून म्हणतां ?

**यशो०**—कारण राजाराम हा माझा, या प्रेमळ मातेचा, मुलगा आहे—तो खुनी असणं शक्य नाहीं. शिवाय खरी हकीकत सांगायला आनंदी तयार आहे.

**आनंदी**—ज्यानं माणिकरामाचा खून केला तोच शेवटीं माझ्यावर उलटला व मलाहि ठार मारायला तयार झाला ! त्या वेळीं राधाबाईनीं किंकाळी फोडली नसती तर मी त्या कसाबाच्या हातून ठार झालें असतें.

**अचल०**—असा कोण तो कसाब ?

**आनंदी**— ( भीत भीत ) सरकार, पण मीं त्याचं नांव सांगितलं तर मला न्याय मिळेल का ?

**अचल०**—त्याविषयीं निःशंक ऐस. तो कसाब जरी प्रत्यक्ष माझा मुलगा असला, तरीहि मी त्याला फांसावर चढवीन ! बोल त्याचं नांव !

**आनंदी**—त्याचं नांव—त्याचं—नांव...( इकडे तिकडे घाबऱ्या नजरेनें पाहते. )

**राधा०**—आनंदी, त्या कसाबाचं नांव घ्यायला एवढी कचरतेस कां ? मी सांगतें त्याचं नांव ! ( इच्छाराम समोर येऊन उभा राहतो व तीक्ष्ण दृष्टीनें त्यांच्याकडे पाहतो. )

**आनंदी**—अगबाई ! हें कोण ? हें कोण ? ( मूर्च्छित पडते. यशोदा तिला सावरते. )

**राधा०**—( धीटपणाने पुढें होऊन ) त्याच नाव इच्छाराम ! ह्याच तो खुनी ! याच कसाबान माणिकरामाचा खून केला.

**अचल०**—काय ? माझा मुलगा इच्छाराम खुनी आहे ?

**इच्छा०**—काय, मी खुनी आहें ?

**राधा०**—हो, हो, नीच कसाबा ! तूच खुनी आहेस ! तू मला फसविलस, आनदीला फसविलस आणि माणिकरामाचा खून केलास !

**इच्छा०**—म्हणजे तुला वाचा फुटली तर ?

**राधा०**—मला नाही वाचा फुटली, खुनालाच वाचा फुटली !

**इच्छा०**—तर मग ती वाचा मी बद करून टाकतो. ( तिच्या अगावर धावून जाऊ लागतो तों अचलराम पुढें होऊन त्याला अडवतो. )

**अचल०**—खुनी बदमाषा, मागे हो. पहिला खून, दुसरा खून केल्यान पचत नसतो, हे ध्यानात ठेव. अमलदार, इकडे या आणि या खुनी बदमाषाला गिरफदार करा.

**इच्छा०**—काय ? तुम्ही माझे प्रत्यक्ष वडील असून सुद्धा तुम्हीच मला गिरफदार करून फासावर लटकवणार ?

**अचल०**—न्यायनीतीला अनुसरून मला योग्य ती गोष्ट न्यायनिष्ठुरपणान केलीच पाहिजे. इच्छाराम, या वेळीं मी तुझा पिता म्हणून तुझ्यापुढें उभा नसून, न्यायनिष्ठुर सर्वाधिकारी म्हणून उभा आहें. तुला फासावर चढवण हेच माझ या वेळच कर्तव्य होय. ( अमलदार येतो त्यास ) अमलदार, पहाता काय ? पकडा या खुनी बदमाषाला ! ( अमलदार त्यास पकडतो. )

**इच्छा०**—बाबा, आज जर माझी आई जिवत असती तर तिन तुमची करुणा भाकून मला फासावरून सोडविल असत ! ( निराशेने ) शेवटी पिता तो पिता आणि माता ती माता, हेंच खर.

**अचल०**—होय, पिता तो पिता आणि माता, ती माता हेंच खर. तुझी माता तुला लहानपणीच इथ टाकून स्वर्गलोकाला निघून गेली. तिच्या प्रेमळ

शिकवणीचा लाभ तुला मिळाला नसल्यामुळंच तूं असा बेफामपणानं वागूं लागलास, आणि शेवटीं खुनी निघालास! आतां तुझ्या पापकृतीचं प्रायश्चित्त तुला भोगलंच पाहिजे. अंमलदार! या खुनी इच्छारामाला अंधारकोठडींत कोंडून ठेवा आणि योग्य हुकूम हातीं पडतांच त्याला फांसावर लटकवा. अंमलदार, राजाराम निर्दोषी आहे, त्याला बंधमुक्त करा.

**इच्छा०**—म्हणजे मला आईची प्रेमळ शिकवण न मिळाल्यामुळें हें प्रायश्चित्त भोगावं लागतं आहे तर? बाबा, हा घ्या माझा अखेरचा प्रणाम—मी स्वर्गस्थ आईच्या दर्शनासाठीं स्वर्गाकडे जावयाला निघालों आहें. (अंमलदार त्याला घेऊन जातो.)

**अचल०**—यशोदाबाई, आतां तरी योग्य तोच निकाल झाला ना?

**यशो०**—होय महाराज, मी आपल्याला धन्यवाद देतें.

**राजा०**—(प्रवेशून) आई, आई, मला फांसावरून कोणीं ग सोडविलं?

**यशो०**—आनंदाच्या आईनं! राजाराम, राधाबाईची मदत मिळाली नसती तर तूं दोषी ठरून फांसावरच लटकला असतास!

**राजा०**—राधाबाई, मी तुम्हांला अभिवादन करतों. (तिला नमस्कार करतो.)

**राधा०**—राजाराम, शतायुषी व्हा! आईच्या अंतःकरणानं ज्यांनीं माझ्या आनंदाचा संभाळ केला त्या तुमच्या यशोदामातेची कधीं अवज्ञा करूं नका! आजपासून तुमची आई हाच तुमचा देव!

**आनंद**—राजाभाऊ, आतां तरी तुम्ही आईचा उपदेश लक्षांत ठेवाल ना?

**राजा०**—होय बाळ! आजपासून मी आईलाच दैवत मानून तिची अनन्य भावानं भक्ति करणार! (यशोदेला वंदन करून) आई, तूंच माझं दैवत! मला आपला आशीर्वाद दे.

**यशो०**—बाळ, शतायुषी हो बरं. (आशीर्वाद देते.)

**राधा०**—सर्वाधिकारीमहाराज, सर्व स्त्रीजातीतर्फे मला आपल्या चरणीं अशी विनंती करावयाची आहे कीं, मतृपदावर आरूढ झालेल्या स्त्रियांचीं

हृदयें विदीर्ण होणार नाहींत अशा तऱ्हेची सदय परिस्थिति समाजांत निर्माण करा आणि दुर्दैवी माताच्या शिव्याशापापासून समाजाचा बचाव करा. आमच्या हिंदुसमाजान तरुण विधवाच्या सभोवतीं अन्यायी रूढीच कांटेरी कुपण घालून, गेलीं शेंकडो वर्षे, त्याचा चोहों बाजूनी कोडमारा चालविला आहे. पुनर्विवाहाचा नवा मार्ग स्वीकारणाऱ्या विधवाकडेहि समाज तुच्छतेनच पहातो आणि त्यामुळ विधवा स्त्रिया नवा धर्ममार्ग आक्रमण्यालाहि धजत नाहीत. शेवटी, मोहाला बळी पडून तरुण विधवा आडमार्गाला लागतात आणि फशीं पडतात. त्या माता झाल्यावर त्याची अगदी असह्य अशी विटबना होते आणि शेंकडो नव्हे तर हजारो आणि लाखो विधवा माता केवळ विटबना टाळण्यासाठीं, एक तर परधर्माचा आश्रय करतात अगर बालहत्यारी बनतात. ज्या विधवा बालहत्यारी बनतात त्याचे मूक शिव्याशाप हिंदु समाजाच्या माथी बसल्याशिवाय रहात नाहींत. महाराज, तुमचा समाज विधवामाताची विटबना करून आणखी किती दिवस हे शिव्याशाप घेणार ? विधवा पापिणी ठरल्या तरी त्याना मातेच हृदय नसतं अस थोडच आहे ? वाटल्यास प्रथमच आम्हा विधवाचे गळे दाबा, पण आम्हाला जिवत ठेवून आमची मातृहृदये चरचरा चिरू नका ! तुमच्यासारख्या अधिकारी माणसाना विधवाच्या प्रश्नाकडे, मातृहृदयाच्या या नव्या दृष्टीनं, पाहण्याची सुबुद्धि होवो हीच त्या आदिशक्ति जगन्मातेच्या चरणीं माझी प्रार्थना आहे.

## प्रार्थनागीत

**परम विमल शोभे या जगीं एक माता ।**
**सुखद शुभद जाणा मातृप्रेमाचि त्राता ॥**
**सुजन ! चिरुं नका हो मातृचित्ता कधीहि ।**
**अदय जनसमाजा दुर्गति घोर पाहीं ॥** चाल ॥
**मातृमनाला कधिं न दुखवा ।**
**सदय कृतीनें त्या सुखवा ॥**
**जरि कुणी पतिता माता झाली ।**
**तरिहि मन तिचें ना तुडवा ॥ १ ॥**

**समाप्त**

# अंक पहिला

## प्रवेश १ ला

( नान्दीला सुरुवात होणार असें समजून वाद्यवादनाला सुरुवात होते, इतक्यांत पांडुरंग प्रवेश करतो. आंतील बाजूस शाळेचा देखावा दिसत असतो. )

**पांडुरंग**—थांबा, थांबा, इतक्यांत वाजवायला सुरुवात करूं नका. मी रंगमास्तरांचा डोळा चुकवून इकडे रसिकांशीं दोन बोबडे बोल बोलण्यासाठीं आलों आहें. नाटक सुरू व्हायला अजून अवकाश आहे. एकदां नाटक सुरू झालें म्हणजे मला रसिकांशीं कोण बोलूं देणार ? रसिकजनहो, मी आधीं तुम्हांला वंदन करतों. तुम्ही माझं कौतुक करतां, तुम्ही माझ्यावर प्रेम करतां, म्हणून मी तुम्हांला देवाच्या ठिकाणीं मानतों. अण्णांनीं माझ्यासाठीं ‘ तरुण पिढी ’ या नांवाचं नाटक लिहिलें असून त्यांत मला पांडुरंगाचा पार्ट दिला आहे. पांडुरंग हें मोठं गोड नांव आहे, नाहीं ? कुणी मला राम म्हणतात, कुणी मला राम्याहि म्हणतात, पण तुम्ही मला जॅकी कूगन म्हणतां ! पण हा कोण जॅकी कूगन बुवा ? बहुधा हा माझ्यासारखाच एकादा हुषार नट असावा ! मला लोक जसे जॅकी कूगन राम आपटे म्हणत असतात तसें त्याला लोक राम आपटे जॅकी कूगन म्हणत असतील ! आतां बोला, माझ्या डोक्यांत अक्कल आहे कीं नाहीं ? ( हंसून व डोक्याला बोट लावून ) अगदींच कांहीं ठणठणीत मडकं नाहीं हें ! ( शाळेची घंटा वाजते. ) ठणूठणण ! अरेच्या, घंटा झाली, आतां मला पांडुरंग बनून शाळेंत गेलंच पाहिजे. पण हो, एक गोष्ट सांगायला

विसंरलो. लोक मला विचारतात कीं रामा, तू नाटकात एवढे पार्ट करतोस तें तुला त्यातल काहीं कळत कारे? खर सागू? मला पार्टातल काहीं कळो वा न कळो, माझा पार्ट चागला झाला म्हणजे भाऊ मला कुरवाळणार, अण्णा माझी पाठ थोपटणार आणि काकू माझी दृष्ट काढणार—एवढ तरी मला कळतच कळत! (पाहून) अरे पण हे काय? शाळा सुद्धा सुटली वाटत? म्हणजे मघाशीं जी घटा वाजली, ती शाळा सुरू होण्याची कीं सुटण्याची? हे आलेच गुरुजी इकडे, शाळा सुटली हेंच खर! बोलता बोलता कसा वेळ जातो तो पहा! आता गुरुजी मला खास म्हणणार, पाड्या लेका, कसारे मठ्ठ निघालास असा?

(विद्याधर गुरुजी एका मुलीसह प्रवेश करतात.)

**विद्या०**—पाड्या लेका, कसारे मठ्ठ निघालास असा? शाळा सुद्धा सुटली आणि आत्ता तू शाळेत यायला निघालास? काय म्हणाव तुला?

**पांडु०**—(स्वगत) गुरुजी मला मठ्ठ म्हणतात, पण ते पुढ काय बोलणार तें मी आधींच ताडल. तेव्हा आता मठ्ठ कोण? मी कीं हे...

**विद्या०**—मठ्ठ लेकाचा! कसा घुम्यासारखा उभा आहे! पाड्या, तुझ्यापेक्षा ही तुझ्या शेजारची सुशी शभर पटीने चागली! अरे चागला पुरुषाच्या जन्माला आलास, निदान बायकाइतका तरी शहाणपणा दाखव! किती चागली मुलगी आहे ही! शाळेत वेळेवर येते, अभ्यास चोख ठेवते आणि सालसपणान वागते. काय जगाची उलटी गति झाली पहा! मुलापेक्षा मुलीच हुषार! या मुली शिकू लागल्या नव्हत्या तोंपर्यंत पुरुषाची भरली मूठ सव्वा लाखाची होती, पण आता ती उघडी पडली हेच खर! अरे पाड्या, स्वतःजवळची अकलेची पुजी सपली असली तर सुशीजवळून तरी थोडी उसनवार मागून घे. आजच्या पुढारलेल्या काळात बायकाजवळ अक्कल शिकण्यात मुलींच कमीपणा नाही! जें पुरुषाना कळत नाही ते त्यानीं न लाजता खुशाल स्त्रीजातीपासून शिकाव!

**पांडु०**—पण गुरुजी, सुशी ही माझी शेजारीण आहे, वैरीण आहे. तिच्याशीं बोलायला माझ्या वडिलानीं मला सक्त मनाई केली आहे.

**विद्या०**—म्हणजे? तुझे वडील असाच का शेजारधर्म पाळतात? शेजारी हा वैरी कसा आणि कां?

**पांडु०**—सुशीचे वडील माझ्या वडिलांचे वैरी आहेत, सुशीची आई माझ्या आईची वैरीण आहे, अर्थात् एका आईबापांच्या मुलानं दुसऱ्या आईबापांच्या मुलीशीं वैरच धरलं पाहिजे !

**विद्या०**—हें तूं काय बोलत आहेस तें माझ्या नाहीं डोक्यांत शिरलं ?

**पांडु०**—( स्वगत ) मी इतकं स्पष्ट बोललों तरी यांच्या डोक्यांत प्रकाश पडत नाहीं आणि असे हे गुरुजी मलाच मठ्ठ म्हणतात ! कां ? आहे कीं नाहीं गंमत ?

**विद्या०**—बरं तें कांहींहि असो ! पांडुरंगा, ही सुशी तुझी शाळासोबतीण आहे, तिच्याशीं तुला भांडतां येत नाहीं. तूं सुशीलेचा भाऊ आणि सुशीला तुझी बहीण !

**पांडु०**—गुरुजी, तुमचा उपदेश शाळेपुरता खरा आहे. मी शाळेंत असेपर्यंत तिच्याशीं भांडत नाहीं; पण शाळेच्या बाहेर पडलों कीं, झालों तिचा वैरी ! संधि साधून तिला मी मारतों, बोचकारतों, निदान दुरून लहानसा दगड तरी तिच्यावर फेंकतों.

**विद्या०**—हो का ग सुशे ? शाळेच्या बाहेर हा पांड्या तुझ्याशी असा कां वागतो ?

**सुशी**—होय गुरुजी ! मी पांडूची खोडी कध्धीं कध्धीं सुद्धां काढीत नाहीं, पण तोच माझ्याशीं अस्सा वांकडेपणानं वागतो !

### गज्जल

**मज द्वेष नाहिं ठावा । धरितें न वैरभावा ॥**
**खोडी कशी करावी । मज ठाउकेंहि नाहीं ॥ ध्रु० ॥**
**कटु बोल बोलुनीयां । दुखवीत नाहिं कवणा ॥**
**रुचतें न जें मनाला । तें बोलुं मी कशाला ॥ १ ॥**

**विद्या०**—पांड्या, लेका ! कसारे मठ्ठ निघालास असा ? शेजारधर्म म्हणजे वैर नव्हे हें सुद्धां तुला कळूं नये ना ?

**पांडु०**—गुरुजी, खरं सांगूं ? सुशी बिचारी गरीब मुलगी आहे. तिच्याशीं वैर करूं नये हें मला कळतं, पण बाबा मला वैर करायला शिकवतात ना ? आतां तुम्हीच सांगा, मीं काय करावं बरं ?

**विद्या०**—पांडु, मी सांगतों तुला काय करायचं तें. तूं आणि सुशी दोघंहि

माझ्या शाळेत शिकता ! तुम्ही एकमेकांशीं मुळींच भांडता कामा नये. सुशे, नाही ना तू पाडूशी भांडणार ?

**सुशी**—गुरुजी, मी पाडूशींच काय, पण कुणाशीच भांडत नाही—मला कसं तें भांडताच येत नाहीं. हा पाडु कधीं घरी पेन्सिल विसरून शाळेत आला तर मी हळूच दातानीं आपली पेन्सिल मोडून त्याला एक तुकडा देते, आणि मधल्या सुटींत पाडूला माझ्या डब्यातला अर्धा लाडू दिल्याशिवाय रहात नाहीं. आज हा शाळेत आला नाहीं म्हणून मीं त्याच्या वाटणीचा अर्धा लाडू तसाच या डब्यात ठेवून दिला आहे बघा ! पाडु, या डब्यातला अर्धा लाडू खाऊन टाक पाहू—( डबा देऊ लागते. )

**पांडु०**—छेः, छेः, छेः, छेः, लाडू खाईन पण शाळेत असताना ! शाळेच्या बाहेर तुझ्या डब्यातला लाडू खाण्याबद्दल मला माझ्या वडिलाचा हुकूम नाही ! ऊ हू, नको मला तो लाडू !

**सुशी**—पहा गुरुजी तुम्हीच ! पाडू माझा अपमान करतो आहे !

**पांडु०**—हो, हो, करणारच तुझा अपमान ! मला माझ्या वडिलाचाच तसा हुकूम आहे ! इथ गुरुजी आहेत म्हणून तुझा नुस्ता अपमानच केला, पण इथ जर गुरुजी नसते तर मीं हाच डबा तुझ्या हातातून हिसकावून घेऊन तुझ्या टाळक्यात मारला असता आणि घराकडे पळून गेलो असतों ! सुशे, गुरुजी आहेत म्हणून वाचलीस बर !

**विद्या०**—असो, एवढी तरी गुरुजींची लाज बाळगतोस म्हणायचा ! पाडु, तुझ्या डोक्यात वैराचा रोग शिरला आहे, पण तो अजून असाध्य स्थितीला पोंचलेला दिसत नाहीं. पाडु, तू जोंपर्यंत आमच्या शाळेंत येत आहेस तोंपर्यंत तरी तुला सुशीशीं–तुझ्या शाळासोबतिणीशीं–वैरभावान वागता कामा नये. पाडु, माझ्या शिष्यानी आपापसात मुळींच भांडता कामा नये. पाडु, तुला माझी शपथ आहे, देवाची शपथ आहे ! पाडुरगा, माझ्या शिष्या, हा घे तुझ्या हातात डबा—( डबा देतात ). आता डबा उघडून लाडू खा पाहू ! कचरू नकोस, भिऊ नकोस, कुणी तुला खात नाही, खा तो लाडू, मी आहें ना तुझ रक्षण करायला इथ उभा ? हं, खाऊन टाक तो लाडू ! हं, बाळ माझा तो, किती शहाणा आहे पण !

**पांडु०**—( कांपऱ्या हातानें लाडू तोंडाकडे नेत ) पण गुरुजी, बाबांना नाहीं ना हें कळणार ? खाऊं ना लाडू ?

**धनाजी**—( पुढें येऊन ) पांड्या, पांड्या, दे तो लाडू फेंकून ! हें चांगलं नाहीं ! तो लाडू माझ्या हाडवैऱ्याच्या घरचा आहे–तो तूं खातां कामा नये. माझं आणि त्या कारटीच्या बापाचं वैर आहे हें तूं विसरलास कसा ? बाप-जाद्यांचं वैर तुला पुढं चालवलंच पाहिजे. फेंकून दे तो लाडू ! ( त्याच्या हातांतला लाडू उडवून देतो. )

**विद्या०**—काय हें धनाजी ? तुमच्या मनांतल्या जीर्ण झालेल्या वैरभावना या मुलांच्या कोंवळ्या मनांत कां भरवून देतां ? नका असा अविचार करूं ! मुलांच्या कोंवळ्या अंतःकरणांत भलत्या भावना न शिरतील अशी काळजी तुम्ही घ्यायला नको का ? तुमचीं जुन्या पिढींतील वैरं तरुण पिढीच्या मनांत कां पेरून ठेवतां ?

**धनाजी**—आमची परंपरा यांनीं अखंड चालवावी म्हणून ! गुरुजी, तुम्हांला आमच्या वैराची गोम माहीत नाही. आम्ही धनवंत आणि आमचे शेजारी मानवंत यांचं वैर गेल्या कित्येक पिढ्यांचं आहे. धनवंत हे मानवंतांचे अनेक पिढ्यांचे वैरीच आहेत. पांडूचे आणि सुशीचे खापरपणजोबा यांचं वैर–आजन्म टिकलं ! इतकंच काय, पण तेव्हांपासूनचें वैर आम्हीं–त्यांच्या वंशजांनीं-या घटकेपर्यंत चालू ठेवलं आहे. आम्ही धनवंत, आमचे शेजारी जे मानवंत त्यांचं सदासर्वकाळ वैरच करतों. एक धनवंत किंवा दुसरे मानवंत रसातळाला पोंचतील तेव्हांच हा वैराग्नि कायमचा विझेल ! माझ्या वडिलांनीं आपल्या वडिलांचा कित्ता गिरवला आणि मीहि माझ्या वडिलांचा कित्ता गिरवतों आहें. आतां ही जुन्या पिढीची परंपरा नव्या पिढीनं चालवावयास नको काय ? पांडु, तूं धनवंतांच्या कुळांत जन्माला आला असून सुशी ही मानवंतांच्या कुळांत जन्मलेली मुलगी आहे. पांडुरंगा, धनवंता, तुला जर तुझ्या कुळाचा अभिमान वाटत असेल तर सुशीचा–या मानवंतीचा द्वेषच कर.

**विद्या०**—धनाजी, तुम्हांला मी विनवून सांगतों कीं, हें द्वेषाचें विष तरुण पिढीच्या मनांत भरवूं नका ! पांडु आणि सुशी यांना एकमेकांविषयीं मुळींच द्वेष वाटत नाहीं. त्यांना गुण्यागोविंदानें नांदूं द्या, म्हणजे तुम्ही कित्येक पिढ्या

चालविलेली ही द्वेषाची परपरा तुमच्या पुढच्याच पिढींत नष्ट होईल. म्हणून म्हणतों, तरुण पिढीच्या मनात नका हे विष भरवू !

**धनाजी**—गुरुजी, शाळेतले शाळुक्ये तुम्ही, शाळेतच काय ते उपदेशाचे दिवे लावा ! शाळेच्या बाहेर तुमच्या शहाणपणाची दिवटी पाजळू नका.

**विद्या०**—पण माझ्या शाळेतलीं मुले वाईट वर्तनाचीं निघाली तर ते मला लाछनास्पद नाही का ? मला माझ्या शिष्याच्या शीलाची काळजी घेतलीच पाहिजे.

**धनाजी**—गुरुजी, जास्त बडबड करून माझ पित्त भडकवू नका ! शाळेच्या चार भितीआड बसून मुलामुलीना र–ट–फ करायला शिकवण हे तुमच काम, तुम्ही नका शीलाबीलाच्या भानगडीत पडू ! धनवताच शील धनवत सभाळतील आणि लौकरच मानवताना रसातळाला पोचवितील !

**मानाजी**—( दुसऱ्या बाजूने प्रवेशून ) आणि मानवताच शील मानवत सभाळतील आणि लौकरच धनवताना मातीला मिळवतील ! धनाजी, तुम्ही माझे पिढीजाद वैरी असून माझ्या मुलीला धमकी देता ? काही झाल तरी सुशीला ही या मानवताची मुलगी आहे, ती तुम्हा धनवताचा द्वेषच करणार ! गुरुजी, तुम्ही पाडुरग धनवत आणि सुशीला मानवत या दोघाचेहि गुरुजी आहात ना ? मग धनाजी धनवताला माझ्या मुलीवर अस गरळ का ओकू देता ?

**धना०**—गप्प बैस मानाजी ! मी तुला पुरून उरेन, समजलास ?

**माना०**—गप्प बैस धनाजी ! मीहि तुला पुरून उरेन—समजलास ?

**विद्या०**—तुम्ही दोघेहि गप्प बसा. ही एकमेकाना पुरण्याची भाषा तुमच्यासारख्या थोरामोठ्याच्या तोंडी शोभत नाहीं. जुना वैराग्नि पिढ्यान् पिढ्या धुमसत ठेवून एकमेकाचा निष्कारण द्वेप करण चागल नाही. तुम्ही एकमेकाचा द्वेष का करता ?

**धना०**—माझे पणजोबा मानाजीच्या पणजोबाचा द्वेप करीत होते म्हणून !

**माना०**—आणि माझेहि पणजोबा या धनाजीच्या पणजोबाशी वैर करीत होते म्हणून !

**विद्या०**—तुम्हा दोघाच्या पणजोबाच्या काळीं एकमेकाबद्दल वैर वाटण्यासारख एखाद कारणहि घडल असेल हें मलाहि कबूल आहे. पण ते जुन कारण पिढ्यान् पिढ्या जिवत ठेवण बर नाहीं. मेहेरबानी करा आणि द्वेषभाव सोडून

द्या, निदान तुमच्या जीर्ण झालेल्या अंतःकरणांतला द्वेषभाव या कोंवळ्या मनाच्या तरुण पिढीला तरी पढवूं नका !

**धना०**—गप्प बसा पंतोजीबुवा ! आम्हांला आमचं हित कळतं बरं कां ?

**माना०**—पंतोजीबुवा, चांगली भांडणाची पर्वणी आली आहे, आम्हांला पोटभर भांडून घेऊं द्या. तुम्ही गप्प बसून आमच्या भांडणाची एक मौज तरी पहा, किंवा तुम्हांला ही मौज पहावतच नसेल तर इथून चालते व्हा !

**विद्या०**—बरं आहे, जातों मी ! ( जातां जातां ) बाळांनों, तुम्ही माझाच उपदेश लक्षांत ठेवा—आपापसांत भांडूं नका ! तुम्ही कधीं विनाकारण एक-मेकांचा द्वेष कराल तर तुम्हांला माझी शपथ आहे, देवाची शपथ आहे. (जातां जातां ) परमेश्वरा, या तरुण पिढीला तरी प्रेममय जीवन कंठण्याची सुबुद्धि दे. ( जातो. )

**धना०**—मानाजी, गेला तो शाळुंक्या ! आतां बोल काय तें !

**माना०**—धनाजी, वायफळ बोलण्यांत काय अर्थ आहे ? करायचं तें करूनच दाखवीन !

**धना०**—बरं, बरं, करून दाखव, मीहि पाहून घेईन !

**माना०**—लक्षांत ठेव कीं, मी तुला मातीला मिळवीन तरच मानवंताचं नांव सांगेन.

**धना०**—आणि तूंहि लक्षांत ठेव कीं, मी तुला मातींत मिसळीन तरच धनवंताचं नांव लावीन !

**माना०**—ठीक आहे, सुशे, चल घरीं ! उद्यांपासून तुला पांड्याची शाळा बंद !

**सुशी०**—पण बाबा, शाळेनं काय केलं ?

**माना०**—काय म्हणतेस ? शाळेनं काय केलं ? अग, शाळांनींच तर सगळा सांवळा गोंधळ केला ! या शाळा नसत्या तर बरं झालं असतं ! सुशे, चल घरीं मुकाट्यानं ! ( तिला ओढीत नेतो. )

**धना०**—पांडु, चल घरीं, उद्यांपासून तुलाहि सुशीची शाळा बंद ! पांडु, ऐकलंस ना नीट ? कळलं ना सारं ?

**पांडु०**—ऐकल सार. पण बाबा, खर विचाराल तर मला काही एक कळल नाही. सुशी किती चागली मुलगी आहे ? तिच्याशीं मी का हो भाडू ?

**धना०**—म्हणे का भाडू ? मी सागतो म्हणून ! चल घरी, तुला परपरा-धर्मांची नीट शिकवण देऊन ठेवतों. चल. ( त्याला ओढून नेतो. )

---

## प्रवेश २ रा

( स्थळ—रस्ता. सोकाजी प्रवेश करतो. )

**सोकाजी**—नवरा मरो की नवरी मरो, जो पेटलेल्या चितेवरसुद्धा आपली विडी पेटवून घेईल तोच खरा सोकाजी ! ( विडी पेटवितो. ) मी उक्तीप्रमाणें कृतीचाहि सोकाजीच आहे. ‘ बोले तैसा चाले त्याचीं वदावीं पाउले ’ हे सताच वचन माझ्यासारख्या सोकाजीला उत्तम लागू पडत. एखाद्याच्या घराला आग लागली आणि ते जर थडीचे दिवस असले तर मी खुशाल त्या घराच्या आगीशी शेकत बसेन ! आम्हा सोकाजीची कुणीकडून तरी चैन चालली म्हणजे झाल ! आग लावायलाहि आमची तयारी आणि आगींत तेल ओतायलाहि आमची तयारी ! धनवत आणि मानवत या दोन घराण्यातल वैर बऱ्याच पिढ्याच आहे. हा वैराग्नि, माझ्यासारख्या सोकाजीनीं त्यात तेल ओतण्याच सत्कर्म चालू ठेवल नसत तर, केव्हाच विझून गेला असता ! धनवत आणि मानवत याच्यातील वैराग्नि विझू न देण्यातच माझ हित आहे. धनाजी धनवताची मुलगी केतकी जर माझ्याशी लग्न करायला कबूल होईल तर माझ्या चैनीच्या सागराला कधींच ओहोटी लागायची नाहीं. माझी उसनी ऐट पाहून धनाजी मला जावई करून घ्यायला तयार झाले आहेत. पण उपयोग काय ? ती फटाकडी पोर केतकी कुठ माझ्याशीं लग्न करायला तयार होते आहे ? खरच, मी जर धनाजीचा जावई झालों असतों तर काय बहार उडाली असती ? श्रीमताचा जावई म्हणजे आयत्या बिळावरचा नागोबाच तो ! मी नागोबा बनून केतकीभोंवतीं घिरट्या घालतों आहें, पण ती पोर काहीं मला दाद लागू देत नाहीं. ती दुसऱ्या

कोणाच्या प्रेमजालांत तर अडकली नसेल ? धनाजीच्या केतकीभोंवतीं घुटमळ-णारा तो नागोबा जर माझ्या हातीं लागेल...ओहो ! बोलाफुलाला गांठच पडली कीं ! ही केतकीच इकडे कुणा मित्राबरोबर गप्पागोष्टी करीत येते आहे. त्यांच्यावर चोरटी नजर ठेवण्यांतच तूर्त शहाणपणा आहे.

( बाजूला जाऊन उभा राहतो. )

**केतकी**—( मोहनासह प्रवेशून ) मोहन, आपण दोघंहि धर्ममंडळांत जातों आणि प्रार्थनेच्या वेळीं स्वामी प्रेमानंदांसारख्या अधिकारी माणसांच्या तोंडून निघणाऱ्या उपदेशामृताचं पान करतों. पण या अमृतपानानं आपलीं मनं तितकींशीं शुद्ध झालेलीं नाहींत, असं का ? मोहन, खरं धार्मिक जीवन कोणतं ?

**मोहन**—प्रेममय जीवन हेंच खरं धार्मिक जीवन होय. ज्या जीवनांत प्रेम नाहीं तें जीवन कसलं ? मरणच तें !

**केतकी**—खरं ना ? मग तुम्ही माझ्याशीं तशा स्वर्गीय प्रेमभावनेनं कां वागत नाहीं ? मला तुमच्याशीं आणि तुम्हांला माझ्याशीं प्रेमभावनेनं वागतां येणार नाहीं कां ?

( राग—मिश्रमांड; ताल—एकताल. )

**प्रेम परम अमरधाम । मंगलमय वाटे ॥ ध्रु० ॥**
**कलहीं ना सौख्य दिसे । प्रेमीं आनंद वसे ॥**
**प्रीतरीत जरि वरीत । स्वर्ग कां न थाटे ॥ १ ॥**

**मोहन**—कां नाहीं वागतां येणार ? केतकी, तुझ्यावर प्रेम करायला मला तुझी परवानगी आहे का ?

**केतकी**—म्हणजे ? तुम्ही माझ्यावर प्रेम करणार तें माझी परवानगी घेऊन वाटतं ? प्रेम ही मनाची उपजत भावना आहे, ती भावना कुणाच्या परवानगीची वाट पहात बसत नाहीं. प्रेमाची भावना स्वयंभू आहे. मोहन, आतां उगीच कशाला आडवळणानं बोलूं ? मी तुमच्यावर प्रेम करत्यें तें तुमची परवानगी मिळविल्याशिवाय ! माझी प्रेमभावना तुम्ही प्रेमळ मनानं मान्य कराल का ?

**मोहन**—केतकी, किती वेडी आहेस तू ? तुला माझ्यावर प्रेम करतांच येणार नाहीं.

**केतकी**—का बर ? मी कुणाची गुलाम का आहे ? माझी मी स्वतंत्र आहें, मी वाटेल त्याच्यावर प्रेम करणार !

**मोहन**—पण तुझे वडील धनाजी धनवत तुला ही गोष्ट करू देणार नाहीत. धनवताच्या मुलीला मानवतावर प्रेम करताच येणार नाहीं. तुझे वडील माझ्या वडिलाचा किती द्वेष करतात हें तुला माहीतच आहे.

**केतकी**—पण हा जुन्या पिढीचा द्वेष आपण तरुण पिढीन का बर पुढ चालवावा ? धनाजी धनवत मानाजी मानवताचा खुशाल द्वेष करोत ! पण तो त्याचा जुनापुराणा द्वेष मला मुळींच मान्य नाहीं. मी काही तुमचा द्वेष करीत नाहीं. आता तुम्हीच माझा द्वेष करीत असाल तर गोष्ट निराळी !

**मोहन**—नाहीं, मी तुझा मुळींच द्वेष करीत नाही, उलट मी सुद्धा तुझ्यावर प्रेमच करतो. धर्ममडळात होणारी धार्मिक व्याख्याने ऐकून माझ मनहि द्वेषापासून अलिप्तच राहिल आहे. माझे वडील तुझ्या वडिलाचा खुशाल द्वेष करोत, मी नाही तुझा द्वेष करीत ! केतकी, मी तुझ्यावर मनापासून प्रेमच करतों.

**केतकी**—बर, पण तुमच्या प्रेमभावनेला तुमच्या वडिलानी विरोध केला तर ?

**मोहन**—तरीहि मी तुझ्यावर प्रेमच करीन.

**केतकी**—मग तुमच्या मनाचा हा निश्चय पक्का आहे तर ?

**मोहन**—मी माझ्या निश्चयापासून कधींहि ढळणार नाही.

( राग—पटदीप, ताल त्रिवट. )

**स्वर्ग-आनंद प्रेमी मला । लाभला । प्याला सुखाचा । निधी पीयुषाचा ॥ ध्रु० ॥ केला मनी नेम । मेरू जसा कां । चळणार ना प्रेम । त्यजि सारि शंका ॥ ब्रीदासि पाळीन । हा बोल साचा ॥ १ ॥**

**केतकी**—तर मग अस करा. ( त्याच्या कानांत सागते. )

**सोकाजी**—( स्वगत ) हीं दोघं बाकीचं सारं उघड बोललीं पण मुद्याची गोष्ट तेवढी कानांत सांगताहेत ! अरेरे ! प्रेमाच्या कानगोष्टी अशा गुप्त चालाव्यात ना ?

**मोहन**—केतकी, ठरलं तर ! तूं सांगत्येस तसं वागायला मी तयार आहें.

**केतकी**—बरं तर. तुम्ही आपल्या घरीं जा, मी आपल्या घरीं जात्यें. हो, पण आत्तांची गोष्ट मात्र विसरायची नाहीं, बरं का ?

( राग—भीमपलास; ताल—त्रिवट )

**विसरूं नका ! हां, हां, प्रेमा । प्रेमचि तारक माना ॥**
**सुखशोभना, मनमोहना ॥ ध्रु० ॥ संसृतिसागर**
**तरावयाला । विधिनें प्रेमा मनीं निर्मियला ॥**
**हितकर, शुभकर । सुखशोभना मनमोहना ॥ १ ॥**

( जातात. )

**सोकाजी**—अरेरे, घात झाला ! आतां मी माझी विडी कुणाच्या चितेवर पेटवूं ? केतकी आणि मोहन यांच्यांत द्वेषाग्नीच धुमसत नाहीं, मग मी आगींत तेल तरी कसं ओलूं ? बस्स, आतां मी असंच करणार ! त्या दोघांच्या गुप्त प्रेमाची बातमी धनाजीरावांना जाऊन सांगणार आणि मानवंतांविषयींचा त्यांच्या मनांतील द्वेषाग्नि भडकवणार ! असं केल्याशिवाय या सोकाजीनागाला केतकीचा सहवास लाभणंच शक्य नाहीं. ( विडी हातांत घेऊन ) आतां ही विडी मी मोहनच्या चितेवर पेटवणार, हीच माझी विषारी प्रतिज्ञा ! ( जातो. )

---

## प्रवेश ३ रा

( स्वामी प्रेमानंद प्रवेश करतात. स्थळ रस्ता. )

**स्वामी प्रेमानंद***—काय करावं या कलहप्रिय लोकांना ? हे लोक

---

* ( राग-मिश्रखमाज; ताल—दीपचंदी )

**जगिं प्रेमसुधास्वानंद वसो । दावी विधाता**
**माया जन ना फसो ॥ ध्रु० ॥ कलहीं आत्मा होई दुरात्मा ।**
**प्रेमसुखा मनीं वितरी । सुमती तसो ॥ १ ॥**

लहानशा कारणावरूनहि मोठीं भाडण उकरून काढतात आणि भांडतात. केव्हा केव्हा तर शुष्क कारणांवरून सुरू झालेलीं ही भाडणें इतक्या विकोपाला जातात कीं, शेवटी कलहाग्नीच्या ज्वालानीं वाळलेल्याबरोबर ओलहि जळून जातें. ॐ सच्चिदानद ! सच्चिदानद ! देवा प्रेमनिधाना, या कलहप्रिय लोकामध्यें तू तरी केव्हा प्रेमभाव उत्पन्न करणार आहेस, तें तुझं तुलाच माहीत ! ॐ सच्चिदानद ! सच्चिदानद !

( इतक्यात दोन फाटके गृहस्थ भाडत येतात. )

**धोंड्या**—गुड्या, तू मला धक्का का मारलास तें बोल !

**गुंड्या**—धोंड्या, मीं नाहीं तुला धक्का मारला, मी सहज तिकडे पहात चाललों होतों तों तुला सहज माझ्या हाताचा धक्का लागला ! सहज धक्का लागला तर एवढ तुला वर्दळीवर यायला काय झाल ?

**धोंड्या**—गुड्या, तू मला मुद्दामच धक्का मारलास, आणि आता तिकडे पहात होतों नि इकडे चालत होतों म्हणून कागावा करतोस ? तू मला मुद्दामच धक्का मारलास !

**गुंड्या**—नाहीं बुवा ! का उगाच माझ्यावर कुभाड घेतोस ? तू आपल्या वाटेने जा, मी आपल्या वाटेन जातों.

**धोंड्या**—तें शक्य नाहीं, तू मला मुद्दाम धक्का मारलास !

**गुंड्या**—( नाइलाजानें ) हो, हो, मी तुला मुद्दाम धक्का मारला, मग तुझ काय म्हणण ? धक्का लागला तर त्यात एवढ रागवायला काय झाल ? तू काहीं औरत नाहींस !

**धोंड्या**—मलाच धक्का मारून आणखी वर माझी औरत काढतोस काय ? थाब, माझे सोबती जमवतों आणि तुला बदडून काढतों.

**गुंड्या**—मग मलाहि माझे सोबती जमवता येतील, बर का ? बोलाव पाहूं तुझे सोबती !

**प्रेमानंद**—( पुढें होऊन ) बाबांनों, कां उगाच भाडता ? सहज घडलेल्या

गोष्टीवरून भांडण मारामारीच्या प्रकरणापर्यंत नेणं बरं नाहीं. या गृहस्थानं तुला धक्का मारला, होय ना ?

**धोंड्या**—होय, महाराज !

**गुंड्या**—नाहीं महाराज !

**प्रेमानंद**—तें कांहीं असो, धोंडोपंत, तुम्ही आतां मला दहा धक्के मारून आपला क्रोध शांत करा. तुमच्या हातचा मार खाऊन कलहाग्नि इथच्या इथं विझवायला मी तयार आहें. गांवगुंडांच्या हातून दहापांच मुडदे पडलेले पहाण्यापेक्षां मला तुमच्या हातचे दहापांच धक्के खाणें अधिक बरें वाटतें. धोंडोपंत, तुम्ही माझ्यावर तुमचा सूड खुशाल उगवून घ्या. हा मी आनंदानं तुमच्यापुढं नम्र होतों.

**धोंड्या**—( शरमून ) महाराज, माझ्या हातून हें पाप होणं शक्य नाहीं. मी तुम्हांला कां मारूं ? मी गाढव नाहीं महाराज !

**प्रेमा०**—मग लाथाळी माजविणं हें जें गर्दभराजाचं ब्रीद तें टाकून दे आणि माणसासारखा वाग. हं, घ्या आतां एकमेकांच्या हातांत हात आणि प्रेमानंच एकमेकांचा निरोप घ्या. ( तसं करवितात व ते दोघे एकमेकांना भेटून निघून जातात. ) खऱ्या शत्रूशीं झुंज खेळणं हा धर्म असून आपापसांत कलह माजविणं हें पाप आहे हें आमच्या लोकांना केव्हां कळूं लागेल देव जाणे ! ( इतक्यांत दुरून भांडणाचा ध्वनि ऐकूं येतो. ) तें पहा, तिकडे तिसरंच भांडण जुंपलं आहे. काय करावं या भांडखोर लोकांना ? ( जातात. )

---

## प्रवेश ४ था

(एका बाजूस धनाजी धनवंताचा वाडा व दुसऱ्या बाजूस मानाजी मानवताची झोपडी. दोन घराच्या मधील अगणात विद्याधर गुरुजी पाडुरग व सुशीला यासह बसले असून धनाजीची बायको कावेरी व मानाजीची बायको गोदावरी त्याच्याशी भाडत आहेत.)

**गुरुजी०**—बायानो, हातात लाटणीं घेऊन तुम्ही माझ्या अगावर धावून आल्यात त्या का ते तर आधीं सागाल ?

**कावेरी**—तुम्ही माझ्या पाडूला कुणाच्या हुकमान शिकवता आहात ?

**गोदा०**—आणि तुम्हाला सुशीला शिकवायला कुणी सागितल ? आमच्या तिकडच्यानीं पोरीला तुमची ती जळ्ळी शाळा बद केलेली आहे ना ?

**कावे०**—आणि आमच्या तिकडच्यानींहि पाडूला तुमची ती जळ्ळी शाळा बद केली नाहीं का ?

**विद्या०**—बायानो, आमची शाळा जळली नाहीं, पण तुमच्या कलहाग्नीनं मात्र पेट घेतला आहे. तुमच्या यजमानानीं वेडेपणान जरी मुलाना शाळेतून काढून घेतल असल तरी त्याच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष करण्याचा मूर्खपणा मला करता येत नाहीं. मुलें सालस आणि सुशील आहेत. त्याना मी इथ येऊन शिक्षण देणार !

**कावे०**—शाळेचा पगार तुम्ही खाता ना ? मग शाळेतील मुलांनाच शिक्षण द्या.

**गोदा०**—सोडा हा नसता चोंबडेपणा आणि धरा आपला रस्ता !

**विद्या०**—पण तुम्ही समजता तसा मी पोटभरू गुरुजी नाही. मी पैशाच्या लोभान नाहीं विद्यादान करीत ! विद्यादान करण हे माझ पुण्यव्रत आहे. हें व्रत मी निर्लोभ वृत्तीनच आचरणार, मग शहाणे मला वदोत कीं मूर्ख मला निंदोत !

**कावे०**—म्हणजे आम्हीच मूर्ख—होय ना ?

**गोदा०**—या कावेरीबाई आणि त्यांचे पतिराज धनाजीराव मूर्ख असतील, आम्ही नाहीं मूर्ख! आमच्या सुशीच्या शाळेंत त्यांनीं आपल्या पांड्याला कां पाठवावं ?

**कावे०**—गप्प बैस तूंच ! मोठी आली आम्हांला मूर्ख ठरविणारी ! तुम्ही मुलांच्या शाळेंत मुलीला पाठविलंत, तेव्हां तुम्हीच मूर्ख !

**विद्या०**—पण मी म्हणतों, एकमेकांना मूर्ख ठरविण्यांत शहाणपणा नाहीं. भांडूं नका, माझं पवित्र कार्य मला करूं द्या. पांडुरंगा, अभ्यासाला लाग, सुशीले, धडा पाठ कर.

**कावे०**—अहो, या लौकर बाहेर आणि या गुरुजीची पाठ तिबा !

**गोदा०**—अहो, या लौकर इकडे आणि या गुरूला दावें लावा !

( दोन्ही बाजूंनीं धनाजी व मानाजी सोटे घेऊन येतात. )

**धनाजी**—अहो गुरुजी, चालते होतां मुकाट्यानं की लगावूं सोटा ?

**माना०**—अहो गुरुजी, काढा पाय मुकाट्यानं, नाहीं तर बसेल पाठींत रपका !

**विद्या०**—बरं आहे, जातों मी ! ( जातां जातां ) मुलांनों, जुन्या पिढीचीं माणसं खुशाल भांडत बसोत, तुम्ही मात्र आपापसांत भांडूं नका ! भांडत बसणं हें तरुण पिढीचं काम नव्हे. मुलांनो, भांडूं नका, तुम्हांला माझी शपथ आहे, देवाची शपथ आहे. ( जातो. )

**धना०**—सुशे, तूं भिकारड्या मानवंताच्या पोटीं जन्माला आली आहेस, तुला धनवंताच्या मुलाशीं मैत्री करतां कामा नये.

**माना०**—आणि पांड्या, तूंहि सुशीजवळ मैत्री करतां कामा नये. मानवंत हे धनवंतांचे आजन्म वैरीच राहणार !

**धना०**—आणि धनवंतहि मानवंतांशीं सदासर्वदा वैरभावानंच वागणार !

**पांडु०**—पण बाबा, सुशीजवळ मीं का भांडावं हो ?

**धना०**—ती आपल्या वैऱ्याची मुलगी आहे म्हणून !

**पांडु०**—पण बाबा, सुशी माझी वैरीण नाही.

**सुशी०**—आणि पांडूहि माझा वैरी नाही.

**माना०**—हा पांड्या तुझा वैरीच आहे.

**सुशी०**—तो कसा ?

**माना०**—ते तुला नाहीं कळायचं, मी सांगतो ते मुकाट्यानं ऐक.

( इतक्यांत सोकाजी येतो. )

**सोका०**—ऐका, धनाजीराव, ऐका ! तुमच्या केतकीनं जीव दिला !

**कावे०**—काय, माझ्या केतकीनं जीव दिला ?

**गोदा०**—केतकी म्हणजे मोठी ढालगज भवानी ती, ती जीव देणारच !

**कावे०**—गोदे, तूच ढालगज भवानी आहेस, गप्प बैस. सोकाजीराव ! बोला, माझ्या केतकीनं खरोखरच जीव दिला की काय ?

**धना०**—बोला, बोला लौकर काय ते !

**सोका०**—धनाजीराव, काय सांगू ? ( रडत ) ते भयंकर दृश्य मला पहावेना ! तुमच्या केतकीनं आपला जीव मोहनच्या स्वाधीन केला. तिनं जिवाभावानं मोहन्याच्या गळ्यांत लग्नमाळ घातली. तिनं मानवताच्या मोहनला आपला जीव दिला !

**धना०**—कारटीनं घात केला, धनवताच्या कुळाला कलंक लावला !

**गोदा०**—छान केलं, माझा मोहन आहेच तसा ! धनवताच्या मुलीनं माझ्या मोहनचे पाय धरले हेंच चांगलं झालं ! भली खोड मोडली धनवताची !

**माना०**—छेः, छेः, बायको ! मोहननं हे चांगलं केलं नाहीं. आमच्या घराला धनवताच्या पोरीचा पांढरा पाय लागतां कामा नये ! मोहन्या, मोहन्या, काय केलंस हें ?

**मोहन**—( केतकीसह प्रवेशून ) बाबा, मी केतकीशी लग्न केलं.

**धना०**—केतकी, घात केलास आमचा ! केतकी, लग्नाची गोष्ट खोटी आहे असं तरी सांग.

**केतकी**—बाबा, मीं खोटं कसं बोलूं ? माझं मोहनरावांवर प्रेम आहे.

**धना०**—काय वैऱ्यावर प्रेम ? मानाजी माझा वैरी अर्थात् त्याचा मुलगा मोहन तुझा वैरीच आहे.

**केतकी**—पण बाबा, तुमचं जुन्या पिढीचं वैर आम्हां तरुण पिढील कशाला पढवतां ? आमची तरुण पिढी ऐक्याची भोक्ती आहे, वैराची भुकेली नाहीं.

**माना०**—मोहन, केतकीचा त्याग कर आणि घरांत चल.

**मोह०**—नाही, तें शक्य नाहीं.

**धना०**—केतकी, मोहन्याचं नांव टाक आणि घरांत चल.

**केत०**—तें शक्य नाहीं.

**धना०**—तर मग हो चालती वाटेल तिकडे.

**केत०**—प्रेमाच्या परमेश्वराची आराधना करण्याकरितां मी वनवास भोगायलाहि तयार आहें.

**माना०**—आणि तूं रे कारट्या ?

**मोह०**—मीहि केतकीच्या मागून जाणार ! तुमचीं जुन्या पिढीचीं लटकीं भांडणं भांडत बसायला मी तयार नाहीं.

**माना०**—मग कर काळं इथून !

**मोह०**—केतकी, चल आपण जाऊं ! ( केतकीला घेऊन जाऊं लागतो. )

**पांडु०**—केतकीताई, मलाहि आपल्याबरोबर घेऊन चल ! मलाहि बाबांच्या भांडखोर स्वभावाचा वीट आला आहे.

**केतकी**—बाळ, तूं अजून लहान आहेस, आईजवळच रहा !

**सुशी०**—मोहनदादा, मी येतें तुझ्याबरोबर ! मला मुळीं भांडतांच येत नाहीं, मग मी इथं राहून काय करणार ?

**माना०**—सुशे, तूं अजून लहान आहेस, मोठी झालीस म्हणजे कळेल तुला भांडणं कशीं भांडायचीं तें ! ये इकडे.

**धना०**—केतकी, हो चालती !

**माना०**—मोहन, हो चालता !

**प्रेमानंद**—( प्रवेशून ) मोहन, केतकी, चला माझ्याबरोबर प्रेमभुवनांत रहायला ! जुन्या पिढीला भांडणाचा मार्ग खुशाल चोखाळू द्या. तरुण पिढीन जुनीं वैरं उकरून काढून भाडत बसण हिताच नाहीं.

**धना०**—मोठा आला जोगडा तत्त्वज्ञान शिकवायला ! मी मरेपर्यंत भांडत राहणार !

**माना०**—जोगड्या, मीहि मरेपर्यंत वैराची भावना जिवत ठेवणार !

( जातात. )

**मोहन**—केतकी, जुन्या पिढीला खुशाल भाडत बसू दे. आपण तरुण पिढीन, प्रेमानदानीं दाखविलेला धर्ममार्गच आक्रमिण योग्य आहे.

**केत०**—चला तर !

( राग—बागेश्री, ताल—त्रिवट. )

**जाउं या स्वभुवना सोडुनी । मलिन जें कलहविषी लांछनीं ॥ ध्रु० ॥ टाकुनि कलहा प्रेमें राहूं । मंगल सेवातपा कराया ॥ १ ॥**

**पडदा**

---

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

( स्थळः—रस्ता. सोकाजी प्रवेश करतो. )

**सोकाजी०**—काय करावं या रिकामटेंकड्या लोकांना ? हे म्हणे निष्काम कर्मे करतात ! तो लेकाचा विद्याधर गुरुजी, कोणी पैसे देवो वा न देवो, आपला विद्यादान करीत सुटतो ! म्हणे विद्यादानासारखं पुण्य नाहीं ! अरे पण लेका, तुला हा निष्काम उद्योग सांगितला कुणी लेकानं ? खावं, प्यावं आणि मजा करावी हा राजमार्ग दिला सोडून आणि तो भिकारडा विद्याधर गुरु बनला आहे. हा कसला गुरु, हें मोकाट सुटलेलं गुरूं आहे गुरूं ! पण हें गुरूं इकडेच येतं आहे, बाजूला व्हावं नाहीं तर शिंग मारायचं एकाद्या वेळीं ! ( बाजूला उभा राहतो. विद्याधर गुरुजी, पांडुरंग व सुशीला यांसह प्रवेश करतात. )

**विद्या०**—पांडुरंगा, त्या पलीकडच्या टेकडीवर तूं कोणता देखावा पाहिलास ?

**पांडु०**—गुरुजी, मला तिथं आनंदाशिवाय कांहीच दिसलं नाहीं ! मोठमोठीं झाडं आनंदानं डुलत होतीं आणि पांखरं चिवचिव करीत इकडे तिकडे फिरत होतीं. त्या टेकडीवर मला दुःखाचा लेशहि आढळला नाहीं.

**विद्या०**—शाबास पांडोबा ! योग्य तेंच उत्तर दिलंस. आतां सुशे, तूं सांग, तिथं पांडूला दुःखाचा लेश कां आढळला नाहीं तें ?

**सुशी०**—कारण तिथं कुणी कुणाशीं भांडत नाहीं. जिथं भांडण नाहीं तिथं आनंदच असणार ! गुरुजी, तुम्ही जर माझ्या बाबांना त्या टेकडीवरील मौज दाखवाल तर त्यांनाहि भांडणं टाकावीशीं वाटतील.

**विद्या०**—तें अशक्य आहे. तुझे बाबा जुन्या पिढीचे आहेत, त्यांच्या डोक्यांत नवे विचार शिरणं शक्य नाहीं. ते शहाणे होतील, पण अनुभवानं ! पांडु, आतां तूं या बाजूनं आपल्या घरीं जा आणि सुशे, तूं या बाजूनं आपल्या घरीं जा. पण मुलांनों, लक्षांत ठेवा कीं, प्रेमांत आनंद आहे आणि कलहांत दुःख

आहे. ( मुले जातात. ) मला वाटत की, माझ्या श्रमाच सार्थक होणार आणि धनवत व मानवत या दोन कुळातील वैराग्नि तरुण पिढीच्या अमदानीत पार विझून जाणार !

**सोका०**—( पुढे होऊन ) चुकता तुम्ही गुरुजी ! तुमच्या या चोरट्या शिकवणीन त्या दोन्ही कुळाचा सत्यानाश होणार !

**विद्या०**—तो कसा ?

**सोका०**—अहो, ही दुनिया स्वाभिमानाच्या जोरावर चालली आहे. एकदा हा अभिमान नष्ट झाला की, दुनिया बुडालीच पाहिजे.

**विद्या०**—दुनिया नाहीं बुडणार पण तुमच्यासारखे सोकाजी मात्र बुडतील खरे !

**सोका०**—होय ना ? खर ना ? मग आमच्या सुखाच्या आड तुम्ही का येता ? विद्याधर, मी तुम्हाला बजावून ठेवतो की, हे धदे सोडा आणि...

**विद्या०**—तुम्हा सोद्याना चैनीचा मार्ग मोकळा करून द्या हेच की नाहीं ? सोकाजी, दिसता सभावित पण धदे करता सोदेगिरीचे, हे बरें नाही !

**सोका०**—हो, हो, मी आहेच सभावित सोदा, मग तुमच काय म्हणण ?

**विद्या०**—माझ म्हणण हेंच कीं, आताची तरुण पिढी तुमची डाळ शिजू देणार नाही, म्हणून हे धदे टाका.

**सोका०**—पण पालथ्या घड्यावर पाणी ओतण्याचा उपद्याप तुम्हाला कुणीं सागितला ?

**विद्या०**—माझ्या अतःकरणात वास करणाऱ्या परमेश्वरान !

**सोका०**—पण माझ्या अत करणात वास करणारा परमेश्वर मला तसं का सागत नाहीं ?

**विद्या०**—कारण तिथ सैतानाच साम्राज्य माजल आहे म्हणून !

**सोका०**—हें तुम्हाला कळत ना ? मग तुम्ही सैतानाशी का वितडवाद करता ? मी खरोखरच सैतान आहें, तुम्हाला पाताळात गाडीन ! व्हा चालते, पण मीं सागितल ते नीट लक्षात ठेवा !

**विद्या०**—मी जायला तयारच आहें, मला कुठ आहे भाडणाची हौस ? ( जातो. )

**सोका०**—पण मला आहे ना भांडणाची हौस ?

**प्रेमानंद**—( प्रवेशून ) कां बाबा, असली हौस कां धरतोस ?

**सोका०**—( पाहून ) अरे, वाः रे तूं गोसावडा ! हो, पण हें बरंच झालं कीं, तूं मला भेटलास ! गोसावड्या, तूं माझा वैरी आहेस.

**प्रेमा०**—पण मी कुणाशीच वैर करीत नाहीं.

**सोका०**—तें कां ?

**प्रेमा०**—कारण मी प्रेमानंद आहें. जगांतील कलहाचं बीज नष्ट करून टाकणं हें माझं ब्रीद आहे.

**सोका०**—पण माझं ब्रीद जगांत कलह माजविणं आणि आपली चैन चालविणं हें आहे. तूंच त्या मोहनला आणि केतकीला आपल्या प्रेमभुवनांत आसरा दिला आहेस, नाहीं का ? गोसावड्या, तूं हें वाईट काम करतो आहेस. तुझ्यामुळं माझा धंदा नीट चालत नाहीं, म्हणून याद राखून ऐस, मी तुला एक-ना-एक दिवस खास रसातळाला पोंचवीन !

**प्रेमा०**—मला त्याची पर्वा नाहीं. मी कधीहि धर्मच्युत होणार नाहीं.

**सोका०**—नुस्ता मूर्ख आहेस झालं !

**प्रेमा०**—पण उगाच दुसऱ्याला मूर्ख ठरविणारा स्वतः शहाणा ठरत नसतो.

**सोका०**—हो, मी मूर्ख आहें—मग तुझं काय म्हणणं ?

**प्रेमा०**—माझं म्हणणं इतकंच कीं, शहाण्यानं मूर्खांची संगत धरूं नये. हा मी जातों, बसा खुशाल बडबडत ! ( जातात. )

**सोका०**—काय करावं या मूर्खांना ! लेकाचे नीट संतापत सुद्धां नाहींत ! मी पहात होतों भांडण उकरून काढायला, पण हे लेकाचे संतमहंत संतापाच्या भरांत माझ्यावर तुटून पडतील तर शपथ ! ते जर थोडे संतापले असते तर मजा आला असता ! मग मींसुद्धां दाखवली असती भांडणाची मौज ! छे, ती मौज दाखवायला धनाजी धनवंतालाच गांठलं पाहिजे—त्याला देतों भडकावून, त्याशिवाय नाहीं जमायचं ! ( जातो. )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—प्रेमभुवनातील एक खोली. केतकी सेविकेच्या वेषात काही लिहीत बसली आहे. )

**केतकी**—झाली बाई एकदाची डायरी लिहून ! रात्री सर्व कामें आटोपल्यावर रोजची डायरी लिहिली म्हणजे मनाला तितकच समाधान वाटत. ( शाई टिपते इतक्यात मागून मोहन येतो आणि तिचे डोळे झाकतो. ) इ.श, मेले डोळे काय झाकायचे ते ! लग्नाला इतके दिवस लोटले तरी मेला थट्टेखोर स्वभाव जात नाहीं ना ? माझे नका डोळे झाकू, मला नाही कुणी डोळे झाकलेले आवडत !

**मोहन**—का बर ?

**केतकी**—का म्हणजे ? कुणी डोळे झाकून काम करू शकत का ? मी तरी निदान नीट डोळे उघडे ठेवूनच प्रत्येक काम करत्ये.

**मोहन**—काय, नीट डोळे उघडे टेवून तू प्रत्येक काम करतेस ? मला वाटत की, तुझ्या स्मरणात काही तरी चूक होते आहे. तू केलेली १।२ कामें तरी मला अशी माहीत आहेत की, त्या वेळीं तू डोळेझाकच केलीस !

**केत०**—छेः, मी कोणत्याहि कामात डोळेझाक केलेली नाही.

**मोह०**—मग मला जे तू वरलस तें आपल्या कुळाच्या इज्जतीकडे डोळेझाक करूनच नाहीं का ? बर, तें एक झाल. पण पुढ इथ प्रेमभुवनात येऊन सेविकेच व्रत घेतलस, यात तू स्वतःच्या इभ्रतीकडे डोळेझाकच केलीस ! तू जर माझ्याशी लग्न केल नसतस तर सेविका होण्याचा दीनवाणा प्रसग तुझ्यावर आलाच नसता !

**केत०**—पण मला सेवाव्रत घेण्यात मुळींच कमीपणा वाटत नाहीं. दीनदुबळ्याची सेवाचाकरी करण्यात उलट मला धन्यताच वाटते. मला हें सेविकेच काम फार आवडत.

**मोहन**—पण तू धनाजी धनवताची मुलगी, श्रीमतींत वाढलेली बाई, तुला या असल्या हलक्या कामाचा कटाळाच वाटला पाहिजे. आमच आपल बरोबर आहे. मी गरिबींतच जन्माला आलो, तेव्हा गरिबाचा सेवक झालो हें माझ्या योग्यतेला साजेसच आहे.

**केत०**—बरं, बरं, पुरें झालं हें कुचकं बोलणं. असलं बोलणं बायकांना शोभतं, पुरुषांना नाहीं शोभत !

**मोहन**—बरं बुवा, राहूं द्या आमचं आपलं ! तुम्हीच काय तिकडे दिवे लावले आहेत ते तर दाखवाल ? पाहूं बरं आज काय डायरींत लिहिलंस तें !

**केत०**—म्हणजे माझी आणखी थट्टा उडवायला वाटतं ? ही घ्या डायरी, आहे काय तिच्यांत ?

**मोहन**—( डायरी घेऊन ) आहे काय हिच्यांत ? हिच्यांत तर तूं आपलं खरं अंतःकरण ओतलं आहेस ! डायरी म्हणजे माणसाच्या मनाचं सत्य प्रतिबिंब ! ( वाचूं लागतो. ) " प्रातःकाळीं उठल्याबरोबर प्रथम पतिदेवाचं दर्शन घेतलं आणि मुखमार्जन आटोपून कामाला लागल्यें. दुपारीं अस्पृश्य बंधुभगिनींच्या वस्तींत जाऊन दुखणाइतांना औषधोपचार केले. एका बाईचा मुलगा थेट आमच्या पांडूसारखा असलेला मला आढळला, तेव्हां मला रडूं कोसळलं, आणि तेव्हांपासून माझ्या मनश्चक्षूंपुढं एकसारखा पांडूच दिसतो आहे–मनाला कसं तें चैनच पडत नाहीं..." अस्सं ! म्हणजे तुला एकसारखी घराची आणि घरच्या मंडळीची आठवण होते आहे तर ?

**केतकी**—मग काय झालं माहेरच्या मंडळीची आठवण झाली तर ? माहेर तें माहेर ! आम्हां बायकांच्या स्मरणांतून माहेरच्या आठवणी नष्ट होणं शक्य नाहीं. माहेर, मग तें कितीहि वाईट असेना, आम्हां बायकांना त्याची आठवण होणारच !

**मोहन**—ठीक आहे तर, मग जा माहेरींच रहायला !

**केतकी**—काय म्हणून मी माहेरींच जाऊं ? मला जर माहेरीं रहायचं असतं तर तुमचा हात धरून इथं आल्येंच नसत्यें.

**मोहन**—मी तुला बजावून ठेवतों, तूं माहेरची आठवण काढून रडतां कामा नये. एक माहेर टाकून माझ्याजवळ रहा किंवा मला टाकून माहेरीं जा, दोन दगडींवर पाय ठेवूं नको.

**केतकी**—म्हणजे मी माहेरची नुसती आठवण सुद्धां करूं नको ना ? मीं तुमच्याशीं लग्न केलं ही चूकच केली म्हणायची ! हें पहा, मी तुमची पत्नी आहें, गुलाम नाहीं. मी तुमचा हा जुलूम मुळींच सहन करणार नाहीं !

**मोहन**—मीहि तुझा पति आहे, तुला माझी प्रत्येक आज्ञा मानलीच पाहिजे.

**केतकी**—हो का ? तुम्ही मला बटकीप्रमाणच वागवणार तर ? मेल बायकाच जिण फोल, हेच खर !

( राग—पिलु, ताल—केरवा. )

**बोला, जीव फार भ्याला। ममता प्रेम फोल ना ॥ध्रु०॥**
**भोळी राणी झाली दासी। कंठ कापिला। कां हो ॥ १ ॥**

**मोहन**—तुम्हा बायकाना स्वतःची चूक रडून साजरी करून दाखविता येते हे मला माहीत आहे. हं, हे खोट रड आवर आणि काय ते स्पष्ट उत्तर दे. केतकी, तुझ्या तोंडून निघणाऱ्या उत्तराची मी वाट पहात उभा आहे. हं, आवर खोट रड आणि खर उत्तर दे !

**केतकी**—( रडत ) म्हणजे मी खोटच रडत्ये आहे, होय ना ? मेली पुरुषाची जातच निर्दय ! ( रडते. )

**मोहन**—रड रड, खुशाल रड ! तुझ्या मायावी रडण्यान माझ्या हृदयाला द्रव येण शक्य नाहीं.

**प्रेमानंद**—( एकदम प्रवेशून ) अरे मोहन, इथ काय करतो आहेस ? घात झाला ! तुझी आठवण काढकाढीत तुझ्या वहिणीन—सुशीन विहिरीत जीव दिला ! बिचारी प्रेमळ सुशी !

**मोहन**—( स्फुदत ) काय म्हणता स्वामीमहाराज ! माझ्या लहानग्या प्रेमळ सुशीन माझ्यासाठी आपला जीव दिला ? बोला, तिला कुणीच वाचविली नाहीं का ?

**प्रेमा०**—कोण वाचविणार तिला ? तू तिचा प्रेमळ भाऊ इकडे आलास, मग तिला घरी मायेच कोण उरल बर ?

**मोहन**—खरच महाराज, मीं घर सोडून इकडे आलो ही चूकच केली. मी घरीं असतों तर सुशी खात्रीन जिवत राहिली असती ? ( डोळे पुसतो. )

**प्रेमा०**—अहारे रड्या ! हाच का तू धैर्यशाली पुरुष तो ? डोळे पुशीत रडतो तो पुरुष कसला ? ( हसतात. )

**मोहन**—महाराज, तुम्ही माझी थट्टा तर करीत नाहीं ? बोला, बोला लौकर !

**प्रेमा०**—वेड्या, मीं तुझी थट्टाच केली. सुशी जिवंत आहे आणि तुझे आई-बाप नित्यनियमाला अनुसरून केतकीच्या आईबापांशीं जोरजोरानं भांडत आहेत.

**मोहन**—महाराज, तुम्ही कधींच थट्टा करीत नाहीं, मग आजच कां बरं अशी माझी थट्टा केलीत ?

**प्रेमा०**—तुझ्या द्वेषांध डोळ्यांत अंजन घालण्याकरतां ! मोहन, दुसऱ्याच्या डोळ्यांत चटकन् बोट जातं, पण तेंच स्वतःच्या डोळ्यांत गेलं म्हणजे रडूं कोसळतं. जसं तुझं मन तसंच केतकीचं मन ! केतकीला पांडूची आठवण झाली म्हणून तिला तूं दूषण दिलंस, आणि स्वतःवर प्रसंग येतांच बायकोसारखा डोळे पुसूं लागलास ! तूं विनाकारण केतकीला रडविलंस ! तुला जसं सुशीलेबद्दल प्रेम वाटतं, तसंच केतकीला पांडूबद्दल प्रेम वाटतं ! तूं कोंवळ्या मनाच्या केतकीला रडवलंस ही चूकच केलीस ! आतां तिची क्षमा माग आणि तिची समजूत कर, मी जातों—( जातो. )

**मोहन**—म्हणजे स्वामीजींनीं माझी चांगलीच फजिती केली यांत शंका नाहीं. पण स्वामीजींनीं केलं तें योग्यच केलं. मीं व्यर्थ केतकीच्या मनाला दुःख दिलं ! किती द्वेषांध आणि किती मूर्ख आहें मी ! आतां मला केतकीचे पाय धरून तिची क्षमा मागितल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ( हळु पावलांनीं केतकीकडे जात ) प्रियतमे, माझ्या हातून घोर अपराध घडला, मला क्षमा कर.

( राग–कर्नाटकी; ताल–त्रिवट. )

**करिं गे क्षमा । प्रिय तूंचि रामा । दिनरात ध्यातों ।**
**तुझिया सुनामा ॥ ध्रु० ॥ लक्ष्मी जशी कां नारायणाला ।**
**सीता किं रामा । तशी तूं सुभामा ॥ १ ॥**
**कलहा करोनी । छळिलें तुला गे ॥ चुकलों खरा मी ।**
**धरुं कां पदांना ॥ २ ॥**

( पाय धरावयास जातो तों केतकी त्याला वर उठविते. )

**केतकी**—नाथ, आपण पुरुष, आपण नाहीं माझ्यासारख्या स्त्रीची क्षमा मागायची ! पुरुष चुकले तरी त्यांच्या चुकीचं प्रायश्चित्त स्त्रियांनींच भोगलं पाहिजे. नाथ, मीच तुमची क्षमा मागतें.

( राग—जीवनपुरी, ताल—त्रिवट. )

**जरि पतिमन ग्रासी संशय हा ! । भीतचि मानसि रामा ॥**
**पती चुकतां कटु फल भोगी कांता ॥ ध्रु० ॥**
**रुसतां फुगतां रडतां कढतां । होत अती व्याकुल ती**
**वनिता ॥ करिं नाथ क्षमा । पदी वाही मम माना ॥ १ ॥**

**मोहन**—प्रियतमे, माझे डोळे साफ उघडले, आता मला अधिक हिणवू नकोस ! मी तुझ्याशी आजपासून कधीहि भाडणार नाहीं, मग तर झाल ना ? आता थोड गालातल्या गालात गोडस हसून मोहक उत्तर दे पाहू !

( तिच्या गालाला अगुलिस्पर्श करतो. )

**केतकी**—( हसत ) नाथ, खर ना पण हें ?

**मोहन**—अग, कलहावर माझं मुळींच प्रेम नाहीं. मीं मघाशी थोडा प्रेमाचा कलह केला !

**केतकी**—अस्स ? म्हणजे मघाचा तो प्रेमकलह होता म्हणायचा ? तुमचा झाला प्रेमकलह, पण माझा जीव जायची पाळी आली !

( आतून आवाज—' केतकी, रोग्याना औषधें देण्याची वेळ झाली ना ? ' )

**केतकी**—अगबाई, अगदींच विसरल्यें मी ! नाथ, मी रोग्याच्या शुश्रूषेला रुग्णालयात जात्ये.

**मोहन**—आणि मलाहि माझ्या कामाला गेलच पाहिजे, चल. (जातात.)

---

## प्रवेश ३ रा

( **स्थळ**—रस्ता. सोकाजी त्रासलेला प्रवेश करतो. )

**सोका०**—म्हणे आपापसात भाडू नका, एकमेकावर प्रेम करा, आणि गुण्यागोविंदानें रहा ! अरे, पण तुम्हीं जर भाडला नाही तर आमच्यासारख्या सोकाजींच्या चैनी कशा चालाव्या ? तुम्ही जर पोटभर भांडाल तरच आमचीं पोट भरतील ना ? तो गोसावडा प्रेमानद आणि तो गुरवडा विद्याधर यांनीं तर भंडावून सोडल आहे. धनवत आणि मानवत यांची जुनी पिढी परपराधर्माला अनुसरून आपापसात भाडायला तयार आहे, पण त्या प्रेमानद—विद्याधरांनीं

तरुण पिढीला फितवलं ना ? तो गोसावडा म्हणे सेवाश्रम चालवतो आणि तो गुरवडा म्हणे मुलांमुलींना विद्यामृत पाजतो. त्या मोहन्यानं केतकीला पळविलं नसतं तर आज मी धनाजी धनवंताचा जामात बनून चैनींत लोळत पडलों असतों. आतां त्या धनवंताला कसं लुबाडावं तेंच कळत नाहीं. त्या धनवंताच्या धनाला एकदां आग कां लागत नाहीं तेंच कळत नाहीं. आग—आग—वाः, फार छान युक्ति सुचली ! आतां मीच देतों त्याच्या घराला आग लावून आणि आगीचा डोंबाळा माजला कीं, घरांत घुसून लुबाडतों, त्यांचं धन ! कुठं गांवांत आगी लागल्या म्हणजे माझ्यासारख्या उचल्यांचं चांगलंच फावत असतं. शिवाय धनाजीचं घर पेटलं म्हणजे मानाजीची झोंपडी आपोआपच जळून भस्म होईल ! हा ! हा ! छान जमला बेत !

**पांडुरंग**—( प्रवेशून ) काय सोकाजी, कसला बेत चालला आहे ? अगदीं आग पेटल्यासारखी दिसते आहे ?

**सोका०**—कुठं, कुठं आग पेटली ?

**पांडु०**—काय, तुम्हांला नाहीं दिसत ?

**सोका०**—नाहीं बुवा !

**पांडु०**—हो, तेंहि खरंच ! तुम्हींच पेटविलेली आग तुमची तुम्हांला कशी दिसणार ?

**सोका०**—काय मीं आग पेटविली ? आणि कुठं ?

**पांडु०**—तुमच्या मनांत ! तुमच्या मनांत पेटलेल्या आगीचा धूर तुमच्या डोळ्यांवर आलेला दिसतो आहे !

**सोका०**—माझ्या डोळ्यांवर धूर आला असला तर त्या धुरानं तुझ्या डोळ्यांतून पाण्याचे पाट वाहूं लागतील, समजलास पांड्या ?

**पांडु०**—ते कां ?

**सोका०**—त्या गुरुजीचा नाद धरलास म्हणून !

**पांडु०**—माझे गुरुजी तुमच्या डोळ्यांत कां खुपतात हो ?

**सोका०**—ते तुला परंपराधर्म शिकवीत नाहींत म्हणून. त्या गुरवड्याच्या शिकवणीनंच तूं सुशीचा द्वेष सोडलास, होय ना ?

**पांडु०**—मीं सुशीशीं कां भांडावं ?

**सोका०**—तुझा बाप तिच्या बापाशी भांडतो म्हणून !

**पांडु०**—पण मी नाहीं सुशीशीं भाडायचा ! सोकाजीराव, आपले कान चागले लाब करा आणि मी सागतो ते ऐका. आमची तरुण पिढी यापुढ कधींहि आपापसात भाडणार नाहीं. आपापसात नसती भाडण भाडल्यामुळ कसा सत्यानाश होतो तें आम्हा तरुण पिढीला चागले कळून चुकल आहे.

**सोका०**—तुम्हाला कळल नाही काहींसुद्धा, पण चुकल आहे मात्र सार ! तशात तू त्या ढालगज भवानीचा—केतकीचाच भाऊ की नाहीं ? ती मोहन्याचा हात धरून पळून गेली...

**पांडु०**—हा, गप्प बसा ! माझ्या ताईला शिव्या दिलेल्या मला खपणार नाहीत !

**सोका०**—पण मी जन्मभर केतकीला शिव्याच देणार !

**सुशीला**—( प्रवेशून ) सोकाजी, तुम्ही जन्मभर शिव्याच देत बसा ! कारण तुम्ही आहात शिमगापडित ! आमच्या घरी येऊन तरी तुम्ही मोहनदादाच्या नावान शिमगाच करीत असता कीं नाही ? पाडु, हे सोकाजी फार पाजी गृहस्थ आहेत—त्याच्या काय नादीं लागतोस ?

( कवाली )

**हा दुष्ट नष्ट मेला । दिसतो खराच बगळा ।। ध्रु० ।।**
**दिसतो वरून भोळा । परि अंतरांत काळा ।।**
**हा नाग विषारी हो । दंशील कोण वेळा ।। १ ।।**
**हा दावि पेट मोठी । परि धरित बुद्धि खोटी ।।**
**हा चावराच कुत्ता । मारा तयास लत्ता ।। २ ।।**

**पांडु०**—सुशे, तुझ म्हणण खर आहे. या दुष्टापासून दोन पावल दूरच राहिल पाहिजे.

**सुशी०**—चल तर !

**पांडु०**—सोकाजीराव, आम्ही जातों, आता खुशाल करीत बसा शिमगा ! ( जातात. )

**सोका०**—मी आता तुमच्या घरांची होळी पेटवितो आणि तुम्हालाच शिमगा करायला लावतों. दुसऱ्याच्या घराना आगी लावल्याशिवाय माझ्यासारख्या सोकाजीची चैन तरी कशी चालणार ? ( विडी काढून ) आता ही विडी मी

धनवंताच्या घराच्या आगीवरच पेटविणार—कारण मी सोकाजी आहें. आतां जातों आणि, मानाजी तुझ्या घराला आग लावणार आहे म्हणून धनाजीला सांगतों; आणि धनाजी तुझी झोंपडी जाळून टाकणार आहे म्हणून मानाजीचे कान फुंकतों. म्हणजे घरादारांचें भस्म झाल्यावर धनाजी व मानाजी एकमेकांच्या नरडीचा घोंट घेऊन वैरात्मक परंपराधर्माचा शेवट लावतील आणि मी शीरसलामत मोकळा सुटेन !

---

## प्रवेश ४ था

( **स्थळ**—अंगण. गोदावरी अंगण झाडीत असून कावेरी दारांत विणीत बसली आहे. )

**कावेरी**—( पुढें होऊन ) काय ग गोदावरी, तुला लाज नाहीं वाटत ?

**गोदा०**—मला कां लाज वाटेल? घरचं अंगण झाडण्यांत कुणाहि कुलस्त्रीला लाज वाटत नाहीं. काय ती सारी लाज तुम्हां श्रीमंतींत लोळणाऱ्या गोजिरवाण्या मैनांना ! इकडची काडी तिकडे कराल तर शपथ ! तुमचं काय जें मोठं काम तें विणकाम ! चांगलं कंबर मोडून केरपोतेरं केलंस तर अंग तरी मोकळं होईल !

**कावे०**—बस्स झालं तुझं लेक्चर ! मोठी आली मला उपदेश करायला ? अग ए भिकारडे मानवंती, मी तुझ्यासारख्या सत्रा मोलकरणी केरपोतेऱ्याच्या कामावर ठेवल्या आहेत बरं ? हं, थांब तिथंच ! तुझ्या अंगणांतला केर माझ्या अंगणाच्या हद्दींत येऊं लागला. तुझा केर माझ्या अंगणांत झाडायला, म्हटलं, तुला लाज तरी कशी वाटत नाहीं ?

**गोदा०**—तुला लाज वाटते आहे ना ? मग बोलाव त्या तुझ्या सत्रा मोलकरणी आणि भरून टाक केर ! माझं अडलं आहे खेंटर तुझा हुकूम मानायला ! ( झाडूं लागते. )

**कावे०**—तशी तूं कुठली बऱ्या बोलानं ऐकायला ? मानवंतीण ना तूं ? ऐकलंस तर मान मोडायचा ! ( तिच्या हातांतील केरसुणी हिसकावून ) हो चालती मुकाट्यानं, नाहीं तर मारीन पाठींत !

**गोदा०**—मला तुझी श्रीमंतीची ऐट नको दाखवूं ! गरीबगुरिबांना तुच्छ लेखतेस त्याचं प्रायश्चित्त तुला खास भोगावं लागेल ! एक दिवस तुझी श्रीमंती जळून खाक झाल्याशिवाय रहायची नाहीं !

**कावे०**—आग लागो तुझ्या तोंडाला !

**गोदा०**—आग लागो तुझ्या श्रीमतीला !

( सोकाजीचा आवाज—"आग ! आग ! धनवताच्या घराला आग ! मानवताच्या झोंपडीला आग !" )

**कावे०**—अगबाई, खरीच आग ! ( धावत जाते. )

**गोदा०**—अगबाई, आता काय करू ? खरीच आग ! ( धावत जाते. )

( आगीचा देखावा ! )

**धनाजी**—( सोटा घेऊन सतापलेला प्र. क. ) अरे नीचा मान्या, शेवटीं आपला सूड माझ्या घराला आग लावून उगवलास काय ? ये असा माझ्या-समोर, तुझ टाळकच फोडतों.

**मानाजी०**—( सोटा घेऊन चिडलेला प्र. क. ) काय म्हणतोस रे धन्या ? माझ्या झोपडीला स्वतःच आग लावून माझ्यावर कुभाड घेतोस काय ? ये पुढें, तुझ टाळक फोडतो ! ( दोघाची सोटासोटी सुरू होते, इतक्यात विद्याधर व प्रेमानद येतात व त्याना मागे ओढतात. )

**विद्या०**—धनाजी, हे तुम्ही काय माडल आहे ? घराला आग लागली तरी मनातला द्वेषाचा पीळ जळला नाही ना ?

**प्रेमा०**—मानाजी, घरदार पेटल तरी भाडणाची आग शात झाली नाहीं ना ? वेड्यानो, चला आधीं आणि बायकापोराना तरी वाचवा ! चला ! ( विद्याधर व प्रेमानद धनाजीला व मानाजीला आत ओढून नेतात.)

---

## प्रवेश ५ वा

( **स्थळ**—रस्ता. सोकाजी एक पेटी घेऊन चोरासारखा प्रवेश करतो. )

**सोका०**—धावा, धावा, धनाजी धनवताच्या घराला मानाजी मानवतान आग लावली, धावा ! ठीक आहे, सारे लोक तिकडेच जाताहेत, आपण आतां या पेटीसह पोबारा करावा ! त्या दोघाचीं घरें पेटली खरी, पण मला धनाजीच्या तिजोरीवर डल्ला मारायला चागली सधि मिळाली. तो कारटा पाड्या मला आडवा आला होता, पण टाकला त्याला आगींत कोडून ! आग, आग, धावा,

धांवा ! (पळण्याची संधि पहातो तों आगींतून बाहेर पडलेला पांडु येतो. त्याचे कपडे जळलेले दिसतात, अंग भाजलेलं असतं.)

**पांडु०**—सोकाजी, पळूं नकोस. आग लावून आणि चोरी करून पळून जातोस काय ?

**सोका०**—(मागें वळून) तूं कोण ? पांडया ! आणि तूं जिवंत कां ?

**पांडु०**—मेलों नाहीं म्हणून ! मला आगींत कोंडून पेटीसह जात होतास नाहीं का ? पण कसा सुटलों आणि तुला पकडायला आलों ?

**सोका०**—आगींतून सुटलास पण फोफाट्यांत मात्र येऊन पडलास ! आधींच भाजून अर्धमेला झाला आहेस, आतां मात्र पुरा मारीन तुला ! सोड मला मुकाट्यानं !

**पांडु०**—मेलों तरी बेहेत्तर, पण तुला सोडणार नाहीं ! (पाय जोरानें पकडतो.) धांवा, धांवा, या चोराला पकडा !

**सोका०**—(पेटी खालीं ठेवून व त्याची मान पकडून) आतां सोडतोस मला कीं तुझी मान मुरगाळूं ?

**सुशी०**—(प्रवेशून) सोकाजी, सोड पांडूला, नाहीं तर पाय ओढून तुला आपटी खायला लावत्यें. (पाय ओढते.)

**सोका०**—कारट्यांनों, सोडा मला, सोडा मला ! पडलों ना मी ? (पडतो.)

**पांडु०-सुशी०**—धांवा, धांवा !

**सोका०**—(दोघांना दूर लोटीत) कारट्यांनों, ओरडा आतां खुशाल ! (पेटी घेऊन पळून जाऊं लागतो तों केतकी-मोहन धांवत येतात. मोहन सोकाजीच्या अंगावर धांवून जातो. केतकी पांडूला सांवरते.)

**केतकी**—अगबाई, पांडूला मूर्च्छा आली वाटतं ? (त्याला वारा घालूं लागते.)

**मोहन**—पाजी ! आतां कुठं पळशील ? (पकडतो.) पोलीस ! पोलीस !

**पोलीस**—(येऊन) काय, काय भानगड आहे ?

**मोहन**—या चोराला पकडा ! हा सोकाजी आगींत सांपडलेल्या धनवंताच्या घरांत चोरी करून पळून जातो आहे !

**पोलीस**—अरे बदमाष ! छान सांपडलास. (त्याला बेडी घालतो) चल अंधारकोठडींत !

**सोका०**—चला, त्यात तरी कुठ बिघडल? तिथ घराच भाड द्याव लागणार नाही आणि लोकाच्या घराना आगी लावल्याशिवाय सकाळसध्याकाळ जेलखान्यातली कांजी भुरकायला मिळेल! चला! भाड्याच्या किंवा बिन-भाड्याच्या कुठल्याहि घरात जो चैनींत राहील तोच खरा सोकाजी! मोहन, चल मला पोचवायला.

**पोली०**—मोहनराव, चौकीवर चला आणि फिर्याद दाखल करा.

**मोह०**—केतकी, पाडूला सेवाश्रमात घेऊन जा आणि त्याला औषधोपचार कर. हा मी आलोच लौकर! सुशे, तू केतकीला मदत कर. (पोलीस, सोकाजी व मोहन जातात. केतकी पाडूला उचलून नेते. सुशी त्याच्याबरोबर जाते.)

---

## प्रवेश ६ वा

(स्थळ—प्रेमानदाचा सेवाश्रम. बाहेरच्या बाजूस प्रेमानद प्रवेश करतात.)

**प्रेमानंद***—पणजोबानी आणि खापरपणजोबानी सुरू केलेली भाडण आजहि भाडत बसण्यात शहाणपणा कोणता तेच मला कळत नाहीं. जुनीं भाडण उकरून काढून भाडत बसू नका म्हणून सागितल तर ते जुन्या पिढीला पसत नाहीं. म्हणे आपापसात यादवी माजविण हा परपराधर्म आहे. त्यातल्या त्यात आनदाची गोष्ट इतकीच की, हीं जीर्ण भाडण तरुण पिढीला तितकीशी पसत नाहींत. कलहाच बीज तरुण पिढीच्या मनात रुजणार नाहीं तर किती मौज होईल!

**सुशीला**—(प्रवेशून) स्वामीमहाराज, माझ्या पाडुभाऊला लौकर बर वाटेल ना हो?

**प्रेमा०**—बाळ, पाडूला लौकरच आराम वाटेल बर! पाडु बरा व्हावा अस तुला मनापासून वाटत ना?

**सुशी०**—होय महाराज!

---

* (राग—बहार, ताल—त्रिवट.)

**करि शांतिभंग जगिं या विनाशकारी वैरलीला ॥ ध्रु० ॥**
**कलही जग हें। नितांत घालें। त्यजी सुधेला।**
**प्राशी सुरेला ॥ १ ॥**

**प्रेमा०**—तर मग तूं तशी देवाची प्रार्थना कर. सर्व संकटांतून मुक्त करण्यास तो देवाधिदेवच समर्थ आहे. ( जातो. )

**सुशी०**—देवा, माझ्या बंधुरायाला लौकर बरेपणा वाटूं दे.

**केतकी**—( प्रवेशून ) सुशीले, पांडूला बरेपणा वाटला, त्यानें डोळे उघडले, तो तुलाच हांका मारतो आहे.

**सुशी०**—हो का ? तर मग मी जात्येंच त्याच्या समाचाराला ! ( जाते. )

**केतकी**—देवा, आतां तरी जुन्या पिढीचे डोळे उघड आणि आपापसांतील कलह सोडण्याची सुबुद्धि दे.

( राग-भैरवी; ताल-त्रिवट )

**दाविं देवा दया । दयाळा । झणिं खलजनमति न्यावी लया ॥ ध्रु० ॥ प्रेमसुमंगल पथा वराया । द्या सुमति जगा तारावया ॥ १ ॥**

( आंतील भाग दिसूं लागतो. आरामस्थलीं पांडु पडला असून त्याच्या शेजारीं धनाजी, मानाजी, कावेरी, गोदावरी, सुशीला, केतकी, मोहन, प्रेमानंद, विद्याधर इ. मंडळी जमा झाली आहेत. )

**पांडु०**—बाबा, मी सुशीशीं भांडत नाहीं, सुशी माझ्याशीं भांडत नाहीं, केतकीताई मोहनरावांशीं भांडत नाहीं आणि मोहनराव केतकीताईशीं भांडत नाहीत; मग तुम्हीच मानाजीरावांशीं कां भांडतां हो ? आई, तूं सुद्धां गोदावरीबाईशीं भांडूं नकोस ! आम्हां तरुण पिढीप्रमाणंच तुम्हीहि भांडणं टाका !

**सुशी०**—आई, बाबा, पांडुभाऊचं म्हणणं खरं नाहीं का ?

**मानाजी**—सुशे, मला माझा मूर्खपणा पुरता कळून आला ! आतां मी धनवंतांशीं मुळींच भांडणार नाहीं.

**गोदा०**—आणि तुम्ही भांडण सोडलं म्हणजे मी तरी कशाला कावेरीबाईशीं भांडूं ?

**धना०**—मानाजीराव, तुमच्या आमच्या भांडणांत सोकाजीराव आपली तुंबडी भरून घेतात. दोघांच्या भांडणांत सोकाजीरावाचा लाभ होतो. मी आतां तुमच्याशीं कधींहि भांडणार नाहीं. आपण आतां तरुण पिढीचंच उदाहरण गिरवूं या.

**कावे०**—गोदावरीबाई, माझ्या खोट्या अभिमानाला आग लागली, आता मी तुमच्याशी कधीं सुद्धा भांडायची नाही बर ?

**विद्या०**—हेंच उत्तम ! माझ्यावरहि आता तुमच्या हातच्या लाटण्याचा प्रसाद खायची पाळी येणार नाहीं.

**प्रेमानंद**—विद्याधर, तुमच्यासारखे गुरु असल्यावर तरुण पिढीत कलहाच बीज रुजण्याची भीतीच नको ! खरे विद्यादाते गुरु हेच समाजाचे त्राते होत.

**मोहन**—आणि स्वामीमहाराज, तुमच्यासारखे नि:स्वार्थी समाजसेवक हेच तरुण पिढीचे खरे मार्गदर्शक होत.

**केतकी**—नाथ, आता प्रेमान सुद्धा भांडत बसायच नाहीं बर का ? नाहीं तर प्रेमाचा कलह करता करता पुनः कलहावरच प्रेम वर डोक काढायच !

**मोहन**—त्याची तुला काळजीच नको ! आजपासून सारे कलह नष्ट झाले !

**सुशी०**—दादा, हे खर कशावरून ?

**मोहन**—तरुण पिढीचा प्रतिनिधी जो पांडुरंग त्याचीच शपथ ! ( शपथ घेतो. )

**प्रेमानंद**—तथास्तु ! तथास्तु ! ! नारायण ! ! ! जुनाट व खोट्या कलहाना परपराधर्म समजण्याची जुन्या पिढीची कुबुद्धि नष्ट होवो ! तरुण पिढी ऐक्याचा व प्रेमाचा कल्याणकारी मार्ग आक्रमो ! वंदे मातरम् ।

## समाप्तिगीत

( राग—कलिंगडा, ताल—त्रिवट. )

**वंदे मातरम् ।**
**सुजलां, सुफलां, मलयजशीतलां ।**
**शस्यश्यामलां मातरम् ॥ ध्रु० ॥ शुभ्रज्योत्स्नापुलकित-**
**यामिनीं । फुल्लकुसुमितद्रुमदलशोभिनीं ।**
**सुहासिनीं सुमधुरभाषिणी । सुखदां, वरदां मातरम् ॥ १ ॥**



# अंक पहिला



## प्रवेश १ ला

( **वेळ**—रात्रींची. रजनी एका बाजूला अभ्यास करीत असून जीवन आणि जुई हीं मुलें देवाची प्रार्थना करीत आहेत. स्थल—रजनीचा दिवाणखाना. )

मुलें—

### प्रार्थनागीत.

**येई गा तूं येई गा तूं पंढरीच्या राया ॥ तुजवीण शीण वाटे क्षीण झाली काया ॥ ध्रु० ॥ याती हीन मती हीन कर्म हीन माझें । सर्वेहि लज्जा सोडुनि बापा शरण मीं आलों तुज ॥ १ ॥ दीननाथ दीनबंधू नाम तुम्हा साजे । पतितपावन ऐसी ब्रीदावळी गाजे ॥ २ ॥ विटेवरी उभा नीट कटावरी कर । तुका म्हणे हेंचि आम्हां ध्यान निरंतर ॥ ३ ॥**

( प्रार्थनागीत संपल्यावर आंतून ताराबाई ‘ जीवन, जुई ! प्रार्थना संपली ना ! या आतां झोंपायला ’ अशी सूचना देतात. )

**रजनी**—बाळांनों, जा, झोंपायची वेळ झाली. ही पहा आई तुम्हांला बोलावते आहे.

**जुई**—जातों आम्ही झोंपायला, पण ताई, तुला नाहीं का ग झोंप येत ?

**रजनी**—बाळ, मला अजून पुष्कळ अभ्यास करायचा आहे. तें पुस्तक वाचून संपेपर्यंत मला नाहीं झोंप घेतां यायची ! कॉलेजचा अभ्यास फार कठीण

बाई ! तुमच्यासारख्या चिमणीकावळयाच्या गोष्टीचा नाहीं तो ! कॉलेजात किनई, फार मोठमोठी इंग्रजी पुस्तकें घोकावीं लागतात.

**जीवन**—( रजनीच्या टेबलावरील अभ्यासाचे पुस्तक आणून ) पण ताई, आत्ता तू वाचीत होतीस ना, हें तर मराठी पुस्तक दिसतय ! याच्यावर ' प्रेमाची जादू ' अस लिहिलेल आहे ! जुई, वाच या पुस्तकावरच नाव, प्रे-मा-ची जा दू !

**जुई**—खरच ताई, ही प्रेमाची जादू तर मराठी दिसते, मग तू मराठी पुस्तकातून इंग्रजीचा अभ्यास कसा करीत होतीस ?

**जीवन**—अग जुई, हीच तर ताईची जादू आहे ! ताई मोठी जादुगारीण आहे, बर का ?

**रजनी**—( रागावून ) चावट कुठला ! आण ते पुस्तक इकडे, नाही तर जादूची काडी तुझ्या पाटींत घुसेल आणि डोळयातून गगायमुना वाहू लागून जुईला जादूचा चमत्कार दिसेल ! आण ते पुस्तक इकडे !

**जीवन**—नाहीं देत जा ! मी आईकडे जाऊन या पुस्तकातली जादु समजावून घेणार बघ ! तू जादुगारीण होणार मग मला नको का जादुगार व्हायला ? ( पळू लागतो, तो रजनी त्याला पकडते, तो तारानाथ येतात. जीवन त्याच्या अगावर पुस्तक फेंकतो. )

**तारानाथ**—काय रे जीवन, इतकी रात्र झाली तरी अजून इथ खेळत बसला आहेस, नाहीं का ? करू दे रजनीला अभ्यास ! का तिला त्रास देतोस ? काय ग जुई, तू तरी हाक मारल्याबरोबर यायच की नाहीं झोंपायला ? का जीवनच्या सगतीन झालीस खट्याळ !

**जुई**—बाबासाहेब, हा जीवन ताईजवळ जादू शिकतो आहे, मग मला नको का जादूची गमत पहायला ? मी नाहीं जा, जीवनबरोबर मीसुद्धा जादू शिकणार बघा !

**बाबा०**—काय, जीवन रजनीजवळ जादू शिकतो आहे ? काय रे जीवन, काय म्हणते ही जुई ?

**जीवन**—बाबासाहेब, तें तुमच्या हातांतलं ताईच्या अभ्यासाचं पुस्तक वाचा म्हणजे कळेल तुम्हांला सगळी जादू! बाबासाहेब, ताई नाहीं मला त्यांतली जादू शिकवीत, तुम्हीच आम्हांला जादू शिकवा! शिकवा ना जादू?

**बाबा०**—(पुस्तकांतील पानें चाळून) अस्सं! म्हणजे रजनीचा हाच अभ्यास चालतो म्हणायचा! मुलांनों, जा झोंपायला मुकाट्यानं, ती तुमची वाट पहात बसली आहे! चला.

**जीवन**—जुई, चल. बाबासाहेब रजनीताईवर फार रागावलेले दिसतात.

**जुई**—खरंच रे खरंच, चल आपण जाऊं! (जातात.)

**बाबा०**—रजनी, हें काय आहे? आं?

**रजनी**—बाबासाहेब, तें पुस्तक आहे!

**बाबा०**—हें पुस्तक आहे हें मलाहि कळतं! पण हें कसलं पुस्तक आहे? तुझ्या कॉलेजांतील अभ्यासाचं?

**रजनी**—बाबासाहेब, तें कसलं पुस्तक आहे, त्यांत काय सांगितलं आहे, तें सगळं तुमच्या लक्षांत आलं आहे, मग माझ्या तोंडून आणखी वदविण्यांत कांहीं अधिक आहे वाटतं?

**बाबा०**—रजनी, असलं बाष्कळ पुस्तक वाचतांना मी आज प्रथमच तुला पाहतों आहें. म्हणून हा, तुझ्या हातून घडलेला, पहिला अपराध आहे असं समजून मी तुला क्षमा करतों. रजनी, तुला बजावून ठेवतों, असलीं बाष्कळ पुस्तकें तुझ्या अभ्यासाच्या खोलींत मला आढळतां कामा नयेत. असाच जातों आणि हें प्रेमाच्या जादूचं बाष्कळ पुस्तक जाळून टाकतों. रजनी, नीट अभ्यास करायचा असेल तर अभ्यास कर, नाहीं तर दिवा बारीक करून स्वस्थ झोंप घे. मी जातों. (जातात.)

**रजनी**—बाबासाहेब म्हणतात, स्वस्थ झोंप घे. पण प्रेमाची जादू कळूं लागल्यावर मला तरी स्वस्थ झोंप कशी येईल? बाबासाहेब माझ्यावर प्रेम करतात, आई माझ्यावर प्रेम करते, जुई आणि जीवन यांचंहि माझ्यावर प्रेम आहे; पण इतक्या सगळ्या प्रेमानं माझ्या मनांतील प्रेमाची भूक शांत होत नाहीं. मला

आता माझे प्रिय मित्र रमाकात याच्या प्रेमाची क्षुधा लागली आहे. प्रेमळ रमाकात, तुमच्या स्वर्गीय प्रेमासाठीं भुकेलेली ही रजनी प्रेमाचा टाहो फोडून तुमचा धावा करते आहे. प्रेमदेवा रमाकाता, असाल तसें धावून या आणि तुमच्या रजनीला स्वर्गीय प्रेमाच्या नदनवनात घेऊन जा !

( **राग**–भीमपलास, **ताल**–झपताल. )

**या प्रेमदेवा। व्याकुल मी धांवा ॥ ध्रु० ॥ सारा पसारा। नि सार वाटे ॥ सुखशिखर झणिं दावा ॥ १ ॥**

बाबासाहेब म्हणतात, अभ्यास कर. ( पुस्तकें हातात घेऊन ) हीच तीं अभ्यासाचीं पुस्तकें ! पण या पुस्तकात प्रेमाचा ओलावा असेल तर शपथ ! या रुक्ष ग्रथात शुष्क तत्त्वज्ञानाचा काथ्याकूट भरलेला आहे. हे जाडेभरडे ग्रथ का माझ्या प्रेमळ मनाला शाति प्राप्त करून देणार आहेत ? ग्रथराजानों, तुम्ही आपलीं तोंड लपवा, मला तुमच्यात प्रेमाचा परमेश्वर दिसत नाहीं. ( पुस्तकें फेंकते. ) माझ अत.करण कस अगदी भरून आल आहे. आता मी काय करू ? रडू का ? प्रेमासाठी अश्रूचे पाट वाहवून मी माझ जडावलेल हृदय हलक करू का ? होय, रडतेच मी, त्याशिवाय मनाला शाति मिळण शक्य नाही.

**आईसाहेब**—( प्रवेशून ) बाळ रजनी, काय बर हें ? तिकडचा स्वभाव जरा रागीट आहे, तिकडच बोलण अस मनाला लावून घेऊ नकोस. रडून रडून डोळे सुजतील. मला तिकडून सर्व काहीं समजल आहे. चल झोपवत्ये तुला ! तुझा डोळा लागला म्हणजे मग मी जाईन. तुला झोंप लागावी म्हणून मी राधाकृष्णाच एखाद गाण म्हणत्ये पाहिजे तर ! चल.

**रजनी**—पण आई, तुझ राधाकृष्णाच गोड गीत ऐकून...

**आई**—हा, बोलू नकोस आता ! आधी स्वस्थ झोप घे, उद्या सकाळी साग मला काय तें !

**रजनी**—पण आई, मी आधीं काय म्हणत्यें तें ऐकून तर...

**आई**—मला आत्तां तुझ काहीं एक ऐकायच नाहीं. उद्या ऐकेन सार ! आता तोंडातून एक ब्र सुद्धा काढू नको–चल पाहू झोंपायला ! चल.

**रजनी**—तू मुळी माझ ऐकतच नाहीस मग मी तरी काय करू ? चल तर !

**आई**—शहाणी माझी बाळी ती ! आतां कसं ठीक बोललीस ? चल. ( रजनीला पलंगाकडे घेऊन जाते. थोड्या वेळानें आईच्या गीताचे मंजुळ ध्वनि ऐकूं येतात. इतक्यांत रमाकांत काळा बुरखा पांघरून चोरपावलांनीं प्रवेश करतो व हळूच रजनीच्या शय्यामंदिराकडे जाऊं लागतो, तों ताराबाई बाहेर येतात व रमाकांताचा चोराचा वेष पाहून घाबरतात व ' चोर, चोर, धांवा, धांवा, ' म्हणून आरोळी ठोकतात. रमाकांत पळण्याचा विचार करतो तों तारानाथ येऊन त्यास पकडतात रजनीहि बाहेर येते. )

**तारानाथ**—रजनी, मीं या चोराला नीट पकडून ठेवलं आहे. झट्कन टेलिफोन करून पोलीस-ठाण्यावर वर्दी दे आणि पोलिसांना बोलाव !

**रजनी**—बरं बाबा, करतें टेलिफोन ! ( जाऊं लागते. )

**रमाकांत**—रजनी, मागं फीर, पोलिसांना बोलावण्याचं कारण नाहीं. मी आपण होऊन मुकाट्यानं पोलिसांच्या स्वाधीन व्हायला तयार आहें. तारानाथ, सोडा मला ! ( तारानाथाला जोराचा हिसका देऊन स्वतःची सोडवणूक करून घेतो. )

**रजनी**—अगबाई, तुम्ही कोण ? तुम्ही तर ते...

**रमाकांत**—रजनी, होय, मी तोच आहें. तारानाथ, पहा नीट मी कोण आहें तो. ( बुरखा फेंकून ) तारानाथ, मी चोर असलों तरी प्रेमी चोर आहें—मी तुमच्या रजनीचा प्रियकर आहें. रजनीनं माझं मन चोरलं म्हणून मी तिची चोरून भेट घेण्यासाठीं असा चोरासारखा इथं आलों. तारानाथ, मी पोलिसांच्या स्वाधीन झालों तर तें तुमच्या रजनीबालेला आवडेल का ?

**तारा०**—चोर तो चोर आणि वर शिरजोरीच्या गोष्टी करतो आहे ! चल मुकाट्यानं चौकीवर !

**रमाकांत**—अहो, पण एवढी उतावीळ काय आहे ? मी कांहीं इथून पळून जात नाहीं. आधीं रजनीची संमति घ्या मग सावकाश जाऊं चौकीवर ! स्वतः श्वशुरच जर प्रसन्न झाले तर कोणता जामात आनंदानं चतुर्भुज होणार नाहीं ?

**ताराबाई**—बाळे रजनी, हा चोर असं काय बरळतो आहे बरं !

**तारानाथ**—बोल, रजनी ! हा कोण चोरटा ?

**रजनी**—आई, बाबा, रागावूं नका. हे रमाकांत माझ्या पवित्र प्रेमाचे परमेश्वर आहेत. मीं त्यांना मनानं वरलं आहे.

**रमाकांत**—आणि बाबासाहेब, नव्हे मामासाहेब, तुमची रजनी या प्रेमाच्या परमेश्वराची प्रेमदेवता आहे. मामासाहेब, आम्ही दोघहि पवित्र लग्नबंधनांत बद्ध व्हावयाला तयार आहोंत. आमच्या प्रीतिविवाहाला संमति द्या म्हणजे साऱ्या भानगडी आपोआप मिटतील !

**तारानाथ**—रजनी, रमाकांताशीं प्रीतिविवाह करण्याची तुझी तयारी आहे तर ?

**रजनी**—होय बाबासाहेब, मी रमाकांताशी प्रीतिविवाह करायला तयार आहें.

**तारानाथ**—ठीक आहे तर, मी तुमच्या प्रीतिविवाहाला संमति देतों.

**ताराबाई**—पण मी म्हणतें, पोरीच्या उतावळ्या विचाराला संमति देण्यापूर्वी थोडा विचार करावयास नको का ?

**तारानाथ**—गोष्टी इतक्या थराला गेल्यानंतर विचार करीत बसणं हाच अविचार ठरेल ! विचार करीत बसण्याची वेळ केव्हाच निघून गेली ! आतां फक्त एकच विचार–या दोघांचा विवाह करून त्यांना प्रेममय जीवनाचा मार्ग मोकळा करून देणें, हाच या वेळीं सुविचार ठरणार आहे. रजनी, तूं आतां काहीं लहान नाहींस, पूर्ण विचारांतींच रमाकांताला पति म्हणून तूं पसंत केलं आहेस ना ?

**रजनी**—होय बाबासाहेब, मला रमाकांताच्या सहवासांतच स्वर्गसुख लाभणार आहे. रमाकांताच्या वियोगांतील प्रत्येक क्षण मला मरणप्राय वाटेल.

**तारानाथ**—ठीक आहे तर ! रजनी, प्रीतिविवाहाचा मार्ग पत्करून तूं स्वतःवर फार मोठी जबाबदारी ओढवून घेतली आहेस. रमाकांत हे कोणत्या योग्यतेचे गृहस्थ आहेत हें तुझें तूं पाहून घेतलंच असशील ! रमाकांत, तुम्हीहि प्रेमदेवता म्हणून माझ्या रजनीला मान्य केलंच आहे. रजनी आणि रमाकांत, आतां तुम्ही प्रेमानंच एकमेकांच्या हातांत हात द्या आणि प्रेमाच्या शपथा घ्या.

**रमाकांत**—( रजनीचा हात धरून ) रजनी, मी तुला माझ्या प्रीतीची देवता समजतों. माझ्या जीवांत जीव असेपर्यंत मी तुला अंतर देणार नाहीं.

**रजनी**—रमाकांत, मीहि तुम्हाला माझ्या प्रेमाचे परमेश्वर समजतें. मीहि माझ्या जीवांत जीव असेपर्यंत तुम्हाला अंतर देणार नाहीं.

**तारानाथ**—तारामती, या दोघांचा प्रीतिविवाह झाला ! जा, मुलीच्या पाठवणीची तयारी कर.

**ताराबाई**—पण नाथ, मी म्हणत्यें...

**तारानाथ**—आतां कांहीं म्हणूं नकोस. जा, मुलीच्या पाठवणीची तयारी कर.

**ताराबाई**—आपल्यापुढं मी तरी काय बोलणार ? ( डोळ्यांत पाणी आणून ) बाळे, पतीला देव समजून त्याच्याजवळ प्रेमानंच रहा बरं !

**रजनी**—आई, तुझे हे प्रेमळ बोल मी कधींहि विसरणार नाहीं.

( **गझल** )

**मानिन मनीं वचना । पूजिन पतिप्रेमा ॥ ध्रु० ॥**
**प्रीतचि तारक संसारीं या । सेविन सुखमय धामा ॥ १ ॥**

**तारानाथ**—( चेक आणून रमाकांताच्या हातांत देत ) रमाकांत, जामात या नात्यानं मी तुम्हांला ही दहा हजारांची देणगी देतों. सुखाचा संसार थाटा आणि सुखानंच रहा !

**ताराबाई**—रजनी, रमाकांत, चला देवाला नमस्कार करा, मी तुम्हां दोघांच्या हातावर दहींसाखर घालत्यें. चला. ( जाऊं लागतात. पडदा. )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—रस्ता. नटेश्वर प्रवेश करतो. हातांत डिक्शनरी असते. )

**नटेश्वर**—हंबग् ! म्हणे इंग्रजींत बोलूं नका ! व्हाय नॉट ? जर मला इंग्रजी येतं आहे—इफ इंग्लिश कम्स टु मी—तर मीं इंग्रजी कां बोलूं नये ? हंबग् ! मी आतां अप्-टु-डेट—आज तारखेचा-जंटलमन् होणार आणि इंग्रजींत बोलणार आणि इंग्रजींतच चालणार ! जर मीं इंग्रजींत बोलणेंचालणें केलें—इफ आय डिड स्पीकिंग वॉकिंग इन इंग्लिश—तर त्यांत काय बिघडलं ? म्हणे इंग्रजींत बोलूं नका—हंबग् !

**कामेश्वर**—( समोरून प्रवेशून ) नमस्कार, नटेश्वर ! नमस्कार.

**नटेश्वर**—हंबग् ! चांगले जंटलमन् दिसतां आणि नमस्कार काय करतां ? गुड मॉर्निंग बोला ! कामेश्वर, तुमच्या नमस्काराला हा माझा गुड मॉर्निंग घ्या.

चागली सकाळ-गुड मॉर्निंग ! (हात पुढें करतो.) कामेश्वर, हाताला हात लावा—अप्लाय हॅंड टु हॅंड आणि गुड मॉर्निंग करा ! गावठी नमस्कार काय ठोकता ?

**कामेश्वर**—हबग् ! तुमचा विलायती नखरा आमच्या काय कामाचा बर ? आमचा आपला हा देशी नमस्कारच चागला आहे.

**नटेश्वर**—हबग् ! कामेश्वर, विलायती नखऱ्याची मौज काहीं और आहे. सध्या लिटल् लिटल् इंग्लिश इज् कमिंग टु मी—मला थोडथोड इग्रजी येऊ लागल आहे, पण लौकरच चागल इग्रजी येऊ लागल कीं, मी थेट विलायत गाठणार ! तिथली मजा काहीं औरच आहे बघा ! लुक, दि मजा देअर इज अजब ! तिथ स्त्रियाना स्वातत्र्य आहे आणि तिथ प्रीतिविवाह आहे. आमच्या-सारख्या गर्भश्रीमतानीं इग्रजी शिकून तत्काल विलायतच गाठली पाहिजे या डर्टी हिंदुस्थानात दिवस काढायचे ? हबग् ! डर्टी इडिया !

**कामे०**—अहो पण नटेश्वर, तुम्ही विलायतेला जाऊन डर्टी हिंदुस्थानचाच पैसा उडविणार कीं नाही ? तुमच्या नटेश्वरी भाषेत बोलावयाच म्हणजे यू वुइल गो टु इंग्लड ॲड फ्राय इडियाज् मनी !

**नटे०**—हबग् ! लक्ष्मी ही चचल आहे, ती इथून विलायतेला गेली तरी त्यात बिघडल कुठ ? मी तरी बुवा लौकरच विलायतेला जाणार आणि मजा करणार—कारण तिथ स्त्रियाना स्वातत्र्य आहे आणि तिथ प्रीतिविवाह आहे !

**कामे०**—एवढ्यासाठीच का तुम्ही विलायतेला जाणार ? एवढ्यासाठी नका विलायतेची वारी करू ! इथल्या स्त्रियासुद्धा स्वतत्र होऊ लागल्या आहेत, आणि इथ सुद्धा प्रीतिविवाह रूढ होऊ लागले आहेत.

## परिहासगीत

**नव विचारें जगत सजलें । जुना तो काळ झणिं गेला ॥**
**स्त्रिया नटल्या नवमतांनी । नवा हा काळ अजि आला ॥ ध्रु० ॥**
**करी ना कोणिहि पर्वा । पित्याची वा स्वमातेची ॥**
**गमे जो मानसा प्यारा । तयाला वरिति अजि बाला ॥ १ ॥**
**सुखाच्या मृगजलापाठीं । उड्या घेती जशा हरिणी ॥**
**तशी झाली दशा अपुली । नमीतों दुरुनि या काला ॥ २ ॥**

नुक्तीच घडलेली गोष्ट, तारानाथांच्या मुलीनं-रजनीनं आईबापाच्या संमतीची पर्वा न करतां रमाकांत नांवाच्या एका फक्कड-रावाशीं प्रीतिविवाह केला !

**नटे०**—स्प्लेन्डिड्ड् ! काय ? तारानाथाज रजनी कमिटेड लव्हमॅरेज ? स्प्लेन्डिड्ड् ! मी अस्सा जातों आणि तिच्या पायांवर लोटांगण घेतों. रजनी ! तूं खरोखर धन्य आहेस ! रजनी, यू आर रिअली-( स्वगत ) धन्य या शब्दाला इंग्रजी शब्द कोणता ? ( डिक्शनरी चाळीत ) धन्य-धन्य...

**कामे०**—धन्य झाली तुमच्यापुढं ! नटेश्वर, त्या पुस्तकांत काय शोधतां ?

**नटे०**—हंबग् ! या डिक्शनरींत देशी धन्य शब्दाला विलायती प्रतिशब्द शोधतों आहें.

**कामे०**—जाऊं द्याहो, कांहीं अडलं नाहीं त्या शब्दाशिवाय !

**नटे०**—हंबग् ! अडलं नाहीं कसं ? माझं तर प्रत्येक शब्दागणिक अडतं आहे !

**कामे०**—( स्व० ) तसाच अडेलतट्टू आहेस तूं ! ( उघड ) बरं येतों, नमस्कार ! ( जातों. )

**नटे०**—या बरं ! कम् ऑलराइट् ! गुड्मॉर्निंग् ! छट् , त्या रजनीचं-डर्टी हिंदुस्थानांत विलायती वातावरण निर्माण करणाऱ्या त्या अप्सरेचं-दर्शन घेतल्याशिवाय मला चैन पडणंच शक्य नाहीं. चैन वुइल नॉट फॉल टु मी वुइदाउट् टेकिंग दर्शन ऑफ दॅट अप्सरा ! हंबग् ! आपल्या डर्टी देशी भाषेंत किती कठीण शब्द आहेत हे-चैन, दर्शन, अप्सरा ! चैन, चैन, चैन- ( डिक्शनरी उलटीत जातो. )

---

## प्रवेश ३ रा

( स्थळ—रस्ता. रमाकांत नोटा मोजीत येतो. )

**रमाकांत**—वाहवा, काय मौज उडाली पण ? माणसाचं आयुष्य म्हणजे एक बडा जुगार आहे, असं जें म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. ती उतावळ्या स्वभावाची पोर रजनी माझ्या प्रेमजालांत अडकली काय, आणि मी तिच्याशीं विवाहबद्ध होतांच तिच्या बापानं मला दहा हजार रुपयांची देणगी दिली काय ? गंमत केली आणि चांगली साधली यांत संशय नाहीं. मीं तरी काय, हा प्रेमाचा जुगारच खेळलों होतों, पण एकंदरींत तो चांगला साधला ! आतां या प्रेमाच्या

जुगारावर मला सारा जन्म चैनीत घालवता येईल! जरी रजनीवर माझ तितकस प्रेम नाही तरी तिच मात्र माझ्यावर आत्यंतिक प्रेम आहे. रजनी माझ्यासाठी आपला जीवसुद्धा पाखडील, मात्र खोट्या प्रेमाच्या बतावणीन तिला मी सदोदित झुलवीत ठेवल म्हणजे झाल! पण अशान मी तिच्या प्रेमाशी प्रतारणा करीत नाहीं का? त्या इमानी जीवाशी मी बेमान होऊं का? पण छे., जुगाऱ्याला कसल आल आहे इमान? इमान पाळील तो अस्सल जुगारीच नव्हे! मी अट्टल जुगारी आहे ना? बस्स, झाला मनाचा निश्चय! असाच जुगारखान्यात जातो आणि हजाराचे दहा हजार आणि दहा हजाराचे लाख रुपये करून अट्टल जुगारी हे नाव सार्थ करितो. प्रेमाचा जुगार खेळून मी रजनीला वश केल, आता नवा जुगार खेळून मी रमणीला वश करणार! ( जातो. )

---

## प्रवेश ४ था

( स्थळ—रमाकाताचा दिवाणखाना. आतील बाजूस विठू साफसुफी करीत असून बाहेरील बाजूस नटेश्वर कामेश्वरासह प्रवेश करतो. )

**कामेश्वर**—नटेश्वर, हाच रमाकाताचा महाल. इथच तुम्हाला रजनीच दर्शन होईल.

**नटेश्वर**—थॅंक यू कामेश्वर! यू आर रिअली ए कामेश्वर—गॉड ऑफ वर्क! बर, मी आत जाऊन रजनीच दर्शन घेतो आणि तिन प्रीतिविवाहाची सुधारणा धडाडीन अमलात आणून दाखविल्याबद्दल तिच अभिनदन करतो—नाऊ आय् गो ॲंड डू हर अभिनदन—अभिनदन. हवग्, काय कठीण देशी शब्द हा—( डिक्शनरी चाळून पाहू लागतो. )

**कामे०**—हे पहा नटेश्वर, ती डिक्शनरी द्या आता माझ्याजवळ ! या जाड्या ग्रथात घोंटाळाल तर सारा घोटाळा होईल. द्या ठोकून जें तोडाला येईल तें ! रजनी हुषार आहे, ती घेईल तुमच्या विलायती चुका सांवरून !

**नटे०**—हवग् ! माझ्या चुका रजनीच्या नजरेस पडता कामा नयेत. अरे बाबा, माझा प्रीतिविवाह होईपर्यंत ही डिक्शनरी मला पत्नीप्रमाणं जवळ बाळगली पाहिजे. अरे बाबा—ओ माय फादर—

**कामे०**—कमाल झाली तुमच्या इंग्रजी ज्ञानाची ! सोडा हे वेडेचार !

( **राग**–मुलतानी; ताल–एका. )

**सोडुनि द्या छंद खुळा । निंदा निज टाळा ॥ ध्रु० ॥**
**कटु रव लोपे कां काकाचा । जरि हंसाचें रूप तो धरी ॥ १ ॥**

( जातो. )

**नटे०**—हंबग्, माझ्या इंग्रजीच्या ज्ञानाला हा लेकाचा गांवढळ कामेश्वर नांवं ठेवतो ! हंबग् ! ( जातो. आंतील भाग दिसूं लागतो. )

**नटेश्वर**—( प्रवेशून ) वाहवा ! ठीक ! बरा गांवढळ गडी तोंडाशीं सांपडला आहे. याच्यावरच द्यावा इंग्रजीचा भडिमार उडवून ! माय डिअर, कम हिअर, कम हिअर !

**विठू**—तुमी कोन हायसा ? मस्नी विंग्रजी नाय समजत ! मऱ्हाटीतच बोला की !

**नटे०**—हंबग् ! म्हणे मराठींत बोला ! ओ माय डिअर सर्वंट...

**विठू**—हां, तुमी गांवठी साब बनूनशानी आलांत, तरी पुन मी तुमच्या शिया नाय ऐकून घेनार पगा ! सांगूनश्यान ठेवतों, मी इठू हाय, सुरवंट नाय !

**नटे०**—हंबग् ! डिअर विठू, यू आर ए सर्वंट !

**विठू**—मी सुरवंट नाय, मी इठूच हाय ! त्वांड संभाळूनशान बोला, नायतर माज्या हातचा दणका खाल !

**नटे०**—हंबग् ! व्हॉट् ? आय शॅल ईट दणका ऑफ युअर हॅंड ? हंबग् ! डोन्ट बी अँग्री माय डिअर सर्वंट विठू !

**विठू**—मी नाय सुरवंट, तूंच सुरवंट हायस ! ( त्याला मारायला धांवतो. )

**नटे०**—हंबग् ! मी काय केलं बाबा ? व्हॉट डिड आय डू फादर ?

( गडबड ऐकून रजनी येते. )

**रजनी**—विठू, हें रे काय ? आपल्याकडे हे गृहस्थ भेटायला आले आणि तूं त्यांच्यावर हात उगारतोस ? हो मागं !

**विठू**—रजनीबायसाब ! माफ करा. ह्यो लेकाचा गांवठी साब मस्नी सुरवंट म्हनतुया.

**रजनी**—बर जा तू ! मी सांगते त्यांना काय ते.

**विठू**—बर बायसाब ! ( जातो. )

**रजनी**—कोण आपण ? का आलात ? काय काम आहे आपल ! बसा इथं !

**नटे०**—रजनीबाई, मी तुमचे अभिनंदन करण्याकरिता आलो आहे. आय् हॅव्ह् कम टु मेक युअर.. अभिनंदन ! ( स्वगत ) आता दरशब्दागणिक डिक्शनरींत पहायची सोय नाहीं. ही वेळ मला मारून नेलीच पाहिजे—आय मस्ट कॅरी बीटिंग धिस टाईम !

**रजनी**—तुम्ही कशाबद्दल माझ अभिनंदन करणार आहात ?

**नटे०**—आईबापाची पर्वा न करता तुम्ही तुमच्या डिअर रमाकांताशी प्रीतिविवाह केल्याबद्दल ! सच धैर्य मस्ट कम इन अवर वुइमेन—आपल्या स्त्रियात अस धैर्य आलंच पाहिजे.

**रजनी**—बर, आणखी काही सांगायच आहे का ?

**नटे०**—( टेबलावरील रमाकांताचा फोटो पाहून ) हबग् ! व्हॉट ? या रमाकांताशी तुम्ही लग्न केलत ? हबग् ! धिस् रमाकांत इज पक्का जुगारी ! आय टेल यू रजनीबाई, धिस् जुगारी फॉर्म्ड यू—या जुगाऱ्यान तुम्हाला बनवल हो बनवल—ही रिअली फॉर्म्ड यू ! ( इतक्यात रमाकांत येऊन बाजूला ऐकत उभा राहतो )

**रजनी**—हो, पण त्याला आता उपाय काय ? जे नशिबात लिहिल होत ते घडून आल !

**नटे०**—हबग् ! इतक्या सुंदर स्त्रीच्या नशिबाला एक जुगारी नवरा यावा ना ? अलास ! अलास !! हाय ! हाय !!

**रमा०**—( पुढें येऊन ) मग त्यात काय बिघडल ? नटेश्वर, ही रजनी तुमची मैत्रिण आहे ना ? सुचवा तिला घटस्फोटाचा उपाय !

**नटे०**—हबग् ! काय बोलता हें तुम्ही ? तुम्हीच जुगाराचा नाद सोडा आणि रजनीबाईना सुखात ठेवा—रमाकांत, पुट रजनीवूमन इन हॅपिनेस !

**रमा०**—पाजी माणसा ! माझ्या पाठीमागे घरात शिरून माझ्या प्रिय पत्नीच मन माझ्याविषयी कलुषित करतोस ? पाजी कुठला !

**नटे०**—हंबग् ! आय ॲम नॉट पाजी, यू आर पाजी ! यू गेव्ह भुलथापाज टु रजनी ॲंड फॉर्म्ड हर ! हंबग् !

**रमा०**—आतां मुकाट्यानं निघून जातोस कीं काढूं तुझं हंबग् बाहेर ? ( धक्का मारतो. )

**नटे०**—हंबग् ! डोन्ट बीट मी धक्का ! मला धक्का मारूं नको. मी जातों, पण लक्षांत ठेव कीं, रजनी इज अप्सरा, रजनी इज देवता, डोन्ट मेक मोअर पाजीपणा !

**रजनी**—नटेश्वर, तुम्ही आतां जा पाहूं. मी तुम्हांला विनवून सांगत्यें, तुम्ही जा आतां.

**नटे०**—ओ देवते, आज्ञा प्रमाण ! युअर ऑर्डर इज प्रमाण टु मी. मी जातों. रमाकांत, मेहेरबानी करा आणि जुगार सोडा, लीव्ह जुगार ! ( जातो. )

**रमा०**—हंबग् ! म्हणे जुगार सोडा ! काय म्हणून जुगार सोडूं ? लग्नाचा जुगार खेळलों म्हणूनच ना ही चालतीबोलती पैशाची थैली माझ्या हातीं आली ? म्हणे जुगार सोडा, हंबग् !

**रजनी**—पण नाथ, त्यांत नटेश्वरांनी तरी काय वाईट सांगितलं ? बाबा-साहेबांनीं दिलेल्या दहा हजार रुपयांत आपल्याला सुखाचा संसार थाटतां येणार नाहीं का ?

**रमा०**—कुठं आहेत ते दहा हजार रुपये ?

**रज०**—ते तर तुमच्याजवळच आहेत !

**रमा०**—छट् , ते पैसे आलों जुगारांत उडवून !

**रज०**—मग नाथ, आतां पुढं काय करायचं ?

**रमा०**—आतां पुनः तुझ्या बापाला लुबाडायचं आणि चैन चालवायची !

**रज०**—नाथ, आतां बाबासाहेब एक कवडी तरी देतील का आपल्याला ? त्यांना न विचारतां, त्यांच्या संमतीची पर्वा न करतां, मीं तुमच्याशीं प्रीतिविवाह केला, आतां ते मला दारांत सुद्धां उभी करणार नाहींत ? बाबा जितके प्रेमळ आहेत तितकेच ते हट्टी आहेत !

**रमा०**—आणि मी कुठं कमी हट्टी आहें ? रजनी, जा, बापाजवळ हट्ट धरून बस आणि माझा पैशांचा हट्ट पुरा कर.

**रज०**—आणि बाबासाहेबानीं पैसे दिले नाहीं तर?

**रमा०**—तर माझा नाद सोड.

**रज०**—म्हणजे, तुमच पैशावर प्रेम आहे, माझ्यावर तुमच प्रेम नाहीं, असच ना?

**रमा०**—हो असच! रजनी, मी जसा पैशाचा जुगारी आहे तसाच प्रेमाचाहि जुगारी आहें. तू निघून गेलीस तर माझा फायदाच होणार आहे. मी माझ्या फसव्या प्रेमाचा फांसा दुसऱ्या एकाद्या श्रीमत पोरीपुढ टाकीन आणि तिला फशीं पाडीन!

**रज०**—पण नाथ, अशान सर्व जग माझी छीः थूः करणार नाही का? नाथ, माझ तुमच्यावर प्रेम आहे—माझ्या प्रेमाला निर्दय मनान लाथाडू नका.

**( गझल )**

**दिधला ना प्रेमा ईश समजुनी अपणां।**
**त्यजिला ना कधिही साच सतीचा बाणा॥ ध्रु०॥**
**प्रीतिलतिका कुसुमभारें बहरली ना।**
**त्यजुनि माया चुरितसां कां अतां सुमना॥**
**सखया द्या धीरा दावि दयाळा करुणा॥ १॥**

**रमा०**—रजनी, किती मूर्ख आहेस तू? मी पक्का जुगारी आहे. तुझ्याकडून पैसे मिळण्याची आशा असेपर्यंतच मी तुझ्यावर प्रेम करीन! पैसे आण म्हणजे प्रेम करीन नाही तर

**रज०**—नाही तर काय?

**रमा०**—नाही तर, मारहाण करून तुला घरातून घालवून देईन!

**रज०**—नाथ, नका हो असे निष्ठुर होऊ! मारा किंवा तारा, मला तुमचे पाय सोडून जायला तोंडच उरल नाही, मी तुमच्या चरणाजवळच राहणार!

**रमा०**—तर मग माझा नाइलाज आहे. तुला मारहाण करून घरातून घालवून देण हाच एक उपाय माझ्या हाती उरला आहे.

**रज०**—काय, तुम्ही मला मारणार?

**रमा०**—हो, हो, मी तुला मारणार, मरे-मरेतो मारणार! ही पाहिलीस काठी? ( काठी उगारतो. )

**विठू**—( बाहेर येऊन ) अन् ह्यो पगितलात का सोटा ? मी रजनी बायसाबांच्या माहिरचा नोकर हाय, मी तुमास्नी बायसाबांना हात लावूं देनार नाय! ती काठी निमूटशान तकडे ठेवा, नायतर तुमच्या काटीवर माजा सोटा बसल आन् तुमच्या काटीचा अन् माज्या सोट्याचा पिरतीव्याह लागल !

**रमा०**—म्हणजे तूं याच कामाकरतां इथं येऊन राहिलास वाटतं ? हरामखोर !

**विठू**—मी नाय हराम ! तुमीच बाईसायबास्नी पिरतीच्या थापा देऊन हरामखोरी केलीया ! बायसाब, चला माहिरीं, कशापायीं या कसाबाकड दिस काढतांसा ?

**रज०**—पण विठू, बाबासाहेब मला क्षमा करतील का ?

**विठू**—व्हय बायसाब ! बाबासाबांचं मन अगदीं लोन्यावानी लिबलिबित हाय पगा ! अन् आईसाब हायतच की नाय ?

**रज०**—मग नाथ, तुमचं माझ्यावर प्रेम नाही तर ? जाऊं ना मी ?

**रमा०**—चल, जा, हो चालती ! माझं प्रैशावर प्रेम आहे. तुझ्यासारख्या मूर्ख मैनेवर नाहीं !

**रज०**—बरं चल तर विठू ! माझी प्रीतिविवाहाची हौस पुरती फिटली ! चल.

**विठू**—चला बायसाब ! अव रमाकांत ? नीट ध्यानांत ठेवा, ह्ये चांगलं नाय ! एकाद दिशीं तुमास्नी रडत बसावं लागल पगा !!

**रमा०**—आतां तुम्हीच ध्यानांत ठेवा कीं, इथं जास्त वेळ थांबाल तर तुमच्यावरच रडत बसण्याची पाळी येईल !

**विठू०**—बर हाय ! जातो अमी, रामराम !! ( जातात. )

**रमा०**—बस्स, झालं माझं काम ! रजनी गेली, आतां रमणीला भुलथापा देऊन झुलवतों आणि दुसरा चैनीचा संसार सुरू करतों ! चारदोन गोड थापा देऊन शेवटीं प्रीतिविवाहाची भुरळ घातली कीं, ती उतावळी पोर माझ्या जाळ्यांत खास अडकेल ! ( हंसत सुटतो. )

**पडदा.**

---

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

( **स्थळ**—रस्ता. नटेश्वर आणि कामेश्वर प्रवेश करतात. )

**नटेश्वर**—हबग् ! पैशासाठी प्रीतिविवाह ? हबग् ! मी प्रीतीपुढे पैशाला माती समजतो. आय कन्सिडर पैसा बिफोर प्रीति अॅज माती !

**कामेश्वर**—पण नटेश्वर, हे जग असच आहे. लोक पैशापुढ प्रीतीलाच माती समजतात.

**नटे०**—हबग् ! कामेश्वर, मी रमणीवर प्रेम करतो हे तुम्हाला माहीतच आहे. आतां ती जर माझ्यावर प्रेम करील तर, मी तिच्या पायाच्या धुळींत माझी सर्व दौलत ओतीन ! रमणी, ये आणि माझ्यावर प्रेम कर—रमणी, कम अॅड डू लव्ह अपॉन मी !

**कामे०**—रमणी तुमच्यावर प्रेम करील, पण तुम्ही हा आचरटपणा सोडाल तेव्हा ! आचरट पुरुषावर कोणतीहि रमणी कधीहि प्रेम करीत नसते

( राग—दरबारी कानडा, ताल–एका )

**नारी वरिति त्या नरासि । जो वरि सुमतीला ॥ ध्रु० ॥**
**शिकल्या अजि या अबला । चतुरमती झाल्या ।**
**समजे त्यां नीर क्षीर । समय नवा आला ॥ १ ॥**

**नटे०**—हबग् ! कामेश्वर, तुम्ही चुकता आहात. मी आचरट नाहीं. मी अप–टु–डेट जटलमन आहे—मी आज तारखेचा गृहस्थ आहे.

**कामे०**—( एका सरदारी पोषाख केलेल्या गृहस्थाबरोबर रमणी येत आहे अस पाहून ) ए गृहस्थ ! गप्प बैस. ती पहा रमणी कुणा सरदाराबरोबर बोलत येते आहे. चूप रहा आणि बाजूला उभे राहून गमत पहा ! ( बाजूला जातात. )

**रमणी**—( पोषाखी सरदारासह प्रवेशून ) सरदार सुदरदास, मला तुमच ते कडकाबाद दाखवाल का ? तुमच्या तोंडून तुमच्या कडकाबादच वर्णन ऐकल्यापासून मला तुमच तें सुदर आणि रमणीय कडकाबाद केव्हा पाहीन अस झाल आहे.

( **राग**–मिश्रखमाज; **ताल**–एकताल. )

**बघुनि जगातें नव नवला । बावरतें मन मोहें ॥ ध्रु० ॥**
**सुंदर शशि पाहुनियां । जेविं जलधी मोहे ॥ १ ॥**

**सुंदरदास**—रमणी, मोठ्या खुषीनंच मी तुला आमच्या कडकाबादला घेऊन जाईन. तूं एकदां तिथं गेलीस म्हणजे तुला या भिकारड्या प्रेमनगराला परत यावंसें सुद्धां वाटणार नाहीं. अहाहा ! कडकाबादचे ते भव्य प्रासाद, ते बगीचे, तीं विहारमंदिरें–अहाहा !

**रमणी**—सुंदरदास, झाला माझ्या मनाचा निश्चय ! मला तुमच्या त्या कडकाबादला घेऊन चलाच ! मी रमणी आहें, मी रमणीय सौंदर्याची उपासक आहें आणि सुदैवानें मला कशाचीच कमतरता नाहीं. मातापितरांनीं मागं ठेवलेली आणि आतां माझ्या मालकीची झालेली सर्व मालमत्ता सौंदर्याच्या उपासनेंत खर्च करीत असतांना मला स्वर्गीय आनंदाचा लाभ होणार आहे. सुंदरदास, केवळ माझं धन्यभाग्य म्हणूनच तुमचा व माझा स्नेह जुळून आला !

( **राग**–जंगला; **ताल**–त्रिवट. )

**मम भाग्यकाल आला । मुदित झाली बाला ॥**
**सुखद लाभे स्नेह अपुला हेतु पुरला ॥ ध्रु० ॥**
**सुंदरा बघुनि रचना । सुखवूं नितांत नयनां ।**
**करूं शांत मानसाला । झणिं सेवुं पीयुषाला ॥ १ ॥**

**सुंदर०**—रमणी, मग शक्य तितक्या लौकर आपल्या मालमत्तेची जुळवाजुळव कर आणि माझ्याबरोबर कडकाबादला चल. मीहि सुंदरदासच आहें–सौंदर्याची उपासना करण्यांत मलासुद्धां धन्यताच वाटते.

**रमणी**—चला तर, आपण त्याच तयारीला लागूं या. ( जातात. )

**नटे०**—( कामेश्वराशीं झगडत पुढें येऊन ) हंबग् ! कामेश्वर, सोड मला ! अरे तो लफंगा खात्रीनं रमाकांतच असला पाहिजे. हंबग् ! दॅट रमाकांत इज नाऊ फॉर्मिंग रमणी–तो रमाकांत आतां रमणीला बनवतो आहे. अस्साच जातों आणि त्याचें बिंग फोडतों–कामेश्वर, आय मस्ट ब्रेक हिज बिंग !

**कामे०**—नटेश्वर, उतावीळपणात सर्वच फसण्याचा संभव आहे. आपण युक्तियुक्तीनच त्याच बिंग बाहेर काढू या. आतां क्षणार्धात रमणी पूर्णपणे फसणार, अस आढळून आल्यावरच रमाकांताचा कपटव्यूह ढासळून पाडण्यात मौज आहे. अस कराल तर ती रमणीहि तुमच्या खऱ्या प्रेमाला शरण येईल ! इतक झाल्यावर रमणीचा व तुमचा प्रीतिविवाह घडून यायला कितीसा उशीर ?

**नटे०**—खर सांगू कामेश्वर ? मला वाईट वाटत आहे ते बिचाऱ्या भोळ्या रजनीच्या दुर्दैवाबद्दल ! कामेश्वर, वाटेल ते कर पण रजनीच्या सुखाला धक्का मात्र लावू नकोस—प्लीज डोन्ट अप्लाय धक्का टु रजनीज हॅपिनेस !

**कामे०**—म्हणूनच तर मी म्हणतो, हा उतावळेपणा टाका. चला, आधी आपण रजनीची काय हालहवाल आहे, ती काढू या.

**नटे०**—चल, आपण रजनीची हालहवाल काढू या. लेट अस ड्रॉ रजनीज हालहवाल ! ( जातात. )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—तारानाथाचे घर. रजनी अश्रू ढाळीत बसली असून ताराबाई तिची समजूत करीत आहेत. )

**रजनी**—आई, मला बाई बाबासाहेबांची भारीच भीति वाटते. ते आता इतक्यात गावाहून परत येतील. मी रमाकांताशी भांडून इथ परत आल्ये हे त्यांना कळल म्हणजे ते रागावतील आणि मला इथून घालवून द्यायला कमी करणार नाहीत. आई, मी आपली जात्येच कशी इथून !

**ताराबाई**—पण रजनी, तुला त्यात एवढ भ्यायला काय झाल ? तिकडचा राग मी शांत करीन. तू कांहीं आपण होऊन रमाकांताशी भांडली नाहीस ! रमाकांतच तुझ्याशीं भांडले आणि तुला त्यांना सोडून इकडे येणे भाग पडल, होय ना ? मग त्यात तुझा काय अपराध बर ?

**रजनी**—माझा कांहीच अपराध नाही हे खर, पण तुमची परवानगी न घेता अविचारानें आणि उतावळेपणान मींच त्यांना वरल ना ? लग्न होईपर्यंत

ते किती प्रेमानं माझ्याशीं वागत होते पण ! पण लग्न होतांच त्यांनीं आपलं खरं स्वरूप प्रगट केलं, आणि माझा केंसानं गळा कापला ! माझ्या हातूनच सारी चूक झाली, आतां तिचं प्रायश्चित्त माझं मला भोगायला नको का ?

( **राग**—तिलककामोद; **ताल**—झपताल. )

**दिसत खरी पतिता । नसे मान मुळिं जगतिं उरत**
**कांता जरि अपुली पतीहि त्यजित ॥ ध्रु० ॥**
**केला न सुविचार । धरिला विपथ स्वैर ॥**
**अहितकारी । अतां येतचि नाश हा सहज ॥ १ ॥**

**ताराबाई**—रजनी, तें कांहीं असलं तरी मी तुला रस्त्यावर टाकणार नाहीं. आम्हां बायकांना एक नवऱ्याचा आधार नसला म्हणजे सारं जग खायला येतं. तुला जर आम्हीं आसरा दिला नाहीं तर कोण देईल ?

**रजनी**—आई, तुझं म्हणणं खरं आहे; पण बाबासाहेबांच्या रागीट स्वभावापुढं...

**विठू**—( धांवत येऊन ) तायसाब ! बाबासायबांची सवारी आलिया—अतां कसं व्हनार ?

**ताराबाई**—काय व्हायचं आहेरे ! मी आहें ना रजनीचं रक्षण करायला इथं उभी ? रजनी, भिऊं नको, मी करीन तिकडची समजूत !

**तारानाथ**—( येऊन ) तारे, रजनी इथं केव्हां आली, कां आली, सर्व कांहीं मला ठाऊक आहे.

**ताराबाई**—पण इकडे तर परगांवला जायचं झालं होतं, मग आपल्याला ही हकीगत कशी कळली ?

**तारानाथ**—मी स्टेशनवर उतरलों मात्र, तों एका पोरानं माझ्या हातीं हें निनांवी पत्र दिलं आणि तो पोऱ्या चटकन् कुठं पसार झाला ! या पत्रांत रजनी व रमाकांत यांच्यामध्यें उपस्थित झालेल्या सर्व भानगडी स्पष्ट लिहिलेल्या आहेत. रजनी, आमच्या सल्लामसलतीची पर्वा न करतां तूं ज्याला उतावीळपणानं वरलंस तो फक्कडराव शेवटीं जुगारी व पाजी निघाला ना ?

**रजनी**—होय बाबासाहेब, त्यांनीं माझा छळ आरंभला आणि मला दुरुत्तरें बोलून घरांतून घालवून दिलं !

**तारानाथ**—त्यानं तुला घालवून दिलं, पण तूं कां तिथून निघून आलीस ?

**रजनी**—मग काय करूं ? मी तिथून निघून आल्यें नसतें तर त्यांनीं मला मारहाणसुद्धां केली असती !

**तारानाथ**—मग त्यांत कुठं बिघडलं असतं ? रमाकांत म्हणजे तुझ्या प्रीतीचा परमेश्वर ! प्रेमाच्या भरांत त्याचा हात धरायला गोड वाटलं, मग त्याच्या हातचा मार खायला आतां कां कडू वाटतं ? आणि शिवाय मी म्हणतों, तो कां मारील तुला ? तूं तर त्याच्या प्रीतीची देवता !

**रजनी**—बाबासाहेब, रमाकांतांनी मला खोट्या प्रेमाची भुरळ घातली आणि फसवलं हो फसवलं ! ते तुमच्या पैशाच्या लोभानं माझ्यावर प्रेम करीत होते हें, मला काय बरं माहीत ?

**तारानाथ**—पण तें मला माहीत होतें आणि म्हणून मी त्याची मागणी येण्यापूर्वीच त्याला दहा हजारांची देणगी दिली. रजनी, त्याच वेळीं मी तुझ्या ऋणांतून मुक्त झालों. आतां मी एक कपर्दिकाहि तुला किंवा त्या भामट्याला देणार नाहीं आणि तुलाहि घरांत बाळगणार नाही. जा, वाटेल तें कर आणि नवऱ्याला ताळ्यावर आण. रजनी, तुझ्या प्रीतीचा परमेश्वर ना तो ? मग तो सैतान कसा निघाला ?

**ताराबाई**—रजनीला काय विचारायचं त्यांत ? तिला काय कळतं ?

**तारानाथ**—अग, तुला ठाऊक नाहीं, जें काय कळत नाहीं तें आम्हां जुन्या लोकांना ! हल्लींच्या तरुण पोरांना लहानपणींच शिंगं फुटतात ! त्या रात्रीं मीं जर हिला रमाकांताशीं प्रीतिविवाह करूं दिला नसता तर, हिनं आकाशपाताळ एक केलं असतं आणि मलाच मूर्खांत काढलं असतं ! तारामती, तूं गप्प बैस. रजनी, रमाकांताला ताळ्यावर आणल्याशिवाय पुनः या घरांत पाऊल ठेवूं नकोस ! प्रीतिविवाहाच्या तत्त्वाला कवटाळणं सोपं आहे, पण त्या तत्त्वाप्रमाणं वागणं कठीण आहे. मी आणि ही तारामती कधींकाळीं भांडलों तर एक वेळ चालेल, कारण आमच्या आईबापांनींच आम्हां दोघांना एका दिवशीं संसाराच्या गोठ्यांत आणून

बांधलं ! पण तुमची गोष्ट निराळी आहे. तुम्ही प्रेमाची नीट पारख करूनच एकमेकांना पसंत केलें आहे. रजनी, तुझं रमाकांतावर प्रेम होतं ना ?

**रजनी**—बाबासाहेब, त्यांच्यावर माझं प्रेम होतं, इतकंच नव्हे तर, अजूनहि माझं त्यांच्यावरच अनन्य प्रेम आहे.

**तारानाथ**—आणि जिवंत जीव असेपर्यंत रमाकांताला अंतर न देण्याबद्दल तूं माझ्यासमक्ष शपथहि घेतली आहेस. ती शपथ तूं कशी विसरलीस?

**रजनी**—केवळ नाइलाज म्हणून ! ते असे कसाई निघतील असं मला स्वप्नांत सुद्धां वाटलं नाहीं !

**तारानाथ**—पण आतां त्याचा काय उपयोग? धनुष्यापासून सुटलेला बाण कधीं परत येतो का ? रजनी, रमाकांत हा तुझा प्रेमाचा परमेश्वर होता, आतां तो कसाई निघाला असला तर त्याला ताळ्यावर आण आणि पुनः त्याला परमेश्वर बनवून त्याच्या पाशींच सुखाचा संसार कर. प्रीतिविवाहामुळं वधूवरांवर फार मोठी जबाबदारी येऊन पडते. रमाकांतासाठीं दुःखांचे पर्वत शिरावर घेणें हेंच तुझं कर्तव्य आहे. सुखाच्या लालसेनं एक झालांत आणि दुःखाचा भास होऊं लागतांच एकमेकांना अंतर दिलंत, हें बरं नाहीं. जा, रमाकांताला ताळ्यावर आण. आज तुला माझं बोलणं कडू लागत असेल, पण उद्यां तुला तुझ्या प्रेमाच्या परमेश्वराची प्राप्ती झाली म्हणजे माझ्या बोलण्यांतील गोड सत्य तुझ्या अनुभवाला येईल ! रजनी, आतां इथं क्षणभरहि थांबूं नको.

**ताराबाई**—हें काय बरं असं ! इतका काय निष्ठुरपणा करायचा तो ! पोटच्या पोरीला घरांतून घालवून देणं इकडे तरी शोभतं का ?

**तारानाथ**—खुळी आहेस तूं ! तुला माझ्या निष्ठुरपणांतलं मर्म कळणं शक्य नाहीं. रजनी, आतां कां इथं थांबलीस ?

**रजनी**—बाबासाहेब, जात्यें मी, मला माझं कर्तव्य केलंच पाहिजे. मला आपला आशीर्वाद द्या. ( नमस्कार करते. ) आई, माझी चिंता करूं नको. मला आपला आशीर्वाद दे म्हणजे पुरें आहे. ( मिठी मारते. )

**ताराबाई**—( अश्रू ढाळीत ) बाळे, तूं उघड्या डोळ्यांनीं आगींत उडी

घेते आहेस, मग माझं मन तुझ्या चिंतेन होरपळून गेल्याशिवाय कस राहील ? रजनी, आता तुझ कस ग होईल ?

**रजनी**—आई, माझ रक्षण परमेश्वर करील, जात्ये मी ! ( जाऊ लागते, तों जुई आणि जीवन येतात व तिला मिठी मारतात. )

**जुई**—ताई, एकदा तू आम्हाला टाकून गेलीस ते पुरेस झाल नाहीं का ? आता तरी तू आम्हाला टाकून जाऊ नकोस !

**जीवन**—ताई, आमच्याशिवाय तुला तिकडे चैन पडत का ग ? ताई, कशी ग अशी निष्ठुर झालीस तरी ?

**रजनी**—बाळानो, काय सागू तुम्हाला ? मी निष्ठुर झाल्ये नाही, माझे दुर्दैवच माझ्यावर उलटल आहे. बाळानो, सोडा मला, मला माझ्या कर्तव्याला गेलच पाहिजे.

**तारानाथ**—जीवन, जुई, या इकडे. तुमची ताई आपल कर्तव्य करण्या- साठीं जाते आहे, तिला अडवू नका. ( त्याना माग घेतो. रजनी जाते. )

**ताराबाई**—(रडत) काय बर केलत हे ? पोरीला घरातून घालवून दिलींत .

**तारानाथ**—हो, हो, तिच कल्याण व्हाव म्हणूनच मीं तिला घालवून दिल, आणि तारामती, तुलाहि मी बजावून ठेवतो, तू तिच्यासाठीं रडत बसलीस तर तुलाहि मी घरातून घालवून देईन !

**ताराबाई**—काय म्हणून घालवून द्याल मला ? मी काहीं तुमच्याबरोबर प्रीतिविवाह केलेला नाहीं. चागली आईबापानींच मला तुमच्या गळयात जन्मभर बाधून ठेवली आहे—तुम्ही द्याल घालवून, पण मी गेल्यें पाहिजे ना ? मुलानो, चला घरात, इथ क्षणभर सुद्धा थाबू नका. (मुलाना घेऊन घरात जाते.)

**विठू**—धनीसाब, तुमी अगदीं वगाळ काम केलया पगा ! तो रमाकात मनुक्ष नाय, येताळ हाय येताळ !

**तारानाथ**—होय ना ? मग मी सांगतों तस कर. तुला रजनीबद्दल वाईट वाटत ना ?

**विठू**—व्हय धनीसाब ! रजनी तुमच्या प्वाटची प्वार असल पुन ती माज्या पिरतीची प्वार हाय पगा !

**तारानाथ**—होय ना ? मग चल तर माझ्याबरोबर. पुढं काय काय करायचं तें मी तुला सांगून ठेवतों.

**विठू**—चला तर ! त्या प्वारीसाठीं मी जळत्या चितेंत बी उडी घ्येयाला मागं फिरनार नाय. ( जातात. )

---

## प्रवेश ३ रा

( **स्थळ**—बगीचा. कामेश्वर रमणीला घेऊन येतो. बाजूला नटेश्वर उभा असतो. )

**कामे०**—रमणीबाई, तुम्हांला एका भयंकर संकटांतून वांचविण्यासाठीं मी इथं आलों आहें. मी तुम्हांला आधीं असं विचारतों कीं, सध्यां तुम्ही ज्यांच्याशीं स्नेहसंबंध जोडला आहे ते कोण ?

**रमणी**—ते तर कडकाबादचे सरदार सुंदरदास आहेत. त्यांचा व माझा स्नेहसंबंध जुळला हें मी माझं परम भाग्यच समजतें. किती थोर, किती उदार, किती प्रेमळ गृहस्थ आहेत ते ! मी तर माझा सर्व पैसाअडका बरोबर घेऊन त्यांच्याबरोबर कडकाबादला रहायला जाण्याच्या विचारांत आहें. शिवाय, त्यांनीं माझ्यावरचं आपलं प्रेम व्यक्त करून माझ्या प्रेमाची याचना केली आहे. अजून मीं कांहीं त्यांना प्रीतिविवाहाचं वचन दिलं नाहीं, पण...

**कामे०**—आणि माझी तुम्हांला अशी आग्रहाची विनंती आहे कीं, तुम्ही कृपा करून त्यांना इतक्यांत तसं वचन देऊं नका.

**रमणी**—कां बरं ?

**नटे०**—( पुढें येऊन ) हंबग् ! दॅट सुंदरदास इज ए लफंगा ! रमणी, टेक केअर, आय ॲम् बजाविंग यू, टेक केअर.

**रमणी**—नटेश्वर, तुमचा आचरटपणा या थराला येऊन पोंचला का ?

सरदार सुदरदासानीं माझं प्रेम सपादन केल म्हणून तुमच्या मनात मत्सर पेटलेला दिसतो आहे. मी तुम्हाला केव्हापासून सागत्ये आहे की, सोडा हा आचरटपणा ! कुठ ते आणि कुट तुम्ही ?

**नटे०**—हबग् ! रमणी, त्याची आणि माझी तुलना करू नकोस. हबग् ! आय मे बी आचरट, बट नॉट लफंगा ! मी आचरट असेन, पण लफंगा मात्र नाहीं.

**रमणी**—तुम्ही लफंगे नाही आणि सुदरदास तरी कशावरून लफंगे आहेत ?

**कामे०**—तें आम्ही सिद्ध करून देतों. या कामी आपल्याला रजनी नावाच्या एका तरुण मुलीच उत्तम साह्य मिळणार आहे. तिची आणि तुमची गाठ घालून देतों, आणि सिद्ध करून देतों की—

**नटे०**—ही इज ए लफंगा ! मी त्याच बिंग फोडायला तयार आहे—आय ॲम रेडी टु ब्रेक हिज बिंग !

**रमणी**—तस कराल तर मी तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाही.

**नटे०**—हें खर कशावरून ? बीट हॅड अपॉन हॅंड—हातावर हात मार, आणि वचन दे.

**रमणी**—हे घ्या वचन ! बर मी जात्ये, तुम्ही माझी आणि रजनीची भेट करवाच, बर का ? ( जाते. )

**नटे०**—कामेश्वर, लुक, आय बिकेम धन्य ! मी आज धन्य झालो.

**कामे०**—आणि आचरटपणा सोडाल तर ती तुमच्यावर प्रेमसुद्धा करील !

**नटे०**—अस होईल तर कामेश्वर, ओ गॉड ऑफ वर्क, मी तुमच्या पायावर लोटांगण घेईन—आय वुइल टेक् लोटांगण अपॉन युअर फूट !

**कामे०**—हबग् ! लोटांगण घ्या पण ते रमणीच्या चरणावर ! प्रीतिविवाह करू पाहणारा रमण नेहेमीं रमणीच्या पायावर लोटांगणच घेत असतो. बर, पण आता बोलण्यात वेळ घालवू नका. रजनीचा पत्ता काढून तिला सर्व गोष्टी समजावून सांगितल्या पाहिजेत.

**नटे०**—हो, पण हू वुइल टेल हर पत्ता ? रजनीचा पत्ता कोण सांगणार ?

**विठू**—( प्रवेशून ) मी दावतुंया त्येंचा पत्ता. चला माज्यासंगं ! रजनी-ताईसायबांनीं तुमचीच याद केलिया.

**नटे०**—चला तर ! रजनीच्या मदतीनं आपल्याला त्या लफंग्याचं बिंग फोडलंच पाहिजे—वुइथ रजनीज हेल्प वुइ मस्ट ब्रेक हिज बिंग ! ( जातात. )

---

## प्रवेश ४ था

( **स्थळ**—रमणीचा महाल. बाहेरची बाजू. रमाकांत सरदाराच्या वेषांत प्रवेश करतो. )

**सुंदर०**—वाहवा ! वाहवा ! आज मोटी मौज उडणार यांत शंका नाहीं. आज रमणीनं मुद्दाम आपल्या विठाई मोलकरणीला पाठवून मला कां बरं बोलावलं असावं ? तिची कडकाबादला जाण्याची सर्व तयारी झाली असेल, आणि ती सर्व पैसाअडका बरोबर घेऊन तिकडे जावयाला उत्सुक झाली असेल, हेंच खरं ! आतां माझी जन्माची चंगळ उडणार आणि हा नवा जुगार खूप साधणार यांत शंका नाहीं.

**विठू**—( स्त्रीवेषांत येऊन ) अव रावसाब, चला कि बिगीबिगी, बायसाब तुमची वाट पगपगूनशान् अक्षी कंटाळून गेल्याती ! चला !

**सुंदर०**—विठाई, चल हा मी आलोंच ! ( ती जाते. ) या छानछबेल्या एकदां कां अविचारानं कुणाच्या प्रेमजालांत अडकल्या कीं, खड्ड्यांत उडी घ्यायलासुद्धां अशा अधीर होतात ! आमच्यासारख्या लफंग्यांच्या हातांत हा प्रीतिविवाहाच्या भुलथापेचा नवा छानदार गळफांस आला आहे खरा ! चला, आतां गोडगोड थापा देऊन रमणीला या शहरांतून बाहेर न्यावें आणि गळफांस आंवळून जन्माची ददात मिटवावी ! ( जातो. आंतील महाल दिसूं लागतो. )

**रमणी**—( प्रवेशून ) आज काय तो सोक्षमोक्ष होणार. नटेश्वरांनीं तसं सांगितलं, कामेश्वरांनीं दुजोरा दिला आणि रजनीची भेट झाल्यावर तर बहुतेक खात्रीच पटली ! हे खरेखुरे सरदार सुंदरदास नसून ते रजनीचे पति रमाकांत

आहेत असे जर सिद्ध झाले तर मीं एका मोठ्या सकटातून बचावल्यें असच म्हणाव लागेल ! देवा, या वेळी मला आल्या प्रसगाला तोंड देण्याच धैर्य दे.

( राग—झिंजोटी, ताल—खेमटा )

**घोर अशा समया। धांव दयाघन प्रभुराया ॥ ध्रु० ॥**
**दुरित देखुनि मी बहु भ्यालें। धीर मनाला द्या देवा ॥ १ ॥**
**मूढमती मी भोळी बाला। द्यावी सुमति मज नमि पायां ॥ २ ॥**

**विठू**—( स्त्रीवेषात प्रवेशून ) अव रमणी बायसाब, समदी तयारी झालिया ! त्ये तकड बसल्याती, ह्ये हकड हायती, आणि त्ये बाहिर पाळत ठेवून-श्यान् उभे हायती ! समदा यूह कसा छान जमलाया. आता इकत्यांत त्ये लफगेराव येत्याल, नीट सभाळूनश्यान त्येच्याशी बोला, बर का ? कमजास्त दिसल तर मी टाकीनच म्हारुतीपरमान उडी !

**रमणी**—ठीक तर, जा तू आता ! पण विठू, माझ्यावर काही भलताच प्रसग ओढवणार नाही ना ? मी पहा कशी अगदीं गोंधळून गेल्ये आहें. विठू...

**विठू**—आता मी इठू नाय, आता मी इठी झालो हाय ! मला इठी म्हना इठी ! अन् बिलकुल गाबरू नका. मी हाय हकड आन् त्ये हायती तकड —कशा पायी भिता वो ? हां, त्ये पगा लफगेरावच आलेया जनु ! मी आमदी जातों. ( जातो. )

**सुंदर०**—( प्रवेशून ) ओ हो ! रमणी तर माझी वाट पहात उभी आहे, ( जवळ जाऊन ) रमणी, हा तुझा दास तुझ्याजवळ उभा आहे, काय तो हुकूम कर.

**रमणी**—काही झाल तरी तुम्ही थोर सरदार, तुम्ही नाहीं अशी दीन भाषा वापरायची ! जातिवत सरदार कुणाजवळहि दीनपणाची भाषा वापरीत नाहीत. आपण जातिवत सरदार आहात ना ?

**सुंदर०**—( स्वगत ) अर्रर्र, चुकलों वाटत बोलण्यांत ? बाकी, इथ कुणा लेकाला जातिवत सरदाराची भाषा येते आहे ? आतां आपली चूक युक्तीनेंच सांवरून घेतली पाहिजे.

**रमणी**—हें काय ? तुम्ही बोलत कां नाहीं ? तुम्ही जातिवंत सरदार नाहीं वाटतं ? तुम्ही कुणी...

**सुंदर०**—वाः असं कसं होईल ? तुझ्या चतुर भाषणानं मी थोडा वेळ स्तंभित झालों. तुझ्या चतुराईपुढं माझी—एका थोर सरदाराचीहि बोबडी वळली असली तर त्यांत नवल नाहीं. मी सरदार असलों तरी कडकाबाद येथें असतांना ! तुझ्याजवळ मी सरदाराचा तोरा मिरवीत नाहीं, आणि मिरविणारहि नाहीं. रमणी, खरं सांगूं, मी तुझा दास आहें, तुझ्या सौंदर्याचा दीन दास आहें.

**रजनी**—( दुसऱ्या बाजूनें सरदाराच्या वेषांत प्रवेशून ) आणि रमणी, मीहि तुझ्या सौंदर्याचा दासच आहें. माझ्या प्रेमाचा स्वीकार कर आणि यांना इथून हांकलून लाव.

**सुंदर०**—रमणी, हा कोण लफंगा ?

**रमणी०**—हा एक तुमच्यासारखाच...

**सुंदर०**—काय ? माझ्यासारखा...

**रजनी**—हो, सरदारसाहेब ! मीहि तुमच्यासारखाच एक लफंगा आहें.

**सुंदर०**—तूं लफंगा असशील, पण मी कडकाबादचा एक सरदार आहें सरदार !

**रजनी**—आणि मीहि एक सरदारच आहें. तुमच्याप्रमाणंच मलमलीच्या धांदोटीला तीन दमड्यांचा रंग फांसून मीहि पोषाखी सरदार बनलों आहें. रमणी, यांच्यांत आणि माझ्यांत काय फरक आहे बरं ?

## विनोदगीत

**जसे सरदार दिसती हे । तसा मी फांकडा आहें ॥**
**जसे हे ऐट दावीती । तसा मी नेटका वर्तीं ॥ १ ॥**
**जसे हे भामटे मोठे । तसें मी रूप धरि खोटें ॥**
**नसे यांतें जशी अब्रू । तसा मी जाण गे गब्रू ॥ २ ॥**
**जसे हे थोर पोषाखी । तशी मी मिरवितों शेखी ॥**
**नसे गे भेद तो कांहीं । जसे दिसतों तसें नाहीं ॥ ३ ॥**

**सुंदर०**—तुझ्यामाझ्यांत फार फरक आहे. कुठं मी जातिवंत सरदार आणि कुठं तूं पोषाखी लफंगा ? तूं दिसतोस तसा नाहींस खास !

**रजनी**—खरच, मी दिसतो तसा नाही रमणी, तुला कोणातरी लफंग्यावर प्रेम करून फसायचच आहे ना? मग माझ्यावर प्रेम करूनच स्वतःची फसवणूक करून घे. हे पहा, मी जसा खोटा सरदार आहे तसेच हे सुदरदासहि खोटेच सरदार आहेत. ते ज्याप्रमाणे तुझा पैसाअडका लुबाडण्यास तयार झाले आहेत त्याप्रमाणे मीहि तुझ्या मालमत्तेची धूळधाण उडविण्यास तयार आहे.

**सुंदर०**—का हो सरदार? तुम्ही जी एवढी लफंगेगिरी चालविली आहे ती कशाच्या जोरावर? तुम्ही कधी कडकाबाद तरी पाहिल आहे का?

**रजनी**—कडकाबाद पहायला ते कशाला पाहिजे? जे मुळातच नाहीं त्याची वाटेल त्यान वाटेल तशी कल्पना करावी!

**रमणी**—म्हणजे सुदरदास, तुम्ही मला कडकाबादची थापच दिलीत म्हणायची!

**सुंदर०**—छेः, छेः, अस कस होईल? रमणी, चल माझ्याबरोबर, मी तुला आत्ता पाहिजे तर कडकाबाद दाखवितो. मी लफगा आहे, अस जो स्वत च्या तोडान कबूल करतो त्याच्यावर काय तू विश्वास ठेवतेस?

**रजनी**—पाहिजे तर याच्यावर विश्वास ठेव आणि खड्डयात पड! मी जातो हवा तर!

**सुंदर०**—जा जा, चालता हो.

**रजनी**—मग रमणी, खरच जाऊ ना मी?

**रमणी**—नका गडे जाऊ मला टाकून! मला सार काय ते खर खर सागा आणि मग जा. मला या सरदार सुदरदासाची भारी भीति वाटू लागली आहे. नकाच गडे मला टाकून जाऊ!

**( कवाली )**

**ही बावरली बाला। द्या धीरा नका जाऊं ॥**
**जरि जाल अशा काला। सखया हो कुणा ध्याऊं ॥ ध्रु० ॥**
**हित काय तें वदा हो। सुचतें मला न कांही ॥**
**मज क्षमा करावी हो। करुं काई गडे बोला ॥ १ ॥**

**सुंदर०**—अरेच्या ! हा लेकाचा लफंगा सरदार झाला का इतक्यांत गडे ? रमणी, तूं शुद्धीवर आहेस ना ?

**रजनी**—ही शुद्धीवर नाहीं म्हणून तर ती तुमच्या जाळ्यांत अडकली ! रमणी, शुद्धीवर ये. या सरदारसाहेबांची फसवी जादू तुला माहीत नाहीं. यांनीं नुकतेंच रजनी नांवाच्या एका भोळ्या मुलीला फसवलें आहे !

**सुंदर०**—अहो नटवे सरदार, ही आणखी भोळी रजनी कोण आणलींत तुम्हीं ? कोण रजनी ? कुठली रजनी ? कुठं आहे ती ?

**रजनी**—ती इथंच आहे, नीट पहा.

**सुंदर०**—इथं आहे ? मला नाहीं दिसत ती कुठं ? ( शोधूं लागतो. )

**रजनी**—( पुरुषवेष टाकून ) ही पहा ती रजनी ! आहे का मी रजनी ? पटली का खूणगांठ ? स्वतांच्या लग्नाच्या, प्रीतीच्या बायकोला टाकून रमणी-सारख्या भोळ्याभाबड्या मुलीला फसवूं पाहतां, कांहीं लाजलज्जा...

**सुंदर०**—रजनी, अशा रीतीनें तूं माझी फजिती केलीस काय ? मला इथं रहायला तोंडच उरलं नाहीं, मला इथून गेलंच पाहिजे. ( जाऊं लागतो. )

**रजनी**—थांबा, मी तुम्हांला इथून जाऊं देणार नाहीं. ( अडविते. )

**सुंदर०**—तसं जाऊं दिलं नाहींस तर असा जाईन (तिची मानगुटी आंवळतो.)

**विठू**—( धांवून ) अव धनीसाव, सोडा त्येसनी मुकाट्यानं, नायतर टाळकं फुटल या सोडग्यानं !

**सुंदर०**—( मागं वळून ) तूं कोण ? विठी कीं विठ्या ?

**विठू**—मी इठी व्हतों पुन आतां इठू झालुंया ! पगा नीट. ( स्त्रीवेष टाकतो. )

**सुंदर०**—आतां तर इथं थांबायची सोयच उरली नाहीं. विठू, सोटा मागं घे. ( त्याचा सोटा पकडतो, दोघांची झटापट होते, इतक्यांत नटेश्वर फौजदाराच्या व कामेश्वर जमादाराच्या वेषांत येतात. )

**नटे०**—हंबग् ! बदमाष, स्टॉप धिस गडबड ! बदमाष, इफ यू डू दंगा, आय वुइल शो यू इंगा ! लुक्, आय ॲम फौजदार, डोअर ऑफ दि आर्मी ! जमादार, या लंफग्याला बेडी ठोक, स्ट्राइक बेडी टु धिस लफंगा !

**कामे०**—जी, फौजदारसाहेब. ( रमाकाताला बेडी ठोकतो. )

**सुंदर०**—अहो पण फौजदारसाहेब, तुम्ही मला का पकडता ? काय केल मी ?

**नटे०**—हबग् ! तुम्हीं स्वतःचं नाव बदललत, वेष पालटलात आणि रमणीच्या मालमत्तेवर डल्ला मारण्याचा व्यूह रचलांत ! रमाकांत, तुम्हीं फार मोठा गुन्हा केला आहे, यू सी ?

**कामे०**—आणि या अपराधाबद्दल तुमच्यावर लौकरच चक्की पिशीत बसण्याची पाळी येईल !

**रमा०**—मग फौजदारसाहेब, या सकटातून शीरसलामत सुटण्याला कांहीं उपाय नाहीं का ?

**नटे०**—हबग् ! उपाय आहे, रमणीचे पाय धर, होल्ड रमणीज फूट !

**रमणी**—माझे नका पाय धरू ! रजनीचे पाय धरा. किती झाल तरी ती तुमच्या प्रीतीची पत्नी आहे, तीच तुम्हाला क्षमा करील.

**रजनी**—माझे नका पाय धरू ! बाबासाहेबाचेच पाय धरा. तुम्हाला पश्चात्ताप झाला आहे आणि यापुढ तुम्ही माझ्याशी प्रेमळपणान वागाल अशी त्याच्या मनाची खात्री झाली पाहिजे.

**रमा०**—पण रजनी, बाबासाहेब कुठ आहेत ? त्याची खात्री पटवून द्यायला मी तयार आहें.

**विठू**—बाबासाहेब, या आता बाहिर ! ह्यो काळा फत्तर पार ढिसूळ झालाया !

**बाबासाहेब**—( बाहेर येऊन ) रमाकात, तुमच्या पापकृत्याचा तुम्हाला पूर्ण पश्चात्ताप झाला आहे ना ?

**रमा०**—( पाय धरून ) होय बाबासाहेब ! माझे डोळे साफ उघडले आहेत. तसला कडक बदिवास पत्करण्यापेक्षा रजनीच्या प्रेमळ बदिवासात जन्मभर रहायला मी तयार आहें. रजनी, मला तुझ्या बदिवासात ठेव, सरकारी बदिखान्यात पाठवू नकोस !

**रजनी**—बाबासाहेब, माझ्या प्रियकराना क्षमा करा. ते यापुढ प्रीतिविवाहाच्या वेळीं घेतलेली शपथ मोडणार नाहीत अस माझ मन मला सागत आहे.

**तारानाथ**—बरं तर. सर्वांचीच खात्री पटलेली दिसते आहे—मग जास्ती ताणण्यांत तरी अर्थ काय? नटेश्वर, जाऊं द्या त्यांना.

**रमा०**—काय? हे नटेश्वर आहेत? फौजदार नाहींत?

**नटे०**—हंबग्! आय ॲम नॉट फौजदार, आय ॲम नॉ डोअर ऑफ दि आर्मी, आय ॲम रमणीज मोस्ट ओबीडिअंट सर्वंट नटेश्वर!

**रमणी**—हें पहा नटेश्वर, आतां तुम्हीसुद्धां हा आचरटपणा टाका म्हणजे...

**नटे०**—हंबग्! म्हणजे काय होईल?

**रजनी**—म्हणजे रमणी तुमच्याशीं प्रीतिविवाह करायला कबूल होईल. ती केवळ तुमच्या आचरटपणामुळंच तुमच्यावर प्रेम करीत नाहीं.

**नटे०**—असं असेल तर मी सारा आचरटपणा सोडायला तयार आहें. आपल्याकडील रमणी प्रीतिविवाहाला तयार होत नाहींत म्हणून मी इंग्रजीचा अभ्यास करून विलायतेला जाणार होतों. पण इथंच जर रमणी माझ्याशीं प्रीतिविवाह करायला तयार होईल तर मी तरी कशाला जाऊं सातासमुद्रापलीकडे? रमणी, मीं सारा आचरटपणा टाकला, मला पदरांत घे—टेक मी इन यूअर...

**कामे०**—हंबग्! लागलांत पुनः इंग्रजीचे तारे तोडायला!

**नटे०**—होय बाबा, चुकलों खरा!

**कामे०**—रमणीबाई, माझ्या मित्राला क्षमा करा. त्याच्यासारखा प्रेमळ माणूस दुनियेंत सांपडणार नाहीं.

**रमणी**—नटेश्वर, तुम्हीं मला संकटांतून मुक्त केलंत आणि आतां आचरटपणाहि टाकलांत म्हणून मी तुम्हांला माझं प्रेम बक्षीस देत्यें. (त्याचा हात धरते.)

**नटे०**—जय प्रीतिविवाह!

**कामे०**—नटेश्वर, तुमचं काम झालं, मी जातों. नमस्कार!

**नटे०**—हंबग्! मित्रा, माझ्याजवळच रहा, कारण तुझ्याशिवाय मी निकामी होईन!

**विठू**—( रमाकातास ) बर, मी जातुया धनीसाब ! रामराम !

**रमा०**—विठू, तू आता माझा मुख्य कारभारी झाला आहेस. प्रीति-विवाहाची शपथ मोडण्याचा मोह मला कधी उत्पन्न झाला तर खुशाल माझ्या डोक्यात तुझा सोटा हाण, आणि माझ डोक ताळ्यावर आण.

**तारानाथ**—चला, सर्व मडळी आमच्या इथ मेजवानीला चला. जावई-बुवाना भेटायला तारामती उत्कठित झाली असेल. रमाकात, या आनदाच्या प्रसगीं तुम्हाला आणि रजनीला नवा ससार थाटता यावा म्हणून मी आणखी दहा हजाराची देणगी देतों. रमाकात, व्यसने सोडा आणि रजनीशी प्रेमानच वागा. रजनी, तूंहि रमाकाताशीं प्रेमानच वाग. प्रीतिविवाहान बद्ध झालेल्या जोडप्यान कधींहि भाडता कामा नये. प्रीतिविवाहामुळे तुमच्यावर फार मोठी जबाबदारी आलेली आहे. ही जबाबदारी साभाळाल तरच प्रीतिविवाहाच्या तत्त्वाचा विजय होईल ! प्रीति–प्रेम हें परमेश्वर–स्वरूप आहे. त्या प्रेमस्वरूप परमेश्वरालाच आपण शरण जाऊ या म्हणजे झाल !

## भरतवाक्य

( **राग**–देसकार, **ताल**–एकताल. )

**त्या भजा रमाधवास । व्यापी जो कां जगास ॥ भरुनी अणुरेणु खास । उरला त्या ॥ ध्रु० ॥ मूर्तिमंत प्रेमरूप । वर्णुं कसा तो अमूप ॥ वाचा कुंठित अपाप । होत वानितां ॥ १ ॥**



# अंक पहिला

## प्रवेश १ ला

( **स्थळ:**—यूनिटी कॉलेजच्या बाजूचा बगीचा. एका बांकावर रत्नप्रभा अभ्यासाचें पुस्तक वाचीत बसली असून बिंदुमाधव प्रवेश करतो. थोडा वेळ इकडे तिकडे हिंडून बिंदुमाधव रत्नप्रभेच्या बांकावर येऊन बसतो व ' लव्ह डिव्हाइन ' हें कवितेचें पुस्तक वाचूं लागतो. वाचतां वाचतां बिंदुमाधव रत्न-प्रभेकडे सरकतो, ती पलीकडे सरकत जाते व शेवटीं बांकावरून उठते. हा प्रकार चालू असतां लांबून गीताचे ध्वनी ऐकूं येतात. )

**बिन्दु०**—( गीताचे ध्वनी थांबल्यावर कविता म्हणूं लागतो. )

> **ओ माय लव्ह डिव्हाईन ।**
> **यू आर माइन । आय ॲम दाइन ॥**
> **लेट अस ड्रिंक वाइन फाइन**
> **ऑफ लव्ह डिव्हाइन ॥**

**रत्न०**—( स्वगत ) हे बिन्दुमाधव खरोखरच एकादी कविता वाचताहेत कीं चहाटळपणा करताहेत, कांहींच कळत नाहीं. ( रिस्टवॉचकडे पाहून ) हो खरंच ! कॉलेज सुरू व्हायची वेळ झाली, आपण आपलं जावंच कॉलेजांत ! ( जाऊं लागते, बिन्दुमाधव उठून तिच्यापुढें येऊन उभा राहतो. )

**बिन्दु०**—हे चित्तहारिके कुमारिके, ही ' डिव्हाइन लव्ह ' सोडून कुठं चाललीस? हे मनोहारिणी कॉलेजरमणी, या गोड काव्याचा थोडा तरी आस्वाद घे. ( कविता गातो . )

**ओ माय लव्ह डिव्हाइन । इ. इ.**

**रत्न०**—हा काय चहाटळपणा माडला आहे तुम्ही ? सोडा माझी वाट !

**बिन्दु०**—तुझी वाट सोडली तर माझी वाट काय होईल बर ? चल, आपण दोघ मिळून या काव्याची वाटाघाट करू या. हे आपल नदनपुरातील ‘ यूनिटी कॉलेज ’ आहे. या कॉलेजातील मुलामुलीनी एका ठिकाणीं बसून काव्यातील माधुरीचा आस्वाद घेतला पाहिजे. आपल्या यूनिटी कॉलेजचे ब्रीदवाक्य ‘ यूनिटी इज स्ट्रेंग्थ, ’ ‘ सहतिः कार्यसाधिका ’ ऊर्फ ‘ ऐक्यातच मौज ’ हें आहे हे विसरू नको ! रत्नप्रभे, ये, बैस इथ आणि मला या काव्यातील गूढ अर्थ समजावून साग.

**रत्न०**—अहो, काव्यातील गूढ अर्थ समजावून देण हे प्रोफेसराचे काम आहे, त्यानाच काय ते विचारा. चला व्हा बाजूला.

**बिन्दु०**—काय ? बाजूला चल ? पण तिथ तरी तू मला या काव्यातील गूढ अर्थाची शिकवण देशील ना ?

**रत्न०**—काहो बिन्दुमाधव, तुम्ही असे पागल कशान झालात ? तुम्ही काय बोलत आहात याचा अर्थ तरी कळतो आहे का तुम्हाला ?

**बिन्दु०**—हो, हो, माझ्या बोलण्याचा अर्थ–रोमान्स, प्रेम, मौज ! रोमान्सात प्रेम आहे आणि प्रेमात मौज आहे ! रोमान्स, प्रेम, मौज ! म्हणून म्हणतों, हे कॉलेजकुमारी, मला या काव्यातील रोमान्स पटवून दे. रोमान्स, प्रेम, मौज !

**रत्न०**—तुमच डोक काही ठिकाणावर दिसत नाहीं !

**बिन्दु०**—वा , माझ डोक तर अगदी असायच तिथच आहे. हे पहा, माझ डोक माझ्या खाद्यावर आहे. रोमान्स ! प्रेम ! मौज !

**रत्न०**—अहो, डोक नुस्त खाद्यावर असून भागत नाही, ते ताळ्यावर असल पाहिजे. हें पहा, आता मुकाट्यान तुम्ही बाजूला न व्हाल तर मला या छत्रीच्या दाड्यान ते ताळ्यावर आणाव लागेल ! ( छत्री उगारते. )

**बिन्दु०**—अहाहा ! रोमान्स ! प्रेम ! मौज ! काय ? तू मला या तुझ्या नाजुक हातातील नाजुक छत्रीने नाजुक मार देणार ? फाइन, फाइन, व्हेरी फाईन !

ओ माय लव्ह डिव्हाइन । यू आर माइन । आय ॲम दाइन ॥ तुझ्या नाजुक मारांतहि मला रोमान्स दिसेल, प्रेम दिसेल, मौज दिसेल ! रोमान्स, प्रेम, मौज ! पूर्वीच्या अडाणी तरुणी पागल तरुणांना नयनबाण मारून घायाळ करीत असत, पण आजकालच्या शिकलेल्या कॉलेजकुमारिका आपल्या नाजुक हातांतील नाजुक छत्रीचा नाजुक प्रहार करून माझ्यासारख्या पागल तरुणांना ताळ्यावर आणतात. होय ना ? खरं ना ? बस्स, हाच तो रोमान्स ! हेंच तें प्रेम ! हीच ती मौज ! रोमान्स, प्रेम, मौज !

**रत्न०**—मग तुम्ही नाहींच बाजूला होत ! माझ्या हातचा प्रसाद खाणार तर ?

**बिन्दु०**—वाहवा ! तुझ्या पवित्र हाताचा प्रसाद खायला मिळणं यांतच रोमान्स आहे ! रोमान्स, प्रेम, मौज !

**धर्माचार्य**—(प्रवेशून) हे पवित्र कुमारिके, हात मागं घे ! तुझ्या हातचा प्रसाद मिळाल्यावर हा आधींच पागल झालेला तरुण अधिक पागल होईल ! (रत्नप्रभा मागें सरते.) हे पागल तरुणा, असा बेफाम होऊं नकोस ! काय हा अविचार करतो आहेस ? कॉलेजांत शिकतोस तें हेंच का ? तुला प्रोफेसर हेंच शिकवतात का ?

**बिन्दु०**—छेः, प्रोफेसरांना हें मुळींच शिकवितां येत नाहीं ! कॉलेजांत आल्यावर प्रोफेसरांच्या मदतीशिवाय आम्हां मुलांमुलींना स्वयंस्फूर्तीनें जें शिकतां येतें तें हें आहे ! यालाच रोमान्स म्हणतात ! पण हे वेदोपवनांतील वठलेल्या वृक्षा, तुम्हांला हे रोमान्स काय आहे तें कळणंच शक्य नाहीं. रोमान्स, प्रेम, मौज !

**धर्मा०**—हरहर ! काय ही आमच्यांतील तरुणांची अधोगति ! अथवा, त्यांच्याकडे तरी काय दोष ? हरहर ! काय हें आमच्या तरुणांना मिळणारं शिक्षण !

**रत्न०**—महाराज, म्हणजे तुम्ही शिक्षणाच्या विरुद्ध आहांत तर !

**धर्मा०**—नाहीं. मी शिक्षणाच्या विरुद्ध नाहीं. 'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' हें तर सनातन गीताधर्माचं पवित्र तत्त्वच आहे. पण मी दोष देतों तो सहशिक्षणाला ! कॉलेजची पायरी चढलेल्या मुलांमुलींनीं एका ठिकाणीं बसून शिक्षण घ्यावें हें मला पसंत नाहीं. मुलांप्रमाणंच मुलींना शिक्षण देणारीं स्वतंत्र कॉलेजें अस्तित्वांत आलीं पाहिजेत. मुलींनीं कॉलेजांत जावं, पण तें मुलींच्या कॉलेजांत !

**बिन्दु०**—अहो धर्माचार्य, तुम्ही मला [illegible] दिसत आहांत !

मुलींची स्वतंत्र कॉलेजे स्थापन झालीं तर मुलांच्या कॉलेजाचीं कान्तारें बनतील ! अरण्यें होतील ! नुसत्या बाभळीच्या वृक्षानीं गजबजलेल्या काटेरी अरण्यात रोमान्स कुठून उत्पन्न होणार ? बाभळीच्या बनात मधून मधून बोरी चमकू लागल्या तरच त्यात रोमान्स, तरच त्यात प्रेम आणि तरच त्यात मौज ! रत्नप्रभे, या रोमान्सच्या नव्या दिव्य दृष्टीन या सहशिक्षणाच्या प्रश्नाचा विचार कर म्हणजे तुलाहि मुलींच्या स्वतंत्र कॉलेजाचा अप्रयोजकपणा दिसून येईल. प्रभा, आता तरी माझ रोमान्सच तत्त्वज्ञान तुला पटू लागल का ? प्रभा, तू मोगरीची सुकुमार वेल आहेस. या जाबुवतासारखी जगली नाहीस !

**रत्न०**—बिन्दुमाधव, मला धर्माचार्यांचच तत्त्वज्ञान पटत. तुमच्या तत्त्वज्ञानांत अनर्थ आहे तर धर्माचार्यांच्या तत्त्वज्ञानात अर्थ भरलेला आहे. महाराज, आमच्या या नदनपुरात एकाद मुलींच कॉलेज निघेल का हो ?

**धर्मा०**—निघेल, मुलींचेहि कॉलेज निघेल. पण मुलाच्या कॉलेजात आपल्या तरुण मुलींना पाठविणाऱ्या आधळ्या पालकांचे डोळे उघडतील तेव्हा ! ठेच लागल्याशिवाय शहाणाहि शहाणपणा शिकत नसतो. ( कॉलेजची घटा ऐकू येते.)

**रत्न०**—महाराज, कॉलेजची घटा वाजली, मी जात्ये आता. (जाते.)

**धर्मा०**—बिन्दुमाधव, तुला नाहीं का कॉलेजात जायच ? तू इथच रेंगाळत राहिलास तर क्लासात तुझी हजेरी कशी लागेल ?

**बिन्दु०**—अहो कोरड्या तत्त्वज्ञानाचे खडक ! तुम्हाला नाहीं तें आमच गुपित कळायच ! क्लासात हजेरी लागणाऱ्या विद्यार्थ्याला क्लासात हजर रहावच लागत अस नाही ! एकाच नाव पुकारल्याबरोबर दुसरा विद्यार्थी मान खालीं घालून व किंचित् आवाज बदलून 'प्रेझेंट सर !' अस खुशाल ओरडू शकतो आणि गैरहजर विद्यार्थ्याची आपोआप हजेरी लागते ! हें आमचें गुपित आहे, तें आमच्या प्रोफेसराच्या कानावर घालूं नका हं ! बाकी, त्यात तरी कुठ बिघडणार ? आजचे प्रोफेसर कालच्या विद्यार्थीदशेंत हेंच करीत होते म्हणा !!

**धर्मा०**—करा बाबानों, काय वाटेल तें करा, पण माझी तुम्हा बेफाम तरुणाना एवढीच विनति आहे कीं, मुलींचीं स्वतंत्र कॉलेजें स्थापन होईपर्यंत तरी डोक ताळ्यावर ठेवून मुलींबरोबर वागा !

**बिन्दु०**—अहो डोकेबाज, माझ डोक या इथ अस ताळ्यावर आहे, तुमच्याच डोक्याची आधीं तुम्ही काळजी घ्या.

**धर्मा०**—बेफाम तरुणा, तुझं डोकं स्वस्थानीं आहे पण त्यांतील मेंदू चळला आहे. माझं वाक्य नीट ध्यानांत ठेव. रघुपति राघव राजाराम। पतीतपावन सीताराम ॥

**बिन्दु०**—अहो रघुपति राघव राजाराम, अहो सटक सीताराम, अहो भटक भोलाराम, जा कीं आतां एकदांचे इथून ! ( स्वगत ) हा लेकाचा वृद्ध कपि अजून इथंच आहे, ती बिंबाधरा इकडे येऊं लागली सुद्धां !

**धर्मा०**—जातों बाबा ! रघुपति राघव राजाराम ! ( जातो. )

**बिन्दु०**—अहाहा ! ही पहा, ही माझी कॉलेजमैत्रीण बिंबाधराच आली ! रोमान्स, प्रेम, मौज ! मला तर असं वाटतं कीं, ही बिंबाधरा माझ्याकडे येत नसून मूर्तिमंत रोमान्सच ठुमकत आणि मुरडत माझ्याकडे येत आहे. रोमान्स, प्रेम, मौज ! बिंबाधरे, कालचे कविकुमार तुला सौंदर्याची पुतळी म्हणतील पण आजचा हा कॉलेजकुमार तुला रोमान्सची पुतळी असंच म्हणणार ! अरे वा: ! तिनं या बाजूला मुरडून पाहिलं, रोमान्स ! अरे ही हंसली, रोमान्स ! हिच्या मुरडण्यांत रोमान्स; हंसण्यांत रोमान्स; नजरेंत रोमान्स ! रोमान्स, रोमान्स, रोमान्स ! तिच्या पाठीवर रुळणाऱ्या वेणींत रोमान्स, वांकलेल्या भुवईंत रोमान्स, पिकलेल्या अधरबिंबांत रोमान्स, हृदयांत रोमान्स, पायांत रोमान्स, इतकंच काय, पायांतील बुटांतसुद्धां रोमान्स! रोमान्स, रोमरोमांत रोमान्स!!! हं, आतां अशी मौज करावी. या रोमान्सला नवी मौज यावी म्हणून आपण त्या बांकावर हें काव्य वाचीत बसल्याचा आव आणावा ! ही बिंबाधरा त्या रत्नप्रभेसारखी अरसिक नाहीं. ही खात्रीनं आपल्या चतुर भाषणांनीं रोमान्सला नवी मौज आणील ! ( तसं करतो. )

**बिंबा०**—( प्रवेशून ) ती मेली रत्नप्रभा तरी किती अरसिक आहे ! म्हणे क्लास अटेंड करावा, प्रोफेसरांचीं लेक्चरें ऐकावीं आणि ज्ञानसंपन्न व्हावं ! नुसतें शिकून परीक्षा पासच व्हायचं मनांत आणलं तर त्या नोट्स् नाहींत का ? नोट्स् घोकल्या तरी परीक्षा पास होईलच ! त्याला कॉलेज कशाला पाहिजे आणि प्रोफेसरांची बडबड तरी कशाला पाहिजे ? मी तरी बाई कॉलेजांत आल्यें ती रोमान्सकरितां ! मला जर इथं रोमान्टिक लाइफ लीड करतां आलं तरच माझं कॉलेजांत येणं सार्थकीं लागेल !

## पद

**मजला एकाचि प्रेमा भासत । स्वर्गसुखाचा ॥**
**इतर न कांहीं सुखवि रमवि मधु भाव मनाचा ॥ ध्रु० ॥**
**सकला विद्या येथ साच रमल्या हो । सरिता सजल्या**
**प्रेमपूर्ण ज्ञानदान करिति अहा ! सकलां ॥ १ ॥**

बसाव या बागेंतच आणि नेचरपासून रोमान्स शिकावा ! ! ( बाकाकडे जाते तों तिथे बिन्दुमाधवाला पाहून ) अगबाई ! हे कोण इथ अभ्यास करीत बसलं आहे ? ( नीट पाहून ) हे तर बिन्दुमाधव ! आता याची थोडी जम्मत करावी. मी आणत्यें आता प्रिन्सिपॉलचा आव आणि याना देत्ये घाबरवून ! ( मागे लपून व गभीर स्वराने ) यू बिन्दुमाधव ! व्हॉट आर यू डुइग हिअर ? वर्गात प्रोफेसर गेले तरी तू अजून इथच ? वर्गात गैरहजर राहिल्याबद्दल तुला जबर शासन केल्याशिवाय तू ताळ्यावर येणार नाहींस ! यू बिन्दु ! डोन्च्यू हिअर मी !

**बिन्दु०**—( घाबरून ) अरे बापरे, हा तर आमच्या प्रिन्सिपॉलसाहेबाचा घणघणाट ! आता हे कडकराव मला कडक शासन केल्याशिवाय सोडीत नाहींत. आता कस कराव ?

**बिंबा०**—( गभीर आवाजाने ) यू बिन्दु, यू डन्स, यू हबग् , डोन्च्यु हिअर मी ?

**बिन्दु०**—( नम्र वाणीनें ) प्रिन्सिपॉलसाहेब, माझ्या हातून चूक झाली; मला क्षमा करा.

**बिंबा०**—आता पुनः अशी चूक तू करणार नाहींस ना ?

**बिन्दु०**—नाहीं, नाही. ( स्वगत ) एकूण, इथला रोमान्स मला चागलाच भोंवला म्हणायचा !

**बिंबा०**—( पुढें येऊन ) ठीक तर, तुम्हाला मी सप्रेम क्षमा केली आहे. लाजूं नका, इकडे पहा !

**बिन्दु०**—(पाहून) म्हणजे हा काय चमत्कार झाला ? कडकराव प्रिन्सिपॉल साहेबाची एकाएकीं सुकुमार बिंबाधरा कशी झाली ? आहे काय हे गौडबगाल ?

**बिंबा०**—अहो तुम्ही घाबरट ! हें गौडबगाल नाहीं, हे म्हटल रोमान्स आहे ! पहा, पहा, नीट पहा ! !

**बिन्दु०**—तूं मूर्तिमंत रोमान्स आहेस, हें मला अगोदरपासूनच माहित आहे. मी तुला चांगली ओळखतों, चांगलं केलंस !

**बिंबा०**—तुम्ही मला चांगली ओळखतां ना ? मग बावरलांत कां ?

**बिन्दु०**—बावरलों नाहीं. ( स्वगत ) प्रिन्सिपॉलसाहेबांच्या भीतीनें डोळे गरगरूं लागले आणि डोकं भिरभिरूं लागलं इतकंच !

**बिंबा०**—बावरलांत नाहीं, पण घाबरलांत तर खरे !

**बिन्दु०**:—छेः, मुळींच घाबरलों नाहीं. ( स्वगत ) फक्त अंगाला दरदरून घाम सुटला !

**बिंबा०**—बावरलांत नाहीं, घाबरलांत नाहीं—पण मला पाहून लाजलांत आणि क्षमा मागायला निघालांत हें तर कांहीं खोटं नाहीं ना ?

## पद

**परिहास केला । रंग आला । परि झाला उपहास ॥ ध्रु० ॥**
**मनिं लाजलां ना । नच राग माना ॥ डौल फोल तो ।**
**वरिं आतां अनुराग ॥ १ ॥**

**बिन्दु०**—अग बिंबाधरे, तुझा तो कडकलक्ष्मीचा अवतार पाहून मी लाजलों यांत आश्चर्य कसलं ? तुम्हां शिकलेल्या मुलींचे हे अवतार पाहून आम्हां पुरुषांवर आतां लाजण्याचीच पाळी आली आहे. हो, मीं तुझी क्षमाहि मागितली, पण त्यांत तरी कुठं बिघडलं ? अग, हा रोमान्सचा नवा काळ आहे. या काळांत बायकांची क्षमा मागणार नाहीं तो पुरुषच नव्हे !

**बिंबा०**—बरं पण हा नवा काळ रोमांटिक आहे हें तुम्ही कशावरून म्हणतां ?

**बिन्दु०**—या रोमांटिक काव्यावरून. हें काव्य आपल्या परीक्षेला नेमण्यांत आलं असून या काव्यांतील स्वर्गीय उच्च तत्त्वें ज्या विद्यार्थ्याला कळणार नाहींत तो परीक्षेंत फेलच होणार, आपटणार ! ही घे कविता, कळतें का तिच्यांतील उच्च तत्त्व तुला ?

**बिंबा०**—म्हणा पाहूं, पहातें अर्थ कळला तर !

**बिन्दु०**—( ओ माय लव्ह डिव्हाइन इ. कविता म्हणतो. )

**बिबा०**—छेः बाई, मला नाही या काव्यातल मर्म समजत! (लाजते.) चला, आपण ही डिफिकल्टी प्रोफेसरानाच विचारू या!

**बिन्दु०**—ऊ हुः, असल्या बाबतीत नाही त्याची बुद्धि चालायची! ते प्रोफेसर या एवढ्याशा टीचभर कवितेवर तासभर लेक्चर झोडतील, तरी पण शेवटीं ज्ञानाचा हडा कोरडा तो कोरडाच राहील! अग, हा नेचरच आपला खरा शिक्षक आहे. तो हेच शिकवितो कीं, तरुणानों आणि तरुणींनो, कॉलेज-कुमारानो आणि कॉलेजकुमारींनो, प्रेमगीताचा आत्मा रोमान्स हाच आहे. रोमान्स, प्रेम, मौज!

**बिबा०**—पण मी म्हणत्ये की, इतक हे उच्च तत्त्व तुम्हाला हो कस कळल?

**बिन्दु०**—अग वेडे, हा सहशिक्षणाचा सुपरिणाम आहे. तरुण मुलगे आणि तरुण मुली ज्या कॉलेजांत एकत्र शिक्षण घेतात त्या सहशिक्षण देणाऱ्या कॉलेजातील विद्यार्थ्यांना आणि विद्यार्थिनींना रोमान्सच उच्च तत्त्व आपोआपच कळू लागत. म्हणून मी म्हणतो कीं, सहशिक्षणच पाहिजे, मुलींची स्वतंत्र कॉलेजे नकोत!

**बिंबा०**—पण ती रत्नप्रभा म्हणते कीं, मुलींच्या उच्च शिक्षणासाठी मुलींची स्वतंत्र कॉलेजें निघायला हवींत!

**बिन्दु०**—वेडी आहे ती! मघाशींच या इथ तिचा आणि माझा खडाजगी वाद झाला. मी तिला या काव्यातील रोमान्स, प्रेम आणि मौज याची मीमासा सागू लागलों पण तिन माझा धिःकार केला. मी प्रथम तिच्यावर गरम झालो, पण तिच्या तोंडाचा तोफखाना सुरू होताच मी नरमलों आणि शेवटीं वरमलो.

**बिंबा०**—छान झाल, रत्नप्रभेन तुमची चागलीच फजिती केली. कशाला गेलात तिच्याशी लघळपणा करायला? मी तुमच्या तोंडचे रोमान्सचे धडे ऐकून घेत्यें म्हणून ती तोंडाळ रत्नप्रभा बरी तुमचीं लेक्चरें ऐकेल? आता प्रसगच आला आहे म्हणून तुम्हांला स्पष्टच विचारत्यें, तुम्ही खर प्रेम माझ्या-वर करता कीं त्या रत्नप्रभेवर? तुमच खर प्रेम जर माझ्यावरच असेल, तुम्हाला जर कॉलेज सोडल्यावर माझ्याशींच लग्न करून आयुष्य कठायच असेल तर आत्ताच तशी शपथ वहा!

**बिन्दु०**—हो, पण खऱ्या प्रेमाला शपथेचा आधार कशाला हवा? माझ प्रेम अचल आहे. माझ्यावर तुझा विश्वास नाहीं का?

**बिंबा०**—माझा तुमच्यावर विश्वास आहे; पण तुमच्या मनावर माझा विश्वास नाहीं. ' मन हें ओढाळ गुरूं ' असें पुरुषांच्या मनाचें वर्णन आहे, हें तुम्हांला माहीत आहे ना ? घ्या तर माझ्या प्रेमाची शपथ !

**बिन्दु०**—अग पण तुझे वडील मला जांवई म्हणून पसंत करतील का ? मी कोण आहें, माझी परिस्थिति काय आहे इत्यादि गोष्टी तरी तुला माहीत आहेत का ?

**बिंबा०**—मला नको ती माहिती ! ' लव्ह इज डिव्हाइन ' असंच त्या कवितेंत म्हटलं आहे ना ? मग प्रेमाच्या थोरवीपुढें इतर गोष्टींना मी काय म्हणून महत्त्व देऊं ? डिअर बिन्दुमाधव, मी तुमच्यावर प्रेम करतें आणि तुमच्याशिवाय इतर कोणावरहि प्रेम करणार नाहीं अशी निसर्गाची शपथ घेत्यें. आतां तुम्हीहि तशी शपथ घ्या.

**बिन्दु०**—बरं आहे, तुझ्या वेड्या समजुतीसाठीं मीहि, तुझ्यावरच प्रेम करीन आणि तुझ्याशिवाय इतर कोणाहि स्त्रीवर प्रेम करणार नाहीं अशी निसर्गाला साक्षी ठेवून शपथ घेतों. ( एकमेकांच्या हातांत हात देतात. इतक्यांत आंतून ' सोडा, हात सोडा ' अशी आरोळी ऐकूं येते. दोघें चपापून एकमेकांचे हात सोडतात. रत्नाकर किशोरचे हात घट्ट धरून त्याला बाहेर ओढीत आणतो. )

**किशोर**—सोडा, हात सोडा ! माझे हात कां धरतां ?

**रत्ना०**—तूं या दोघांना एकमेकांचे हात सोडण्याबद्दल इशारा दिलास म्हणून ! गाढवाच्या लेका......

**किशो०**—हां, मला शिवी देऊं नका. मला पिल्लं, गाढव म्हणूं नका.

**रत्ना०**—बदमाष !......

**बिन्दु०**—रत्नाकर, किशोरनं काय केलं ? त्याला कां शिव्या देतोस ?

**रत्ना०**—त्यानं तुम्हां दोघांना एकमेकांचे हात सोडून देण्याबद्दल इशारा दिला म्हणून ! तुम्ही दोघांनीं एकमेकांच्या हातांत हात देऊन प्रेमाच्या शपथा घेत होतां हें खरं ना ?

**बिन्दु०**—तें खरं असो वा खोटं असो, तुला काय करायच्या दुसऱ्यांच्या उठाठेवी ?

**रत्ना०**—कारण बिंबाधरा ही माझ्या प्रेमाची ठेव आहे. ती ठेव तुझ्या तिजोरींत येऊन पडणं शक्य नाहीं. ही बिंबाधरा, आपल्या यूनिटी कॉलेजांत

येऊ लागल्यापासून तिच्यावर मी प्रेम करू लागलो आहे, म्हणून तिच्यावर तू प्रेम करू नको.

**बिंबा०**—अहो पण दीडशहाणे, मी नाही ना तुमच्यावर प्रेम करीत? मला वाटल, मला पटल आणि माझ्या मनाला रुचल तर मी बिन्दुमाधवावरसुद्धा प्रेम करीन! अहो रत्नाकर, अहो रत्नाचे सागर, उर्फ अकलेचे खदक, व्हा चालते इथून!

**रत्ना०**—हा बिन्दुमाधव, घेतलेली शपथ मोडीन अस कबूल करीपर्यंत मी इथून जाणार नाहीं. बिन्दुमाधव, तुझ्या तोंडचे उत्तर ऐकण्यासाठीं मी अधीर झालों आहे.

**बिन्दु०**—मी एक रोमान्स जाणतों. रोमान्स, प्रेम आणि मौज यापुट मी सर्वांना–तुलासुद्धा–कस्पटासमान मानतो. रोमान्स, बस् रोमान्स!

**रत्ना०**—तर मग रोमॅंटिक वीराप्रमाणे द्वद्वयुद्धाला तयार हो. या रोमॅंटिक बिबाधरेवर कोणी प्रेम करायच हे जुन्यापुराण्या पण इतिहासप्रसिद्ध रोमॅंटिक तऱ्हेनच ठरवू या. प्रेमाच्या परीक्षेचा द्वद्वयुद्ध हाच एक रोमॅंटिक मार्ग आहे. (अस्तन्या माग सारतो.)

**बिन्दु०**—बिंबाधरे, दूर उभी राहून रोमान्सची मौज पहा. रोमान्स, माझ्या आयुष्याच ध्येय एक रोमान्स. (अस्तन्या माग सारतो.)

**बिबा०**—(एकीकडे) किशोर, इकडे ये. जा, पलीकडे उभा रहा आणि या दोघानी एकमेकावर हात टाकले कीं, 'प्रिन्सिपॉल, प्रिन्सिपॉल' म्हणून ओरडत सूट म्हणजे तत्काल या दोघाचा पोरकटपणा थाबेल. जा, मी सागत्ये तस केलस तर मी तुला नेहेमीप्रमाणे चागल बक्षीस देईन.

**किशोर**—बर तर. (जातो.)

**रत्ना०**—चल ये पुढ, काढतो तुझा रोमान्स बाहेर!

**बिन्दु०**—रोमान्स, बस्स रोमान्स! जीव गेला तरी बेहेत्तर, पण रोमान्सच ध्येय सोडणार नाहीं. चल, ये असा! हा मी तयार आहें. (दोघे एकमेकावर हात टाकतात इतक्यात किशोर आतून ओरडतो.)

**रत्ना०**—(चपापून) अरे बापरे, प्रिन्सिपॉलसाहेबाची स्वारी आली वाटत! त्यांनीं आमच हे युद्ध पाहिल तर ते आम्हाला रस्टिकेट केल्याशिवाय खास

राहणार नाहींत. बिन्दुमाधव, आपण हा प्रेमाचा रोमांटिक लढा पुढें केव्हां तरी लढूं, या वेळीं प्रिन्सिपॉलसाहेबांची स्वारी येत आहे, या वेळीं नको. ( जातो. )

**बिन्दु०**—नको तर नको ! रोमान्स, प्रेम, मौज ! चल बिंबाधरे, आपणहि इथून निघून जाऊं ! शेवटीं कसा कां होईना, पण कॉलेजच्या रोमांटिक वातावरणांत रोमान्साचाच जय झाला ! रोमान्स, प्रेम, मौज !

**बिंबा०**—चला तर.

## पद

**ही मंगला अजि आलि वेला । शुभ भावना सफला गणा ॥ ध्रु० ॥ नव रंग आला । प्रीतिसुमाला ॥ गोड गोड मधु सामावला ॥ १ ॥** ( जातात. )

**किशोर**—( प्रवेशून ) वाहवा ! वाहवा ! रोमान्सचा खूप मजा उडाला बुवा ! या यूनिटी कॉलेजांत मुली शिकावयास येऊं लागल्यापासून अशा मौजाच मौजा घडून येतात. मुलांमुलींच्या कॉलेजांतील गंमती तरी किती सांगाव्या !*

**पडदा**

---

## पद*

**कलीची करणी । आल्या कॉलेजांत नव तरुणी ॥ ध्रु० ॥ येती ठुमकत कॉलेजाला । जाती मुरडत त्या क्लासाला ॥ बघती चमकत चौबाजूला । जशा कीं हरिणी ॥ १ ॥ बघतां त्यांचे नाजुक नखरे । सोडिति विद्यार्थी सुस्कारे ॥ प्रोफेसरहि चित्तिं बावरे । कांपत चरणीं ॥ २ ॥ होई सर्व मामला थंडा । अभ्यासाचा गडबडगुंडा ॥ फडके प्रेमाचा परि झेंडा । वातावरणीं ॥ ३ ॥ सुट्टी होतां कॉलेजाला । जाती दूर हवा खायाला ॥ पिउनी रोमान्साचा प्याला । लागति झुरणीं ॥ ४ ॥ ऐसे रंगढंग मौजेचे । किति सांगुं मी दुबळ्या वाचें ॥ पाणीं नारळामधीं सांचे । प्रभूची करणी ॥ ५ ॥**

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

( **स्थळ** —रस्ता. रत्नाकर चिडलेला प्रवेश करतो. )

**रत्ना०**—व्हॉट् रॉट्! मत्सराच्या भरात मी त्या बिन्याबरोबर द्वद्वयुद्ध खेळायला उभा राहिलो खरा, पण मागाहून माझा मूर्खपणा माझ्या नजरेला आला! व्हॉट रॉट! द्वद्वयुद्धे जिंकून बायका मिळविण्याचे हे दिवस नाहींत हेंहि त्या वेळीं माझ्या ध्यानात आल नाही. जुने रोमाटिक इतिहास पाठ करून आम्ही शिकलेली कॉलेजर्ची पोर केव्हा केव्हा असा मूर्खपणा करीत असतो. समजा, द्वद्वयुद्धात मीं त्या बिन्याचा पाडावहि केला असता, तरीसुद्धा माझ्या गळ्यात लग्नाची माळ घालण हें शेवटी त्या बिंबाधरेच्याच हातात होत की नाही? व्हॉट रॉट? त्या बिंद्याचा पाडाव करून जर मला खरोखरच बिबेचे प्रेम सपादन करून घ्यावयाच असेल तर मला हरप्रयत्नानीं तिलाच वश करून घेतल पाहिजे. हो, त्या बिंबेला रोमान्स प्रिय आहे आणि बिदुमाधव म्हणजे मूर्तिमत चालताबोलता रोमान्स! मलाहि आता तोच मार्ग धरला पाहिजे. बस्स, आता या रत्नाकराच्या जीविताच ध्येय म्हणजे रोमान्स, प्रेम, मौज! रोमान्स, प्रेम, मौज!!

**किशोर**—( प्रवेशून ) वाहवा, वाहवा! हे रत्नाकर सुद्धा रोमान्स घोकू लागले का? आमच्या कॉलेजातलीं सर्व मुले—मुलीसुद्धा—ज्या रोमान्साची एवढी आराधना करतात, तो बेटा रोमान्स आहे तरी कोण? आपण आता रोमान्सचा अर्थ याच राजेश्रींना विचारावा! ( जवळ जाऊन ) बिदुमाधव, क्या तुम्हारी बात?

**रत्ना०**—कायरे किशोर? मी रत्नाकर आहे एवढेहि तुझ्या लक्षात आल नाही का? अरे मी बिंदुमाधव नाही, रत्नाकर आहे.

**किशोर**—क्या तुम्हारी बात? तुम्ही रोमान्स घोकीत होता तेव्हा मला वाटल कीं, तुम्ही बिंदुमाधवच असाल! रोमान्स, रोमान्स! क्या तुम्हारी बात! पण काहो रत्नाकर, हा बेटा रोमान्स असा आहे तरी कोण? तो बेटा दोन पायांचा आहे कीं चार पायाचा?

**रत्ना०**—हा आम्हा कॉलेजकुमाराना व कॉलेजकुमारीना वेड लावणारा रोमान्स दोन पायाचाहि नाही आणि चार पायाचाहि नाही. तो स्वतः आहे

बिनपायांचा; पण त्याची जादू एवढी विलक्षण आहे कीं, तो हळूच आमच्या हृदयांत घुसतो आणि आम्हां दोन पायांच्या तरुणांना चार पायांच्या प्राण्यां-सारखें नाचवतो! थोडक्यांत सांगायचं म्हणजे दोन पायांच्या बहकलेल्या तरुणांना जो चार पायांचे बैलोबा बनवितो तो रोमान्स!

**किशोर**—म्हणजे तुम्ही आजपासून बैलोबा झालां आहांत, होय ना? वाहवा, क्या तुम्हारी बात!

**रत्ना०**—बरं पण किशोर, तूं रे कुठं चालला आहेस? आणि हें रे काय तुझ्या हातांत?

**किशोर**—रोमान्स, प्रेम, मौज! हें एक गुपित आहे आणि तें मी तिच्याकडून त्याला नेऊन देतों आहें. क्या हमारी बात!

**रत्ना०**—अरे पण या गुपितांतली ती ती कोण? आणि हा तो कोण?

**किशोर**—वाहवा, क्या तुम्हारी बात! अहो, मी हे गुपित जर तुम्हांला विनाकारण सांगितलं तर तें गुपित कसं राहील? म्हणे गुपित काय तें सांग! क्या तुम्हारी बात! मी कारणाशिवाय कुणाचंहि गुपित फोडीत नसतों.

**रत्ना०**—म्हणजे तुला हें गुपित फोडायला कारण पाहिजे, असंच ना? हें घे कारण! (त्याला रुपया दाखवतो.)

**किशोर**—छेः छेः, हें पाप आहे. मी या पापाला हात लावणार नाहीं. वाहवा! मला तुम्ही लांच देऊन पाप करायला लावतां? क्या तुम्हारी बात!

**रत्ना०**—हें पाप आहे ना? तूं त्याला आपल्या हातानं स्पर्श करूं नको म्हणजे झालं! तूं डोळे मिटून घे म्हणजे मी हें पाप माझ्या स्वतःच्या हातांनीं तुझ्या खिशांत टाकतों. म्हणजे तूं स्वतः पापाला स्पर्श केला नाहीस आणि माझं पाप तुला दिसलं नाहीं, असं होईल!

**किशोर**—क्या तुम्हारी बात! म्हणजे तुमचं पाप मला दिसूं नये म्हणून काय मी माझे डोळे मिटून घेऊं? क्या तुम्हारी बात! (डोळे मिटून घेतो व रत्नाकर त्याच्या खिशांत रुपया टाकतो.) काय, केलंत पाप! उघडूं डोळे? क्या तुम्हारी बात!

**रत्ना०**—नको, इतक्यात डोळे उघडू नकोस, मला आणखी एक पाप करायच आहे. ( त्याच्या हातातील पत्र घेऊन ) हे मी दुसर पाप केल. आतां खुशाल डोळे उघड.

**किशोर**—अहो, पण हे काय केलत तुम्ही ? तिच तें पत्र मला त्याला नेऊन द्यायचं आहे ना ?

**रत्ना०**—तुला नको त्याची काळजी. मी करतो ते गुप्त काम ! तू जा परत.

**किशोर**—अहो, पण मी ते गुप्त पत्र जर त्याला दिल नाही तर ती काय म्हणेल ? क्या तुम्हारी बात !

**रत्ना०**—ती काहीं म्हणणार नाहीं. मी ते पत्र त्याला दिल म्हणजे झाल कीं नाही ? जा आता मुकाट्यान, नाही तर देईन एक थप्पड !

**किशोर**—वाः, क्या तुम्हारी बात ! माझ्या हातातल पत्र हिसकावून घेऊन मलाच उलट दरडावता ? क्या तुम्हारी बात ! मला हातोहात फसवून माझ्यावरच तुम्ही हात टाकता ? तुमची ही हातचलाखी मी प्रिन्सिपॉलसाहेबाच्या कानावर घालीन, सोडणार नाही. म्हटल—मी यूनिटी कॉलेजचा चपरासी आहे.

**रत्ना०**—तू चपरासी आहेस आणि म्हणूनच माझ्या हातची चपराक खाशील ! व्हॉट रॉट ! चल, हो चालता ! लेकाचा चोरट्या प्रेमपत्रिका पोच-विण्याचा धदा करतो आणि वर मलाच तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सागतो. थाब, मीच आता हे गुप्त पत्र प्रिन्सिपॉलसाहेबाना नेऊन दाखवितों—मग पाहतो तुझी कशी कबक्ती होते ती. व्हॉट रॉट ! देऊ हे गुप्त पत्र प्रिन्सिपॉलसाहेबाना ? सागू हा तुझा धदा त्याना ?

**किशोर**—( घाबरून ) नका, एवढ मात्र करू नका. प्रिन्सिपॉलसाहेबाना हें कळल तर ते मला कामावरून हाकलून लावतील ! महाराज, मघाशीं तुम्ही माझ्या खिशाकडे पाहिलत, आता माझ्या पोटाकडे पहा !

**रत्ना०**—अस्स ? बर तर जा. तुला मीं एकवार क्षमा केली आहे.

**किशोर**—तुम्ही मला क्षमा केलीत ? क्या तुम्हारी बात ! (जाता जाता स्वगत) यांनीं केल पाप आणि क्षमा करतात मला ! काय जगाची उलटी रीत आहे पहा ! बा जगता ! तू अजब आहेस, क्या तुम्हारी बात ! ( जातो. )

**रत्ना०**—( पत्र हातांत घेऊन ) व्हॉट रॉट ! हें त्या बिंबेचं गुप्त पत्र. तिनं तें बिन्दुमाधवाला लिहिलेलं आहे. ठीक आहे. मी मत्सराच्या भरांत त्याला द्वंद्वयुद्धांत घायाळ करणार होतों, पण त्याची आतां गरज उरलेली नाहीं. योग्य संधि साधून हा विषारी बाण त्याला मारला म्हणजे तो आपोआप घायाळ होईल. वाहवारे मुलांमुलींचं सहशिक्षण ! वाहवारे यूनिटी कॉलेज ! वाहवारे रोमान्स, वाहवारे प्रेम, वाहवारे मौज !!! ( तो जाऊं लागणार इतक्यांत वयोवृद्ध, पडशी खांद्यावर घेतलेला कोंकण्या अप्पाराव प्रवेश करतो. )

**अप्पा०**—हरे राम ! हरे राम ! अहो साहेब, या नंदनपुरांतलं यूनिटी कालीज कुठं आहे ? मला त्या कालीजांत जायचं आहे, कुठं आहे तें कालीज ? हरे राम !

**रत्ना०**—व्हॉट रॉट ! काय तुम्हांला कॉलेजांत जायचं आहे ? व्हॉट रॉट ! हा थेरडा आतां कॉलेजांत जाणार ? असे थेरडेसुद्धां जर कॉलेजांत येऊं लागले तर तरुणांना व तरुणींना वेड लावणारा तो पोरकट रोमान्ससुद्धां, या थेरड्यांच्या सहवासानं पोक्त बनेल ! हा थेरडा कॉलेजांत जाणार ? व्हॉट रॉट !

**अप्पा०**—बोला हो, तें कालीज–कुठं आहे ? हरे राम !

**रत्ना०**—( त्रासून ) अहो थेरडे हरेराम ! मला नका सतावूं ! तुम्हांला काय विचारायचं तें दुसऱ्या कोणा रिकामटेकड्यांना विचारा ! म्हणे, कालीज कुठं आहे ? व्हॉट रॉट ! इथं कालीजहि नाही आणि काळीजहि नाहीं !

**अप्पा०**—अहो पण तुम्हांला काळीज आहे ना ? मी असा म्हातारा, कुठं आणखी हिंडूं ? तुम्हांला तरी काळीज आहे ना ?

**रत्ना०**—व्हॉट रॉट ! आम्हां कॉलेजच्या तरुणांना काळीज ? हो आहे, आम्हांला काळीज आहे, पण तें रोमान्सच्या वेड्या कल्पनांनीं कुचकामाचं झालेलं आहे. चल, थेरड्या सतावूं नकोस मला, व्हॉट रॉट !

**अप्पा०**—अहो त्या कालीजांत माझा मुलगा बिन्दुमाधव शिकतो आहे हो ! माझ्या मुलाची मला भेट घ्यावयाची आहे. हरे राम !

**रत्ना०**—व्हॉट रॉट ! तुम्ही त्या बिन्दुमाधवाचे बाप आहांत ! अरेरे ! किती दुःखाची गोष्ट आहे ही !

**अप्पा०**—हरे राम ! काय बोलतां तुम्ही हें ? मी बिन्दुमाधवाचा बाप आहें ही दुःखाची गोष्ट कशी ?

**रत्ना०**—ही दुःखाचीच गोष्ट आहे, कारण तुमचा मुलगा रोमान्सच्या नादीं लागलेला आहे, तुम्ही त्याला बाप शोभत नाही. तुमचा बिन्दु ऐटदार पोषाख करतो तर तुमचा पोषाख गबाळ आहे. तुमचा बिन्दु छाती वर काढून चालतो तर तुमच पेकाट मोडलेल आहे. तुमचा बिन्दु फॅशनच गौडबंगाल जाणतो पण तुम्ही तर नुसते कंगाल आहात ! म्हणून म्हणतो, तुम्ही बिन्दूचे बाप शोभत नाही. कुठ तो आणि कुठ तुम्ही ! व्हॉट रॉट ?

**अप्पा०**—हरे राम ! काय ऐकतो मीं हे ? ज्या मुलाच्या शिक्षणासाठीं मीं माझ घरदार गहाण टाकल आणि शेवटी सावकारान घरातून हाकून लावल्यामुळे असा देशोधडीला लागलो तो माझा बिन्दु खरोखरच बहकला असेल का ? बोला, खर काय असेल ते बोला, माझी छाती धडधडू लागली. हरे राम !

**रत्ना०**—काही हरकत नाही. औषधोपचार केले तर तुमच्या छातीतली कळ थांबेल आणि तुमची बिघडलेली प्रकृति ताळ्यावर येईल. पण हे बिन्दूच्या बापा, काय सांगू ? कस सांगू ? तुमचा तो बहकलेला पोर मात्र ताळ्यावर येण शक्य नाही. व्हॉट रॉट !

**अप्पा०**—म्हणजे त्यान अस केल तरी काय ?

**रत्ना०**—व्हॉट रॉट ! ते मी कस सांगू तुम्हाला ? त्याची हकीकत तुम्हाला कळली तर, तुम्ही इथच्या इथ छाती फुटून प्राण सोडाल ! व्हॉट रॉट ! !

**अप्पा०**—अहो, मग ती कुवार्ता लौकर तरी सांगा ! ही पहा माझ्या छातींत कळ आली ! हरे राम !

**रत्ना०**—काहीं हरकत नाही, तुम्ही छाती फुटून मेलात तरी हरकत नाहीं, पण ती हकीकत ऐकू नका.

**अप्पा०**—अहो, सांगा लौकर, तुमच्या पाया पडतो—पण असा माझा अंत पाहू नका. हरे राम !

**रत्ना०**—ऐकाच तर ! तुमच दुर्दैव ! तुमच्या मुलान, तुम्ही घरदार गहाण टाकून दिलेले सर्व पैसे एका फटाकड्या पोरीच्या नादान उधळून टाकले ! ती आहे एका श्रीमंताची पोर. ती त्याला प्रेमाच्या गुलजार थापावर नुस्ती झुलवते आहे ! ती शेवटीं तुमच्या मुलाला फशीं पाडणार आणि मग तुमचा

मुलगा पागल बनून वस्तऱ्यानें आपला गळा कापून घेणार ! हल्लीं अशा पुष्कळ पागल तरुणांनीं आत्महत्या केलेल्या आहेत. पहा बुवा ! इतकं करून तुम्हांला त्याची भेट घ्यायची असेल तर खुशाल घ्या. ती समोर मोठी थोरली जंगी इमारत दिसते आहे ना ? तें आहे यूनिटी कॉलेज. तिथंच बाजूच्या वसतिगृहांत तुमचा मुलगा राहतो. तिथं गेलांत तर कोणीहि तुम्हांला त्याची खोली दाखवील ! पण हो, एक पंचाईत आहे. तुम्हाला तो ओळख देईल कीं नाहीं याचीच शंका वाटते. तुम्ही त्याचे बाप नाहीं असं जर का बिन्दूकडून इतर मुलांना कळलें तर मात्र तुमच्या फटफजितीला पारावार उरणार नाहीं. अरेरे ! म्हातारपणीं तुमच्यावर असा प्रसंग यावा ना ? व्हॉट रॉट !

**अप्पा०**—तुम्ही कां उगीच दुःखी होतां ? माझं दुःख मी भोगीन. काय वाटेल तो प्रसंग येवो, मी त्याची भेट घेणारच ! हरे राम, हरे राम ! ( जातो, रत्नाकर त्याला पोंचवून परत येतो. )

**रत्ना०**—वाहवा, खूप मौज उडाली ! माझं कपटनाटक आतां खूप रंगणार ! ठीक झालं, हा थेरडा बिन्याचा बाप असला तरी तो आतां माझ्या भात्यांतला विषारी बाण झालेला आहे. ( जाऊं लागतो तों दुसऱ्या बाजूनें रत्नप्रभा येतांना दिसते. ) व्हॉट रॉट ! आज माझं नशीब तर खूप जोरावर दिसतं आहे. ही रत्नप्रभा इकडेच येते आहे. तिला आतां आपल्या कपटजालांत अडकवावी. साधला डाव तर माझा रोमान्स सफल होईल. डाव नच साधला तर निदान बिंबाधरेचा डाव विफल करायला ही उपयोगी पडेल. या तुम्ही प्रभा...प्रभा...

**रत्न०**—कां, बोलतांना असे अडखळलांतसे ? प्रभा काय ? एवढी कसली अडचण पडली ?

**रत्ना०**—हो, प्रभा म्हणतांच फार मोठी अडचण उद्भवली. तुम्हांला प्रभाबाई म्हणावं कीं प्रभाताई म्हणावं हा विचार मनांत येतांच जीभ सहाजिक अडखळली. व्हॉट रॉट ! आतां मी तुम्हांला प्रभाताई म्हणूं कीं प्रभाबाई म्हणूं ? व्हॉट रॉट, इकडे ताईचा आड तर तिकडे बाईची विहीर अशा संकटांत मी सांपडलों आहें, व्हॉट रॉट !

**रत्न०**—हं, इतक्या संकटात पडूं नका. इकडे आडातहि पडूं नका आणि तिकडे विहिरींतहि उडी घेऊ नका. नुस्त साध प्रभा असं जरी मला म्हटलंत तरी सुद्धा चालेल.

**रत्ना०**—तुम्हाला चालेल, पण..

**रत्न०**—पणबीण कांही नाही. तुमच्यासारख्या रोमान्सच्या नादी लागलेल्या कॉलेजकुमाराकडून नुस्त प्रभा म्हणवून घेणहि धोक्याच आहे. रत्नाकर, तुम्ही मला आपल प्रभाताईच म्हणा कसे! प्रभाबाई हें फार पोक्त नाव होत. शिवाय, कॉलेजकोर्स संपेपर्यंत मला कोणाहि बुवाची बाई व्हायच नाहीं, समजल ना रत्नाकर?

**रत्ना०**—( स्वगत ) ही प्रभा मोठी वस्ताद आहे! ती नाही मला वादविवादात टिकाव धरू द्यायची! शिवाय, मला या वेळीं असला वाद करण श्रेयस्करहि होणार नाही. हिला प्रभाताईच म्हणाव म्हणजे हिचा माझ्यावर विश्वास बसेल व ही माझ्या कपटकारस्थानाला उठाव आणण्याच्या कामी उपयोगी पडेल.

**रत्न०**—विचार कसला करता आहात एवढा?

**रत्ना०**—प्रभाताई, माझा विचार कळला तर तुम्ही मला मदत कराल कीं नाहीं हाच विचार करतो आहे.

**रत्न०**—कोणत्या कामात तुम्हाला माझी मदत पाहिजे आहे? ते काम जर चांगल असल तर मी तुम्हाला आनंदान मदत करीन.

**रत्ना०**—काम चांगल आहे, पण ते रोमांटिक आहे. बिन्दुमाधव व बिंबाधरा ही दोघ रोमान्सच्या नादान वेडावून गेली आहेत हें तुम्हाला माहीतच आहे. परवा तर त्या दोघांनीं एकांतात प्रेमाच्या शपथासुद्धा घेतल्या. व्हॉट रॉट्!

**रत्न०**—मग एकान दुसऱ्यावर प्रेम करण हें वाईट का आहे?

**रत्ना०**—व्हॉट् रॉट! प्रेम ही चीज मुळात वाईट नाहीं, पण रोमान्सच्या नादान वेडावलेल्या तरुण-तरुणींनीं एकमेकावर प्रेम करण आणि तशा शपथा एकान्तात घेण हें चांगल का?

**रत्न०**—पण हा गुप्त शपथविधी तुम्हाला कसा कळला? का ती बिंबा वेडावली म्हणून तुम्ही मत्सरान चिडला आहात? तुम्ही सुद्धा त्यातलेच कीं काय?

**रत्ना०**—व्हॉट् रॉट ? मी आणि त्यांतला, हें शक्य नाहीं. एखाद्या वेळीं या सहशिक्षणाच्या अभिमानी नंदनपुरांत स्वतंत्र असं मुलींचं कॉलेज निघेल, पण मी रोमान्साच्या भुतानं पछाडला जाणं शक्य नाहीं. व्हॉट् रॉट ? प्रभाताई, तुम्ही माझ्यासारख्या सालस कुमाराबद्दलहि अविश्वास दाखवतां ? दुर्दैव माझं, व्हॉट् रॉट !

**रत्न०**—दुर्दैव तुमचं नाहीं, दुर्दैव ओढवलं आहे तें आम्हां तरुण मुलींचं ! मुलींचं स्वतंत्र असं कॉलेज नसल्यामुळं आम्हांला मुलांच्याच कॉलेजांत जावं लागतं आणि मग तुम्हां तरुणांना आम्हांला पाहून रोमान्सचं भूत पछाडतं, खरं ना ? म्हणून म्हणतें कीं, या एवढ्या सुधारलेल्या नंदनपुरांत एकादें मुलींचं कॉलेज नसावं हें आमचं दुर्दैवच होय. आतां हेंच उदाहरण पहा. सुधारणेचे आणि सहशिक्षणाचे भोक्ते एवढे अण्णासाहेब इनामदार, पण त्यांना जर कां आपल्या मुलीचे—बिंबाधरेचे—रोमान्सचे चाळे कळले तर ते मोटारगाडीच्या कंदिलाप्रमाणें डोळे फाडतील आणि इंजनांतल्या कोळशाप्रमाणं संतापानं लाल होतील ! आतां अशा गृहस्थांनीं आपल्या मुलीला सहशिक्षण देणाऱ्या कॉलेजांत कां धाडावं बरं ? पण सध्यां आम्हां मुलींचंच दुर्दैव ओढवलं आहे ना ? त्याला ते बिचारे अण्णासाहेब तरी काय करतील ?

**रत्ना०**—व्हॉट् रॉट ? बिंदूच्या व बिंबेच्या विवाहाला अण्णासाहेब विरोध करतील ? व्हॉट् रॉट ?

**रत्न०**—हो, विरोधच करतील. कारण ते स्वतःचं कुल उच्च मानतात आणि बिन्दुमाधवाच्या कुलाला नीच लेखतात. अण्णासाहेब कितीहि सुधारले असले तरी समाजाचा रोष पत्करून ते मिश्रविवाहाला संमति देण्यास तयार होणंच शक्य नाहीं.

**रत्ना०**—व्हॉट् रॉट ! हें संकट नव्हतं माझ्या लक्षांत आलं ! पण प्रभाताई, हें संकट जर उद्यां उभं रहाणार असेल तर त्यांना आज नको का जागं करायला ? म्हणजे ते एव्हांपासून बिंबेच्या मनाला बंध घालतील.

**रत्न०**—पण अण्णासाहेबांची खात्री करून देण्यासारखा आपल्याजवळ तरी असा कोणता भक्कम पुरावा आहे ? प्रत्यक्ष पुराव्याच्या अभावीं ते आपल्या इशाऱ्याला कवडीचीहि किंमत देणार नाहींत. शिवाय ते पडले ऑनररी मॅजिस्ट्रेट ! प्रत्यक्ष पुराव्याच्या अभावीं न्यायाधिशाला खऱ्या खुनी इसमालासुद्धां फांशीं देतां येत नाहीं, हें तुम्हांला माहीत असेलच !

**रत्ना०**—तशा प्रत्यक्ष पुराव्याशिवायच अडल असेल तर हा पहा तो पुरावा ! (पत्र दाखवून ) ही प्रेमपत्रिका असून ती बिंबाधरेन बिंदुमाधवाला लिहिलेली आहे. पुरावा स्पष्ट आहे आणि खात्री पटविणाराहि आहे. बोला, करता या पुराव्याचा उपयोग ?

**रत्न०**—(स्वगत) हे गुप्त पत्र आहे आणि त्याचा उपयोग करून अण्णासाहेबाना सावध करण हे माझ्या जिवलग मैत्रिणीचा–बिंबाधरेचा–विश्वासघात करण्यासारखच आहे. पण काय करणार ? पुढ तिच आयुष्य मातीमोल होऊं नये म्हणून मला हे पत्र अण्णासाहेबांना दाखविण जरूरच आहे. देवा, माझ्या मैत्रिणीचा पुढं होणारा घात टळावा म्हणून मी चागल्या बुद्धीनेच हे विश्वासघाताच काम करीत आहें याबद्दल तू मला क्षमा कर.

**रत्ना०**—व्हॉट् रॉट ! प्रभाताई, इथ आणखी उभ राहून बोलण बर नाहीं. तिकडे चला म्हणजे आपण ही गोष्ट अण्णासाहेबाच्या कानावर कशी घालावयाची तें सविस्तर ठरवू !

**रत्न०**—चला तर तिकडे. (जातात.)

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—यूनिटी कॉलेजचें विद्यार्थीवसतिगृह. बाहेरच्या बाजूस किशोर उपस्थित. )

**किशोर**—या यूनिटी कॉलेजात फटाकड्या पोरी येऊ लागल्यापासून मोठी गंमत उडून गेली आहे. खलबतें, गुप्त भेटी आणि पत्रापत्री याची तर एवढी दगल माजून राहिली आहे कीं कांहीं विचारू नका. आत्ताच पहाना, सर्व मुलें कॉलेजात गेलीं पण आमचे बिंदुमाधव कोणा तरी गुलजार मित्राबरोबर आपल्या खोलींत खलबत करीत बसले आहेत. हा त्याचा गुलजार मित्र कोण असावा ? अथवा शका कसली ? हें तेंच त्रांगड असल पाहिजे. त्याशिवाय त्यानीं मला इथं पहारा करीत बसायला सागितलं नसतं ! कांहीं का असेना, या किशोर

चपराशाची मात्र तूर्त चैन चालली आहे ! खलबतें करा, माझी चैन ! भेटी घ्या, माझी चैन ! पत्रापत्री करा—तरीहि माझीच चैन ! *

**अप्पाराव**—( प्रवेशून) हरे राम ! शिपाईदादा, अहो शिपाईदादा, माझ्या बिंदुमाधवाची खोली कोणती ?

**किशोर**—ती त्यांची खोली ! पण कांहो थेरडोपंत, तुम्ही कोण ?

**अप्पा०**—हरे राम ! मी त्याचा बाप. मला त्याची भेट घ्यावयाची आहे. आहे का तो खोलींत ?

**किशोर**—तुम्ही त्यांचे बाप असा, नाहीं तर त्यांच्या बापाचे बाप असा, ते तुमच्यासारख्या थेरड्यांच्या भेटी घेत नसतात ! ते भेटी घेतात, अगदीं गुप्त भेटी घेतात, पण त्या...पण छेः, मला नाहीं विनाकारण गुप्त गोष्टी फोडतां येत.

**अप्पा०**—हरे राम ! अरे पण माझ्या बाबा...

**किशोर**—छट्, मी नाहीं तुमचा बाबा ! धंद्याच्या बाबतींत मी फार कडक आहें. बापाला सुद्धां मी बाप म्हणणार नाहीं, मग तुमचा बाप होईन ही आशाच सोडा !

---

**पद***

**चपरासी मी छान । आहें । चाले माझी चैनरे ॥ ध्रु० ॥**
**पत्र तियेचें त्याला देतों । उत्तर त्याचें तिजलागीं ।**
**पत्रापात्रि पेशी चालतां चाले माझी चैनरे ॥ १ ॥**
**भेटी घेती गुप्तपणानें । उभा करिति मज बाहेरी ॥**
**भेटीगांठी अशा चालतां चाले माझी चैनरे ॥ २ ॥**
**वेड माजलें रोमान्साचें । खेळ माजले प्रेमाचे ।**
**दिनरातीं अशि मौज चालतां चाले माझी चैनरे ॥ ३ ॥**
**घरुनी येती मनीऑर्डरी । पैशाची नाहीं पर्वा ॥**
**पैशाचे परि खेळ चालतां चाले माझी चैनरे ॥ ४ ॥**
**कोणी वंदा कोणी निंदा । माझा धंदा रोखीचा ॥**
**मरो नोवरा मरो नोवरी । चाले माझी चैनरे ॥ ५ ॥**
**कॉलेजांतलि मुलें आणि मुलि । मनांत झुरती तळमळती ॥**
**अभ्यासाची झाली माती । चपराशाची चैनरे ॥ ६ ॥**

**अप्पा०**—हरे राम ! अरे पण अस काय करतोस ? जा, बिंदुमाधवाला सांग कीं, तुझा बाप आला आहे.

**किशोर**—ते सुद्धा माझ्यासारखेच कडक आहेत. ते बापाला बाप म्हणतील कीं नाहीं याची सुद्धां मला शका येते. (हळू आवाजानें) ते या वेळीं एका गुलजार मित्राशीं खलबत करीत बसले आहेत.

**अप्पा०**—कोणरे हा त्याचा गुलजार मित्र ? हरे राम !

**किशोर**—तें एक गुपित आहे आणि मी कोणतहि गुपित विनाकारण फोडीत नसतों. कारण दाखवा, चागल वाजवून दाखवा.... .

**अप्पा०**—हरे राम ! दाखवतों हा कारण चागल वाजवून तुझ्या कानशिला-वर ! हो बाजूला, नाहीं तर रगवतों तुझें कानशील ! काय लेकाचा हा चपरासी तरी मगरूर आहे ? बापालाहि बाप म्हणत नाहीं ! (त्याच्या अगावर धावून जातो.) बदमाष कुठला ?

**किशोर**—(स्वगत) बदमाष कुठला !

**अप्पा०**—चोर लेकाचा !

**किशोर**—(स्वगत) चोर लेकाचा !

**अप्पा०**—हरामखोर नाहीं तर !

**किशोर**—(स्वगत) हरामखोर नाहीं तर ! (उघड) हा, हात उगारू नका ! मी म्हटल कॉलेजचा चपरासी आहें, तुमच्यासारखा लुगासुगा बाप नाही !

**बिन्दु०**—(गडबड ऐकून बाहेर येतो.) किशोर, काय आहेरे गडबड एवढी ? आणि हा रे कोण थेरडा ?

**किशोर**—(हळूच) हा तुमचा बाप !

**बिन्दु०**—काय, माझा बाप ?

**अप्पा०**—हो, हो, मुला ! तुझा बाप ! हा तुझा बाप तुझी भेट घ्यायला आला आहे बरें ! हरे राम !

**किशोर**—(स्वगत) अरे बापरे, हाच मुलाचा बाप ! आता बापाची आणि मुलाची खूप जुंपणार ! आपण आपल बाजूला उभ रहाव ! (जातो.)

**बिन्दु०**—(स्वगत) आतां कसं करावं ? खोलींत तर बिंबाधरा बसली आहे. आतां या थेरड्याला कसा वाटेला लावावा ? (उघड) बाबा, मला या वेळीं क्षमा करा. हें कॉलेजचें वसतिगृह आहे. इथं रेक्टरच्या परवानगीशिवाय मला कुणाचीहि भेट घेतां येत नाहीं. तुम्ही गांवांत जाऊन त्या आनंदाश्रमांत उतरा, मी तिथंच तुमची भेट घेईन !

**अप्पा०**—हरे राम, हरे राम ! कायरे तुझी ही बुद्धि पालटली ! तुला इथं एकान्तांत गुलजार मित्रांच्या भेटी घ्यायला कुणाची परवानगी लागत नाहीं आणि बापाची, सख्ख्या बापाची भेट घ्यायला परवानगी लागते काय ? मी तुझा बाप आहें, मी कुणाच्याहि बापाला भीत नाहीं. चल खोलींत.

**बिन्दु०**—पण बाबा...

**अप्पा०**—अरे बाबा, चल मुकाट्यानं ! चल, चल ! (त्याला आंत ढकलीत नेतो.) (खोलीचा अंतर्भाग दिसूं लागतो.)

**बिंबा०**—(फॅशनेबल पुरुषवेषांत) ओ माय लव्ह डिव्हाईन ! (गीत गाते.)

**पद**

**भरला जगांत प्रेमा । ठसला मनांत प्रेमा ॥ रमला जनांत प्रेमा । अणुरेणुमाजि प्रेमा ॥ ध्रु० ॥ मी प्रेमरंगिं नटलें । प्रेमांत जीव डोले ॥ प्रेमा मला विसावा । आनंद एक ठावा ॥ १ ॥**

**अप्पा०**—(बिन्दुमाधवासह प्रवेशून) हरे राम ! कायरे बिन्दु, हा कोण बुलबुल तुझ्या खोलींत गातो आहे ? (स्वगत) हरे राम ! मघाशीं जी मला या पोराच्या छांदिष्ट वर्तनाची हकीकत कळली ती खरी तर नसेल ? दिसायला आहे बुलबुल, पण आवाजी आहे कोकिळेची ! (उघड) हरे राम ! काय रे तूं कोण आहेस ? 'तो' बुलबुल कीं 'ती' कोकिळा ?

**बिंबा०**—(चिडून) थेरड्या, मी बुलबुल असेन नाहीं तर कोकिळा असेन, तुला कावळ्याला काय करायच्या चांभारचौकशा ? बिन्दुमाधव, कोण हा थेरडा ?

**बिन्दु०**—हे आमच्या तिकडचे कोंकणांतले एक वृद्ध गृहस्थ आहेत.

**अप्पा०**—हरे राम ! कारट्या, काय रे बोलतोस हें ? अहो बुलबुल, मी याच्या तिकडचा नाही, मी याचाच बाप आहे.

**बिंबा०**—वाहवा थेरडोपत ! पाहुणे म्हणून आलात आणि बाप होऊन बसलांत का ? बिन्दुमाधव, असल्या निर्लज्ज थेरड्याला इथ क्षणभरहि उभे करू नका. थेरडोपत, हे तुमचे पुत्र नाहीत आणि तुम्ही त्याचे बाप नाहीं ! होय ना पण ?

**अप्पा०**—हरे राम ! ते मला कशाला विचारता ? या कारट्यालाच विचारा. कायरे, मी तुझा बाप नाही ?

**बिन्दु०**—( मन कठोर करून ) नाहीं, तुम्ही माझे बाप नाहीं आणि मी तुमचा मुलगा नाहीं. तुम्ही जर माझे बाप झालात तर इथलीं सारी मुलें तुम्हांला तोंडावर हसतील !

**बिंबा०**— हॅ, हॅ, हॅ ! वाहवारे बाप ! काय पण बाप ! काय हो थेरडोपत, तुमच्या वयाला साठ वर्षे झालीं असतील, नाहीं ? म्हणूनच तुमची साठी बुद्धि नाठी झाली आहे ! हॅ, हॅ, हॅ !

**अप्पा०**—हरे राम ! कारट्या, असल्या पाचकळ मित्राची सगती धरलीस आणि म्हणूनच बहकलास बर !

( आतून आवाज ऐकू येतात. )

**अण्णासाहेब इनामदार**—( आतून ) कुठं आहे, कुठ आहे तो बहकलेला तरुण ? किशोर, मला अडवू नकोस !

**किशोर**—( आतून ) अण्णासाहेब इनामदार, आत जाऊ नका. अण्णासाहेब इनामदार,.........

**बिंबा०**—( घाबरून ) कोण, अण्णासाहेब इनामदार ? माझे बाबा ? बिन्दुमाधव, बाबा आले ! आता कस करू ? अगबाई......

**अप्पा०**—'अगबाई !' हरे राम, हरे राम ! अग बाई, तुझे बाबा आले, होय ना ? आता लपवा आपलीं काळवडलेलीं थोबाड !

**बिन्दु०**—होय बिंबाधरे, तिथ लपून बस ! बस त्या तिथ ! (तिला लपवितो.) बाबा, कृपा करा, त्या तिथ लपून बसा !

**अप्पा०**—हरे राम ! कांरे बाबा, मीं कां आपलं तोंड लपवूं ? तोंड लपवायला मी काय त्या अण्णासाहेब इनामदाराची बहकलेली पोर थोडीच आहे ? हरे राम !

**अण्णा०**—( प्रवेशून ) कुणाची पोर बहकली ? माझी ?

**अप्पा०**—हो, हो, तुमची ! हरे राम !

**अण्णा०**—पण तूं रे कोण थेरड्या, माझ्या मुलीला बहकली म्हणणारा ?

**अप्पा०**—मी बिन्दुमाधवाचा बाप !

**अण्णा०**—बिन्द्या, असल्या कंगाल बापाच्या पोटीं जन्माला येऊन माझ्या श्रीमंत आणि उच्च कुलांतल्या सालस पोरीला प्रेमाची भुरळ घालतोस ? मला तुझा सर्व पाजीपणा कळलेला आहे. कुठं आहे माझी मुलगी ?

**बिन्दु०**—असेल क्लासांत बसलेली, मला काय विचारतां ? आणि नीट चौकशी केल्याशिवाय माझ्यावर कां भलभलते आळ घेतां ?

**अण्णा०**—भलभलते आळ घेतों ? माझी बिंबा क्लासांत नाहीं. ती इथंच तुझ्याकडे आली असली पाहिजे. दाखव मला माझी मुलगी ! तिनं म्हणे तुझ्यासारख्या गाढवाला लग्नमाळ घालण्याची शपथ घेतली आहे ! बिन्द्या, लक्षांत ठेव, गाढवानं कितीहि खरारा करून घेतला तरी त्याला घोडा होतां येत नाही !

**अप्पा०**—ए अण्णासाहेबा, माझ्या मुलाला गाढव म्हणण्याचा गाढवपणा करूं नको ! हरे राम ! शहाण्याच्या कांद्या ! तूं आपल्या मुलीला घोडीएवढी वाढवलीस, मुलांच्या कालीजांत शिकायला पाठवलीस, आतां ती लाथा झाडणारच ! करावं तसं भरावं ! भांग पेरलीस, तिची तुळस कशी उगवेल बाबा ? हरे राम !

**अण्णा०**—गप्प बस थेरड्या ! बिन्द्या, माझी मुलगी माझ्या स्वाधीन कर, नाही तर पोरीला पळविल्याचा आरोप तुझ्यावर ठेवून मी तुला पोलिसांच्या ताब्यांत देईन.

**बिंबा०**—( पुढें येऊन ) त्यांना कां शासन करतां ? काय शासन करायचं असेल तें मला करा. खरा अपराध केला आहे मी. माझं प्रेम बिन्दुमाधवां-वरच आहे.

**अण्णा०**—[ आश्चर्याने ] बिंबे, काय हा तुझा वेष ? काय हा तुझा अवतार ! बहकली, कारटी बहकली ! कारटे, अशी कशी बहकलीस ? तू कुणाला आपला पति म्हणणार ? या हीन जातीच्या बिन्द्याला ? याची जात कोण हें या थेरड्याला तरी विचारून घे. बिन्द्यान आपली जात लपविली असली तरी हा जुन्या काळचा थेरडा तरी आपली हीन जात लपविणार नाहीं. विचार त्याला !

**अप्पा०**—हरे राम ! काय मी जात लपवू ? नाही, माझी जात मी लपविणार नाहीं. प्रत्येक जात आपापल्यापरी श्रेष्ठच आहे. ही जात हलकी आणि ती जात उच्च अस म्हणणारेच खरे हीन जातीचे आहेत. तुला जसा तुझ्या जातीचा अभिमान आहे तसा मला माझ्या जातीचा अभिमान आहे. मी तुझ्यापेक्षा जातीन निराळा असलो तरी तुझ्यासारखाच उच्च आहे. घमेंडखोरा, तुझी ही उच्च जातीची पोर माझ्या मुलाच्या पाया पडत आली हे ध्यानात ठेवून स्वतःच्या उच्च जातीची घमेंड मार.

**अण्णा०**—बस्स, पुरे झाला हा वितंडवाद ! बिंबे, या बिन्द्याचा धि:कार करून माझ्याबरोबर घरी चल ! मूर्खपणा केलास तेवढा पुरे झाला !

**बिंबा०**—काय बाबा बोलता हे ? तुम्ही मला उच्च शिक्षण घेण्यासाठीं कॉलेजात पाठविलत, माझ लहानपणीं लग्न न करता मला वयान वाढविलीत, मला स्वतंत्र विचाराच्या वातावरणात वाढूं दिलत, मी धीट व्हावे म्हणून मला सहशिक्षण देणाऱ्या मुलाच्या कॉलेजात पाठविलत,—हें सार तुम्ही केलत आणि आता मीच मूर्खपणा केला का ? मी केल ते योग्यच केल. बिन्दुमाधवाची जात कोणतीहि असो, ते माझ्या पवित्र प्रेमाचे परमेश्वरच आहेत. बाबा, मीं केल तें योग्यच केल !

## पद

**मनानें पूजी प्रेमाला । करूं का प्रेमि बेमानी ॥ त्यजोनी नीतिच्या पंथा । करूं का पापमय करणी ॥ ध्रु० ॥ मिळालें ज्ञान जें मजला । करूं का फोल तें सारें ॥ नका हो तुडवुं प्रेमाला । दयाळा, लागतें चरणी ॥ १ ॥**

**अण्णा०**—तसं कां होईना, सारा मूर्खपणा माझ्याच हातून झाला. चल पोरी, आतां तरी घरीं चल ! समाजांत माझी आणखी बेअब्रू करूं नकोस ! तुझ्या अंगीं धीटपणा यावा म्हणून मीं तुला मुलांच्या कॉलेजांत पाठविली, आतां धीटपणा दाखविलास तेवढा पुरे झाला ! या धटिंगणाचा धिःकार कर आणि घरीं चल ! मी तुझी विनवणी करतों, माझी समाजांतील अब्रू राख !

**बिन्दु०**—अण्णासाहेब, तुमच्या मुलीची इच्छा असेल तर तिला खुशाल घेऊन जा. तिचं खरं प्रेम माझ्यावर असेल तर ती तुमच्या धमकावणीला भीक घालणार नाहीं किंवा तुमच्या विनवणीलाहि भाळणार नाहीं. बिंबे, माझ्या प्रीतीच्या देवते, तुझी इच्छा असेल तर खुशाल घरीं जा. माझी चिंता करूं नकोस. तुला दिलेली शपथ मी कधींहि मोडणार नाहीं.

**बिंबा०**—माझ्या प्रेमाच्या परमेश्वरा, वाटेल तो प्रसंग आला तरी मीहि माझ्या शपथेशीं कधींहि बेमान होणार नाहीं. बाबासाहेब, मला क्षमा करा, मला बिन्दुमाधवांच्या चरणांजवळच राहूं द्या !

**अण्णा०**—तूं पुष्कळ राहशील, पण मीं तुला राहूं दिलं पाहिजे ना ? मुकाट्यान माझ्याबरोबर आली नाहींस तर तुला फरफरां ओढीत नेईन ! चल, चल, उचल पाय ! अब्रूची चाड धर; चल लौकर ! ( तिला ढकलीत नेतो. ती रडत जाते. )

**अप्पा०**—हरे राम, हरे राम ! कारट्या, कारट्या, काय रे हें ?

**किशोर**—( पुढं डोकावून ) हा कॉलेजांतील रोमान्स !!

**( पडदा )**

**—दुसरा अंक समाप्त—**

# अंक तिसरा



## प्रवेश १ ला

( **स्थळः**—कॉलेजचा बगीचा. बाहेरील भाग..बिन्दुमाधव सचिंत प्रवेश करतो. )

**बिन्दु०**—ओ माय लव्ह डिव्हाईन ! लव्ह, लव्ह, डिव्हाईन लव्ह ! प्रेम स्वर्गीय असतें असें कवि म्हणतात, पण ते सत्यसृष्टीत खर ठरत नाहीं. मीं रोमान्सच्या भलत्या नादी लागून मूर्खपणाहि केला असेल, पण माझ्यावर प्रेम करणाऱ्या बिंबाधरेवर मीं प्रेम केलें हें पाप कसं तेंच मला समजत नाहीं. समाज तिला उच्च जातीची म्हणतो व मला हीन जातीचा लेखतो, पण हीन विचाराचा पगडा बसल्यामुळे बनलेल्या जातींतील उच्चनीच भाव पवित्र प्रेमाच्या मार्गात आडवे का यावेत ? हिंदुसमाजा, कृत्रिम जातिभेदाचा उचनीचपणा सहन न झालेल्या कोट्यवधि हिंदूनीं आजपर्यंत परधर्माचा आश्रय केला आणि तुला पगू केल. हिंदुसमाजा, अजून तरी सावध हो, मूळच्या साठ कोटींचे अवघे तीस कोटी राहिले, तुझ अर्धांग विगलित झाल तरी अजून तुझे डोळे उघडत नाहींत ना ? धिःकार असो, हिंदुधर्मा ! तुला धिःकार असो !

**धर्मा०**—( प्रवेशून ) कोण हिंदुधर्माचा धिःकार करतो आहे ?

**बिन्दु०**—मी, मी तुमच्या हिंदुधर्माचा धिःकार करतो आहे, आज मी त्याचा नुस्ता धिःकार करतों आहें, पण प्रसगच पडला तर मी त्याचा त्यागहि करीन !

**धर्मा०**—हर हर ! काय मी ऐकतो आहे ? पतीतपावन सीताराम ! रामचद्रा, तुझ पतिताना पावन करण्याच ब्रीद नष्ट झाल का ? पवित्र हिंदुधर्माचा त्याग करणाऱ्या हिंदूना तू सुबुद्धि तरी केव्हा देणार ? ‘ बुद्धि दे रघुनायका ’ ही समर्थाची हाक तू विसरलास वाटत ?

**बिन्दु०**—अहो पतितपावन, देव तुमच ऐकत नाहीं म्हणून तुम्हीच आता त्याच्या नांवान नुसत्या हाका मारीत बसा !

**धर्मा०**—कॉलेजांतल्या अविचारी तरुणा, काय हे तुझे धर्मविरोधी विचार? विचार कर, कांहीं विचार कर, हे हीन विचार उच्च शिक्षण घेणाऱ्या तरुणाला शोभत नाहींत.

**बिन्दु०**—आणि एकाच धर्माच्या शीतल छायेखालीं आराम घेणाऱ्या दोन माणसांत खोटा व कृत्रिम भेदभाव निर्माण करणाऱ्या तुमच्या हिंदुसमाजाला तरी भेदभावाचे हीन विचार शोभतात का? तुमचा हिंदुसमाज, तुमचा हिंदुधर्म...

**धर्मा०**—हिंदुसमाज माझा, हिंदुधर्म माझा, आणि—बेफाम तरुणा! तुझा रे समाज कोणता? तुझा रे धर्म कोणता?

**बिन्दु०**—ज्या समाजांत भेदभावाला थारा नाही, उच्चनीचत्वाच्या विचारांना थारा नाहीं तो माझा समाज, आणि अशा अद्वैतवादी समाजाचा धर्म तो माझा धर्म!

**धर्मा०**—म्हणजे तुझा विचार तरी काय आहे? तूं आपल्या पवित्र हिंदुधर्माचा त्याग करणार?

**बिन्दु०**—उच्च जातींत जन्म घेतलेल्या बिंबाधरेशीं जर माझं—समाजानं विनाकारण हीन ठरविलेल्या जातींत जन्म घेणाऱ्या माझं—लग्न झालं नाहीं तर मी हिंदुधर्माचा त्यागहि करणार!

**धर्मा०**—नको, तरुणा! असा अविचार करूं नको. मी सांगतों त्याप्रमाणं कर. तुझे वडील इथंच आहेत का?

**बिन्दु०**—हो, इथंच आहेत.

**धर्मा०**—तर मग...(त्याच्या कानांत सांगतो.) एवढी गोष्ट करून पहायला तुला काय हरकत आहे?

**बिन्दु०**—पण तिथं माझा किंवा माझ्या वडिलांचा अपमान होतां कामा नये.

**धर्मा०**—त्याची काळजी तुला नको. मी आतां पुढच्या तयारीला लागतों.

**धांवरे रामराया। किती अंत पहासी॥**
**रघुपतिराघव राजाराम। पतितपावन सीताराम॥** [ जातो. ]

**बिन्दु०**—(पश्चात्तापाने) माझ्या वडिलाचा अपमान होता कामा नये म्हणून मीं धर्माचार्यांना अट घातली खरी, पण मीं स्वतःच माझ्या वडिलाचा अपमान त्या दिवशीं केला नाहीं का? अरेरे, कोण पातकी मी? (अश्रू ढाळतो.)

**किशोर**—( प्रवेशून ) अरे अरे अरे! साहेब, काय झाल? रडता का? सुस्कारे का सोडता? क्या तुम्हारी बात! साहेब, तुम्हाला या यूनिटी कॉलेजात काय कमी आहे? बागेंत रोमान्स आहे, रोमान्सात प्रेम आहे आणि प्रेमात मौज आहे. रोमान्स, प्रेम, मौज! हसा, हसा! रोमान्स, प्रेम, मौज! क्या तुम्हारी बात!!!

**बिन्दु०**—किशोरा, काय सांगू? ज्या रोमान्सन मला हसविल, तोच रोमान्स मला आता रडवतो आहे. किशोरा, मला हिणवू नकोस! रडू दे, मला पोटभर रडू दे.

**किशोर**—अरे अरे अरे! साहेब, क्या तुम्हारी बात! तुम्ही आता रडणार? पोटभर रडणार? हुदके देऊन रडणार? अरे अरे अरे! क्या तुम्हारी बात! ( रडतो. )

### पद

**डोळे रडूनियां सुजले। नाकहि बहुत लाल झालें॥ ध्रु०॥**
**सोडितसां ऐसे सुस्कारे। बघणाराचें चित्त बावरे॥**
**ऐशां कुविचारां। करुनि त्वरा। झणिं वारा॥**
**सोडा विचार हे असले॥ १॥**

**बिन्दु०**—अरे पण किशोरा, तूं का रडतोस? मला रोमान्स रडवतो आहे, पण तुला कोण रडवत आहे?

**किशोर**—साहेब, तुमचा पुरुषीपणा मला रडवतो आहे. क्या तुम्हारी बात! तुम्ही पुरुषासारखे पुरुष असून रडतां? क्या तुम्हारी बात! मिशीवर

पीळ द्यायचा सोडून तुम्ही बायकांसारखे रडतां ? क्या तुम्हारी बात ! ( त्याला मिशा नाहींत असें पाहून ) अरे हो, पण तुम्हां कॉलेजांतल्या पुरुषांना मिशाच नसतात, मग तुम्ही मिशांवर पीळ तरी कसे देणार ? अरे अरे अरे ! साहेब, तुम्हांला मिशाच नाहींत ! तर मग खुशाल रडा, तुम्हांला मिशा नाहींत, क्या तुम्हारी बात !

**बिन्दु०**—किशोरा, खुशाल तुला वाटेल तेवढी माझी चेष्टा कर, मी आतां चेष्टेचाच विषय झालों आहें. किशोरा, किती मूर्ख मी ? किती पागल मी ? तुला माझी कींव येत नाहीं का ?

**किशोर**—साहेब, मला तुमची कींव येते, क्या तुम्हारी बात ! आणि साहेब, तुम्ही हा रडवेपणा टाकाल तर मी तुमचं वाटेल तें काम बक्षिसाची आशा न धरतां करीन ! काम करीन, काम करीन, पण साहेब ! आधीं पुरुष व्हा, पुरुष व्हा ! क्या हमारी बात !

**बिन्दु०**—तर मग आत्तांच्या आत्तां रत्नप्रभेला इकडे घेऊन ये.

**किशोर**—तें काम माझं ! म्हटलं मी चपरासी आहें ! आत्तां तुमचं काम करतों, क्या हमारी बात ! ( पाहून ) हें पहा, करतों म्हणतांच काम झालं, या रत्नप्रभाबाईच रत्नाकरांना घेऊन इकडे येताहेत. काय साहेब, आहे कीं नाहीं माझी शाबास ? जाऊं आतां मी माझ्या कामाला ?

**बिन्दु०**—शाबास आहे तुझी !

**किशोर**—साहेब, तुम्हीं मला शाबासकी दिलीत, मी धन्य झालों. क्या तुम्हारी बात ! ( जातो. )

**रत्न०**—( रत्नाकरासह प्रवेशून ) बिन्दुमाधव, तुम्ही असे खिन्न कां ? रडून काय होणार ?

**बिन्दु०**—प्रभाताई, खिन्न होऊं नको तर काय करूं ? माझी प्रियतमा बिंबाधरा, तिकडे एकसारखी रडत असेल हा विचार मनांत आला कीं, मलाहि रडूं कोसळतें.

**रत्न०**—अहाहाहा ! रड्ये कुठले ? माझी मैत्रीण बिंबा मुळींच रडत नाही, उलट ती समाजाच्या अन्यायी वर्तनावर एखाद्या वाघिणीप्रमाणे चिडली आहे. ती चिडली आहे आणि तुम्ही मुळुमुळु रडता आहात ! अहारे रड्ये ! आत्ता वाटेंत मला धर्माचार्यांची स्वारी भेटली होती, त्यानी तुम्हाला सुमार्गाला लावण्याच कबूल केल आहे, पण ते तरी तुमच्यासारख्या रडतराउताना काय घोड्यावर बसविणार ? धर्माचार्यांनीं सुचविलेली गोष्ट करण्याची तुमची तयारी आहे का ? तयारी असेल तर चला अण्णासाहेबाकडे ठरलेल्या वेळी ! जा, आपल्या वडिलाना वर्दी देऊन ठेवा !

**बिन्दु०**—वर्दी देऊन ठेवतो, पण . पण.. ..

**रत्न०**—आता का अडखळता ? अहो रडतराऊत, कुठ अडल तुमच वरघोड ? बिन्दुमाधव, खर सागू तुम्हाला ? तुम्ही असे रड्ये, माझ्या साहसी बिंबेला पतीच शोभत नाही ! रडता काय, कढता काय, चद्राचें तोड पाहून सुस्कारे काय सोडता ? पण बाई, करणार काय ? त्या रोमान्सन तुम्हा दोघाना पच्छाडल आहे ना ? जळ्ळा मेला हा कॉलेजातला रोमान्स ! ह, पहाता काय असे माझ्या तोंडाकडे ? कितीहि आशाळभूतपणान माझ्या तोंडाकडे पाहिलत तरी, फटकळ तोंडाची ही मानी प्रभा, नाही बर तुमच्यासारख्या रडतराऊत नवरदेवाच्या तोंडाभोवती प्रेमाचे दिवे ओवाळायची ! पुसा डोळे आणि थोडा पुरुषी खबीरपणा धारण करून पुढच्या कामाला लागा !

**बिन्दु०**—प्रभाताई, छान, छान, एकदरीत छान लेक्चर झोडलत तुम्ही माझ्यावर ! पण लक्षात ठेवा, आज ज्या रोमान्सन मला पागल बनविल आहे तोच रोमान्स उद्या तुम्हाला.. ..

**रत्न०**—बर बर, बोलू नका जास्त, जा आपल्या कामाला ! ( तो गेल्यावर ) बर रत्नाकर, तुम्ही कोणती मदत करणार आम्हाला ?

**रत्ना०**—मी तुम्हाला वाटेल ती मदत करतो पण एका अटीवर, मी तुम्हाला नुस्त प्रभा म्हणेन, प्रभाताई नाहीं म्हणणार ! प्रभा, तुझ्यासारख्या सुदर तरुणीला ताई म्हणायच जिवावर येत बुवा !

**रत्न०**—अगबाई ! म्हणजे कॉलेजांतल्या रोमान्सनं तुम्हांलाहि पागल बनविलं तर! तुम्ही प्रथम बिंबेवर नजर ठेवलीत, तो डाव फसला—आतां तुम्ही माझ्यावर नजरबंदीची विद्या चालवितां अं ? रत्नाकर, मी तुम्हांला स्पष्टच विचारत्यें, माझे जन्माचे सोबती होण्याची आहे का तुमची योग्यता ? मी अशी स्पष्ट बोलीची आणि सरळ चालीची मुलगी आहें; आणि तुम्ही दगलबाज आणि बेमान आहांत. तुमचं माझं कसं जुळावं हो ? हं, नाहीं म्हणूं नका. तुम्हीं प्रथम बिंबावर प्रेम केलंत आणि दगाबाजी करून माझ्याजवळ तिची ती प्रेमपत्रिका दिलीत, होय ना ? आतां तुम्ही माझ्या प्रेमाकडे जिभल्या चाटीत बघतां आहांत ! मीं नुस्तें होय म्हटलं कीं, तुम्ही कुत्र्यासारखे माझ्या पायांत घुटमळूं लागाल. कशाला तोंड फिरवतां ? तुम्ही नाहीं का पाजी, बेमान, दगलबाज ?

**रत्ना०**—प्रभाताई, खरोखर तुम्ही म्हणतां तसाच मी आहें. माझ्या चुका आतां मला कळून आल्या, मला क्षमा करा.

**रत्न०**—आणि तुम्हीहि, मी इतकं कठोर बोलल्यें याबद्दल मला क्षमा करा. आतां नका घुटमळूं मुलींच्या भोंवतीं. नीट अभ्यास करा आणि आपल्या ज्ञानार्जनानं यूनिटी कॉलेजचा दर्जा वाढवा.

**रत्ना०**—प्रभाताई, जातों मी. माझा कॉलेजचा रोमान्स इथंच संपला ! आतां एकच ध्यास ! अभ्यास, अभ्यास, अभ्यास ! ( जातो. )

**रत्न०**—या सहशिक्षण देणाऱ्या कॉलेजांतल्या उल्लूभाईंना अस्सं कठोर बोलूनच ताळ्यावर आणावं लागतं. जरा मऊ दिसलं तर हे रोमान्सचे खवीस कोंपरांनीं खणायला कमी करायचे नाहींत ! पण बाई, माझ्यासारखी सटकसावित्री कॉलेजांत विरळाच आढळायची. कॉलेजांत, भोळ्या बिंबेसारख्या मुलीच फार ! तशा मुलींनीं शिक्षण घ्यावें, पण तें स्वतंत्र अशा मुलींच्याच कॉलेजांत. सहशिक्षण देणाऱ्या यूनिटी कॉलेजांत म्हणे उच्च शिक्षण मिळतं ! इथं उच्च शिक्षण तर नाहींच, उलट तुच्छ शिक्षण मात्र भरपूर मिळतें खरं ! अगबाई, उशीर झाला. बिंबेच्या घरीं गेल्यें नाहीं तर साराच घोंटाळा व्हायचा ! घोंटाळे, घोंटाळे, घोंटाळे ! कॉलेजांत बाई अस्सेच घोंटाळे ! ( जाते. )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**—अण्णासाहेबाचा दिवाणखाना, अण्णासाहेब वाचीत बसले आहेत. इतक्यात बिंबाधरा हातात बॅग घेऊन बाहेर जाण्याच्या तयारीने येते. )

**बिंबा०**—( अण्णासाहेबाना नमस्कार करून ) बाबासाहेब, तुम्हाला ही तुमची मुलगी बिंबाधरा नमस्कार करीत आहे. मला आपला आशीर्वाद द्या.

**अण्णा०**—( न पाहताच ) सौभाग्यवती भव!

**बिंबा०**—' सौभाग्यवती भव ' असा तुमचा कल्याणप्रद आशीर्वाद मला मिळाला, मी आता जात्ये.

**अण्णा०**—पोरी, कुठ चाललीस ? तुला घरातून बाहेर पडायला मी बंदी केली होती ना ?

**बिंबा०**—तुम्ही खूप बंदी कराल, पण तुमच्या बंदीत राहण्याच मी मान्य केल पाहिजे ना ? मी काहीं एखादी शिळपट शेळीमेंढी नाही, की तुमच्या कोंडवाड्यांत अडकून बसेन ! बाबा, मला तुम्ही ज्ञानामृत पाजून वाढविल आहे, माझ्या मनात स्वातंत्र्याचे विचार पक्के रुजले आहेत, आता तुम्हीं मला शाळुकी समजून पिंजऱ्यात अडकवणार कोण ?

**अण्णा०**—अग, पण मी तुझा बाप आहे ना ? माझ्या प्रत्येक कृतीन तुझ कल्याणच होईल.

**बिंबा०**—माझ कल्याण तुमच्या हातून झाल असत, पण ते मी लहान असताना, अज्ञान असताना ! तुम्ही मला आता, गुडघ्यात मान खुपसून लग्नाला तयार झालेली परकरी पोर तर समजत नाही ना ? तुम्हीं मला वयात येईपर्यंत का वाढविलत ? शिक्षण का दिलत ! उच्च शिक्षण घेण्यासाठी सहशिक्षण देणाऱ्या व जेथे मुलें व मुली यांचे स्नेहसंबंध जुळतात आणि वाढीस लागतात अशा मुलामुलींच्या यूनिटी कॉलेजात का पाठविलत !

**अण्णा०**—तुला चालू जमान्यांत धीटपणान आणि नीटपणान वागता याव म्हणून !

**बिंबा०**—होय ना ? खरं ना ? मग मीं आतां धीट बनून नीट प्रियकराच्या घरची वाट धरली तर कां दांतओंठ खातां ?

**अण्णा०**—मी हें सारं कबूल करतों कीं, माझ्या हातून तो सारा मूर्खपणा झाला ! आतां तुझा बाप म्हणून माझी तुला एवढीच प्रार्थना आहे कीं, बये, त्या हीन जातीच्या बिंदुमाधवाशीं लग्न करून, नको ग माझ्या कुलाची अब्रू खराब करूं ! तूं अशा प्रकारं त्या धटिंगणाचा हात धरून गेलीस तर जुन्या मतांचा हिंदुसमाज मला बाहेर तोंड काढूं देईल का ? तुझ्या भावांना, उच्च कुलांतले कोण गृहस्थ आपल्या मुली देतील ? तुझ्या बहिणींना, उच्च कुलांतील कोणते गृहस्थ घरांत घेतील ? तुझी तूं स्वतंत्र नाहींस; तूं सज्ञान झाली आहेस; तुला कुलाच्या अब्रूची जबाबदारी संभाळलीच पाहिजे. कुलाच्या पावित्र्याकडे व समाजाच्या निष्ठुरपणाकडे पाहून तरी मागं फीर.

**बिंबा०**—नाहीं, मी मागं फिरणार नाहीं. पति म्हणून बिन्दुमाधवांचा स्वीकार करण्यांत मला कोणतंहि पाप दिसत नाहीं. पतीला परमेश्वर समजून वागणं हाच स्त्रियांचा धर्म, असं आपला हिंदुधर्म सांगतो ना ? मग मी माझ्या प्रियकराला माझे परमेश्वर करावयास चालल्यें यांत मी हिंदुधर्माची कोणती हानि केली ? आतां माझें हें कृत्य कदाचित् तुमच्या मठ्ठ समाजाच्या रूढीशीं जुळतें नसेल, पण जोंपर्यंत मीं खऱ्या धर्माची पायमल्ली केलेली नाहीं तोंपर्यंत मीं रूढीच्या पायमल्लीला कां भ्यावं ? बाबा, तुम्ही सुधारक असून रूढीची—अन्यायी रूढीची पायमल्ली करावयास निघालेल्या माझे पाय कां ओढतां ?

**अण्णा०**—अग, मी पुष्कळ सुधारक आहें. मला पुष्कळ सुधारलेलीं मतें मान्य आहेत. पण मला रूढींनीं जखडलेल्या समाजाला सोडून कसं चालतां येईल ? सुधारणा करावी, पण ती समाजाच्या पचनीं पडेल तेवढीच ! असं आहे तरी, सुधारणेचीं तत्त्वें मात्र मनमुराद बोलावीं, कारण बोलतां बोलतां तत्त्वें पटूं लागतात आणि केव्हां तरी तीं अंमलांत आणण्याचं धैर्य अंगीं येतं. तूं सुद्धां वाटेल तितकीं सुधारलेलीं मतें बोल, पण समाजाला रुचतील व पचतील तेवढींच कृतींत आण. म्हणून पुनः एकदां तुला विनवून सांगतों कीं, मागें फीर.

**बिंबा०**—ते शक्य नाहीं. 'सौभाग्यवती भव' असा तुमचा आशीर्वाद मला मिळाला आहे, आता ही तुमची कुवार कन्यका सौभाग्यवती व्हायला जाणार !

**अण्णा०**—तुला लग्नच करायच असेल तर आपल्या उच्च ज्ञातींतले किती तरी श्रीमान व ज्ञानवान तरुण तुला मागणी घालायला टपलेले आहेत. त्याना पाहिजे तर माळ घाल. तुझ्या लग्नाप्रीत्यर्थ मी हजारों रुपये खर्च करीन !

**बिंबा०**—पण बाबा, तुमच हे कृत्य किती अधर्माचे होणार आहे हें तुम्ही विसरलात ! एकाशी पत्नीत्वाची शपथ घेऊन दुसऱ्याशी लग्न लावणारी कुमारी, स्त्रीधर्माची विटंबनाच करणार नाही का ?

**पद**

**त्यजुं कां अजि नीतीला । जी प्रेमा अवमानी ॥ नाशि धर्मे ती बाला ॥ ध्रु० ॥ मंगलता शील धरी ॥ लावुं कां कलंक कुला ॥ १ ॥**

बाबा, एक मानीव अधर्म टाळण्यासाठीं दुसरा भरीव अधर्म करावयास मला का लावता ?

**अण्णा०**—तशान माझी समाजातील अब्रू साफ राहील म्हणून !

**बिंबा०**—म्हणजे तुम्ही खऱ्या धर्मापेक्षा खोट्या अब्रूला जास्त किंमत देता तर ?

**अण्णा०**—बाळे, खर सागू ? मी आपण होऊन काही हें करीत नाहीं, पण अन्यायी रूढींनीं जखडलेला समाज मला तस करायला लावतो आहे. माझ्या कुलाच्या अब्रूकरिता तरी मला हा समाजाचा जुल्म सहन केलाच पाहिजे, म्हणून पुनः पुनः तुला विनवून सागतों कीं, माग फीर.

**बिंबा०**—आणि समजा, नाहीं माग फिरल्यें तर ?

**अण्णा०**—कारटे, यापेक्षा तू लहानपणींच मेली असतीस तरी बर झाल असत ! असली बेफाम पोर जिवत राहण्यापेक्षा मेलेली पुरवली ! कुलाची अब्रू तरी साफ राहील !

**बिंबा०**—तुमच्या समाधानाकरितां मीं आत्महत्त्याहि केली असती, पण आत्महत्त्या करणं हें भेकडपणाचं आहे. बाबा, मी जिवंत राहूनहि मरून दाखवूं का ?

**अण्णा०**—म्हणजे ?

**बिंबा०**—म्हणजे मी धर्मांतर करत्यें आणि बिंदुमाधवांनाहि परधर्माचा अंगिकार करावयास लावतें. परधर्मांत गेलेली मुलगी...

**अण्णा०**—मेली, ठार मेली ! जिवंत असून समाजाच्या दृष्टीनं मेली !

**बिंबा०**—होय ना ? मग अशा रीतीनं मरून मी समाजाच्या जाचांतून तुम्हांला मुक्त करूं का ? आपल्या हिंदुसमाजाला रूढीचे पाश तोडणारीं माणसें जिवंत असलेलींहि पहावत नाहींत, पण परधर्मांत गेलेलीं हाडाचीं हिंदू माणसं जिवंत जगलेलीं पाहवतात ! मी परधर्मांत गेल्यें तर समाज मला दोन शिव्या हांसडील, 'मेली' असं समजून स्वस्थ बसेल; शिवाय तो तुमच्या अब्रूच्याहि आड येणार नाहीं ! मग जाऊं का मी परधर्मांत ? बाबा, तुम्ही बोलत नाहीं, मूक झालांत यावरून माझा विचार तुम्हांला पटत चाललेला दिसतो. होय ना ? ( इतक्यांत धर्माचार्य, अप्पाराव, बिन्दुमाधव व रत्नप्रभा येतात. )

**धर्मा०**—हरहर ! अण्णासाहेब, काय ही तुमची अधोगति ! रूढीचं बंधन तोडून हिंदु धर्मांत राहणाऱ्या मुलीच्या चित्रापेक्षां, परधर्माचा आश्रय करून हिंदुधर्माच्या दृष्टीनें मृतवत् झालेल्या मुलीचं चित्र तुम्हांला अधिक रम्य वाटतं काय ? बोला, अण्णासाहेब, स्पष्ट काय तें बोला, मूकपणा धारण करून...

**अण्णा०**—धर्माचार्य, मूकपणा धारण करूं नको तर काय करूं ? हीन मानलेल्या अन्य जातीच्या पुरुषाशीं विवाहबद्ध होऊन राहणाऱ्या मुलीचं लांछन माझ्या कुळाला अखंड चिकटून बसेल, पण परधर्मांत गेलेल्या मुलीचं लांछन समाज लौकरच विसरून जाईल. महाराज, आपला हिंदुसमाज परधर्माचा आश्रय करणाऱ्या पतितांचा छळ कुठं करतो ? आमचा समाज छळ करतो

तो रूढीची पायमल्ली करणाऱ्या पण स्वधर्मालाच चिकटून राहणाऱ्या रूढि-द्रोही पण धर्मनिष्ठ लोकाचा !

**बिंबा०**—ठीक आहे तर, मी माझ्या प्रेमाच पावित्र्य राखण्यासाठीं परधर्माचा आश्रय करावयास तयार आहे. बिंदुमाधव, तुम्हीहि माझ्यासाठीं परधर्माचा आश्रय करून बाबाच इनामदाराच कुल कलंकरहित ठेवाल काय ?

**बिन्दु०**—रूढीची पायमल्ली करून स्वधर्माच्या आश्रयाला राहाण्यानं जर इनामदाराचं कुल कलंकित होत असेल तर धर्माचा त्याग करण्याचीहि माझी तयारी आहे.

**अप्पा०**—हरे राम ! कारट्या, काय बोलतोस हें अभद्रासारख ? दुसऱ्याच्या जातीला हीन लेखणाऱ्या हलक्या लोकासाठीं तू आपला पवित्र धर्म सोडणार ! हरे राम ! मी नाहीं तुला आपला धर्म सोडू देणार ! खर की नाहीं धर्माचार्य !

**धर्मा०**—अप्पाराव, तुमच म्हणण खर आहे. 'स्वधर्मे निधन श्रेयः परधर्मो भयावहः ।'

**अण्णा०**—अहो, पण ही बिम्बाधरा मिश्रविवाह करून आपल्या समाजाच्या दृष्टीनं पतितच होणार ना ?

**धर्मा०**—ही आज पतित झाली तरी उद्या पवित्र होईल पण परधर्मात गेली तर आपल्या हिंदुधर्माला, पवित्र आर्यधर्माला कायमची मुकेल. रूढीचा जाच सहन होत नाहीं म्हणून आजपर्यंत कोट्यवधि हिंदूनीं परधर्माचा आश्रय करून स्वधर्माला सख्येन आणि बलान, पगु केल आहे. यापुढ कोणत्याहि काल्पनिक किंवा खऱ्या कारणासाठीं कोणाहि हिंदून स्वधर्माचा त्याग करता कामा नये. नुसत्या रामनामाच्या जपान पवित्र होण्याच सामर्थ्य हिंदु धर्मातील ईश्वराच्या नामस्मरणात आहे. पतितपावन सीताराम ! हिंदूंचा राम पतिताना पावन करतो ! हें नामस्मरणाच सामर्थ्य हिंदुधर्माशिवाय इतर कोठहि आढळणार नाहीं.

**अण्णा०**—मग अशा सकटकाळी मी काय करू तें तरी बोला !

**धर्मा०**—वाटेल तो प्रसंग आला, वाटेल तसा छळ झाला तरी तो सहन करा-धर्मप्रेमानं सहन करा, पण आपल्या हिंदुधर्मातल्या चालत्या बोलत्या माणसांचंच काय, पण कीड-मुंग्यांचं सुद्धां स्वधर्मात संरक्षण करा. रामनामाच्या सामर्थ्यानं वानरसुद्धां उद्धरले, शिला सुद्धां उद्धरल्या, मग या मुलांची कथा काय ? मुलांनों, हा धर्माचार्य, स्वधर्माचं रक्षण करा आणि परधर्माचा आश्रय करूं नका म्हणून तुम्हांला विनवून सांगत आहे. समाजाचा जुलूम सहन करण्याचें सामर्थ्य जर तुमच्यांत असेल तर रूढीचे पाश खुशाल झुगारून द्या पण प्राणांवर बेतली तरीहि स्वधर्माचा त्याग करूं नका. (पदर पसरून) मुलांनों, हिंदुधर्माच्या छाव्यांनों, एवढी स्वधर्मरक्षणाची भिक्षा या आर्य धर्माच्या भिक्षूला घाला.

**बिंबा०**—महाराज, रामनामाची ग्वाही देऊन तुम्हांला मी अभिवचन देत्यें कीं, समाजानं माझा कितीहि छळ केला, मला कितीहि तुच्छ लेखलं तरी मी प्राणांतींहि हिंदुधर्माचा त्याग करणार नाहीं.

**बिन्दु०**—महाराज, मीहि अशी ग्वाही देतों की, वाटेल त्या संकटाला तोंड देईन-पण स्वधर्माचा त्याग करणार नाहीं.

**अप्पा०**—शाबासरे माझ्या बाळ्या ! माझ्या जातींत-हीन वृत्तीच्या लोकांनीं हीन म्हणून लेखलेल्या जातींत-तूं हिरा जन्माला आलास खरा !

**रत्न०**—अण्णासाहेब, हे हिंदु अप्पाराव आपल्या हिंदु मुलासाठीं तुमच्या हिंदु मुलीला मागणी घालायला आलेले आहेत. त्यांना काय तें विचारपूर्वक उत्तर द्या.

**अण्णा०**—काय उत्तर देऊं ? कारट्यांनों, तुमचा कॉलेजांतला रोमान्स मला पुरता भोंवला ! आतां मुलीच्या मिश्रविवाहाला संमति देऊन समाजाचा रोष सहन करूं कीं काय करूं ?

**रत्न०**—तुम्हांला कॉलेजचा रोमान्स भोंवला खरा, पण त्याबद्दलची मूळ चूक तुमच्याच पदरीं येऊन पडते. तुम्ही स्वतंत्र असं मुलींचं कॉलेज निर्माण करून जर त्यांत आपल्या मुलीला पाठविलं असतंत तर हा आजचा प्रसंग

तुमच्यावर ओढवलाच नसता! सहशिक्षणाच्या गप्पा झोडायला पाहिजेत, पण त्याची जोखीम पत्करायला नको असं म्हणून कसं चालेल?

**अण्णा०**—चुकलों पोरी, सहशिक्षणाचा अभिमान धरून साफ चुकलों! मी समाजसुधारक आहें, लब्या गप्पा झोडणारा आहें, पण समाजाच्या छळाला भिणारा भेकड आहें. माझ्यासारख्या बोलण्यात पटाईत पण कृतीत भेकड असणाऱ्या पालकांनीं आपल्या मुलींना तूर्त तरी मुलींच्याच कॉलेजात पाठवावें ते बरे!

**धर्मा०**—शिवाय मुलींचीं स्वतंत्र कॉलेजें निघालीं तर तेथें त्याना पुरुषी थाटाचें अनवश्यक शिक्षणहि घ्यावयास नको. मुलींना ज्ञानदान करून त्यांच्या शीलाची काळजी घेण्याचं काम मुलींचीं कॉलेजें आपण होऊन करतील.

**अप्पा०**—मग अण्णासाहेब, तुम्ही आपली मुलगी माझ्या मुलाच्या पदरात टाकता कीं नाहीं?

**अण्णा०**—टाकतों बाबा, त्याशिवाय सुटका कोठे आहे? मग समाज काय माझा छळ करील तो करील!

**धर्मा०**—तुम्ही सुधारक आहात ना? मग योग्य सुधारणा अमलात आणावयाच्या झाल्यास समाजाच्या जाचाला का भिता? सुधारणा हवी पण जाच नको असं का? सुधारकांनों, तुमचा जर सुधारणावर विश्वास असेल तर त्या अमलात आणतांना होणारा छळ मुकाट्यानें सहन करा. आपल्या सतमहंतांनीं समाजाची सुधारणा घडवून आणताना जुन्या अत्याग्रही लोकाचा छळ असाच सहन केलेला आहे. सुधारणावादी तुकाराममहाराजाचा छळ काय थोडा झाला? समाजसुधारक अण्णासाहेब कर्व्यांचा छळ काय थोडा झाला? पण त्याची योग्यता आज सर्वमान्य झालेली आहे. अण्णासाहेब कर्व्यांना महर्षि ही श्रेष्ठ पदवी मिळाली आहे. तेच सुधारक मोठे कीं, जे तत्त्वासाठी समाजाचा छळ सहन करतात आणि स्वधर्माच रक्षण करतात! रूढी तुडवा पण धर्म बुडवू नका. छळ सहन करा पण धर्मरक्षण करा. अण्णासाहेब, या नन्दनपुरांत स्वतंत्र असं एक मुलींचं कॉलेज काढून तुम्ही अण्णासाहेब कर्व्यांच उदाहरण गिरवा. म्हणजे तुमच्यावर कॉलेजांतील रोमान्स कोणतहि सकट आणणार नाहीं. पायाशुद्ध काम केल्यावर सकटें का येतील?

**अण्णा०**—धर्माचार्य, तुमचा उपदेश योग्यच आहे. आतां मीच प्रथम या नंदनपुरांत मुलींचं कॉलेज काढण्याची चळवळ हातीं घेतों आणि माझी पहिली एक लाखाची देणगी देऊन कार्याला प्रारंभ करतों.

**धर्मा०**—चालू परिस्थितीचा विचार करतां तुम्ही करतां तेंच योग्य आहे. मी तुम्हांला धन्यवाद देतों. मुलींचं कॉलेज निघाल्यानं कॉलेजांतील रोमान्साची नांगी आपोआप मोडेल आणि धर्मावरहि कमी संकटें येतील, शिवाय मलाहि असल्या भानगडींत पडावं लागणार नाहीं. मुलांनों, हिंदु म्हणून सुखाचा संसार थाटा पण हिंदुधर्माच्या त्यागाचा अमंगळ उच्चार पुनः करूं नका. तो पतितांना पावन करणारा सीताराम सर्वांचं कल्याण करो! अण्णासाहेब, आपल्या हिंदु मुलीचा विवाह हिंदु बिन्दुमाधवाशीं लावण्याचा निश्चय आत्तांच जाहीर करा, आणि त्यांनी कोणत्याहि भयंकर परिस्थतींत स्वधर्माचा त्याग केला नाहीं म्हणून त्यांस धन्यवाद द्या.

**अण्णा०**—महाराज, मी माझी मुलगी बिंबाधरा हिचा विवाह बिंदुमाधवाशीं करण्याचा माझा निश्चय याच वेळीं जाहीर करतों. पण एका अटीवर! प्रथम या दोघांनींहि आपापल्या स्वतंत्र कॉलेजांत जाऊन आपापला कॉलेज—कोर्स पुरा केला पाहिजे.

**बिन्दु व बिंबा०**—कबूल, अक्षरशः कबूल!

( इतक्यांत किशोर एक लखोटा घेऊन येतो. )

**किशोर**—अण्णासाहेब, आमच्या प्रिन्सिपॉलसाहेबांनीं तुम्हांला देण्यासाठीं हा लखोटा दिला आहे, हा घ्या. ( देतो. )

**अण्णा०**—( लखोटा वाचून ) महाराज, या पत्रांत कॉलेजांतील रोमान्सचा गोंधळ पाहून कंटाळलेल्या प्रिन्सिपॉलसाहेबांनींच मुलींच्या स्वतंत्र कॉलेजाच्या स्कीमची आंखणी करून माझ्याकडे वर्गणीची मागणी केली आहे. मी त्यांना मोठ्या आनंदानें एक लाख रुपयांची देणगी देणार असल्याचें कळवितों.

**किशोर**—वाहवा, अण्णासाहेब खरोखर लाख रुपयाची गोष्ट बोलले ! अण्णासाहेब, क्या तुम्हारी बात ! आता मुलींचें कॉलेज स्थापन झाल्यावर आमच्या कॉलेजातला रोमान्स मात्र संपणार !

**धर्मा०**—झाल तें ठीक झाल. आता आपल्या हातून जर काहीं चुका झाल्या असतील तर त्याच्या परिमार्जनासाठीं रामरायाचा धावा करू या. तो पतितपावन सीताराम सर्वांना पावन करो !

**बिबा०**—

**पद**

**सुमनें स्मरा रामा । नाशिल पापा ध्याइं सुनामा ।। ध्रु० ।।**
**वानर तरले । ज्या नामानें । कां नच नेइल नरअघ विलया ।।१।।**

**पवित्र आर्य धर्माचा जयजयकार असो !**

# अंक पहिला

( **स्थळ**—पुणें, आनंदरावाचें बिऱ्हाड. त्याचे काका एका आराम–खुर्चीवर 'सडेतोड' पत्राचा ताजा अंक वाचीत बसले आहेत. कोणी तरी बाहेरून दार ठोठावतें. )

**टप्पूकाका**—( आवाज ऐकून ) कोण दार ठोठावतें आहे तें ?

**झब्बूमामा**—( बाहेरून ) मी, मी आहें बाहेर उभा ! मी आहें–मी !

**टप्पू०**—अरे, मी म्हणजे कोण ?

**झब्बू०**—मी म्हणजे–' आय् ' ! प्रथम पुरुषी पुल्लिंगी एकवचन ! कळलं ना मी कोण तो ?

**टप्पू०**—तूं म्हणजे प्रथमपुरुषी पुल्लिंगी एकवचन आहेस, हें कळलं ! बरं, पण काय पाहिजे तुला ?

**झब्बू०**—( बाहेरूनच ) मला पुणेरी जोडा पाहिजे आहे !

**टप्पू०**—( उठून पुढें येऊन, आश्चर्यानें ) काय, तुला पुणेरी जोडा पाहिजे आहे ? अरे वेड्या, पुणेरी जोडा इथं नाहीं मिळत ! जा, दुसरीकडे शोध कर जा ! ( स्वगत ) हा लेकाचा भोटमामाच दिसतो कुणी तरी ! ( प्र० ) ए मामा, ए भोटमामा, जा मुकाट्यानं ! वेडारे वेडा, म्हणे पुणेरी जोडा पाहिजे आहे !

**झब्बू०**—हो, हो, पुणेरी जोडा पाहिजे आहे. थट्टा करूं नका अशी ! आतां तुम्ही बऱ्या बोलानं दार उघडतां कीं फोडूं दरवाजा ?

**टप्पू०**—म्हणे फोडूं का दरवाजा ? काय लेकाचा दिमाख पहा ! हॅं, हॅं ! दार फोडून तर पहा, मग बघ कसं तोंड फुटतं तें ! पण इतक्या थराला गोष्टी न्याच कशाला ? बरं बाबा, हें बघ दार उघडलं ! ( जाऊन दार उघडतो व झब्बूमामासह परत येतो. )

**झब्बू०**—कां हो, अगदीं लोणकढी थाप ठेवून दिलींत ?

टप्पू०—तुम्ही दारावर थापा मारल्यात म्हणून !

झब्बू०—मारीन, वाटेल तितक्या थापा मारीन ! थापा मारण हा माझा जन्मसिद्ध हक्कच आहे ! पण मी म्हणतों, तुम्ही कां ‘ इथ पुणेरी जोडा नाहीं ’ म्हणून थाप मारलीत ? इथ, या बिऱ्हाडात पुणेरी जोडा आहे !

टप्पू०—म्हणजे तुम्हाला पुणेरी जोडा पाहिजे ? कशाला पाहिजे तो तुम्हांला ?

झब्बू०—कशाला म्हणजे पहायला !

टप्पू०—समजा, मी तुम्हाला पुणेरी जोडा दाखवला तर पुढ काय कराल ?

झब्बू०—ते माझ मी पाहून घेईन. मग मी आहे आणि तो पुणेरी जोडा आहे ! त्या पुणेरी जोड्याची आणि माझी गाठ घालून द्या !

टप्पू०—नाही माझ्या हातून ते जमायच ! तुम्हीच घ्या पुणेरी जोड्याची गाठ ! तुम्ही दिसता विक्षिप्त, मी तसा नाहीं, मी सुक्षिप्त आहें.

झब्बू०—ह, हे नाहीं मला खपायच ! मला थापाड्या म्हणा, भोटमामा म्हणा, चालेल ! पण मला विक्षिप्त म्हणू नका ! विक्षिप्तपणा हा तुम्हा पुणेकराचा बाणा आहे !

टप्पू०—आणि थापाडेपणा हा तुमचा शहाणपणा आहे वाटत ? पण म्हटल, तुम्ही कोण, कुठले ?

झब्बू०—मी मुबईचा, मला मामा मुबईकर म्हणतात ! मी इथ मुद्दाम पुणेरी जोडा पहाण्यासाठी आलो आहें. मग बऱ्या बोलान मला दाखवता पुणेरी जोडा कीं, तो माझा मीच शोधून काढू ?

टप्पू०—अरे ए आनदराव, अग ए अन्नपूर्णे, या, बाहेर या, हा पहा कोणी झब्बूमामा मुबईकर इथ पुणेरी जोडा बघायला आला आहे ! या, या, फुकटात झब्बूमामाच नाटक पहायला मिळेल तुम्हाला !

झब्बू०—( स्व० ) लेकाचा अस्सल पुणेकर आहे ! नाटक पहायचं आणि तें सुद्धा फुकटात ! पुणेरी, अस्सल पुणेरी ! ( आनदराव व अन्नपूर्णा येतात. )

आनंद०—काय, म्हणतां काय टप्पूकाका ?

अन्न०—कोण तें ? अ ! हे तर आमचे झब्बूमामा ! ( जवळ जाऊन ) मामा, या, बसा ! मामजी, हे झब्बूमामा माझे दूरचे मामा लागतात ! ( आनदरावास ) समजल ना इकडे ?

**झब्बू०**—इकडे ? हा कोण इकडे ? काय हो, ही माझी भाची शालिनी तुम्हांला इकडे–तिकडे कां करते ?

**अन्न०**—इ:श ! मामा, अशी काय बरं थट्टा करायची इकडची ! हे आतां **माझे** झाले आहेत !

**टप्पू०**—आणि ही आतां ह्याची झाली आहे ! मामा, कसा दिसतो हा जोडा ?

**झब्बू०**—वा: काय विचारतां ? पुणेरी जोडा तो, तुम्हांला छानच दिसायचा ! पण माझ्या डोळ्यांत खुपतो आहे हा ! पोरी शालिनी, तुझ्या डोळ्यांत हा भरला आणि म्हणून तूं पुण्याला पळून येऊन याच्याशीं लग्नहि केलंस ! हा तुझ्या डोळ्यांत भरला, पण माझ्या डोळ्यांत खुपतो आहे ! पुणेरी, अस्सल पुणेरी !

**टप्पू०**—अस्सं ! आत्तां डोक्यांत प्रकाश पडला ! तुम्हांला एकूण **हा पुणेरी जोडा** पहायचा होता तर ! पोरांनों, पहातां काय अशीं ? हे झब्बूमामा अन्नपूर्णेचे दूरचे मामा, तेव्हां तुझे दूरचे मामेसासरे लागतात ! करा, यांना जोड्यानंच नमस्कार करा !

**अन्न०**—मामा, ही मी तुम्हाला नमस्कार करतें ! ( वांकून नमस्कार करते. )

**आनंद०**—मामा, मीहि तुम्हांला नमस्कार करतों. ( किंचित् वांकून नमस्कार करतो. )

**अन्न०**—मामा, विचार कसला करतां ? आशीर्वाद द्या !

**झब्बू०**—विचार नको करूं तर काय करूं ? तुला ' अष्टपुत्रा सौभाग्यवती भव ' असा आशीर्वाद कसा देऊं ? तुम्हांला आठ पुणेरी पोरं झालीं तर–नाहीं–हा विचार सुद्धां सहन होत नाहीं ! माझ्या भाचीला आठ पोरं आणि तीं पुणेरी, अस्सल पुणेरी ?

**टप्पू०**—काय हें मामा, साधा तोंडभर आशीर्वाद द्यायचा पण त्यालासुद्धां इतका विचार अं ? मुलांनों, पुनः मामांना जोड्यानं नमस्कार करा आणि आशीर्वाद घ्या !

( दोघें वर सांगितल्याप्रमाणें नमस्कार करतात. )

**झब्बू०**—पोरी, पुरी फसलीस ! या धटिंगण पुणेकराशीं लग्न करून सपशेल फसलीस ! हा पुणेकर आहे, हा तुझा नवरा झाला तरी अजून त्याच्यांतील पुरुषीपणा मेलेला दिसत नाहीं. पुणेरी, अस्सल पुणेरी !

**अन्न०**—काय बोलता हे ! मामा, काय बोलता हे अस ?

**झब्बू०**—बोल, पोरी ! हा कोण तुझा ?

**अन्न०**—इ:श !

**झब्बू०**—खरच इ:श ! तू याच्याशी, या पुणेकराशी लग्न केलस तेव्हा इ:शच झाल हे ! पोरी, इ:श अस हे वर्तन तू केलंस आणि त्यामुळ हा पुणेकर तुझा नवरा झाला !

**अन्न०**—इ:श ! काय बोलता हें मामा तुम्ही ? इ:श !!

**झब्बू**—इ:श ! खरोखरच इ:श ! पोरी, अगातील पुरुषीपणा न मेलेला हा तुझा इ:श–मेला नवरा .

**टप्पू०**—झब्बूमामा, काय बोलता हे अस अभद्र ?

**अन्न०**—खरच, मामजी म्हणतात तसच तुमच बोलण अभद्र आहे. तिकडे उद्देशून अस बोलाव का तुम्ही ?

**झब्बू०**—पोरी, तू ज्याला ‘ तिकडे ’ म्हणतेस, तो तुझा नवरा आहे. अगातील पुरुषीपणा न मेलेला नवरा आहे, आणि नवरा म्हणजे इ.श, नवरा म्हणजे दुष्ट ! नवरा म्हणजे क्रूर, नवरा म्हणजे सैतान ! पोरी, तू गाय तर हा लाडगा ! तू शेळी तर हा वाघ ! तू देवता तर हा सैतान ! पोरी, तू भोळेपणान याच्याशी लग्न लावलस आणि हा तुझा नवरा झाला ! मी मघापासून पहातों आहे, या तुझ्या पुणेरी नवऱ्यातला पुरुषीपणा अजून मेलेला नाही ! पुणेरी, अस्सल पुणेरी ! हा नवरेपणान नटलेला पुरुष, हा पुरुषीपणा न मेलेला नवरा ! दुष्ट, क्रूर, सैतान ! पुणेरी, अस्सल पुणेरी !

**आनंद०**—का हो श्वशुर, काय केलं मी अस ? तुम्ही मला इतक्या शिव्या मोजाव्यात अस काय केल मी ?

**टप्पू०**—मीसुद्धा विचारतों की, अस या माझ्या पुतण्यान केल तरी काय ? का शिव्या मोजता त्याला ?

**झब्बू०**—सागतो यान काय केल ते ! या दोघानाहि पुन. मला नमस्कार करायला सागा !

**टप्पू०**—मुलानो, या झब्बूमामाना पुन. एकदा जोड्यानच नमस्कार करा !

**आनंद०**—काय करायच याना पुन:पुन. नमस्कार करून ? फुकटचा

आशीर्वाद द्यायचं तर दूरच राहिलं, पण आल्यापासून हे आमचे श्वशुर शिव्यामात्र हांसडताहेत !

**झब्बू०**—पहा, टप्पूकाका ! तुम्हीच पहा, या तुमच्या पुतण्यांतला पुरुषीपणा, नवरेपणा अजून मेलेला नाहीं ! नुसता नमस्कार करायचा तर कोण ताठा ? पुणेरी, अस्सल पुणेरी !

**टप्पू०**—हें पहा आनंदराव, कांहीं झालं तरी हे झब्बूमामा तुझ्या पत्नीचे मामा, तुझे श्वशुर आहेत. हा हट्ट सोड आणि पुनः एकदां जोड्यानं, झब्बू-मामांना देव समजून, नमस्कार कर.

**झब्बू०**—देव समजून नव्हे, श्वशुर समजून, माणूस समजून नमस्कार कर !

**टप्पू०**—बरं, थोड्यासाठीं वादविवाद कशाला ? या झब्बूमामांना माणूस समज !

**आनंद०**—काय यांना माणूस समजूं ?

**टप्पू०**—आतां जास्त चिकित्सा करण्यांत वेळ घालवूं नकोस ! करा, यांना जोड्यानंच नमस्कार करा !

**अन्न०**—काय बरं हा इकडचा हट्ट ? करा ना आणखी एकदां नमस्कार ! चांगला वांकून नमस्कार करा, होऊं द्या झब्बूमामांच्या मनासारखं ! कांहीं झालं तरी ते माझे मामा आहेत आणि इकडचे श्वशुर आहेत !

**आनंद०**—बरं तर तुझी मर्जी ! लाडके, तुझी आज्ञा मोडण्याचं काम माझ्या हातून या जन्मांत तरी होणार नाहीं ! चला तर, करूं या जोड्यानंच नमस्कार ! ( अन्नपूर्णा अगदीं कुलीन स्त्रीच्या पद्धतीनें जमिनीपर्यंत वांकून नमस्कार करते व आनंदराव गुडघे टेंकून नमस्कार करतो. )

**झब्बू०**—मी म्हणतों तें हेंच ! दोघांच्या नमस्कारांत केवढा हा फरक ! ही स्त्री असल्यानं जमिनीपर्यंत वांकते आणि याच्यांतील पुरुषीपणा मेलेला नसल्यामुळं हा अर्धा वांकतो ! हा फरक कां ? आधुनिक काळ समान दर्जाचा असतांना नवरा—बायकोच्या वर्तनांत असा फरक कां ?

**टप्पू०**—कसले बारीकसारीक फरक काढतां झब्बूमामा ?

**झब्बू०**—हा बारीकसारीक फरक नाहीं, हा फार मोठा फरक आहे. ( साभिनय ) ही माझी भाची असा नमस्कार करते तर हा तिचा नवरा या

नावाचा प्राणी असा नमस्कार करतो. हे अस का ? हा असा फरक का पडला ! टपूकाका, विचार करा, त्या दोघाच्या नमस्कारात फरक पडला याच कारण म्हणजे ही अजून आर्यस्त्री आहे तर हा पुरुषीपणा न मेलेला नवरा आहे ! पुणेरी, अस्सल पुणेरी !

**आनंद०**—( चिडून ) मग झब्बूमामा, आता काय करू म्हणतां मी ! मी काय केल म्हणजे तुमच समाधान होईल ?

**झब्बू०**—सागू ? सागू ? या तुझ्या बायकोप्रमाण तू मला हुबेहुब नमस्कार कर ! बायकोप्रमाण वागशील तरच मी तुला समान हक्काचा कैवारी समजेन ! नाहीं तर मी समजेन कीं, किती झाला तरी हा पुणेरी, अस्सल पुणेरी !

**आनंद०**—म्हणजे, मी आता तुम्हाला स्त्रीच अनुकरण करून नमस्कार करू म्हणता ? भयकरच प्रसग आला म्हणायचा !

**झब्बू०**—आनदराव, तुझ्यातला पुरुषीपणा मेलेला नाही, तुझ्यातला नवरे-पणा जिवन्त आहे तोपर्यंत तुला हा भयकर प्रसगच वाटणार ! पण हा नवा काळ आहे. या काळाला अनुसरून पुरुषानी बायका झाल पाहिजे. पुरुष बायका झाले, म्हणजेच स्त्री–पुरुषात समान दर्जा निर्माण होईल ! मग बोल आनदराव ! स्त्रीप्रमाण नमस्कार करतोस की तुझ्यात नवरेपणा जिवन्त आहे हे कृतीन कबूल करतोस ? तू कसला स्त्री होतोस म्हणा ! कारण, तू पुणेरी, अस्सल पुणेरी !

**अन्न०**—जाऊ द्या, नका आता फार विचारात पडू ! मामाच्या समाधाना-साठीं माझ्याप्रमाणच नमस्कार करा, पण एकदाचा आशीर्वाद घ्या.

## अनुनय–गीत

**करुं नका फुका प्रेमा । याचना करी भामा ॥**
**आपुले न कां मामा ॥ वंदना करा त्वरें ॥ ध्रु० ॥**
**मानदंभ नसे उरला । वृथा लाजतां हो नाथा ॥**
**शंकित कां मग आतां । सोडी दुजा भावा ॥ १ ॥**

**आनंद०**—आता तुझा आग्रहच आहे, तेव्हा तू सागशील तस मला वागलच पाहिजे. तू सागशील तसच मी वागेन अस मी तुला लग्नाच्या वेळीं वचन दिलेल आहे, तेव्हा मला हा असा नमस्कार केलाच पाहिजे !

( स्त्रीप्रमाण नमस्कार करतो. )

**झब्बू०**—आनंदराव, तुझ्यांतला मरत चाललेला नवरेपणा पूर्णपणं मरो आणि तुझ्यांतला पुणेरी पुरुषीपणा पुरता नामशेष होवो ! आणि शालिनी, तुझ्यांतील स्त्रीपणासुद्धां नष्ट होवो !

**टप्पू०**—अगदीं विक्षिप्त माणूस दिसतो आहे हा ! चालू द्या याचा विक्षिप्त-पणा, आपण आपलं जरा बाहेरून फिरून यावं ! अन्नपूर्णे, जा, तुझे मामा मुंबईहून आले आहेत, त्यांना चहा तरी करून दे ! मी थोडा भटकून येतों. ( जातांना ) बरं, मामा ! आराम करा, चहा घ्या, मी थोडा भटकून येतों. (जातो.)

**झब्बू०**—पुणेरी, अस्सल पुणेरी ! घरांत पाहुणा आला कीं, अस्सल पुणेरी इसम बाहेर भटकायला निघायचा हें ठरलेलंच !

**अन्न०**—बरं, मामा, तुम्ही थोडा वेळ इकडे बोलत बसा, मी चहा करून आणतें. ( जावयास निघते. )

**झब्बू०**—पोरी, कुठं चाललीस ? चहा करायला ? हा तुझा नवरा घरांत असतांना तूं कां चहा करतेस ? तूं आधुनिक स्त्री आहेस, तूं माझ्याशीं गप्पा मारीत बैस, हा तुझा नवरा चहा करून आणील !

**अन्न०**—काय बोलतां हें मामा ? बायकांचीं कामें बायकांनींच केलीं पाहिजेत !

**झब्बू०**—अग पोरी, काय बोलतेस हें आर्यस्त्रीप्रमाणं ? तूं आधुनिक पद्धतीचं महिला मासिक वाचीत नाहींस असं दिसतं ! त्यांत स्पष्ट लिहिलं आहे कीं, स्वयंपाक हें पुरुषांचं काम म्हणून ! तूं महिला मासिकाची वाचक हो, आणि अहो तुम्ही नवरोबा, तुम्ही समाजस्वास्थाचें आलोडन करीत जा ! पहातां काय असे डोळे वटारून ? जा, चहा करून आणा, मी हिच्याबरोबर चार गप्पा झोडतों.

**आनंद०**—मग काय लाडके, जाऊं का मी चहा करायला ? तूं सांगशील तसं करीन ! लाडके, काय तो हुकूम सोड ! लाडके, ......

**झब्बू०**—लागला नवरोबा साखर पसरायला ! पोरी, याच्या लाडके, प्रिये, या गोड शब्दांना भाळूं नकोस ! या नवरोबाला चहा करायला पाठव आणि तूं इथं बैस. अशी विचारांत पडूं नकोस. होऊं दे, तुझ्यांतला आर्यस्त्रीपणा नष्ट होऊं दे.

**अन्न०**—( एकीकडे ) नाथ, या वेळीं तरी मामांचं ऐकावं ! काय झालं एक वेळ चहा केलांत म्हणून ? माझा प्रत्येक शब्द मानण्याचं वचन तुम्हीं लग्नाच्या वेळीं दिलेलंच आहे ! एक वेळ ......

**आनंद०**—एक वेळ कां ? लाडके, तुझा हुकूम होत असेल तर, जन्मभर स्वयंपाक करून मी तुला जेवायला वाढीन ! तुझी प्रत्येक आज्ञा मानण्याच वचन मीं तुला दिलेलच आहे ! मग जाऊ मी ?

**झब्बू०**—पुणेरी, अस्सल पुणेरी ! अजून याच्यातला पुरुषीपणा पुरता मेलेला दिसत नाहीं. आनदराव, पुनः पुनः काय विचारतोस ? जा, पूर्वकाळीं आर्यस्त्रिया ज्याप्रमाण नवऱ्याची आज्ञा होताच चटकन् स्वयपाकघरात निघून जात त्याप्रमाण या आधुनिक काळीं तू बायकोची आज्ञा ऐकताच चहा करावयास जा ! रेंगाळतो आहे, अजून हा रेंगाळतो आहे. पुरता नवरेपणा मेलेला दिसत नाहीं ! पुणेरी, अस्सल पुणेरी !

**अन्न०**—या वेळी तरी जायच गडे ! ( लडिवाळपणाने ) नाही का माझ ऐकायच एवढ ?

**आनंद०**—इतका गोड हुकूम मी का ऐकणार नाहीं ? लाडके, हा मी स्वयंपाकघरात चहा करण्यासाठीं जातों. तू इथ मामाशीं गप्पा मारीत बैस. (जातो.)

**झब्बू०**—( तिला शेजारीं बसवून ) पाहिलस, पोरी ! तुझ्या नवऱ्यान एवढ्याशा बाबतीत किती आढेवेढे घेतले, ते पाहिलेस ना ? पोरी, तू या झब्बू-मामाची भाची आहेस हें विसरू नकोस. मला न विचारता या पुणेकराशीं लग्न केलस, तुझ्या हातून होऊ नये ती गोष्ट झाली, आता निदान या नवरोबाच्या अगातील पुरुषी भावना मारण्याचा तरी हिय्या धर. कचरू नकोस, कच खाऊं नकोस, मी तुझ्या मदतीला धावून आलों आहें.

**अन्न०**—मामा, तुम्ही जें जें बोललात ते ते मुकाट्यान ऐकून घेतल, पण अजून मनाला पुरत पटत नाहीं ! पुरुषाचा पाणउतारा करण, पतीची दर शब्दागणीक मानहानि करण, आम्हा स्त्रियाना शोभत नाहीं !

**झब्बू०**—पोरी, पुण्यांत आलीस, पुण्यांतील पुरुषाला नवरा म्हणून मान्य केलंस आणि पुरती पुणेरी बनलीस ! पोरी, तुझ्या या असल्या भेकड वर्तनान या तुझ्या मामाच्या तोण्डाला काळें फासू नकोस ! मी इथ तुमचा पुणेरी जोडा पाहण्यासाठी, जो एकशें एकोणीस मैलावरून धांवून आलों तो का आलों अस तुला वाटत ? तुझ कल्याण व्हाव म्हणून ! तुझ पुरत कल्याण होईपर्यत तुझ्या इथच राहण्याचा पक्का निर्धार करूनच मी आलों आहे.

**अन्न०**—मग हे तुमचे उपकारच झाले आहेत म्हणायचे !

**झब्बू०**—आतां सांग, तूं इथं पळून येऊन या पुणेकराशीं कां लग्न केलंस ?

**अन्न०**—मामा, कां म्हणून काय विचारतां ? माझं त्यांच्यावर तसंच निर्मळ प्रेम बसलं म्हणून ! ते थोड्या दिवसांपूर्वी मुंबईस आले होते, तेव्हां त्यांची माझी ओळख झाली आणि त्यांनीं माझं प्रेम संपादन केलं. माझं त्यांच्यावर प्रेम बसलं आणि त्यांचं माझ्यावर प्रेम बसलं ! त्यांनीं माझ्या अर्ध्या वचनांत राहण्याची शपथसुद्धां घेतली आहे !

**झब्बू०**—अर्ध्या वचनांत, होय ना ? पुणेरी, अस्सल पुणेरी ! लेकाचा कधींहि सगळ्या वचनांत राहण्याचं वचन द्यायचा नाहीं ! पुणेरी, अस्सल पुणेरी ! बरं, तो आणखी काय म्हणाला ?

**अन्न०**—इ:श ! तें गुपित मी कसं सांगूं ? मला बाई, लाज वाटते !

**झब्बू०**—पोरी, तूं या झब्बूमामाची भाची असून तुला लाज वाटते ? लाज सोड, माझ्याप्रमाणं लाज सोड आणि सारं गुपित मला सांग !

**अन्न०**—ते म्हणाले, लाडके...पण इ:श, मला नाही निर्लज्ज होतां येत !

**झब्बू०**—पोरी, सोड, माझ्याप्रमाणं लाज सोड आणि ' झब्बूमामाची भाची ' ही तुझी महनीय पदवी सार्थ कर. काय म्हणाला तो ?

**अन्न०**—ते म्हणाले, लाडके, तूं माझी अर्धांगी हो !

**झब्बू०**—अरेरे ! हा पुणेरी नवरोबा तुला कांहीं ' पूर्णांगी हो ' असं म्हणाला नाहीं ! अर्ध्या वचनांत राहीन, अर्धांगी हो, असं अर्धवटच तो बोलणार, कारण तो पुणेकर आहे. पुणेरी, अस्सल पुणेरी !

**अन्न०**—काय बरं हें मामा ? किती अर्थाचा अनर्थ केलांत तरी !

**झब्बू०**—पोरी, हा अनर्थ नाहीं, उलट हाच अर्थ अनर्थ टाळील ! बरं पण पोरी, आतां सांग, तूं या पुणेकराला कोणत्या विधीनं नवरा करून घेतलंस ?

**अन्न०**—इ:श ! दुसऱ्या कोणत्या विधीनं ? लग्नविधीनं ! त्यांना मीं पक्की लग्नगांठ बांधायला लावलं आहे. बोला, मामा ! आतां तरी मी शोभतें कीं नाहीं तुमची भाची ?

**झब्बू०**—छे:, अजून नाहीं ! आधीं असं सांग, भटांभिक्षुकांकडून टाळक्यावर मंत्राक्षता उधळून घेऊन लज्जेचा होम केलास कीं,सारी लाजलज्जा गुंडाळून ठेवून....

**अन्न०**—लाजलज्जा कशाला गुंडाळायची ? अगदी उजळ माथ्यान रजिस्टर्ड पतद्वीन कायदेशीर लग्नाची नोंदणी केली ! आता तर सारा संशय फिटला ना मामा तुमचा ?

**झब्बू०**—असो, काळ्यापेक्षा पीठा दगड बरा ! कायदेशीर लग्न नोदवलस हे ठीक झाल ! या नोंदणीमुळं तुला वाटेल त्या वेळीं नवऱ्याला सोडचिठी देता येईल ! ही पळवाट काढलीस याबद्दल मी तुला धन्यवाद देतों आणि वाटेल त्या वेळीं तुला काडीमोड मिळो, अशी सदिच्छा प्रकट करतों !

**अन्न०**—मामा, माझ्या मनात नाही बर असल घटस्फोटाच काळबेर ! माझ त्याच्यावर इतक प्रेम आहे कीं, मी कधींहि त्याच्यापासून दूर होणार नाहीं आणि त्याना माझ्यापासून दूर होऊ देणार नाहीं !

**झब्बू०**—पोरी, तुला अजून जगाचा अनुभव नाहीं कीं तू अजून आधुनिक समाजशास्त्राच आलोडन केल नाहींस, आणि म्हणून तुला असा भ्रम होतो ! या भ्रमात राहू नकोस आणि डोळ्यात तेल घालूनच या पुणेकर नवरोबाकडे सूक्ष्म नजर लावून बैस ! प्रसग पडला तर त्याला दूर लोटायलाहि मागंपुढ पाहू नकोस ! तुझ्या नीतिधैर्याच्या कसोटीची वेळच आली तर कचरू मात्र नकोस ! पण तो बघ, आलाच तुझा नाथ चहा घेऊन ! कसा लेकाचा लाजत लाजत येतो आहे–पुणेरी, अस्सल पुणेरी ! ( आनदराव चहापात्रें घेऊन येतो त्यास ) आनदराव, एकाद्या बायकोनं चहा आणायला इतका वेळ लावला असता तर तिच्या नवऱ्यानं काय केल असत ? पुरुषीपणा न मेलेल्या त्या नवरोबान बायकोला फाड-फाडून खाल्ल असतं आणि आपला नवरेपणा गाजविला असता ! पण आनदराव, तू पडलास नवरा, तेव्हा ही तुझी बायको......

**अन्न०**—इःश ! मामा, काय बोलता हें ? पहाना, सवय नाहीं म्हणून एवढासा चहा करूनसुद्धां किती गोरमोर तोण्ड झाल तें इकडच ? नाथ, डोळे असे लाल का दिसतात ?

**आनंद०**—लाडके, चूलच नीट पेटेना ! लाकड फुकून फुकून थकलों आणि डोळ्यात धूर गेल्यान .

**झब्बू०**—नवरोबाच्या डोळ्यांवरील धूर उतरला ! छान झाल !

**अन्न०**—काय छान झालं ? इकडच्या डोळ्यांत पाणी आल तरी तुमच

त्यांच्यावर वांकडा डोळा ? नाथ, तुमची ही दीन अवस्था पाहून माझ्या हृदयाचं पाणीपाणी होतं आहे ! नाहींना वाईट वाटलं इकडे ?

**आनंद०**—लाडके, तुझ्या या गोड आणि प्रेमळ भाषणानं दुःख तर विसरून गेलोंच, पण उलट आतां मला आनंदच झाला आहे ! लाडके, तुझे असे प्रेमळ बोल मला नेहेमीं ऐकावयास मिळणार असतील तर, मी आजपासून नुस्ता चहाच काय, पण रोजचा स्वयंपाकसुद्धां करीन ! लाडके, मला तुझं निर्व्याज आणि स्वर्गीय प्रेम पाहिजे आहे, तुझ्या प्रेमापुढं मी संकटांचे पर्वतसुद्धां तृणवत् मानीन !

**अन्न०**—अहाहा ! किती भाग्यशाली मी ? मला असलं अनुपम पतिदैवत लाभलं याबद्दल मी परमेश्वराचे आभारच मानतें.

**झब्बू०**—( स्व० ) अरेच्या, हा नवरोबा लागला मोहजाल पसरायला ! आतां कांहीं तरी युक्ति काढलीच पाहिजे. ( उघड ) काय रे आनंदराव, तूं जें जें आत्तां बायकोशीं नाजुक भाषेंत बोललास, तें तें अक्षरशः खरं करून दाखवायची आहे का तुझी तयारी ? कीं आपली दिलीस गोड थाप ठेवून ?

**आनंद०**—मामा, मी कर्ता पुणेकर आहें, मला थापा मारायची संवय नाहीं ! वाटल्यास माझी परीक्षा घ्या ! मी बी. ए. ची परीक्षा पास झाल्याचा अभिमान सोडून, असें शपथेवर आश्वासन देतों कीं, हा पुणेरी पुरुष कसल्याहि बिकट प्रसंगीं वचनभंग करणार नाहीं !

**अन्न०**—मामा, ऐकलंत ना इकडचं आश्वासन ? आतां बोला, असे जन्माचे जोडीदार मिळाले तेव्हां मी भाग्याचीच आहें कीं नाहीं ? ( आनंदरावाजवळ उभें राहून ) आतां खरं खरं बोला, हा आमचा पुणेरी जोडा पुण्यशाली आहे कीं नाहीं ?

**झब्बू०**—पोरी, तुझ्या प्रश्नाचं उत्तर मी आजच देत नाहीं. हा तुझा पुणेरी नवरोबा बी. ए. ची परीक्षा पास झाला असेल, पण त्याला माझी परीक्षा पास होणं फार कठीण जाईल ! पोरी, इतकी उतावळी होऊं नकोस, इतक्यांत हुरळून जाऊं नकोस ! आनंदराव, तुम्ही बी. ए. झालांत, काय मिळतं तुम्हांला नोकरींत ?

**आनंद०**—बी. ए. झालेल्या शाळामास्तराला ४० रुपयांपेक्षां अधिक काय मिळणार ? यांत बढती होतां होतां मरेपर्यंत ७५ चा आंकडा दिसला, म्हणजे भाग्य !

**झब्बू०**—मग मी म्हणतों, तुम्ही नोकरी सोडून, असली दरिद्री शाळा-मास्तरकी सोडून, घर कां संभाळीत नाही आणि पत्नीला मोठ्या पगाराची नोकरी कां करूं देत नाहीं ?

**अन्न०**—इ श ! मला सुशिक्षित स्त्री म्हणतात, पण माझ ५।६ इयत्तापेक्षां कुठं अधिक शिक्षण झाल आहे ?

**झब्बू०**—काय ? तू सुशिक्षित स्त्री नाहीस ? असे कसे म्हणतेस ? तुझ्या नावानें स्त्रियाच्या मासिकातून इतके सुदर सुदर लेख प्रसिद्ध झालेले असताना, तू स्वत ला अशिक्षित म्हणवून घ्यावेंस, याचे मला आश्चर्य वाटते !!

**अन्न०**—अहो पण मामा, ते लेख माझ्या नावावर प्रसिद्ध झालेले असले तरी त्यांतील साऱ्या गुप्त गोष्टी तुम्हाला माहीतच आहेत. ते लेख माझ्या नावावर—

**झब्बू०**—हा ! तें सपादकीय गुपित या पुणेकरासमोर तरी फोडू नकोस. ते लेख तू लिहिले नाहीस हे ठरवायला, पुणेकर विद्वानाना लेखसाधन–कमिटी बसवावी लागेल.

**अन्न०**—कशाला हवी कमिटी ? ते लेख मीं लिहिलेले नाहीत ते लेख माझ्या नावाने तुम्हीं लिहिले आहेत—

**झब्बू०**—पोरी, पक्की पुणेरी झालीस. सपादकीय गुपिते कशी राखावयाचीं हे सुद्धा तू विसरलीस. असल्या सपादकीय गुपिताच्या बाबतींत माझ्या इतका थापाडेपणा आमच्या मुबईच्या मोठमोठ्यानाहि अजून साधलेला नाही. बरे. तो विषय राहू दे. तू नोकरी करण्याचे कबूल कर, म्हणजे पहा वाटेल तेवढी मोठी नोकरी मिळते कीं नाहीं ते !

**अन्न०**—कोण मला देणार मोठी नोकरी ? मला नोकरीत ४० रुपड्यासुद्धा कुणी देणार नाहीं !

**झब्बू०**—तुम्हा आकुचित दृष्टीच्या पुणेरी माणसाना असच वाटायच ! हल्ली शिकलेल्या सुदर स्त्रियाना सिनेमात भयकर मागणी आहे. पोरी, तू मनाचा निर्धार करशील आणि तुझा हा नवरोबा घर सभाळण्याच कबूल करून तुला नटीची नोकरी करण्याची परवानगी देईल, किंवा तूच स्वत आपला नोकरी करण्याचा स्वातत्र्याचा हक्क गाजविशलि, तर तुझ्या पायाशी पाचशें रुपयाची नोकरी लोटागण घालीत येईल ! काय पुणेरी नवरोबा, पाळता का अभिवचन ? कायग पोरी, आहे का हे तुला धैर्य ?

**आनंद०**—मामा, हिला माझी वाटेल ती नोकरी करायला फुल् परवानगी

आहे. हिच्या पवित्र शीलावर माझा पूर्ण विश्वास आहे. ही नोकरी करील तर मी नवरोबाचा अभिमान सोडून घर संभाळीन, आणि हिची सेवा करीन ! मी माझ्या वचनापासून ढळणार नाहीं.

**झब्बू०**—आणि तूं ग पोरी ?

**अन्न०**—आणि मी इकडच्या शब्दाला मान देईन !

**झब्बू०**—मग हिला द. म. ५०० रु. सिनेमानटीची नोकरी देणें माझ्याकडे लागलं ! तुमच्या पडत्या फळाची आज्ञा घेऊन हा मी त्याच उद्योगाला लागतों ! असं न करीन, तर नांव बदलून देईन ! हो, बरी आठवण झाली ! पोरी, लग्न झालं म्हणून तूं मूर्ख रूढीला अनुसरून आपलें नांव बदललंस आणि अन्नपूर्णा असं हेंगाडं पुणेरी नवं नांव घेतलसं ! अन्नपूर्णा हें, बायकांची चुलीपुढील गुलामगिरी दर्शविणारें, नवं नांव आहे ! पोरी, नटी झालीस म्हणजे तुला पुनः एकदां नांव बदलावं लागेल आणि गुलगुलीत असं मिस् चंपादेवी हें नांव घ्यावं लागेल. सिनेमांतील नटी ही अखण्डकुमारी असल्यामुळें तुझ्या नांवामागील सौ. हें उपपद जाऊन, मिस् हें तुला उपपद लाभेल. मग मिस् चंपादेवी, आणि मिस्टर आनंदराव उर्फ मिस्टर चंपादेव, जाऊं ना मी माझ्या उद्योगाला ? हा मी चाललोंच ! पण हें पहा नवरोबा, सर्व जुळलं तर पुरुषीपणाला मात्र आयत्या वेळीं वर डोकं काढूं देऊं नका हं ! आयत्या वेळीं बिब्बा घालाल तर ठराल पुणेरी, अस्सल पुणेरी ! ( जातो. )

**अन्न०**—गेले, झब्बूमामा माझ्यासाठीं सिनेमांत नोकरी पहावयास गेले ! पण नाथ, या सर्व गोष्टींमुळं तुम्हांला नाहीं ना विषाद वाटत ? मी तर खरोखरच भांबावून गेलें आहें !

**आनंद०**—लाडके, यांत भांबावून जाण्यासारखं तें काय आहे ? तूं नोकरी करून नवऱ्याचीं कर्तव्यें पार पाड, मी घर संभाळून पत्नीचीं कर्तव्यें पार पाडीन ! ही भयंकर उलथापालथ आहे असं कोणाला वाटेल, पण माझ्या प्रेमळ मनाला कांहीं त्यांत वावगें दिसत नाहीं ! लाडके, मनांत पूर्ण निर्धार ठेव कीं, आकाश कोसळलं किंवा धरणी दुभंगून गेली तरी तुझामाझा हा पुणेरी जोडा कुणीहि भंगूं शकणार नाहीं ! काळ बदलला, कर्तव्यांत उलथापालथ झाली, तरी प्रेमाला कशाचीहि बाधा होत नसते !

**अन्न०**—नाथ, तुमच्या प्रेमळ आश्वासनान किनई, मी धन्य झाले ! दिव्य प्रेमाचा जोडा जो लक्ष्मी-नारायण, त्याच्या चरणीं माझी प्रार्थना इतकीच आहे कीं, हा आपला पुणेरी जोडा असाच अभग राहो !

## प्रेम-गीत

**नांदो सुख हे अभंग । वाढो हा प्रेमरंग ॥**
**लक्ष्मीसह नारायण । रतिसह जैसा अनंग ॥ ध्रु० ॥**
**सौख्या त्या नाहि पार । जेथें मधु प्रीतिसंग ॥ १ ॥**

**टप्पू०**—(प्रवेशून) कायरे आनदा, काय ग अन्नपूर्णा, तुमची चर्या अशी उतरलेली का दिसते ? काय, झाल काय ? आणि हा झब्बूमामा कुठ गेला ?

**आनंद०**—काका, झब्बूमामा बाहेर गेले असून, त्याच्या खटाटोपामुळे आमच्या ससारात बरीच उलथापालथ होण्याचा सभव आहे.

**टप्पू०**—म्हणजे, मी नाही समजलो काय ते !

**अन्न०**—काही विशेष नाही हो, मामजी ! मामा माझ्याकरिता सिनेमात नोकरी पहाण्यासाठीं गेले आहेत. सिनेमातून त्याच्या ओळखीदेखी फार चागल्या आहेत.

**टप्पू०**—पहा बुवा तुमच तुम्हीच काय ते ! पण मला यात त्या मामाची भानगड दिसते आहे.

**अन्न०**—माझे मामा तसे भानगडी नाहीत बर ! ते माझ्या हिताचीच गोष्ट करतील !

**टप्पू०**—पोरींचा ओढा सदा मामाकडे असतो, त्या दृष्टीन तुझा मामा-वरचा विश्वास ठीक आहे. पण मला माझ्या आनदाच्या हिताला जपल पाहिजे.

**आनंद०**—मग काका, तुम्ही माझ हित पहा म्हणजे झाल ! मुलीना जसा मामा प्रिय, तसा मुलाना काका प्रिय असतो ! काका, तुम्ही आपल माझ हित पहा !

**टप्पू०**—बस्स, झाला माझा निश्चय ! हा झब्बूमामा या घरात असेपर्यंत मी इथच तळ देऊन रहाणार ! आणि झब्बूमामा, तूहि ध्यानात ठेव कीं, तुझी काही भलती भानगड मला दिसून आली, तर तुला या टप्पूकाकाच्या हातचा सणसणीत टप्पूच खावा लागेल ! कारण हा टप्पूकाका आहे-पुणेरी, अस्सल पुणेरी !

( **पडदा.** )

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

( **स्थळ**—भुजंगरावाचा दिवाणखाना. सडेतोड पत्राचा
संपादक सत्यमूर्ति प्रविष्ट. )

**सत्यमूर्ति**—मग काय भुजंगराव, आज तुमच्या नव्या बोलपटासाठी एक सुंदर नटी मिळणार म्हणतां? खरोखर ही अभिनंदनीय गोष्ट आहे. सुंदर आणि सुशिक्षित कुलीन स्त्रिया सिनेमाच्या चंदेरी चित्रफलकावर चमकण्यासाठीं वाढत्या प्रमाणांत धिटाईनं पुढं येत आहेत, ही खरोखरच माझ्या सणसणीत, खणखणीत, दणदणीत आणि ठणठणीत सडेतोड पत्रांत, भल्या मोठ्या जाड्या टाईपांत, प्रसिद्ध करण्यासारखी प्रशंसनीय गोष्ट आहे. त्या तुमच्या नव्या नटीचा मुखडा तर माझ्या मार्मिक नजरेंत भरूं दे, मग अशा तिरप्या अँगलनें फोटो घेतों कीं, पहात रहाल! त्या फोटोचा असा उठावदार ब्लॉक करतों की, पहात रहाल! तो ब्लॉक अशा भडक रंगांत छापतों कीं, पहात रहाल! त्या चित्रावर असा सणसणीत, दणदणीत, खणखणीत आणि ठणठणीत मथळा देतों की, पहात रहाल! तिच्या वर्णनाचा असा गुळगुळीत मजकूर देतों की, पहात रहाल! माझ्या सणसणीत, दणदणीत, खणखणीत आणि ठणठणीत सडेतोड पत्रांत अशी तिची प्रसिद्धी करतों कीं, पहात रहाल!! मी संपादक आहें, मी सत्यमूर्ति संपादक आहें, प्रसिद्धीकरणांत माझा हातखण्डा आहे! अशी मौज करतों, अशी गंमत उडवून देतों, असा निर्भीड बाणा दाखवतों कीं, नटवर्य सिनेमासम्राट् भुजंगराव! तुम्ही विस्फारित, प्रफुल्लित, सोल्लसित नेत्रांनीं पहात रहाल, पहात रहाल, पहात रहाल! पहा, भुजंगराव, पहा, मला वाटतं तीच मंडळी येते आहे!

**भुजंग०**—हो, तीच ती येणारी मंडळी! सावधान, संपादक, सावधान! त्या मंडळीसमोर माझं असं झोंकदार वर्णन कर कीं...

**सत्य०**—ती सारी मडळी तत्काल गार पडेल !

**भुजंग०**—ती सारी मडळी गार पडो किवा न पडो, ती मिस् चम्पादेवी तरी गारीगार झाली पाहिजे ! सत्यमूर्ति, माझ वर्णन तुम्हाला माहीतच आहे

**सत्य०**—तुम्ही नटवर्य आहात, सिनेमासम्राट् आहात, शिवाय अभिनय-कुशल, गानकुशल, कलाकुशल, भावनाकुशल, तसच सुविद्य, सभावित, सभ्य, शहाजोग, सद्गुणाचे पुतळे..

**भुजंग०**—ठीक, ठीक, ठीक वर्णन जुळल आहे ! मित्रा सपादका, तू मला एवढ्या चपादेवीच्या परीक्षेत पास कर, मी तुला माझ्या सिनेमाचा कायमचा फ्री पास देऊन ठेवीन ! अरे पण ती पहा, आलीच मडळी . (झब्बूमामा, आनदराव, अन्नपूर्णा, टप्पूकाका येतात.) याव, याव, मण्डळी हो, याव ! बसाव, अस बसाव, (सत्यमूर्तीस खुणवून) करा सुरवात !

**सत्य०**—मण्डळी हो, तुमच या भुजगरावाच्या घरी स्वागत असो ! आपणा पैकी सुविद्य, सभ्य, सभावित आणि सद्‌गुणैश्वर्यसपन्न मिस् चम्पादेवी कोण तें कळेल, तर मला प्रथम त्याचे अभिवादनपूर्वक सानद अभिनदन करता येईल !

**टप्पू०**—आमच्यापैकीं चम्पादेवी कोण, हें विचारणारे दीड शहाणे तुम्ही कोण, ते आधी आम्हाला कळेल, तर आमच्या डोक्यात तुमच्या शहाणपणा विषयीं बराच प्रकाश पडेल !

**सत्य०**—हॅ, हॅ, हॅ, हॅ, हॅ, हॅ ! फार कटीण प्रसग आणलात हा. तुम्ही–तुम्ही ?

**झब्बू०**—याच नाव टप्पूकाका !

**सत्य०**—टप्पूकाका ! मी माझ वर्णन काय करू ? मी स्वतःची स्तुति केली तर 'आपुली आपण करी स्तुति तो एक मूर्ख' या सदरात मी पडेन, पण त्याला इलाज उरलेला नाहीं. आता मी सपादकीय भाषेंत माझ्या वर्णनाला सुरुवात करतों. आम्ही–सपादक नेहेमी स्वतःला आम्ही अस सबोधीत असतात–आम्ही सत्यमूर्ति नामधारी सद्‌गृहस्थ आहोत.

**टप्पू०**—(स्व०) हा लेकाचा नामधारी सद्‌गृहस्थ दिसतो खरा !

**सत्य०**—आम्ही स्वतः सडेतोड पत्राचे संपादक आहोंत. आमच्या लेखकवर्गांत कलमगीर, पेनगीर, लेखणीगीर अशा साहित्यबारगीरांची पुष्कळ खोगीरभरती असली, तरी आमचं नांव संपादक म्हणून मुखपृष्ठावर जाड्या टाईपांत छापण्यांत येतें. आमच्या पत्राचें नांव सडेतोड. आमचं पत्र सणसणीत, दणदणीत, खणखणीत, ठणठणीत...

**टप्पू०**—हा तुमचा ठणठणाट चांगला समजला ! म्हणजे तुम्ही सडेतोड पत्राचे संपादक सत्यमूर्ति ! तुम्ही सत्य, निर्भेळ आणि निर्भीड सत्य बोलतां—मग तें शहाणपणाचं असो, दीडशहाणपणाचं असो, मूर्खपणाचं असो कीं, महामूर्खपणाचं असो—तुम्ही सत्य तेंच बोलतां हें कळलं !

**सत्य०**—तसंच, हे माझे मित्र श्रीयुत भुजंगराव ! हे नटवर्य आहेत, सिनेमासम्राट् आहेत, शिवाय अभिनयकुशल, गायनकुशल, भावनाकुशल, कलाकुशल, तसंच सुविद्य, संभावित, शिष्ट, सभ्य...

**टप्पू०**—अहो सभ्य, आम्हांला या भुजंगरावांचेंहि वर्णन कळलं. आतां बोला, तुम्हांला काय पाहिजे ?

**सत्य०**—तुमच्यापैकीं मिस् चम्पादेवी कोण,हें आम्हांला आतां कळलं पाहिजे !

**टप्पू०**—हे अकलेच्या खंदका उर्फ संपादका, तुला आमच्यापैकीं स्त्री कोण, हें सुद्धां कळलं नाही ना ? दुर्दैव आमचं !

**सत्य०**—दुर्दैव तुमचं नव्हे, दुर्दैव आमचं !

**टप्पू०**—नाहीं, दुर्दैव दोघांचं ! नीट डोळे फाडून पहा. हे झब्बूमामा, हे आनंदराव, मी टप्पूकाका, आणि या मिस् चम्पादेवी !

**सत्य०**—काय, या चम्पादेवी ? या चम्पादेवी ?

**टप्पू०**—होय, या चम्पादेवी ! अरे अकलेच्या खंदका सम्पादका, ही चम्पादेवी नसून स्त्रीवेष घेतलेला एखादा स्त्रीपार्टी नट आहे, असं का तुला वाटलं ?

**सत्य०**—तसं कसं वाटेल ? तसं कसं वाटेल ? या स्त्रीच असल्या पाहिजेत, त्या ब्रह्मदेवानं स्वतःच्या देखरेखीखालीं कुशल कलावन्तांकडून निर्मिलेल्या या स्त्रीच असल्या पाहिजेत. यांच्या रूपसौंदर्याच्या प्रखर प्रकाशानं आमचे डोळे

दिपून गेले, आमच्या डोळ्यापुढ अधारी आली, आमच्या डोळ्यापुढ काळोखी चमकली ..अहाहा ! अहाहा !! अहाहा !!!

**टप्पू०**—(स्व.)लागला, आर्टिकलच्या आर्टिकल बरळायला लागला ! (उघड) आता सम्पादकमहाशय, प्रस्तावना फार लाम्बली तेव्हा झट्कन मुद्द्यावर या !

**झब्बू०**—मी तरी तेच म्हणतो. आपण आता मुख्य मुद्द्यावर आल पाहिजे ! मी सागतो थोडक्यात काय ते ! हे नटवर्य, सिनेमासम्राट्, सभ्य, सुविद्य, सभावित भुजगराव ! हे चम्पादेवीला पाचशे रुपयावर सिनेमानटीची नोकरी द्यावयास तयार आहेत. हे भुजगराव सभ्य, सुविद्य, सभावित असल्यामुळ त्याच्या सहवासात चम्पादेवीला तसली कसली कोणतीहि भीति बाळगण्याच कारण नाही ! आपण कुलीन, चम्पादेवी कुलीन, भुजगराव कुलीन ..

**सत्य०**—आणि मीहि कुलीन .

**झब्बू०**—असा सर्व कुलीनाचा हा मामला आहे. तसच भुजगराव हे सभ्य, सुविद्य, सभावित, नटवर्य, सिनेमासम्राट् असल्यामुळे ते फार बोलत नाहीत ..

**भुजंग०**—झब्बूमामा, मी नेहेमींच फार बोलत नाही हें खर, पण आत्ता मात्र चम्पादेवींच्या रूपसौदर्यामुळ माझी अगदी वाचाच बसली आहे. झब्बूमामा, तुम्ही टरवाल ते मला कबूल आहे.

**झब्बू०**—उत्तम ! आता मी गभीरपणें जाहीर करतो की, चम्पादेवीची नेमणूक कायम झाली ! ही मगल सधि साधून मी असहि जाहीर करतों की, पहिल्या बोल-पटाच कथानक मीच लिहिणार असून, त्याचा कथाभाग द्रौपदीवस्त्रहरणाचा आहे !

**सत्य०**—ब्रेव्हो ! ब्रेव्हो ! अहाहा, काय सुदर कथानक झब्बूमामानीं शोधून काढल पण ! आत्ताच माझ्या मार्मिक नेत्राना तो शेवटचा वस्त्रहरणाचा देखावा मूर्तिमत दिसू लागला आहे. हे क्रूरमूर्ति भुजगराव दुःशासनाच्या रूपान समोर उभे असून द्रौपदीच वस्त्रहरण करीत आहेत, द्रौपदी रडते आहे, ओरडते आहे, आणि हें दृश्य पाहून प्रेक्षकसुद्धा रडकुडीला आलेले आहेत—असा तो सुदर देखावा, ती द्रौपदी, ते वस्त्र, तें हरण..

**टप्पू०**—अहो अकलेचे खंदक उर्फ संपादक, तें हरण नसेल, हरिण असेल!

**सत्य०**—हरण म्हणा किंवा हरिण म्हणा ! मला तो सीन मूर्तिमंत दिसतो आहे हें खरं !

**झब्बू०**—शिवाय चम्पादेवींना द्रौपदीची भूमिका फार फिट् दिसेल ! पांच नवऱ्यांना पाणी पाजणारी, नवऱ्यांतील नवरेपणा धुळीला मिळविणारी ती जहांबाज द्रौपदी या चम्पादेवीसारखीच असली पाहिजे ! भूमिका विशाल, तशी नटीहि विशाल ! पण कांहो नवरोबा आनंदराव, तुम्ही कां कांहींच बोलत नाहीं ? तुम्ही तर प्रथम बोललं पाहिजे; कारण या चम्पादेवीनं तुम्हांला नवरोबा मानलं आहे ! नवरोबा, काय दुष्टपणा, जुल्मीपणा, क्रूरपणा अर्थात् पुरुषीपणा दाखवायचा असेल तो आत्तां दाखवा ! एकदां करारमदार झाले, म्हणजे तुम्हांला नवरोबापणा गाजवतां येणार नाहीं ! बोला, नवरोबा, बोला ! तुम्ही नवरोबा आणि त्यांतहि पुणेरी, अस्सल पुणेरी तेव्हां...

**आनंद०**—झब्बूमामा, मी नांवाचा नवरोबा आहें. तुम्ही मला नवरोबा म्हणायचं असेल तर म्हणा, पण मी स्वतःला नवरोबा म्हणजे दुष्ट आणि जुल्मी पुरुष मानीत नाहीं ! मी माझ्या लाडकीचा सेवक आहें, दास आहें, गुलाम आहें. तिच्या मनाहून वेगळें मन मला नाहीं, तिच्या भावनेहून वेगळी भावना मला नाहीं...

**झब्बू०**—( स्व० ) लुच्चा ! लबाड ! मायावी ! कपटी ! पुणेरी, अस्सल पुणेरी ! तशी सहजासहजीं दाद कुठली लागूं देणार हा ? पण कांहीं असलं तरी पडत्या फळाची आज्ञा घेऊन पुढचा मार्ग सुधारला पाहिजे ! ( उ० ) ठीक आहे. चम्पादेवी, तुम्ही आतां काय तें बोला म्हणजे झालं !

**भुजंग०**—( एकीकडे ) मित्रा संपादका, कान टवकारून बस; कारण आतां चम्पादेवींचं गोड-गोड भाषण आपल्याला ऐकावयास मिळणार आहे.

**सत्य०**—( एकीकडे ) मित्रा नटवर्या, सिनेमासम्राटा, नको तुला त्याची काळजी ! माझे कान लांब, अगदी लांब, पांच हजार मैल लांब चाललेलं भाषणसुद्धां ऐकण्याइतके तीक्ष्ण आहेत !

**अन्न०**—मन्ना, मी काय बोलणार ? माझे मामा या नात्यानं तुम्ही माझ्या हिताची काळजी वहातच आहांत ! तुम्ही जें ठरवाल त्याला माझी संमति आहे आणि माझी ज्या गोष्टीला संमति आहे, त्याला इकडचीहि संमति असणारच !

**सत्य०**—इकडची म्हणजे कुणीकडची ?

**आनंद०**—इकडची म्हणजे माझी. मी थोडक्यात आमची हकीकत सागतो. आम्ही तरुण पिढीतील माणस! आम्हीं प्रीतिविवाह केला आणि अत्यत आधुनिक अशा रजिस्टर्ड पद्धतीन विवाहाची नोंद केली, त्यामुळ ही अन्नपूर्णा माझी गृहलक्ष्मी झाली. मी पुण्याचा म्हणून झब्बूमामा आमच्या जोड्याला, पुणेरी जोडा अस म्हणतात! इतक्या गोष्टी असल्या तरी, मी नवरोबाचे हक्क गाजविण्यास तयार नाही. मी अन्नपूर्णेचा नवरोबा नाही, मी तिच्या प्रेमाचा पाईक, सेवेचा सेवेकरी आणि दासानुदास आहे. माझी काळजी करू नका. अन्नपूर्णेची समति आहेच, आता पुढच्या कामाला लागा! टप्पूकाका, आपल काम सपल, चला आपण आता घरी जाऊ. या सर्वांना काय करारमदार करायचे असतील ते शात चित्ताने करू द्या—चला. ( जावयास निघतो. )

**अन्न०**—( त्याच्याजवळ जाऊन ) हे काय बर नाथ? मध्येच का उठून चाललात? रागवायच तर झाल नाही ना? मी करत्ये आहे ते आपणा दोघाच्या सुखाकरताच करत्ये आहे. माझ्या कृतींचा इकडे राग तर नाही ना आला?

## भावना—गीत

**प्रेम द्याहो प्रेम घ्याहो। राग ना चित्ती धरा॥**
**जीवजीवां ऐक्य होतां। ना मुळी शंका वरा॥ ध्रु०॥**
**मोगरीची वेल घेई। जैं तरूचा आसरा॥**
**होय सौख्याची समाधी। भंग हातें ना करा॥ १॥**

**आनंद०**—नाही, लाडके! तुझ्या कोणत्याहि कृतीचा राग मला येत नाही, येणार नाही आणि येण शक्य नाही! मी लौकर घरी गेलो नाही तर घरची व्यवस्था कोण पाहील बर? तू आता आपल्या शिरावर फार मोठी जबाबदारी घेत आहेस. तू दमून भागून घरीं येशील तेव्हा, तुझ्या आगमाची सर्व सिद्धता करून ठेवायला मला नको का? तू अगदीं निःशक मनान इथच रहा! मी टप्पूकाकाना घेऊन जातो. त्याची तरी आडकाठी तुम्हाला पाहिजे कशाला! चला टप्पूकाका! ( पुढे होतो. )

**टप्पू०**—आनदा, चल तर! ( झब्बूमामास ) झब्बूमामा, जरा इकडे या.

(तो आल्यावर) नीट लक्षांत असूं द्या कीं, या प्रकारांत कांहीं भानगड दिसून आली तर माझ्या हातचा खुसखुशीत टप्पू खावा लागेल तुम्हांला !

**झब्बू०**—टप्पूकाका, तुम्हांलाहि मी एकदांच सांगून ठेवतों कीं, माझ्या-विषयीं संशय घेत बसूं नका; कारण हा झब्बूमामा पुणेरी नाहीं, हा सभ्य, सालस, शहाजोग, संभावित आणि सरळ बुद्धीचा आहे !

**टप्पू०**—बस्स करा या थापा आणि मीं बजावलं आहे तें नीट लक्षांत ठेवून कामाला लागा ! हा मी जातों. (जातो.)

**झब्बू०**—(ते दोघे गेल्यावर) ऐक, पोरी ! मी काय सांगतों तें नीट ऐक. तूं कौमार्यावस्थेंत शालिनी होतीस, गृहस्थाश्रमांत सौ. अन्नपूर्णा झालीस आणि आज सिनेमासृष्टींत मिस् चम्पादेवी म्हणून पाऊल टाकते आहेस ! ही तुझ्या कर्तबगारीची चढती भांजणी मला अभिनंदनीय वाटते आहे. या तुझ्या नटीच्या नव्या पेशानं तुला संपूर्ण स्वातंत्र्य मिळणार आहे ! या स्वातंत्र्यामुळं तुझ्या पुणेरी नवऱ्यांतील नवरेपणा नष्ट होण्याचा मार्ग सोपा होणार आहे. कर, मिस् चम्पादेवी ! मोठ्या आनंदानं या करारावर आपली सही कर. (सही करूं लागते.)

---

## प्रवेश २ रा

(**स्थळ**—रस्ता. वर्तमानपत्रें विकणारा पोऱ्या एका बाजूनें व आनंदराव आणि टप्पूकाका दुसऱ्या बाजूनें प्रवेश करतात.)

**पोऱ्या**—सडेतोड ! सडेतोड ! ताजी बातमी ! खास अंक ! सडेतोड—किंमत तीन पै. सकाळ, दुपार, संध्याकाळ, तिन्ही त्रिकाळचा खास अंक ! ताजी बातमी ! सडेतोड ! सडेतोड ! तीन पै. (आनंदराव अंक विकत घेतो व वाचूं लागतो. पोऱ्या ओरडत निघून जातो.)

**आनंद०**—टप्पूकाका, ही पाहिलीत का नवी मौज ? तिकडे अन्नपूर्णेची सही करारपत्रावर होण्यापूर्वींच या सडेतोड पत्रांत ती बातमी प्रसिद्ध सुद्धां झाली ! हे वाचा मथळे ! पुण्यांतील एका गृहलक्ष्मीचें अजब मनोधैर्य ! कुलीन स्त्रीनें

नटीचा पेशा स्वीकारला ! एका मास्तराच्या बायकोला पाचशे रुपये पगार ! वाचा, टप्पूकाका, सर्व हकीगत वाचा ! केवढें हें आश्चर्य ? कोण ही घिसाडघाई ?

**टप्पू०**—( वाचून ) अरे भोळ्या, यात आश्चर्य कसल ? असल्या घिसाड-घाईलाच अमेरिकन जर्नालिझम् म्हणतात ! एखादी बातमी जरी उडत उडत कानावर आली तरी, तिच रसभरित वर्णन ठोकून देऊन, तिचा प्रारभ 'असे कळते कीं' असा केला कीं, हाच ऐकीव प्रकार झाला आधुनिक वृत्तपत्र—व्यवसाय ! तशात तो अकलेचा खदक उर्फ सडेतोड पत्राचा सपादक या कारवाईत असल्यामुळ, त्याला सारी बित्तंबातमी आहेच ! अरे भोळ्या, आधुनिक सुधारणानीं मण्डित अस वृत्तपत्र म्हणजे 'ठोकून देतो ऐसाजे'चा प्रकार ! अस कळत की, अस ऐकण्यांत येत की, अस समजत की, अस आरभी छापाव आणि पुढ वाटेल ते ठोकून द्याव !

**आनंद०**—आणि समजा, ती ऐकीव बातमी खोटी ठरली तर ?

**टप्पू०**—तर काय ? 'घालीन लोटांगण, वदीन चरण, माफीच मागेन म्हणे झब्बू !' शरण आलेल्याला कोण मरण देणार ?

**आनंद०**—बाकी, ही बातमी प्रसिद्ध झाली तेंहि एका अर्थी बरच झाल ! कोबड झाकून तरी फायदा कोणता ?

**टप्पू०**—आणि तुम्हा भावनावश तरुण पोरापुढ बोलून तरी फायदा कोणता ? पण रहावत नाहीं म्हणून बोलतों. हें पहा आनदराव, पुण्यात ज्या सालस वृत्तीच्या सिनेमा कपन्या आहेत, त्याच्याहून या भुजगरावाच्या कंपनीचा प्रकार काही निराळा दिसतो मला ! हा काही तरी बनवाबनवीचा प्रकार आहे खास ! हा भानगड्या झब्बूमामा कथानक विकण्याच्या लोभान अन्नपूर्णेच्या गळ्याला फास लावील अशी मला भीति वाटते. परमेश्वर करो आणि माझी शका खरी न ठरो !

**आनंद०**—तुम्ही काहीं म्हणा, पण काका, मला अन्नपूर्णेच्या बाबतीत बिलकुल भीति वाटत नाही. ती कधींहि मोहवश होणार नाहीं. नीट परीक्षा करूनच मी तिची सासारिक गुलामगिरी पत्करिली आहे !

**टप्पू०**—म्हणजे असच म्हणेनास कीं, 'ती नवरा तू स्त्रीपरी' झाला आहेस ! पोरानो, सभाळा म्हणजे झाल ! आनदराव, तू जा घरीं. माझ डोक भणाणून गेल आहे, मी थोडा हवा खाऊन येतों.

**आनंद०**—बरं, मीहि घरीं जातों. ती घरीं परत येण्याची वेळ झाली. ती माझी लाडकी दमूनभागून घरीं येईल, तिचे कमलासारखे कोमल चरण धुण्यासाठीं ऊन पाणी तापवून ठेवायला नको का ? ( जातात. )

---

## प्रवेश ३ रा

( **स्थळ**—रस्ता. झब्बूमामा व अन्नपूर्णा येतात. )

**झब्बू०**—कां पोरी, कशी गंमत उडाली ? हो, पण मी तुला पोरी म्हणून काय म्हणतों हा ? कोणी ऐकेल तर सारी फजिती होईल ! आतां तूं चम्पादेवी झाली आहेस ! चम्पादेवी,...

**अन्न०**—नाहीं, मी चम्पादेवी नाहीं—मी सौभाग्यवती अन्नपूर्णाच आहें. सिनेमाच्या जाहिरातींतलं नांव आहे तें. मामा, मला माहेरच्या शालिनी या नांवानं हांक मारा, नाहीं तर आपलं अन्नपूर्णा हेंच नांव लावा ! मामा, मी आतां माझे प्रेमळ पतिदेव जे आनंदराव, त्यांची धर्मपत्नी सौभाग्यवती अन्नपूर्णा आहें. आम्ही कुलीन स्त्रिया सिनेमांतील नटी झालें तरी आमच्या नांवामागें कोणी सौभाग्यवती हें उपपद लावलं नाहीं तर आम्हांला राग येतो. मी नटी झाल्यें तरी आनंदरावांची धर्मपत्नीच आहें.

**झब्बू०**—धर्मपत्नी म्हणे धर्मपत्नी ! पोरी, कशाला पाहिजे हा तुम्हांला धर्मपत्नीचा दिमाख ? काय आहे त्या धर्मपत्नी या शब्दांत ?

**अन्न०**—मामा, त्याच शब्दांत आम्हां आर्यस्त्रियांचं सर्व मांगल्य, सर्व पावित्र्य, सर्व सौभाग्य सांठविलं आहे. मामा, पक्कं लक्षांत ठेवा कीं, आम्ही आर्य स्त्रिया कितीहि शिकलों, कितीहि स्वतंत्र झालों तरी, आमच्यांतील आर्य-स्त्रीपणा नष्ट होणं शक्य नाहीं.

**झब्बू०**—पोरी, मला तेंच पहावयाचं आहे ! तुमच्यांतला आर्यस्त्रीपणा मरत नाहीं म्हणून तर पुरुषांचा नवरेपणा नष्ट होत नाहीं ! पोरींनो, तुम्हांला आतां कोणत्या शब्दांत जीव तोडून सांगूं तेंच कळत नाहीं ! हा तुमच्या रक्तांत भिनलेला दुबळा आर्यस्त्रीपणा टाकाल तरच स्त्रीजातीचा खरा उद्धार करायला समर्थ व्हाल ! तूं इतकी शिकलीस, स्वतंत्र बाणा दाखविण्यासाठीं नटीचाहि पेशा

पत्करलास, आता काय करायचा तुला सौभाग्यवती या भाकड शब्दाचा मोह ? म्हणे, अमकीतमकी नटी सिनेमात काम करते तरी, सौभाग्यवती हें उपपद तिच्या नावामाग लावल नाहीं तर सतापते ! काय हा तुमचा दुबळेपणा ? एकाद्या कुलीन नटीन आपल्या नावामागे सौ. हें उपपद लावलेल पाहिल की, माझ्या तळपायाची आग मस्तकात जाते, काळीज फाटते, हृदय दुभगते, क्रोधाग्नि पेट घेतो .

**अन्न०**—आणि तेच सौभाग्यवती हें उपपद नावामागे लावलेल पाहिल कीं, आम्हा नटींचा पेशा पत्करणाऱ्या कुलीन आर्यस्त्रियाना आनदाच भरत येत. मामा, मिस् चम्पादेवी म्हणण्याऐवजीं जर तुम्ही मला सौ. अन्नपूर्णाबाई म्हटलत तर, नाही का चालायच ?

**झब्बू०**—काय म्हणालीस पोरी ? सिनेमाच्या जाहिरातीत सुद्धा तुला आम्ही सौभाग्यवती अन्नपूर्णाबाई म्हणू ? आणि त्याहि पुढ जाऊन तुला सौ. अन्नपूर्णा भ्रतार आनदराव पुणेकर म्हटल तर अधिक बर वाटेल, अस का उघड म्हणत नाहीस ?

**अन्न०**—तसंहि म्हणायला माझी तयारी आहे. मला सौ. अन्नपूर्णा आनद रावच म्हणा ! मी त्याचीच आहे, मी शरीराने आणि मनान त्याचीच आहे ! माझ्या पतिदेवाच नाव माझ्या नावापुढ लावायला मला मुळीच वाईट वाटत नाहीं. म्हणाच तुम्ही मला अन्नपूर्णाबाई आनदराव ! हो, मला तेच नाव आवडते !

**झब्बू०**—पोरी, मग तू सिनेमात पाचशे रुपयाची नोकरी कशाला पत्करलीस ? अजून सुद्धा तुला स्वातत्र्याचा सुविचार सुचत नाही ना ? पोरी, तूं पैसे मिळविणार आणि आनदरावाला खायला घालणार, तू नवरा होणार आणि तो नवरी बनणार ! नको माझ्या बाळे, त्या नवरोबाच्या आहारी अजून तरी जाऊं नकोस ! त्या पुणेरी नवरोबाची फजिती करीन, असा मनाचा हिय्या कर ! आर्यस्त्रीपणाचा दुबळेपणा टाक आणि या झब्बूमामाची भाची हें आपल मूळच नाव राख ! बाळे, तू अस न करशील तर, या तुझ्या मामाच्या तोंडाला काळोखी लावशील ! सौभाग्यवती या शब्दाचा मोह सोड, अन्नपूर्णा या गुलामगिरीच्या निदर्शक अशा नावाचा मोह सोड ! पहा, त्या पुणेरी आनदरावान तुला मोहपाशात अडकवून पुण्यास आणल आणि सौ. अन्नपूर्णा उर्फ चुलीची कायदेशीर बटीक बनवल ! तो पुणेरी आहे, पक्का आहे, लुच्चा आहे, त्याच्यातला पुरुषीपणा जीवत आहे, त्याच्यातला नवरेपणा मेलेला नाही .

**अन्न०**—नका, मामा! आणखी असं कांहीं अभद्र बोलूं नका! मामा, तुमच्या शब्दाला मान देऊन मीं नटीचा पेशासुद्धां पत्करला आणि त्यांना चुलीच्या कामाला लावलं! पतिदेवाची इतकी मानहानि केली तरी, मामा! तुमचा जीव शान्त झालेला दिसत नाहीं. तुमचं भाषण ऐकून माझें हृदय मात्र दुभंगून गेलं आहे. नका, मामा! या वेळीं माझ्या मनाला अधिक टोंचूं नका! मामा, मला एकटीलाच काय तो विचार करूं द्या! आणखी कांहीं उपदेश करायचाच असेल तर, दुसऱ्या एखाद्या वेळीं करा. या वेळी मी बावरून गेलें आहें, माझ्या पतिदेवाचं दर्शन केव्हां एकदां डोळे भरून मला होईल असं मला झालं आहे, मला एकटीलाच घरी जाऊं द्या!

**झब्बू०**—पण पोरी...

**अन्न०**—मामा, तुमच्या पायां पडतें, या वेळी मला क्षमा करा! (पायां पडते.)

**झब्बू०**—(स्व०) काय करावं या कारटीला, कशी अजून ताळ्यावर येत नाहीं? त्या पुणेरी नवरोबानं हिला पुरतं पाशांत जखडलं! (पाहून) अरेरे, आला, इकडून हा पुणेरी नवरोबा आला! आतां इथून तोण्ड काळं करावं आणि थोडा वेळ बाजूला उभें रहावें तें बरं! आलाच हा! पुणेरी, अस्सल पुणेरी! (बाजूला जातो.)

**आनंद०**—(येऊन) कोण, लाडके, तूं का ही? आणि रस्त्यांत काय डोकं टेंकून बसलीस? घेरीबिरी तर आली नाहीं ना तुला? ऊठ, लाडके ऊठ! (तिला उठवतो.)

**अन्न०**—कोण, माझे नाथ! माझे प्राणनाथ! (मिठी मारून) होय नाथ, मला घेरी आल्यासारखंच झालं होतं. पण नाथ, तुम्ही कसें इथं आलांत?

**आनंद०**—तुझी घरीं वाट पाहून पाहून थकलों. मनाला कांहीं चैन पडेना म्हणून म्हटलं थोडं रस्त्यावर जाऊन तरी पहावं! थोडा पुढं येतों तों तूं इथं डोकं टेंकून पडलेली दिसलीस! लाडके, आतां थोडं बरं वाटतं ना तुला? चल घरीं, तुझी मी थोडी सेवा करतों.

**अन्न०**—नाथ, मी तुमच्याकडून सेवा करून घेणार तेव्हां राग नाहीं ना यायचा तुम्हांला?

**आनंद०**—छेः छेः, मुळीच नाहीं राग यायचा ! प्रेमी जिवाची सेवा करण्यात आनदच वाटत नाही का? तुझ्यासारख्या प्रेमळ धर्मपत्नीची सेवा करण्याचा सुप्रसग लाभतो आहे, हे देवाचे माझ्यावर उपकारच आहेत.

**अन्न०**—आणि मला असा हा प्रेमळ पुणेरी जोडीदार मिळाला, हे सुद्धा माझ्यावर देवाचे उपकारच आहेत. देवा, तू लक्ष्मीनारायण आहेस. तुमचा लक्ष्मीनारायणाचा जोडा जसा भाग्यशाली तसाच आमचाहि हा पुणेरी जोडा भाग्यशाली कर, हीच तुझ्या चरणी माझी प्रार्थना आहे.

## आनंद-गीत

**देव हा पावला। प्रियकर पतिहि लाभे मला ॥ ध्रु० ॥**
**नील नभिं ये शशी हंसतसे शुभा शशिची प्रभा।**
**जनमन खुलवित मंगल योग हा ॥ १ ॥**

( जातात. )

**झब्बू०**—( पुढे येऊन ) अरेरे, काय झाल हे ? ही पोर पुनः त्या पुणेरी नवरोबाच्या प्रेमजालात पुरती अडकली ! हा पुणेरी जोडा आता कसा भगणार ? एक वेळ माझं हृदय फाटेल पण हा पुणेरी जोडा फुटण शक्य दिसत नाहीं. पण छेः, अस निराश होता कामा नये. नेपोलियनप्रमाण माझ्या शब्दकोशातहि निराशा हा शब्द येता कामा नये. काय करू ? कोणती नवी युक्ति योजू ? इतकी जीवाची आटापीट करतो आहे, पण व्यर्थ ! खरोखरच हा पुणेरी आनद्या लुच्चा ! मायावी ! पुणेरी, अस्सल पुणेरी ! रसिकहो, या झब्बूमामाची ही फजिती पाहून तुम्हाला माझा धिःकार करावास वाटत नाहीं का ? धि कारा, सज्जनहो, मला धिःकारा म्हणजे तरी मला दुप्पट जोर चढून हा पुणेरी जोडा फोडण्याचे सामर्थ्य मला लाभेल ! धिःकारा, सुजनहो, मला धिःकारा !! मी फजित झालो, हाय ! हाय !!

( डोक्यावर हात मारून मटकन् खाली बसतो. पडदा. )

# अंक तिसरा



( **स्थळ**—आनंदरावाचा दिवाणखाना. टप्पूकाका सडेतोड पत्राचा अंक वाचीत बसले असून, एका बाजूला आनंदराव अन्नपूर्णेच्या पोलक्याला टीप मारीत बसला आहे. )

**आनंद०**—( पोलका शिवीत असतां ) 'मम जिवाची प्रियकरिणी। वास करित हृदयीं जी होती। दृष्टिपुढें भासत ती तरुणी। जिवा ऽऽ ची ॥'

**टप्पू०**—आनंदराव, शोभतं का तुला हें सारं ? बायकोचा पोलका काय शिवतो आहेस, तोण्डानं प्रियकरणीचं गाणं काय गुणगुणतो आहेस, शोभतं का तुला हें ? सकाळी बायकोच्या आधीं उठून चहा काय करतोस, ती सकाळीं उशीरां उठल्यावर तिला 'बेड्–टी'–अंथरुणांतला चहा काय देतोस, तिला तसदी पडेल म्हणून चूळ टाकण्यासाठीं तिच्या तोण्डासमोर पिकदाणी काय धरतोस, ती स्नानाला गेली म्हणजे लुगड्याच्या निऱ्या काय करून ठेवतोस, ताटपाटाची तयारी काय करतोस,स्वयंपाकाची सिद्धता काय करतोस, ती सिनेमा कंपनींत जायला निघाली म्हणजे तिच्यापुढें पुणेरी जोडा काय ठेवतोस, आणि तिला घरीं यायला थोडा उशीर झाला तरी दारांत उभा राहून सुस्कारे काय सोडीत असतोस, अरे पुणेरी मर्दा, काय हें तुझं चारित्र ? जी पुण्यनगरी गेलीं तीन शतकें मर्दांची माउली म्हणून गाजते आहे, तिच्या पोटीं तुझ्यासारखा नालायक, नामर्द, बायल्या जन्माला यावा आणि अशा तुझं हें बायली चरित्र पहाण्याचं या टप्पूकाकाच्या नशिबीं यावं, हें केवढं माझं दुर्दैव ! अरे आनंदराव, जरा इकडे पहा आणि बोल तरी !

**आनंद०**—काका, कां उगाच माझ्या कामांत व्यत्यय आणतां ? हें तिचं पोलकं मीं आत्तांच दुरुस्त करून ठेवलें नाहीं, तर ती घरीं आल्यावर मला काय म्हणेल बरं ? ती रागावेल, रुसेल, फुगेल, आदळआपट करील आणि पूर्वींचे जुने नवरदेव जसे चुकार बायकांची कडक शब्दांत हजेरी घेत होते ना, तशी

ती माझी पत्नी माझी—या नवरोबाची खरडपट्टी काढील ! माझ हातातील काम पुर होऊ द्या, मग बोलतों तुमच्याशीं ! ( कामाला लागतो. )

**टप्पू०**—अरेरे ! आनदराव, तुझी ती बया झब्बूमामाच्या शिकवणीन भडकली आणि ती भडकली म्हणून तूहि बहकलास ! ( हातातील पत्र खालीं आपटून ) अस वाटत कीं या तुझ्या घरात एक क्षण राहू नये ! ( उठून पोषाख चढवीत ) ते नाट्याचार्य देवल शारदेत सागून गेले तेंच अखेरीस खर ठरल !
' जन खुळावले । सकल उलट चालले ॥ '

**आनंद०**—( हातातील काम टाकून व बाहेर जावयास निघालेल्या काकाना अडवून ) काका, कुठ चाललात ? माझ्यावर रागावून तर चालला नाहीं ना आमचं घर सोडून ? तिला सागितल्याशिवाय, तिचा निरोप घेतल्याशिवाय जर तुम्ही एकाएकी निघून गेलात तर ती काय म्हणेल मला ?

**टप्पू०**—ती दुसर काय म्हणेल तुला ? ती तुला नालायक म्हणेल, नामर्द म्हणेल ! आणि मी तुला बायल्या म्हणेन, समजलास ?

**आनंद०**—बसा काका, थोडे बसा आणि मीं असा बायलेपणा काय काय केला तो तरी सागा !

**टप्पू०**—तें मघाशीं तिकडे कायस करीत बसला होतास ते बायलेगिरीच काम नव्हे का ?

**आनंद०**—छेः, ही बायलेगिरी नव्हे, हा माझा पत्नीव्रतधर्म मी एकनिष्ठपणेच पाळतों आहे. आजपर्यंत आपल्या आर्यस्त्रियानीं पतिव्रताधर्म पाळला, आता मी त्या उपकाराची परतफेड करण्यासाठी पत्नीव्रतधर्माचा नवा सप्रदाय सुरू करतों आहे.

**टप्पू०**—आणि हा नामर्दपणाचा बायल्यासप्रदाय तूं पुण्यात सुरू करणार अ ? विलक्षण आहे !

**आनंद०**—काका, हे विलक्षण नाहीं, हें पुण्याच्या दृष्टीन सुलक्षणच आहे. आजपर्यंतचे सर्व नवे सप्रदाय या आपल्या पुण्यनगरीनच सुरू केले नाहींत का ? श्रीशिवाजीमहाराजाचा स्वराज्यसप्रदाय या पुण्यांत सुरू झाला ! पेशव्यांचा अटकेपार झेंडा लावण्याचा साम्राज्यसप्रदाय या पुण्यात सुरू झाला ! इग्रज-शाहीनतरचा राष्ट्रीय सभेचा सप्रदाय महर्षि रानड्यानीं पुण्यांत सुरू केला.

होमरूलच्या चळवळीचा संप्रदाय लोकमान्य टिळकांनीं पुण्यांत सुरू केला. समाजसुधारणेचा संप्रदाय प्रिन्सिपॉल आगरकरांनीं पुण्यांत सुरू केला. महिला विद्यापीठाचा संप्रदाय महर्षि कर्व्यांनीं इथंच सुरू केला. नेमस्तपक्षाचा संप्रदाय इथला, डॉ. भाण्डारकरांच्या प्राच्यविद्यासंशोधनाचा संप्रदाय इथला, बहुतेक सारे संप्रदाय या पुण्यांत सुरू झाले, मग हा नवा पत्नीव्रतधर्माचा संप्रदाय माझ्यासारख्या एका पदवीधर पुणेकरानं या पुण्यांतच कां सुरू करूं नये ? बोला काका ! माझी पत्नी नोकरीवर गेल्यावर जर मीं घर संभाळायला मागं राहिलों आणि पोलक्याला टीप मारीत बसलों तर त्यांत बिघडलं कुठं ?

**टप्पू०**—अरे पण तूं एवढा बी. ए., एवढा विद्वान् पदवीधर...

**आनंद०**—आणि म्हणूनच मी सुविचारपूर्वक या नव्या पत्नीव्रतधर्माच्या संप्रदायाला मनोधैर्यानं सुरुवात केली आहे. तिच्या नोकरीला थोडं स्थैर्य आलं म्हणजे, वेळांत वेळ काढून या संप्रदायाचा मी एक स्मृतिग्रंथ लिहिणार आहें. मग तर माझ्या शिक्षणाचं चीज होईल ना ?

**टप्पू०**—बाबा रे, तुम्ही शिकलेलीं नवमतवादी पोरं, आम्हांला कां वादविवादांत हार जाणार आहांत ? माझं मत मी तुला सांगितलं, आतां जसं तुझ्या मनाला रुचेल तसं वाग. पण एकंदरींत त्या झब्बूमाम्याच्या कारवाईपासून सावध रहा म्हणजे झालं. बरं, मी थोडा वेळ बाहेर जाऊन येतों. सांभाळ हं ! (जातो.)
( आनंदराव पुनः पोलका शिवीत बसतो व पूर्वोक्त पद गुणगुणतो. )

**भुजंगराव**—( प्रवेश करतो व खिशांतून मद्याची बाटली काढून थोडी दारू पितो व इकडे तिकडे हिंडून आनंदरावाच्या पाठीमागें उभा राहून, मागून त्याचे डोळे झांकतो. बायकी आवाजानें ) कां, ओळखलं कां मला ?

**आनंद०**—ऊं:, त्यांत काय आहे ओळखण्यासारखं ? या तुझ्या प्रियकर नाथाचे डोळे झांकणारी तूं माझी नाथी !

**भुजंगराव**—काय नाथी ? इःश !

**आनंद०**—तुम्ही बायका पतींना नाथ म्हणतां, मग आम्ही पुरुषांनीं तुम्हां पत्नींना नाथी म्हटलं तर काय बिघडलं ? गुजराथी लोकांत तर नाथीबाई हें

नाव फार प्रसिद्ध आहे. बर, हा प्रेमाचा लपण्डाव सोडून मला आपल्या मुखकमलाच दर्शन दे पाहू ! ( तिचे हात दूर करू लागतो. )

**भुजंगराव**—इ.श ! ( बाजूला होतो. )

**आनंद०**—( पाहून आश्चर्याने ) कोण, तुम्ही तर भुजगराव ! ही काय थट्टा केलीत माझी ? मला नाही हो तुमच हे दाण्डगाईच वर्तन खपायच ! मी तिच्या कानावर घालीन, सागून ठेवतो.

**भुजंगराव**—( कोचावर बसून ) ऊ, चम्पादेवीच्याच कानावर तुम्ही आपली तक्रार घालणार ना ? ती तुमच्या पुरुपी रडण्याला मुळीच भीक घालणार नाही. ती आता माझी झाली आहे, समजलात ?

**आनंद०**—माझी अन्नपूर्णा तुमची झाली हे खर, पण केवळ नोकरीच्या नात्यापुरती ! माझ्या अगावर कुणी हात टाकलेला तिला खपणार नाहीं, बर का ? आधींच बजावून ठेवतो, मी तिला ही गोष्ट कळवित्याशिवाय सोडणार नाहीं.

**भुजंग०**—अरे जारे बायल्या ! आता तुला ती काय किमत देते ते मला माहीत आहे. दरमहा पाचशे रुपये मिळविणाऱ्या सौभाग्यवती नटीचा स्वयपाक्या नवरा तू, तुझ शहाणपण ते किती ? चुलीपुरते किवा फार फार झाल तर सिंगरच्या शिवण्याच्या मशीनपुरत ! ए बायल्या नवरोबा, लक्षात ठेव की आता ती माझी झाली आहे. ती माझ्या मुठीत आहे, ती माझ्या अर्थ्या वचनात आहे, मी तिचा स्वामी आहे, ती माझी स्वामिनी आहे !

**आनंद०**—अस भलत सलत बोलायला तुम्हाला धीर तरी कसा होतो म्हणतों मी ? पुन तसले अभद्र शब्द उच्चाराल तर जीभ झडून जाईल ! भुजगराव, तुम्हाला हा पत्नीव्रत आर्यपुरुषाचा शाप आहे !

**भुजंग०**—( मद्याचा घोट घेऊन ) अहारे लेका बायल्या ! शाप देणाराच तोंड तर पहा ! बोटें मोडीत बस ! अरे मूर्खा, तुझी ती केव्हाच माझी झाली ! नीट विचार कर, आजकाल चम्पादेवी येते का घरीं वेळेवर ? अरे अन्नपूर्णेच्या प्राणनाथा, तुझी ती माझ्या बगल्यावर मध्यरात्र उलटून गेली तरी का रहाते, याचा स्वतःच्या मनाशीं कधी विचार केलास का ?

**आनंद०**—कां म्हणजे? द्रौपदीवस्त्रहरणाच्या तालमी तिथं चालतात म्हणून!

**भुजंग०**—( मद्याचा घोंट घेऊन ) बायल्या रे बायल्या, खराच बायल्या!

**आनंद०**—असं कसं म्हणतां भुजंगराव? तिथं तुमच्या बंगल्यावर द्रौपदी-वस्त्रहरणाच्याच तालमी नाहीं का चालत? ती तर मला तसं सांगत असते!

**भुजंग०**—आणि तें खरंहि आहे. ऐक, अन्नपूर्णानाथीच्या बायल्या प्राणनाथा, ऐक! हा दुःशासन भुजंगराव त्या चम्पादेवी द्रौपदीचें वस्त्र...

**आनंद०**—पाजी माणसा, पुढं एक शब्द बोलूं नकोस! तुझी जीभ झडून जाईल बघ! दुष्ट, नष्ट, पापी, चाण्डाळ, मेला...

**भुजंग०**—दे. वाटेल तितके बायकी शिव्याशाप दे. पण एक गोष्ट पक्की लक्षांत ठेव कीं, तुझी ती आतां माझी झाली आहे! आणि ती लौकरच जाहीर रीतीनं माझी पत्नीहि होणार आहे.

**आनंद०**—भुजंगराव, हें शक्य तरी आहे का? माझी धर्मपत्नी तुझी धर्मपत्नी कशी होईल?

**भुजंग०**—कां बरं! त्यांत अशक्य असं काय आहे? तिनं तुझ्याशीं रजिस्टर्ड लग्न केलें आहे. या विधीप्रमाणं पत्नीला केव्हांहि नवऱ्याशीं घटस्फोट मिळवितां येतो. आधीं तुझ्याशीं काडीमोड आणि मग माझ्याशीं नव्या लग्नाची जोड!

**आनंद०**—भुजंगराव, मी शपथेवर सांगतों कीं, ती माझी लाडकी जर माझ्याशीं घटस्फोट करण्याची गोष्ट काढील तर मी त्रागा करून तिच्या पायांवर आपलं डोकं फोडून घेईन. माझं प्रेत पडलं म्हणजे मगच हवं तर तिला खुशाल तुझ्याशीं लग्न करूं दे.

**भुजंग०**—अरे, मग ही तर फार सोपी बाब आहे. तुझं प्रेत पाडलं कीं झालं माझं काम! हा मी जातों आणि त्याच पुढच्या तयारीनं परत येतों.

**आनंद०**—भुजंगराव, बोलपटाची तयारी करतां करतां माझं प्रेत पाडण्याची तयारी केलींत ना? धिःकार असो तुम्हांला!

**भुजंग०**—धिःकार असो तुम्हांला! मूर्ख लेकाचे, कसे माझ्या जाळ्यांत अडकले! अरे कोण लेकाचा बोलपट काढतो आहे कोण जाणे! ( मद्याचे

घोट घेत ) हे बघ, मी तुला अगदीं गुप्त गोष्ट सागतों. मी एक उल्लूभाई गर्भ-श्रीमत आहें. सिनेमाची हूल उठवून, कुलीन स्त्रियाना मोह पाडण्याचा माझा धदा आहे. मला चम्पा मिळाली कीं, सपला माझा बोलपट ! या कामीं प्रथम मी झब्बूमामाला कथानकाच्या खरेदीची लालूच दाखवून फसविल आणि नतर त्या सडेतोड पत्राच्या महामूर्ख सपादकाला जाहिरातीची लालूच दाखवून वश करून घेतल. आता फक्त तुझ्या घटस्फोटावरच सार अवलबून राहिल आहे. ह्या एवढा बाण लागला कीं, इकडे तुझा प्राण जाईल आणि तिकडे मला प्राण-प्रियेचा लाभ होईल. अरे, मी उल्लूभाई आहे, बोगस सिनेमावाला आहे. कथानक, तालमी सारा बोगस कारभार आहे ! माझ्या बोलण्याची प्रचीतीच पहायची असेल तर चम्पादेवीजवळ एकदा घटस्फोटाची गोष्ट तर काढून पहा ! मी त्याचसाठी इथ आलो होतो. खुद्द तिच्या नवऱ्याजवळ घटस्फोटाची, म्हणजे काडीमोड केल्या जाणाऱ्या बायकोची, मागणी घालण्याकरिता आलों होतो. मी पुनः येणार आहे. तोपर्यत मनाचा निर्धार करून ठेव.

**आनंद०**—दुसरा कसला निर्धार करायचा ? तिच्या पायावर डोक आपटून प्राण देण्याचा माझा निर्धार आधीच झाला आहे. येऊ दे तर तिला घरीं, मग पहा कस आकाण्डताण्डव करतों ते !

**भुजंग०**—बर तर, मी जातो आणि तुझ्या प्राणहरणाची तयारी करून लौकरच परत येतो. ( जातो. )

**आनंद०**—( स्वतःशी ) अरेरे, माझ्या गृहलक्ष्मीन माझ्या प्रीतिविवाहाची अशी ट्रॅजिडी केली तर ! अस वाटत कीं, तिला तोण्ड दाखविण्यापेक्षा विहिरींत उडी टाकून प्राण द्यावा ! ( इकडे तिकडे अस्वस्थ मनानें हिंडतो, तो सडेतोड पत्राचा अक त्याला दिसतो. तो हातात घेऊन ) आणि हा पाजी सपादक या कटाला अनुकूल अ ? पहा, पहा, याचे मथळे ! म्हणे, ' पुण्यात नव्या सिनेमाकपनीची जगी तयारी ! झब्बूमामाच रोमाचकारी कथानक ! मिस् चम्पादेवींची सुदर योजना ! भुजगराव सिनेमासम्राटाचे कलापूर्ण धाडस ! आणखी विलक्षण घडामोडींची हकीगत पुढील अकीं ! ' या घडामोडी म्हणजे

आमच्या लग्नाची काडीमोड, दुसरं काय? शंकाच नको, हे सारे गावगुण्ड हा आमचा पुणेरी जोडा फोडणार! ( सचिंत बसतो. अन्नपूर्णा झब्बूमामासह प्रवेश करते. अन्नपूर्णा पतीजवळ जाते, झब्बूमामा बाजूच्या खोलींत जातो. )

**अन्न०**—( पाहून ) आज इकडची प्रकृति कांहीं ठीक दिसत नाहीं. आतां यांची थोडी गंमत करावी. ( ऐटींत ) हॅलो! पतिदेव, ही तुमची स्वामिनी आली तरी तुम्हांला ती दिसत नाहीं? ही माझी शाल, हा माझा पुणेरी जोडा...

**आनंद०**—( संतापून ) अहो तुम्ही धर्मपत्नी, बस्स झाला तुमचा थट्टाविनोद! तुमच्या थट्टेनं माझ्या नांवाला मात्र बट्टा लागला! असं वाटतं कीं, आपलं तोण्ड दाखवूं नये आणि तुमचं तोण्ड पाहूं नये!

**अन्न०**—कां, आज फारसा प्रेमाचा थर्मामिटर चढला आहे?

**आनंद०**—अन्नपूर्णे, मी तुझ्या शीलावर विश्वास ठेवून फसलों, तुझी गुलामगिरी पत्करून तोण्डाला काळें फांसून घेतलं, प्राण जाईल तर बरं, असं मला झालं आहे! ( डोक्यावर हात मारून घेतो. )

**अन्न०**—कां? कपाळावरसा हात मारून घेतां? आणि आज एवढा तुमचा आवाज कां चढला?

**झब्बू०**—( बाहेर येऊन ) नवरेपणाच्या सापाचं विष अंगांत चढलं म्हणून! पोरी, नवरोबापासून सावध रहा. हा नवरोबा आहे, हा पुणेरी नवरोबा आहे. दुष्ट, मायावी, क्रूर, पुणेरी—अस्सल पुणेरी!

**आनंद०**—झब्बूमामा, मी एक दुष्ट असलों तर तुम्ही सवाई दुष्ट आहांत. विषारी—अस्सल विषारी!

**झब्बू०**—मी विषारी, मग ही माझी भाची कोण?

**आनंद०**—तिचं काय वर्णन करावं? जसा मामा तशी भाची!

**अन्न०**—आहें, मी मायावी आहें, विषारी आहें, नागीण आहें, मग माझा संबंध तोडून कां टाकीत नाहीं एकदांचा? मी स्वतंत्रमतवादी स्त्री आहें. मी केव्हांहि घटस्फोटाला तयार आहें. आहें मी तयार, मग काय तुमचं म्हणणं?

**आनंद०**—कशाला उगाच ओढून चद्रबळ आणतेस ? तुला माझ्याशीं काडीमोडच करायची आहे, होय ना ? तुमचा सगळा नीच डाव मला आत्ताच कळला आहे.

**झब्बू०**—पहा, पहा, पोरी, पहा कसा हा पुणेरी नवरोबा हळुहळू विष ओकू लागला तो ! दूर हो, या पुणेरी सापापासून दूर हो !

**अन्न०**—मामा, तुम्ही माझ्या कानींकपाळी ओरडता ते खर हो खर ! मला घटस्फोट मागितलाच पाहिजे ! ऐकल का, तुम्ही बऱ्या बोलान मला घटस्फोटाची परवानगी देता कीं कोर्टात जाऊ ?

**झब्बू०**—पोरी, गुप्तपणान या गोष्टीचा निकाल लावून घेऊ नकोस ! या पुणेरी नवरोबाला कोर्टापुढ खेच आणि या नवरोबाची चारचौघात चागली फजिती कर.

**आनंद०**—आता आणखी काय उरली फजिती व्हायची ? अन्नपूर्णे, कोर्टात फजिती करून घेण्यापेक्षा तुझ्या पायावर डोक आपटून घेऊन प्राण दिलेला काय वाईट ? ( तिच्यापुढे गुडघे टेकून ) अन्नपूर्णे, ( रडत ) आपल्या प्रेमाचा असा दारुण अत व्हावा याबद्दल मला अत्यत वाईट वाटते.

**झब्बू०**—अहो पुणेरी नवरोबा, आता का रडण्याच सोंग आणता ? आपटा ना डोक बायकोच्या पायावर ! लुच्चा, मायावी, दुष्ट, नवरोबा, पुणेरी, अस्सल पुणेरी ! आपट, आपट डोक, दे प्राण ! ( खूप झिंगलेला भुजगराव हातात पिस्तूल घेऊन प्रवेश करतो. )

**भुजंग०**—अरे, कशाला डोक आपटण्याची तसदी घेतोस ? ए बायल्या, चम्पादेवीला सोडचिठी देतोस की उडवू पिस्तुलाचा बार ?

**आनंद०**—हाच, हाच तो माझ्या प्रेमावर बिब्बा घालणारा नराधम ! अधमा, उडव पिस्तूल आणि घे माझा प्राण ! ( छाती काढून पुढे उभा राहतो. )

**भुजंग०**—घे देवाच किवा चम्पादेवीच नाव ! झाली तुझी मरायची तयारी ? उडवू पिस्तूल ?

**अन्न०**—( मध्यें उभी राहून ) भुजगराव, हा काय प्रकार आहे ? तुम्ही माझ्या पतिदेवाचा प्राण का घेता ? त्यानीं तुमच काय केल ?

**भुजंग०**—या बायल्यानं माझ्यापासून तुला हिरावून घेतलं! याला जगांतून नाहींसा केल्याशिवाय मला तुझा लाभ कसा होणार? याला ठार मारतों आणि तुला माझी गृहदेवता करतों. चम्पा, दूर हो, मला या बायल्याचा प्राण घेऊं दे!

**अन्न०**—नीचा भुजंगरावा, तुझं कपट आत्तां माझ्या ध्यानांत आलं! तूंच माझ्या पतिदेवाच्या मनांत संशयाचं विष ओतलंस! मामा, या नराधमाला पकडा!

**भुजंग०**—अरे माम्या, तुलाहि मरायचं आहे वाटतं? तूं द्रौपदीवस्त्रहरण लिहूं शकतोस, पण मी झब्बू–प्राणहरण कसं करूं शकतों हें तुला आत्तांच दाखवतों. तिकडे तोंड लपव नाहीं तर उडवतों बार! (पिस्तुल रोंखतो.)

**झब्बू०**—(भीतीनें गर्भगळित होऊन चांचरत) भु–भु–भुजंगराव, मीं–मी–मीं काय केलं? मी गरीब आहें, मी भे–भेकड मामा आहें. मी या कोंचाआड ल–लपून बसतों, मा–मा–माझं प्राणहरण करूं नकोस! (लपतो.)

**अन्न०**—नाथ, पहातां काय? टाका त्या सापावर उडी आणि ठेंचा त्याचं डोकं!

**भुजंग०**—ये, ये, बायल्या! पुढं तर ये.

**आनंद०**—मी पुढं कसा होऊं? माझे पायच उचलत नाहींत. भुजंगरावा, मी तुझ्या पायां पडतों, आम्हांला जीवदान दे!

**अन्न०**—नामर्द कुठले! या अधमाची विनवणी काय करतां? बायकांप्रमाणें त्यांच्यापुढं गयावयां काय करतां?

**भुजंग०**—नामर्द! खराच नामर्द! चम्पा, या नामर्दाच्या हातून तुझं रक्षण होणं शक्य नाहीं. तूं माझा–या मर्दाचा हात धरून सुखाचा स्वर्ग गांठ. तूं माझा हात धर किंवा मी तुझा हात धरतों! (पुढें होऊन हात धरतो.)

**अन्न०**—(धडपडत) नीचा, दूर हो, सोड माझा हात! (आनंदराव त्याच्या हाताला चावतो. भुजंगराव ओरडतो व मागें सरतो. तो पुनः पिस्तुल रोंखतो.)

**भुजंग०**—तर मग मला आतां संहारच केला पाहिजे. नामर्दा, हो मरणाला तयार!

(इतक्यांत टप्पूकाका व सत्यमूर्ति प्रवेश करतात. टप्पूकाका मागून भुजंगरावावर झडप घालतो व सत्यमूर्ति त्याच्या हातांतील पिस्तुल काढून घेतो.)

**टप्पू०**—नीचा भुजगरावा, शेवटी सापाची करणी करून आपल नाव सार्थ केलस तर ! ए अकलेच्या खदका सपादका, पहातोस काय ? याला कोपऱ्यात डाबून ठेव.

**सत्य०**—ए भुजग्या, रहा तिकडे कोपऱ्यात उभा ! ( त्याला गचाडी देऊन कोपऱ्यात लोटतो. )

**टप्पू०**—आणि तो झब्बूमाम्या कुठ गेला ? त्याच्या पापी डोळ्याना हा प्रकार दिसता तर त्याला आपल काळ तोड लपवाव लागल असत !

**झब्बू०**—टप्पूकाका, तुम्हाला नको माझी काळजी ! मी मघापासून इकडे तोड लपवून बसलो आहे.

**टप्पू०**—( त्याला पुढे खेचून ) ये असा पुढ ! भागूबाईप्रमाण तोड काय लपविलस ? या माम्याचा काय तो तोण्डात जोर, बाकी नामर्द—अस्सल नामर्द !

**झब्बू०**—मी एक नामर्द, आणि हा तुमचा पुणेरी पुतण्या आनदराव सवाई नामर्द ! लेकाचा स्वतःला पुणेरी नवरोबा म्हणवतो—पण बायकोच रक्षण करण्याची ताकदसुद्धा अगात नाहीं. नामर्द, पुणेरी, अस्सल पुणेरी !

**अन्न०**—मामा, हे तुमच्याच भेकड शिकवणुकीच फळ ! तुमच्या मूर्खपणाच्या तत्त्वज्ञानाला मी बळी पडल्ये आणि या माझ्या पतिदेवाना बायकी बनविल ! हे बायकी बनले ते माझ्यामुळे बनले, तुमच्यामुळ बनले !

**झब्बू०**—या बोलण्यात काय अर्थ आहे ? पुणेरी पुरुष जात्याच नामर्द..

**टप्पू०**—माम्या, जास्त बोलशील तर तोण्ड फोडून टाकीन बघ ! हा आनदराव पुणेरी आणि तू रे कुठून खाली टपकलास ?

**झब्बू०**—मी मुबईच्या बाबुलनाथापुढचा !

**टप्पू०**—म्हणजे नदीबैल !

**अन्न०**—आणि मी कुठली मामा ? मीहि मुबईचीच ! माझा जन्म मुबईचा, माझ रहाण मुबईच, माझ शिक्षण मुबईच, मी मूर्तिमत मुबापुरीची कन्या ! मामा, तुम्ही जन्मान मुबईकर नसल्यान बाटगे मुबईकर आहात, पण माझी

स्थिति अगदीं निराळी आहे. मी जन्मानं मुंबईची, शिक्षणानं मुंबईची, संस्कारानं मुंबईची अर्थात् मुंबईची, अस्सल मुंबईची ! म्हणून पूर्ण अधिकारवाणीनंच सांगत्यें कीं, मुंबई काय आणि पुणें काय, यांत कसलाहि फरक नाहीं ! जें पुण्यांत तेंच मुंबईत आणि जें मुंबईत तेंच पुण्यांत ! मग हा पुणेरी आणि हा मुंबापुरी असला खोडसाळ आणि दुष्टपणाचा भेद निर्माण करण्यांत फायदा कोणता? मुंबईचा खरा अभिमान मला आहे. मुंबई ही माझी जननी आहे, जन्मभूमि आहे. तशीच पुण्यनगरी ही अनेक शतकें गाजत असलेली मर्दांची माउली आहे ! मामा, पुणें व मुंबई यांत भेदभावाचं विष कालविण्याचा हा धंदा सोडून द्या.

**झब्बू०**—छेः, तें शक्य नाहीं, कारण मी जिताजिवंत आहें, आणि जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाहीं हें तुम्हांला ठाऊकच आहे ! कुठें जन्माला यावें हें माझ्या हातांत नव्हतें. पण कुठें मरावें हें मात्र माझ्या हातांत आहे. जो मुंबईला मरतो, तो स्वर्गाला जातो; आणि जो पुण्याला मरतो तो नरकाला जातो. एवढे तुमचे लोकमान्य टिळक, पण त्यांनीं सारा जन्म पुण्यास घालवूनहि, निव्वळ मरण्यासाठीं ते मुंबईस आले आणि म्हणूनच स्वर्गाला गेले. मी मेलों तरी पुण्याचा ओंकारेश्वर गांठणार नाहीं हें पक्कें लक्षांत ठेवा.

**टप्पू०**—माम्या, तुझी थिअरी मान्य केली तर साराच अनर्थ होईल. तुझ्या तत्त्वाप्रमाणं पुण्यांत येऊन मेलेले नटसम्राट् केशवराव भोंसले आणि गुरुवर्य तात्यासाहेब कोल्हटकर हे लकडीपुलाच्या रस्त्यानें सरळ नरकाला गेले असेंच तुला मग म्हणावें लागेल ! आणि असें तूं म्हणालास म्हणजे तुझा सारा पाजीपणा जगाच्या नजरेला येईल !

**झब्बू०**—छे–छे–छे ! तें शक्य नाहीं–तें त्रिवार शक्य नाहीं. ते दोन्हीहि अपवाद आहेत.

**अन्न०**—म्हणजे तुमची ही थिअरी तुम्ही सोयीप्रमाणें लावीत असतां म्हणायची ! तुमच्या थिअरीवर महामूर्ख तेवढेच विश्वास ठेवतील !

**झब्बू०**—पोरी, कांहीं म्हण पण तूं मुंबईची असून या पुणेकराला वरलंस हें माझ्या डोळ्यांना पहावत नाहीं हें मात्र खरं ! आनंदरावाचा आणि माझ्या

आन्तीचा पुणेरी जोडा पहाताच, माझ्या पायाची आग मस्तकाला जाते! हा पुणेरी जोडा माझ्या डोक्यावर बसल्यामुळे ते भणभणून गेले आहे!

**टप्पू०**—अर्थात् तुझं हे मस्तक या टप्पूकाकाच्या हातचा खुसखुशीत टप्पू खाल्ल्याशिवाय ताळ्यावर येणं शक्य नाहीं.

**सत्य०**—टप्पूकाका, उगाच विचार कसला करता? द्या त्या झब्बूमामाच्या टाळक्यावर एक टप्पू ठेवून! त्याच्या नादानं मी या लफंग्या भुजंगरावाच्या नादी लागलो आणि सडेतोड पत्रात सिनेमाच्या मोठमोठ्या बोगस जाहिराती छापून फसलों! मी तरी काय मूर्खच म्हणा! काका, माझ्याहि टाळक्यावर एक टप्पू हाणा, बर का! मी मरेपर्यंत तुमचा टप्पू विसरणार नाही!

**आनंद०**—आणि काका, माझ्याहि टाळक्यावर चांगले चार टप्पू हाणा! मर्दांची माउली जी पुण्यनगरी तिच्या पोटीं जन्म घेऊन मी माझ्या मुंबईकर धर्मपत्नीचं रक्षण करू शकलो नाही, तेव्हा मी टप्पूकाकाच्या हातचे टप्पू खायला लायकच झालो आहे.

**अन्न०**—पण नाथ, तुमच्या अधःपाताला मीच कारणीभूत झाले नाहीं का? मीं नटीचा पेशा स्वीकारला.

**टप्पू०**—पण यात वाईट असं काहीच नाही चालू जमान्यात तू केलंस ते योग्यच केलंस. पण तुझी चूक झाली ती निराळीच! नवरोबा म्हणजे तो दुष्ट असलाच पाहिजे, पुणेरी म्हणजे तो दुष्ट असलाच पाहिजे, असल्या झब्बूमामाच्या विषारी तत्त्वानी तू आपलं डोकं बिघडवून घेतलंस! त्यामुळं तू संशयपिशाचाच्या तावडीत सापडलीस आणि हा मर्द गडी आनंदराव प्रथम बायल्या आणि अखेरीस नामर्द बनला! मुलांनो, एवढी विषारी तत्त्वे तुम्हीं हृदयातून काढून टाकाल तर तुम्हा दोघांचा हा पुणेरी जोडा लक्ष्मीनारायणाच्या जोड्यासारखा शोभेल! काय झब्बूमामा, हा पुणेरी जोडा मान्य करता कीं देऊं टप्पू टाळक्यावर?

**झब्बू०**—तेवढं करू नका. टप्पू खाण्यापेक्षा शरण-चिठ्ठी लिहून देणं फार सोईचं! घ्या, माझी शरणचिठ्ठी लिहून घ्या! मी मुंबादेवीप्रमाण पुण्यनगरीलाहि शरण आहे.

**टप्पू०**—मग लक्ष्मीनारायणाप्रमाणं शोभणाऱ्या या पुणेरी जोड्याला वंदन कर.

**अन्न०**—नका, मामंजी, झब्बूमामांची इतकी मानहानि करूं नका. कसं झालं तरी ते माझे मामा आहेत.

## मामा–गीत

**मामा थोर मला । नातें अंतीं प्रेमाचें । अनिवार ॥ध्रु०॥**
**नातीं जगतीं जीं असतीं । तोडुनियां तीं नच तुटतीं ।**
**नच जडती हे धागेदोरे । वारंवार ॥ १ ॥**

**टप्पू०**—ए अकलेच्या खंदका संपादका, आण त्या भुजंगरावाला पुढं !

**सत्य०**—ए भुजंग्या, चल हो पुढं ! ( त्याला पुढें खेंचतो. )

**टप्पू०**—ए भुजंग्या, तूं आपल्या काळ्या करणीनं विनाकारण सिनेमाच्या धंद्याला काळीमा लावलास, म्हणून स्वतःच्या तोण्डांत थप्पड मारून घेऊन पश्चात्ताप व्यक्त कर आणि अन्नपूर्णादेवीच्या पायांवर मस्तक ठेव.

**भुजंग०**—हे माते अन्नपूर्णादेवि, मी पुरता शुद्धीवर आलों. मी तुझ्या चरणीं मस्तक ठेवतों, मला क्षमा कर. ( तसं करतो. )

**अन्न०**—हं, हं, उचला वर डोकं, नाहीं तर मस्तकाला पुणेरी प्रसाद लागेल !

**भुजंग०**—आतां आपणां सर्वांनाच पश्चात्ताप झालेला आहे. तेव्हां आपण असं करूं या. मी एक लाख रुपये भांडवल आनंदरावाच्या व अन्नपूर्णादेवीच्या स्वाधीन करतों, त्यांतून यांनीं फिल्म कंपनी काढावी, व जोड्यानें नायक-नायिकांचीं कामें करून सिनेमाच्या कलेला उच्च दर्जा प्राप्त करून द्यावा. हा कुलीन व सुविद्य पुणेरी जोडा बोलपटांत चमकेल तर फार मौज उडेल. या फिल्म कंपनीचा सारा व्यवहार कांटेकोर व्यवहारकुशल जे टप्पूकाका त्यांनीं पहावा. विद्वान् झब्बूमामांनीं 'मुंब्रासुंदरी' या नांवाचें सुंदर कथानक लिहावं आणि सत्यमूर्तींनीं आपल्या तडाखेबंद विक्रीच्या सडेतोड पत्रांतून दणकेबाज जाहिराती कराव्या !

**सत्य०**—तें काम माझं ! माझं सडेतोड पत्र तसंच [illegible] दणदणीत, खणखणीत आणि ठणठणीत आहे !

अन्न०—असो, शेवट गोड झाला आणि पुणे व मुंबई हा खोटा भेद लयाला गेला म्हणून पुण्यातूनच आपण मुंबासुंदरीला प्रणाम करू या. मुंबासुंदरीच्या कृपेनें पुणें विरुद्ध मुंबई आणि मुंबई विरुद्ध पुणे हे पापमूलक आणि आत्मघातकी भेद कायमचे नष्ट करण्याची सुबुद्धि महाराष्ट्रीयाना होवो, हीच आमची प्रार्थना आहे.

## प्रार्थना-गीत

**जय जय जय मुंबापुरी। वंदितों तुला ।। नाहिं तुझ्या विभवाला जगतिंहि तुला ।। ध्रु० ।। भाग्य थोर पुण्य थोर। नव विचारि मन उदार। पुण्यनगरी तव भगिनी। गमत प्रेमला ।। १ ।। भेदभाव जणुं कुठार। हानि करिल ती अपार ।। त्यजुनि त्वरें सकलांच्या वाढवा बला ।। २ ।।**

